॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# श्रीथोरलेस्वामीमहाराज

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क ३ )

– खण्ड चवथा –




–: लेखक :–

द. सा. मांजरेकर

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए. पीएच्. डी.

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

॥ गुरु हा संतकुळींचा राजा ॥
॥ गुरु हा प्राणविसावा माझा ॥

केशव रामचंद्र जोशी

दि. २०।६।१९८८

॥ श्रीगुरु:शरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥



# श्रीथोरलेस्वामीमहाराज

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

### ( उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क ३ )

### – खण्ड चवथा –




–: लेखक :–

द. सा. मांजरेकर

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए.; पीएच्. डी.

प्रकाशक :
व्यवस्थापक,
सिद्धयोग प्रकाशन,
२६।२०२ लक्ष्मीनगर, पुणे ९-
पिन ४११ ००९

★

मुद्रक :
ज. प. खरे
आदित्य मुद्रण,
१४४२ शुक्रवार पेठ, पुणे २.
पिन ४११ ००२

★

प्रकाशनकाल :
प्रथमावृत्ती – १९८९

★

★ मूल्य ६० रुपये ★

## -: नमन :-

श्रीवासुदेवा जगत्पालका। जय विधे जगत्कारका।
जय शंभो जगत्तारका। चित्तहारका तुज नमो ॥ १ ॥
तूंची आर्यसंरक्षक। तूंची अनार्यशिक्षक।
तूंची हें ग्रंथकौतुक। करविसी लोक तारावया ॥ २ ॥
परात्पर परंज्योती। तूंची परब्रह्ममूर्ती।
कोण जाणे तुझी गती। स्वयंज्योती तूं श्रीदत्त ॥ ३ ॥
विविध धर्मान्वित। ज्ञानभक्तिरसभरित।
असे हे श्रीवासुदेव चरित। मूर्तिमंत अमृत कीं ॥ ४ ॥
विहार तुझा स्वभक्त हृदयांत। तूं भक्ताधीन सतत।
केशव मागतो पसरून हात। ह्या ग्रंथीं सतत सान्निध्य ठेवी ॥५॥



## -: समर्पण :-

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक भक्तवत्सल भक्ताभिमानी भक्त-कामकल्पद्रुम भक्तहृदयनिवासी राजराजेश्वर श्रीसद्‌गुरुनाथवासुदेव-स्वरूप श्रीमन् शक्तिपातयोगाचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीयुक्त श्रीसमर्थ सकलसंतश्रेष्ठ श्रीसद्‌गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणी-महाराज यांच्या परमपवित्र व परमकोमल चरणी कोटी कोटी साष्टांग दण्डवत् प्रणाम करून परमप्रेमपूर्वक व परमशरणागती-पूर्वक सादर समर्पण.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

# —: श्रीसद्‌गुरुध्यान :—

नमः श्रीवासुदेवाय यतये सर्वसाक्षिणे ।
मोहध्वान्तविनाशाय सच्चिदानन्दरूपिणे ॥ १ ॥
श्रीवासुदेवं मनुजावतारं ।
सुरासुरैर्वंदितपादपद्मं ।
नित्यं विभुं सर्वगतं ह्यनन्तं ।
वन्दे यतीन्द्रं वरदं त्र्यधीश्वरम् ॥ २ ॥



# ॥ श्रीसद्‌गुरुचरणी विज्ञापना ॥

वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ।
न मनीं इच्छीं त्वद्‌भजनाविण, परिसे बा सदया ॥ ध्रु. ॥
तव पदकमळीं मन हें माझें, रंगुनियां जावें ॥
विषयविलासीं निरास होउनि, प्रेमें तव गुण गावे ॥
वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥ १ ॥
बुद्धींद्रियगणचालक भासक, असशी तूं देवा ॥
तरि मच्चित्ता त्वत्पदसक्ता, दे भजनामृतमेवा ॥
वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥ २ ॥
घडो निरन्तर सन्तसमागम, वदनीं राहो नाम ॥
त्वत्पदकमळीं सीतारामा, सदैव दे विश्राम ॥
वासुदेवयतिराया पायां पडतों मी सखया ॥ ३ ॥

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीशिववामनाय नमः ॥

## प्रस्तावना :—

# ॥ श्रीसद्गुरुप्रार्थना ॥

नमस्तुभ्यं भगवते वासुदेवाय महात्मने ।
जगदुत्पत्तिनाशानां हेतवे मोक्षहेतवे ॥ १ ॥
सर्वदेवाधिदेवाय अन्नपूर्णापतये नमः ।
ऋषियोगिमुनीन्द्राणां त्वमेव परमा गतिः ॥ २ ॥
सर्वपापं प्रशमय सर्वतापं निवारय ।
दुःखं हर हराशेषं मृत्युं विद्रावय द्रुतम् ॥ ३ ॥
त्वदर्चनविधिं जाने न भक्तिस्त्वयि मे हृदि ।
अथाप्यनुग्रहाणेश केवलं दययोद्धर ॥ ४ ॥

* * *

श्रीवासुदेवानन्दसरस्वती । भगवान् स्वयें दत्तमूर्ती ॥
समर्थ सद्गुरु पावनकीर्ती । चक्रवर्ती योग्यांचे ॥ १ ॥
नास्तिकांचे उग्रकाळ । आस्तिकांचे बाप कृपाळ ॥
भक्ततारक दीनवत्सल । प्रणतपाळ महात्मे ॥ २ ॥
ज्यांनी धर्म संस्थापिला । प्रचंड ग्रंथसमूह रचिला ॥
लोक भक्तिपंथा लाविला । उद्धरिला आत्मबोधें ॥ ३ ॥

श्रीमान् शक्तिपातयोगाचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीसन्त सद्गुरु श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या असीम व लोकोत्तर

प्रेमकृपाशीर्वादबलाने, आज त्यांचे श्रीसमर्थ सद्‌गुरू "श्रीथोरले-स्वामीमहाराज" अर्थात् अनन्त कोटी ब्रह्माण्डनायक राजाधिराज श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बे-स्वामीमहाराज यांच्या विस्तृत व खण्डशः प्रसिद्ध होणाऱ्या चरित्राचा चवथा खण्ड अर्थात् उत्तरार्ध–सिद्धखंड–क्रमाङ्क तीन हा प्रसिद्ध होत आहे, ही परमभाग्याची गोष्ट आहे.

"श्रीथोरलेस्वामीमहाराज" या खण्डात्मक चरित्रग्रंथाच्या-पहिल्या खण्डाच्या प्रस्तावनेत कथन केल्याप्रमाणे हे "श्रीवासुदेव-माहात्म्य" किंवा "श्रीवासुदेवमहापुराण" असून या महा-पुराणाच्या पहिल्या खण्डात श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र माणगाव येथे जन्म झाल्यापासून म्हणजे शके १७७६ अर्थात् इ. स. १८५४ ते त्यांनी श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे दंडग्रहण केला म्हणजे शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ पर्यन्तचा जीवनवृत्तान्त कथन केला आहे. अर्थात् प्रथम खण्डात श्रीस्वामीमहाराजांच्या वयाच्या ३६ व्या वर्षा-पर्यन्तची सर्व हकीकत आली असून एक प्रकारे त्यांच्या जीवनाच्या पूर्वार्धातील साधनकाळातील वृत्तान्त यात सामाविलेला आहे. श्रीस्वामीमहाराजांनी वयाच्या ३६ व्या वर्षी ज्यावेळी श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे दण्ड ग्रहण केला त्यावेळी त्यांना श्रीदत्तप्रभूंनी अशी आज्ञा केली की, "आज सर्वत्र वर्णाश्रमधर्माचा लोप झालेला आहे; तरी यापुढे सर्व भरतखंडात पायीच संचार करून सर्व लोकांना उपदेश करावा व धर्ममार्गाची स्थापना करून ईश्वरनिष्ठा व स्वधर्मनिष्ठा जागृत करावी." या आज्ञेचे श्रीक्षेत्र उज्जयिनी येथ-पासून पालन करता करता वयाच्या ६० व्या वर्षी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे समाधी घेईपर्यन्त त्यांचे एकूण २३ चातुर्मास झाले. त्यातील शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ ते शके १८२६ अर्थात् इ. स. १९०४

पर्यन्तच्या १४ चातुर्मासांचा म्हणजे त्यांच्या वयाच्या ५० व्या वर्षांपर्यन्तचा काळ दुसऱ्या खण्डात अर्थात् "उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क १" यात कथन केला असून शके १८२७ अर्थात् इ. स. १९०५ च्या १५ व्या चातुर्मासापासून शके १८३० अर्थात् इ. स. १९०८ च्या १८ व्या चातुर्मासापर्यन्तचा म्हणजे वयाच्या ५५ व्या वर्षांपर्यन्तचा काळ तिसऱ्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध– सिद्धखण्ड–क्रमाङ्क २" यात चित्रित केला आहे. प्रस्तुत चवथ्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध– सिद्धखण्ड– क्रमाङ्क ३"मध्ये शके १८३१ अर्थात् इ. स. १९०९ च्या १९ व्या चातुर्मासापासून शके १८३२ अर्थात् इ. स. १९१०–११ च्या २० व्या चातुर्मासापर्यन्तचा म्हणजे वयाच्या ५७ व्या वर्षांपर्यन्तचा काळ चित्रित केला आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या सिद्ध जीवनातील कितीतरी महत्त्वाचे, अपूर्व, अभ्यसनीय, आदर्शकारी व मनोहारी पैलू या चवथ्या खण्डात कथन केलेल्या त्यांच्या जीवनात प्रकट झालेले दिसून येतात. त्यातील काही मनोज्ञ पैलूंचे दिग्दर्शन केले; तर ते सर्व साधक–भक्तांना आपले जीवन आदर्शवत् सुंदर करण्यासाठी उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

प्रस्तुत चरित्राच्या चवथ्या खण्डात श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनात प्रकट झालेला सर्वात् महत्त्वाचा पहिला पैलू "देवभक्तांचे ऐक्य" हा असून यालाच शास्त्रीय परिभाषेत "सामरस्य किंवा महामिलन" असे म्हणतात. देवभक्तांच्या किंवा सिद्ध-साधकांच्या जगतातील हे ऐक्य किंवा सामरस्य एक अत्यंत गहन– गंभीर व गूढ असे रहस्य आहे. श्रीसंततुकाराममहाराजांनी "देव ते संत, संत ते देव" व "भक्त तोचि देव, देव तोचि भक्त," असे म्हणून हे रहस्य प्रकट केले आहे. या दृष्टीने श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील या

रहस्याचा उलगडा होण्यासाठी श्रीसंततुकाराममहाराजांचे पुढील दोन अभंग मनन करण्यासारखे आहेत.

देव ते संत, संत ते देव। निमित्य त्या प्रतिमा ॥ १ ॥
मी तों सांगतसें भावें। असो ठावें सकळां ॥ २ ॥
निराकारी ओस दिशा। येथें इच्छा पुरतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे रोकडें केणें। सेवितां येणें पोट धाय ॥ ४ ॥

  

देवासी अवतार भक्तांसी संसार। दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥
भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें। देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ २ ॥
देवें भक्तां रूप दिलासे आकार। भक्तीं त्यांचा पार वाखाणिला ॥३॥
एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण। देवभक्तपण स्वामीसेवा ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव। भक्त तोचि देव,देव तोचि भक्त ॥५॥

  

अर्थ :— जे देवाच्या स्वरूप लक्षणाने युक्त असतात ते संत होत. त्यामुळे संतच देव असतात; कारण देव व संत या दोघांच्या आकारातच भेद असतो आणि तो आकार देखील उपाधीच्या निमित्ताने भासतो. ॥ १ ॥ ही गोष्ट सर्वांना कळावी म्हणून मी हे मोठ्या भक्तिभावाने सांगत आहे. ॥ २ ॥ देवाच्या निराकार स्वरूपाच्या ठिकाणी जीव, जगत् व ईश्वर या त्रयींचा अत्यंताभाव असल्यामुळे तेथे देश, काल व वस्तू इत्यादि कोणत्याही गोष्टींचा परिच्छेद नसतो. ही सर्व इच्छा संपलेली अशी स्थिती असल्यामुळे तेथे कोणतीच इच्छा पूर्ण होत नाही; परन्तु संतांजवळ साधकांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. ॥३॥ श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, संतांच्या जवळ साक्षात् अनुभूती देणारे साधन असल्यामुळे ते साध-

काला भोग व मोक्ष हे दोन्ही देऊन त्यांचे इहपर कल्याण करतात. त्यामुळे साधक संतुष्ट होतात. ॥ ४ ॥

देवाच्या जन्माला " अवतार " असे म्हणतात आणि भक्ताच्या जन्माला " संसार " असे म्हणतात; परंतु विचार केला की, या दोन्ही गोष्टी एकाच प्रकारच्या आहेत हे लक्षात येते. ॥ १ ॥ देवाच्या संगतीने भक्तांना सुख होते व भक्तांच्या संगतीत देव सुख भोगतो. ॥ २ ॥ देवाने भक्तांना नामरूपे दिलेली असतात आणि भक्ताने देवाला आकार देऊन त्याचा महिमा वर्णिलेला असतो. ॥३॥ एकाच स्वरूपावर देव आणि भक्त ही दोन रूपे माया आणि अंतः-करण या दोन उपाधींमुळे निर्माण झालेली असून त्यांपैकी " देव " हा " स्वामी " व " भक्त " हा " सेवक " असा कल्पित स्वामी-सेवकपणाही निर्माण झाला आहे. ॥ ४ ॥ श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की, देव आणि भक्त यांच्यात परमार्थतः भेद नाही. त्यामुळे भक्त तोच देव आणि देव तोच भक्त होय. ॥ ५ ॥

शास्त्रकारांनी उपरोक्त भावार्थाचे रहस्य प्रकट करताना असे म्हटले आहे की, " परमेश्वरच आपल्या स्वरूपाला दोन अंशात विभक्त करून स्वतःच देव व भक्त आणि गुरू व शिष्य अशी दोन रूपे ग्रहण करतो. या कल्पित देव-भक्त किंवा गुरु-शिष्य भावाच्या आधारानेच परमेश्वर गुप्तज्ञान प्रकट करीत असतो. वास्तविक पाहता देव किंवा गुरू कोण आहे आणि भक्त किंवा शिष्य कोण आहे ? हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. याचे खरे उत्तर असे आहे की, अद्वयमार्गामध्ये परमार्थसत्तारूप संविद् अर्थात् अनादि आत्मसत्ता हीच सर्व काही असल्यामुळे प्रश्न विचारणारा किंवा भक्ती करणारा शिष्य अगर भक्त आणि उत्तर किंवा मुक्ती देणारा

गुरू किंवा देव यांच्यामध्ये वास्तविक भेद नाही. पारमार्थिक आणि पूर्ण स्वभावयुक्त अशी ब्रह्मवस्तू संविदात्मक अर्थात् शक्तियुक्त असल्यामुळे ती परा, पश्यंती व मध्यमा या वाणींना स्पर्श करीत शेवटी वैखरी वाणीत प्रकट होते. ही स्वसंविद् हीच संकुचित होऊन प्रमातृरूपाने म्हणजे ज्ञान ग्रहण करण्याच्या रूपाने अर्थात् शिष्याची किंवा भक्ताची भूमिका प्रकट करीत प्रष्ट्री म्हणजे प्रश्न किंवा भक्ती करणारी होते. त्यामुळे संविद् हीच प्रश्न करणारी किंवा भक्ती करणारी असते. त्यामुळे प्रश्न आणि उत्तर, शिष्य आणि गुरू, संशय आणि निश्चय किंवा भक्त आणि देव या सर्व गोष्टी संविन्मात्रच असतात. या दृष्टीनेच श्रीअभिनवगुप्ताचार्य यांनी " तंत्रालोक " या ग्रंथात असे म्हटले आहे की,

> गुरुशिष्यपदेऽप्येष वेद्यभेदोऽप्यतात्त्विकः।
> प्रष्ट्री च प्रतीवक्त्री च स्वयं देवी व्यवस्थिता ॥ १.२५६ ॥

या दृष्टीने भगवान् श्रीदत्तात्रेय व श्रीस्वामीमहाराज यांच्या लीलांकडे पाहिले म्हणजे त्यांच्या अप्राकृत अशा अंतरंग भक्तिसंबंधां-वर चांगलाच प्रकाश पडून त्यातील रहस्य ज्ञात होण्यास मदत होते. या प्रकाशात पृष्ठ १०३ ते १०६ वर जो देव-भक्तांचा कलह चित्रित झाला आहे तो पाहण्यासारखा आहे. त्याचप्रमाणे देव-भक्तांच्या या अंतरंग लीलेमध्ये श्रीस्वामीमहाराज देव व भक्त अशा उभयविध भूमिकेत दृग्गोचर होत असल्याचे व त्यात लीलया वावरत असल्याचे प्रतीत होते. ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज करुणासागर व भक्तवत्सल म्हणून दिसतात त्यावेळी आपल्याला त्यांची, श्रीपाद-श्रीवल्लभ व श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज या दोन श्रीदत्ता-वतारानन्तर झालेल्या व पुराणांतरी वर्णन केलेल्या " योगिराज " या नावाच्या तृतीय श्रीदत्तावताराची, प्रचीती आल्याशिवाय राहात

नाही. (पृ. २२७) मात्र ज्यावेळी देवांच्या भक्तिप्रेमाने ओथंबून जाऊन त्यांच्या डोळ्यांमधून अश्रुपात होतो व ते देवांच्या दीन-वत्सलतेचे वर्णन करतात त्यावेळी उच्चतम भक्त कसा असतो हे "सा काष्ठा सा परागतिः।" या न्यायाने एक महान् आदर्शच सर्व साधकांपुढे उपस्थित होतो, यात काहीच शंका नाही. (पृ. २२८ ते २३४) अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे देव व भक्त या उभयविध रूपात दर्शन घेणे व देवभक्तांच्या अंतरंग लीलेत प्रवेश करून अप्राकृत भक्तीची अल्पशी झलक अनुभविणे हा मोठा मनोहारी व आनंददायक प्रत्यय आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा दुसरा महत्त्वाचा पैलू, "पांडि-त्याने व शास्त्र अगर संस्कृत शिकल्याने मोक्षप्राप्ती होत नसून, ती श्रीसद्गुरूंनी दिलेले साधन केल्यानेच होते," या त्यांच्या शिकव-णीतून स्पष्ट होतो. या दृष्टीने श्री. नरहरी दिवाण अर्थात् पुढे प्रसिद्ध पावलेले अष्ट्याचे श्रीदत्तमहाराज यांची कथा अत्यन्त वाचनीय अशी आहे. (पृ. २०८ ते २१८) त्याचप्रमाणे श्री. साधले-शास्त्री यांचीही कथा या पैलूवर प्रकाश पाडणारी असल्यामुळे मोठी अभ्यसनीय आहे. ( पृ. १८४ ते १८६ )

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा तिसरा महत्त्वाचा पैलू धर्म-जागृती अर्थात् वर्णाश्रमधर्माचीं पुनर्स्थापना, समाजकल्याण, लोक-प्रबोधन व लोकोद्धार हा आहे. या हेतूच्या सिद्धीसाठी त्यांनी कीर्तन, प्रवचन व पुराण या सर्व गोष्टी प्रभावी साधन म्हणून वापरल्या. आपल्या या उद्देशाची पूर्ती व्हावी म्हणून त्यांनी श्री. बाळशास्त्री दशपुत्रे यांना स्वतःहून कीर्तनासाठी नवीन नवीन आख्याने लिहून दिली ( पृ.५४ ) व श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे विद्यार्थ्यांना पुराण सांगावयास व कीर्तन करावयास लावून ते स्वतः ऐकावयास बसत

असत. ( पृ. २३९ ) आजच्या या घोर कलियुगात श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी म्हटल्याप्रमाणे "कळीं गिळितयां जिवां ॥ ज्ञानेश्वरी १८.१७६०॥" अशी सर्व जीवमात्रांची स्थिती असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या या दृष्टिकोनाचा समाजधुरिणांनी किती साक्षेपाने विचार करावयास पाहिजे हे ध्यानात येते.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा चवथा महत्त्वाचा पैलू "अपार योगसामर्थ्य" हा आहे. या दृष्टीने पवनीच्या चातुर्मासात झालेले गावभोजन (पृ. १४–१५), श्री. नानाशास्त्री दशपुत्रे यांना त्यांच्या घरातच असलेल्या; पण त्यांना माहीत नसलेल्या पुस्तकाचे ठिकाण आपल्या दिव्यदृष्टीने सांगणे ( पृ. ५३–५४ ) व हावनूर येथे एका मुक्या मुलाला पंक्तीत श्लोक म्हणावयास सांगून त्याला वाचा देणे ( पृ. ३२६–३२७ ) इत्यादि सर्व प्रसंग पाहण्यासारखे आहेत.

श्रीस्वामीमहाराजांना "भजनाची अत्यंत आवड" होती. त्यात ते इतके तल्लीन होत असत की, त्यामुळे त्यांचे देहभान हरपून जात असे. श्रीसंततुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणे "नाम उच्चारिता कंठीं। पुढे उभा जगजेठी ॥" या न्यायाचेच त्यांचे भजन होते यात काहीच शंका नाही. ( पृ. २५ ) या दृष्टीने श्रीकृष्णावेणीची मूर्ती पाहिल्याबरोबर डोळ्यातून अश्रुपात सुरू होणे (पृ. २२८ ), श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील श्रीपादुकांपुढे धूप पडल्यावर व घंटानाद सुरू झाल्यावर डोळ्यातून प्रेमाश्रुधारा वाहू लागणे ( पृ. २२९–२३० ) इत्यादि प्रसंग वाचले म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने भगवद्भक्ताचा व भगवद्भक्तीचा महान् आदर्श आपल्या मनःचक्षूंसमोर उभा राहिल्याशिवाय राहात नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील सहावा महत्त्वाचा पैलू "शास्त्रनिष्ठा" हा आहे. श्रीसंततुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणे

"अधिकार तैसा करूं उपदेश।" व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे "शास्त्र म्हणेल जें सांडावें। तें राज्यही तृण मानावें। जें घेववी तें न म्हणावें। विषही विरु॥ १६.४६०–ज्ञानेश्वरी॥" अशीच त्यांची या बावतीत धारणा होती. त्यामुळे अधिकारी व्यक्तींनाच वेदान्त सांगणे (पृ. ३८), कीर्तनात श्रुतिवाक्य म्हणावयाचे नाही (पृ. ५४–५५), ऋषिप्रणीत ग्रंथांशिवाय अन्य ग्रंथांचा स्वाहाकार करावयाचा नाही (पृ. ७९), श्रीगुलाबरावमहाराज स्त्रीवेष घेतात म्हणून त्यांना दर्शन द्यावयाचे नाही (पृ. १०६ ते १११), सौ. गोदावरीचे मुलात रूपान्तर झाल्यावर त्याच्यावर सर्व संस्कार करणे (पृ. १७० ते १७२) इत्यादि सर्व प्रसंग या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत.

श्रीस्वामीमहाराज शिष्यांच्या आध्यात्मिक प्रगतीसाठी अत्यंत जागृत असत. त्यांच्या जीवनातील हा सातवा पैलू अत्यन्त स्पृहणीय असा आहे. आपल्या शिष्यांनी अहिंसा, निर्वैरत्व, सत्य इत्यादि सर्व यम–नियमांचे कटाक्षाने पालन करून, ते आपल्या जीवनात उतरवून, त्यांनी आपले जीवन भव्य, उदात्त व लोकसंग्रहोपयुक्त असे आदर्शवत् बनवावे अशी त्यांची धारणा होती. पवनी येथे श्रीगांडामहाराज श्री. थत्ते यांना रागाने बोलले म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी स्वप्नात श्रीगांडामहाराजांच्या थोबाडीत मारून त्यांना उपदेश केला. (पृ. ५८–५९) या दृष्टीने त्यांना अभिप्रेत असलेले साधनसंपत्तीच्या आवश्यकतेचे प्रतिपादनही लक्षात घेण्यासारखे आहे. (पृ. ६२ ते ६६) श्रीसद्गुरुनाथमहाराजांना हावनूर येथे मंत्रदीक्षा, प्राणायाम व योगासनांचे शिक्षण, गीता व विष्णुसहस्रनामाची संथा व श्रीदत्तात्रेयांच्या स्वरूपात दर्शन देणे इत्यादि सर्वच भाग या दृष्टीने अत्यन्त मननीय असा आहे. (पृ. ३०७ तें ३२०)

श्रीस्वामीमहाराज हे प्रखरतम वैराग्यसंपन्न असे पराकोटीचे थोर संन्यासी होते. त्यांच्या सारखे संन्यासधर्माचे शास्त्रपूत आचरण करणारा, परमवैराग्यशील आणि परमविरक्त असा महान् संन्यासी उभ्या भारतवर्षात श्रीमदाद्यशंकराचार्यांनन्तर दुसरा कोणाही झाला नाही असा निर्वाळा आसेतुहिमाचल पसरलेल्या भारतातील सर्व शास्त्री, पंडित, भक्त व महात्मे मंडळींनी एकमुखाने दिला आहे. या दृष्टीने गलगली येथे एका बाईंनी आपला मुलगा त्यांच्या कृपेने बरा व्हावा म्हणून त्यांना केलेल्या नवसाप्रमाणे ११०० रुपये दक्षिणा दिल्यावर त्यांनी ती स्वीकारली नाही ( पृ. ३७८ ) व श्रीक्षेत्र कुरुवपूर येथे जाताना ताक व भिक्षा न मिळाल्यामुळे होणारे हाल सहन केले ( पृ. ३८९ ते ३९२ ) हे प्रसंग पाहण्यासारखे आहेत.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील नववा महत्त्वाचा पैलू "शिष्यप्रेम" हा आहे. यादृष्टीने श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामी-महाराज ( पृ. १३१, पृ. १५७ ते १६१ ), श्रीसीतारामहाराज ( पृ. १३८ ते १४३ ), श्रीगांडामहाराज ( पृ. १४६ ते १४९ ) व श्रीगुळवणीमहाराज ( पृ. ३०६ ते ३२५ ) या सर्व शिष्यांच्या बाबतीत जे सर्व प्रसंग घडले ते सर्वच प्रसंग अत्यंत भावस्पर्शी असून "ते गुरुशिष्याची गोठी। पर्दापिडाची गांठी ॥ ३.२७२ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सांगितलेल्या न्यायाने, ही जीव– शिवाच्या ऐक्याची अर्थात् गुरु– शिष्याच्या ऐक्याची गुह्य गोष्ट आहे, हे नितान्त सिद्ध आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा दहावा महत्त्वाचा पैलू "साधन– संपत्तीचा आग्रह" हा आहे; कारण त्यांचे सर्व आयुष्यच "साधनसंपत्तीशिवाय समस्त परमार्थ व्यर्थ होय," या सिद्धान्ताचा परमादर्श उपस्थित करणारे असून त्यात त्यांनी उभ्या आयुष्यात

इतर कोणाशीही व कसलीही तडजोड केली नाही. एवढेच नव्हे; तर या बाबतीत त्यांनी स्वतःशीही कधी तडजोड केली नाही किंवा स्वतःचा कधी अपवादही केला नाही. ज्या साधकांना अध्यात्मात प्रगती करावयाची आहे व ज्यांना अंतिम ध्येयसिद्धी गाठावयाची आहे त्यांनी त्यांचा हा आग्रह आपल्या उराशी बाळगूनच साधनाची वाटचाल करणे आवश्यक आहे. साधकांनी जर असे केले नाही तर अध्यात्माची अंतिम सिद्धी ही खपुष्पाप्रमाणे कल्पनीय व व्यर्थ ठरल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीने श्री. दत्तुशास्त्री साधले यांना सोमयागाच्या निमित्ताने केलेला यमनियमांचा उपदेश वारंवार मनन केला पाहिजे. ( पृ. १७२ ते १८२ )

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील अकरावा महत्त्वाचा पैलू "भक्तांच्या पारमार्थिक प्रगतीसाठी त्यांच्या ऐहिक सुधारणेवर भर," हा आहे. या दृष्टीने या खंडातील कितीतरी प्रसंग पाहण्यासारखे आहेत. श्री. तात्याशास्त्री नगरकर यांच्या सारख्या चिकित्सक माणसानेही "श्रीस्वामीमहाराज हजारो लोकांची सांसारिक दुःखे दूर करून त्यांना परमार्थाच्या मार्गाला लावून त्यांच्या अध्यात्माची सिद्धी करून देतात हीच गोष्ट सर्वथैव योग्य आहे," असा जो निर्वाळा दिला आहे, तो पाहिला म्हणजे ऐहिक व पारमार्थिक दृष्टीने जीवमात्राच्या उन्नतीच्या दृष्टीने श्रीस्वामीमहाराजांच्या विशाल दृष्टिकोनाची व धारणेची कल्पना येऊन मन आनंदाने भरून जाते. ( पृ. २५६ )

श्रीस्वामीमहाराज "करुणासागर व भक्तवत्सल" होते. त्यांच्या जीवनातील या पैलूचे माहात्म्य अपरंपार असे आहे. या पैलूची शतशः पसरलेली किरणे त्यांच्या जीवनातील पुढील प्रसंगातून दृग्गोचर होतात. श्रीमती भागूबाई वाशीमकर यांना स्वतःहून

स्वतःच्या पादुका देणे (पृ. २८–२९), श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजाऱ्यांच्या इच्छेप्रमाणे समाधी लावून देवांकडून वाडीला जाण्याची आज्ञा घेणे (पृ. २०), पवनीला सर्वांकडून स्पर्श करून घेणे (पृ. ४२), पवनीला अंत्यजाकडून स्पर्शपूर्वक नमस्कार करून घेणे (पृ. ४९–५०), पवनीला भक्तमंडळींना प्लेगचा त्रास होऊ नये म्हणून देवांची प्रार्थना करणे (पृ. ५१–५२), श्री. बळवंतराव नाईकांकडून पाणी भरण्याची सेवा करून घेणे (पृ. ७१ ते ७४), पवनी येथे आलेल्या नवीन विचारांच्या तरुण मुलाच्या मनात दृष्टिक्षेपाने स्थित्यंतर करून भक्ती निर्माण करणे (पृ. ७६ ते ७८), एका गावातील बाईंनी प्रेमाने भिक्षा म्हणून आंबिल दिली असताना ती भर दुपारच्या उन्हातून श्रीसीतारामहाराजांकडून आणवून खाणे (पृ. ९८ ते १०२), हिंगोली येथे स्वतःच्या देहधर्मातून निवृत्त होण्याकरिता श्रीसीतारामहाराजांनी लोकांना काठीने मारले असता त्यामुळे व्यथित होणे (पृ. १११ ते ११६), गंगामसले या गावी श्री. आबासाहेब कुलकर्णी हे श्रीगोदावरीनदीमध्ये बुडून मरण पावले असताना त्यांना जिवंत करणे (पृ. ११९), श्रीमती अंबूताई व श्रीमती तुळशीताई यांना बोध करण्यासाठी अभंगनिर्मिती करणे (पृ. १६२) इत्यादि सर्वच प्रसंगातून श्रीस्वामीमहाराजांची करुणा अमर्यादपणे व्यक्त झालेली दिसते. त्याचप्रमाणे श्री. श्रीपादभट हवळे (पृ. १८६ ते १८८), एक मराठा गृहस्थ (पृ. १८८ ते १९२), श्री. धोंडोपंत कोपरकर (पृ. २०० ते २०३), श्री. पुठ्ठोपन्त कुलकर्णी (पृ. २४३ ते २४६), हवेरीचे स्टेशनमास्तर (पृ. ३२९ ते ३३१), श्री. गोविंदराव फाटक (पृ. ३३१–३३२), श्री. यज्ञेश्वर (पृ. ३३३–३३४), श्रीहेमराज मारवाडी यांच्या मातोश्री (पृ. ३३५–३३६) इत्यादि कितीतरी प्रेमी जनांवर, भक्तांवर,

साधकांवर, दुःखितांवर व व्याधिग्रस्तांवर त्यांनी त्रिविध प्रकारे व विविध पद्धतीने जी कृपा केली आहे, ती पाहिली म्हणजे त्यांच्या करुणेला व भक्तवत्सलतेला पारावार नव्हता असेच म्हणावे लागेल.

सारांश, श्रीथोरल्यास्वामीमहाराजांच्या चरित्राच्या चवथ्या खण्डात चित्रित झालेले श्रीस्वामीमहाराज म्हणजे "चंद्रमे ज अलांछन" या श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेल्या न्यायाने कलंकरहित असे शीतल प्रतिचंद्रच आहेत यात तिलःप्राय शंका नसल्यामुळे "।। ॐ नमो भगवते वासुदेवाय ।।" अशी त्यांची अखंड प्रार्थना करणे हेच संयुक्तिक होईल. या प्रार्थनेनुसार श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या सुशीतल चंद्रकिरणांच्या प्रकाशात न्हाऊन काढून आपणा सर्व साधकभक्तांचे दुरिताचे तिमिर हरण करून आपले रक्षण करावे म्हणून श्रीसीतारामहाराजांच्या शब्दात त्यांचे स्मरण व त्यांचा धावा करणे हेच योग्य ठरेल.

स्मरुं वासुदेवा, श्रीदेवाधिदेवा। परिसोनि धांवा, भजकाचा ।। १ ।।
ये बा यतिवर्या, रमेच्या तनया। श्रुतिगणगेया, गुरुवर्या ।। २ ।।
भक्ता अभयकर, सिद्धासनावर। वसे योगिवर, निरंतर ।। ३ ।।
पद्मपत्रसम, सुंदर नयन। सुस्मित वदन, मनरंजन ।। ४ ।।
सीताराम भक्ता, भेटे जो स्मरतां। हरोनी दुरिता, भक्तां रक्षि ।।५।।

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे निरंतर ध्यान व धावा केला आणि त्यांच्या महात्म्यांचे व गुणवैशिष्टयांचे वर्णन करून स्मरण केले म्हणजे आपण त्यांच्या चंद्ररूपी सुशीतल स्वरूपात विरून जाऊन जन्ममरणचक्रपरंपरेतून मोकळे झाल्यामुळे आपणाला जी अखंड आनंदाची महास्थिती प्राप्त होईल, त्याचे वर्णन करताना श्रीसीतारामहाराज असे म्हणतात की—

तुझा वास जेथें असे निरंतर । यमहि किंकर होई त्याचा ।। १ ।।
अष्टसिद्धी दासी होवोनी रहाती । योगियांची गती नाहीं जेथें ।।२।।
कामादि षड्वैरी पळोनियां जाती । आशा तृष्णा मरती भिवोनियां। ३।
ऐसा हा महिमा सद्‌गुरुकृपेचा । अनुभव त्याचा सीतारामा ।।४।।

आंता खण्डशः प्रसिद्ध होणाऱ्या या बृहत् चरित्राच्या छपाईसाठी व प्रसारासाठी ज्यांचे साहाय्य झाले व होत आहे त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे माझे कर्तव्य आहे. श्री. सूर्यकान्त काशीनाथ भावे, सौ. उषाताई सूर्यकान्त भावे, सौ. विजयाताई रघुवीर माटेगावकर, श्री. गोपाळराव सदाशिवराव खांडेकर, श्रीमती कान्ताबेन प्राणुभाई देसाई, श्री. परमानन्द नैलवाल, श्री. उत्तमराव दिनकरराव पाटील, सौ. हेमलताताई उत्तमराव पाटील, श्री. दत्तात्रेय कोंडीराम शिंदे, सौ. सुलभाताई दत्तात्रेय शिंदे, श्री. कमलाकरराव गजाननराव पाटील, श्री. दत्तात्रेय वासुदेव जोशी, श्री. हरिहर गोपीनाथ दाभाडे, श्री. बळवंत केशव जोशी, श्री. श्रीकान्त दिनकरराव खाण्डेकर, श्री. घनःश्याम बाबूराव वायंगणकर, श्री. श्रीराम गोपाळराव खांडेकर, श्री. शा. द. करंदीकर, श्री. यशवन्तराव गजाननराव ताटके, श्री. श्रीधर दिनकरराव ऊर्फ दादा खांडेकर, श्री. दादासाहेब यंदे, सौ. उषाताई कुलकर्णी, श्री. अरुणकुमार शंकरराव वाघ, डॉ. सौ. कुमुदिनीताई अरुणकुमार वाघ, श्री. दामोदर दत्तात्रेय पोळ, सौ. अनुराधाताई दामोदर पोळ, श्री. सुभाष दिनकर ऊर्फ नाना खांडेकर, श्री. सुरेश रामचंद्र मल्लापूर, श्री. हरिभाऊ नारायणराव कुलकर्णी, सौ. मीराताई हरिभाऊ कुलकर्णी, श्री. प्रभाकरराव धोंडोपंत अजोतीकर, श्री. आनंदराव कृष्णाजी पाठक, प्रा. श्री. प्रकाश मोतीराम पाटील, सौ. अनसूयाबाई मोतीराम पाटील, गं. भा. द्वारकाबाई नथ्थू चौधरी, श्री. दत्तात्रेय नारायण मोहन–पाटील, सौ. गयाबाई दत्तात्रेय

मोहन–पाटील, श्री. चंद्रकांतराव रघुनाथराव पाटील, सौ. रेखाताई चंद्रकांतराव पाटील, श्री. सुहासराव वासुदेवराव भारंबे, सौ. प्रतिभाताई सुहासराव भारंबे, श्री. शिरीष इच्छाराम चौधरी, श्री. प्रदीप पीरचंद पाटील, सौ. सखूबाई दगडू पाटील, श्री. मंगलदास शंकरराव अंजने, श्री. मधुसूदन शंकरराव अंजने, श्रीमती पद्‌मजा प्रशान्त सोनारीकर, श्री. पंडितराव रामचंद्रराव दातार (वकील), श्री. रघुनाथ राजाराम ऊर्फ अण्णासाहेब आपटे, श्री. शरद सीताराम ऊर्फ राजाभाऊ अत्रे, श्री. लक्ष्मणराव राजाराम महाजन, श्री. अरुणराव प्रभाकरराव राजे, श्रीमती विजयाताई यज्ञेश्वर पंडित, श्री. किशोर नारायणराव गोराडे, श्री. वासुदेवराव केशवराव जोशी, श्री. बबनराव देवबा लांडगे, श्री. श्रीकृष्ण सदाशिवराव महाडेश्वर, श्री. सुरेशराव रघुनाथराव पंडित, सौ. मंदाकिनीताई मराठे, श्री. दत्तात्रेय गुलाबसा क्षत्रीय, श्री. भास्कर मोरेश्वर आठवले, सौ. सुजाताताई भायदे, श्री. मुलतोजीराव दौलतराव विचारे (ॲडव्होकेट), सौ. हेमांगीताई मुलतोजीराव विचारे (ॲडव्होकेट) या व इतरही सर्व गुरुबंधू, गुरुभगिनी, साधक व प्रेमी मंडळींचे श्रीथोरलेस्वामीमहाराज यांच्या चरित्राच्या प्रकाशन कार्यासाठी अपरंपार साहाय्य झाले असून पुढील सर्व खंडांसाठी हे व इतरही सर्व प्रेमी मंडळी साहाय्य करणार आहेत, ही श्रीस्वामीमहाराजांची व श्रीगुरुचरणांची अपार कृपा आहे, यात काहीच शंका नाही. या सर्वांच्या साहाय्याविना श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राचा हा चवथा खंड छापून प्रसिद्ध होणे कदापीही शक्य झाले नसते व पुढील खंडही छापून प्रसिद्ध होणे शक्य नाही, हे नितांत सत्य आहे. या सर्वांचे हे साहाय्य अत्यंत निरपेक्ष असल्यामुळे त्यांनी केलेली ही सेवा श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्‌गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या उभयतांनी आपल्या कृपा-

प्रेमाशीर्वादाचे अखंड छत्र या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबीय मंडळींवर ठेवावे अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या चारित्राच्या या चवथ्या खंडात ज्या ज्या ठिकाणांची जी जी विविध चित्रे छापली आहेत, त्यांची सर्व छाया-चित्रे श्री. विनय मुरलीधर देशपांडे, भुसावळ, व श्री. सुहास वासुदेव-राव भारंबे, नाशिक, यांनी मोठ्या प्रेमाने, आत्मीयतेने व आपुल-कीने त्या त्या ठिकाणी स्वखर्चाने स्वतः जाऊन काढून आणून दिली. त्याचप्रमाणे या खंडात घातलेले श्रीस्वामीमहाराजांचे रंगीत छाया-चित्र माझे गुरुबंधू श्री. शा. द. करंदीकर यांनी स्वतः छापून आणून दिले आहे. या चवथ्या खंडाची छपाईप्रत माझी भाची चि. कु. राजश्री विष्णुपंत शुक्ल व माझी पुतणी चि. विजयागौरी हरिहर जोशी या दोघींनी अत्यन्त सुवाच्च अक्षरात खूप कष्ट घेऊन लिहून देऊन माझे श्रम हलके केले. श्री. द. सा. मांजरेकर यांनी जे अपरंपार कष्ट घेऊन हे चरित्र लिहिले आहे ते, त्यांची श्रीस्वामी-महाराजांच्या व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या चरणी जी दृढ निष्ठा, श्रद्धा व प्रेम आहे, त्याचे सर्वोत्तम असे प्रतीक आहे, यात तिळमात्र शंका नाही. त्याचप्रमाणे मुद्रिते वाचणे, तपासणे इत्यादि इतर सर्व कामे श्री. माधवराव धोंडोपंत अजोतीकर, श्री. शरद सीताराम ऊर्फ राजाभाऊ अत्रे आणि चि. हरिहर रामचंद्र जोशी, चि. विजयागौरी, चि. रोहिणी, चि. योगेश व चि. सौ. रमा हरिहर जोशी या सर्व घरा-तील मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांची व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची अत्यंत प्रेमाने सेवा म्हणून केली, ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. उपरोक्त सर्वांनी केलेली ही त्यांची विविध सेवा – प्रेम – भक्ती श्रीस्वामीमहाराजांनी व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी मान्य करून घेऊन, या सर्वांना व त्यांच्या कुटुंबीय मंडळींना धन्य व कृतार्थ करून

त्या सर्वांवर प्रेमकृपाशीर्वादाचे छत्र अखंड धारण करावे म्हणून या उभयतांच्या चरणी शरणागतीपूर्वक प्रार्थना आहे.

परम पूजनीय श्री. नि. अ. तथा राजाभाऊ करंदीकरमहाराज, संस्थापक, श्रीवासुदेवानन्दसरस्वती ॐ श्रीसद्‌गुरु प्रतिष्ठान, बोरिवली, त्यांचे सर्व साधक, भक्त व कार्यकर्ते, माझे गुरुबन्धू श्री. यशवन्त महादेव बाक्रे, बोरिवली, आणि श्री. दत्तात्रेय कोंडीराम शिंदे व त्यांच्या सहधर्मचारिणी सौ. सुलभाताई दत्तात्रेय शिंदे, बोरिवली, या सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या आणि श्रीस्वामीमहाराजांनी रचलेल्या इतर ग्रंथांच्या प्रसारासाठी जी अमोलिक मदत करून अपार कष्ट घेतले, घेत आहेत व घेणार आहेत त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. या बाबतीत प. पू. श्री. करंदीकरमहाराज यांचे साहाय्य हे शब्दातीत असून त्यांच्या या साहाय्याबद्दल त्यांना व त्यांच्या सर्व साधक–भक्त कार्यकर्त्यांना माझे शतशः हार्दिक धन्यवाद आहेत !

या चरित्रग्रंथाच्या चवथ्या खंडाची छपाई माझे मित्र व श्रीस्वामी-महाराजांचे सांप्रदायी श्री. ज. प. खरे यांनी हे आपले स्वतःचेच काम आहे या धारणेने व श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी आपलीही सेवा रुजू व्हावी म्हणून अत्यन्त प्रेमाने केले असून पुढील सर्व खंडांची छपाई ते मोठ्या आत्मीयतेने करून देणार आहेत, याबद्दल मी जेवढी कृतज्ञता व्यक्त करीन व त्यांना धन्यवाद देईन तेवढे थोडेच आहेत. त्यांची ही सेवा त्यांचे परमपूजनीय प्रातःस्मरणीय श्रीसद्‌गुरू श्रीनारायणमहाराज, त्यांचे सद्‌गुरू श्रीसीताराममहाराज व त्यांचे श्रीसद्‌गुरू ज्ञान व योगमूर्ती अखंडमंडलाकार श्रीथोरलेस्वामीमहा-राज या श्रीदत्तस्वरूप त्रयमूर्तींनी रुजू करून घेऊन त्यांना धन्य व कृतार्थ करावे अशी त्या सर्वांच्या चरणी नम्रतापूर्वक प्रार्थना

आहे. त्याचप्रमाणे आदित्य मुद्रणालयातील काम करणाऱ्या सर्वांचे अपरिमित साहाय्य झाले, होत आहे व होणार आहे हे नमूद करताना अत्यंत समाधान वाटत आहे. या सर्व प्रेमी कर्मचारी बंधूंना श्रीस्वामीमहाराजांनी प्रेम, कृपा व आशीर्वाद देऊन त्यांचे इहपर अखंड कल्याण करावे म्हणून त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

इत्यलम् । श्रीसरस्वतीगंगाधर यांच्या "श्रीगुरुचरित्र" ग्रंथातील शब्दात अल्पसा बदल करून असे म्हणता येईल की, "श्रीस्वामी-चरित्रामृत । सेविता तृष्णा अधिक होत ॥" हेच खरे आहे; कारण श्रीस्वामीमहाराजांचे चरित्र ही कामधेनू आहे, चिंतामणी आहे. त्यामुळे या चरित्राच्या वाचनाने श्रीसंततुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणे सर्वांच्या मनाची स्थिती झाल्याशिवाय राहणार नाही अशी खात्री आहे. ते असे म्हणतात की, "पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्य उदयाचा ठसा । झालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सावळें ॥ २ ॥ आलिंगनें संताचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तक हें पायां–। वरी त्यांच्या ठेवितां ॥ ३ ॥ तुका म्हणे धन्य झालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । पुढे भार देखोनी ॥ ४ ॥" असे हे या चरित्राचे वास्तविक वैभव असल्यामुळे श्रीगुरुचरित्र ग्रंथात म्हटल्याप्रमाणे "ज्यासी होईल श्रीस्वामीकृपा । त्यासी कैंचें दैन्य बापा । कल्पवृक्ष आश्रय करितां । विघ्न कैंचें तया घरीं ॥ १८.७० ॥ दैवें उणा असेल नरू । तेणें भजावा श्रीगुरू । तोचि पावेल पैलपारू । पूज्य होय सकळ लोकां ॥ ७१ ॥ जो कां भजेल श्रीस्वामीतें । इहपर साधे तयातें । अखंड लक्ष्मी सदनातें । अष्टैश्वर्यें नांदती ॥७२॥" अशी सिद्धी व्हावी म्हणून

श्रीस्वामीमहाराजांनी आम्हा सर्वांचा शिष्यरूपाने स्वीकार करून अनुग्रह करावा आणि आम्हा सर्व साधक-भक्तांना धन्य व कृतार्थ करावे अशी त्यांच्या चरणी शरणागतीपूर्वक अखंड प्रार्थना आहे.

श्रीगुरुचरणरजसेवक
केशव रामचंद्र जोशी



# अनुक्रमणिका





॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥



निम्नहातीं मालाकमंडलू । मध्यहातीं त्रिशूल–डमरू ।
ऊर्ध्वहातीं शंखचक्रू । तो हा महायोगेश्वर श्रीदत्तात्रेय ॥

( संदर्भ–पृ. ३२१ )

॥ श्रीदत्तगुरू भगवान्
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ॥




श्रीवासुदेवानन्दसरस्वती। भगवान् स्वये श्रीदत्तमूर्ती ॥
समर्थ श्रीसद्गुरु पावनकीर्ती। चक्रवर्ती योग्यांचे ॥

॥ भगवान् श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज ॥



दीक्षा द्यावया साधुजना । उद्धरावया भक्तजना ।
अवतरे श्रीदत्तमहाराणा । श्रीमन्नृसिंहसरस्वती शंकर ॥

॥ श्रीक्षेत्र गाणगापूर ॥



भगवान् श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या निर्गुण पादुका

## ।। योगिराज सद्‌गुरु श्रीसंत वामनरावजी गुळवणीमहाराज ।।





शक्तिपाताचा महामेरू । बहुत जनांसी आधारू ।
ब्रह्मस्थितीचा निर्धारू । शांभव योगी ।।

॥ श्रीसद्गुरु श्रीसीतारामहाराज टेम्बे ॥



सीतारामो योगिवरो ब्रह्मचारी कवीश्वरः।
गुरुपादार्पिततनुः समदृग्गुरुतांगतः॥
( समाधी – फाल्गुन शु॥ ८ शके १८४० – इ. स. १९१८
श्रीक्षेत्र वढणेरी, जि. अमरावती )

॥ श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज ॥



प्रकटोनी या धरेवरती। निजजनोद्धार करती।
शांत दांत मुनिस्वामी। ते हे नृसिंहसरस्वती यती ॥

| जन्म—चैत्र शुद्ध १, शके १७८८ इ. स. १८६६ | समाधी आश्विन वद्य ७, शके १८४९ इ.स. १९२७, अयोध्या |
|---|---|

॥ श्रीक्षेत्र गुंज ॥

॥ श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य

श्रीयोगानन्दसरस्वतीस्वामी ऊर्फ श्रीगांडामहाराज ॥



यो वै भूमा तत्सुखं त्वेतिगीतं गेयातीतं ध्यानगम्यं मुनींद्रम् ।
भवतैकार्यं ह्यात्त मानुष्यमूर्ति योगानन्दं तं यतीन्द्रं नतोऽस्मि ॥

जन्म शके–१७९० इ. स. १८६८ मार्गशीर्ष शुद्ध १५, श्रीक्षेत्र तलंगपूर

समाधी शके–१८५० इ. स. १९२८ फाल्गुन वद्य १२, श्रीक्षेत्र गुंज



श्रीक्षेत्र पवनी येथील श्रीविठ्ठल मंदिरातील श्रीस्वामीमहाराजांच्या बसावयाच्या जागेवर ठेवलेला त्यांचा फोटो व पाट. (पृ. ९२–९३)



श्रीक्षेत्र पवनी येथील श्रीदत्तमंदिरातील श्री. ब्रह्मचारी योगीवर श्रीसीतारामाहाराज टेंबे यांची प्रतिमा.




श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मासात श्री-स्वामीमहाराज ज्या ओट्यावर बसत असत तेथे बांधलेल्या मंदिरातील त्यांची प्रतिमा. (पृ.९२-९३)



श्रीक्षेत्र पवनी येथे श्रीस्वामीमहाराज श्रीदत्तमंदिरामागील ज्या औदुंबर वृक्षाखाली बसत असत ती जागा.

(पृ. ३३–३४)



श्रीक्षेत्र पवनी येथील श्रीदत्त-
मंदिरातील श्रीदत्तमूर्ती,
( पृ. ९४ )



श्रीक्षेत्र पवनी येथील
श्रीदत्तमंदिरात स्थापन
केलेले श्रीदत्तयंत्र आणि
त्यावरील श्रीस्वामीमहा-
राजांच्या पाषाणाच्या
पादुका. ( पृ. ९३ )

श्रीक्षेत्र हावनूर



श्रीक्षेत्र हावनूर येथील श्रीतुंगभद्रानदीचे विहंगम दृश्य. (पृ. ३१०)

श्रीक्षेत्र पवनी



श्रीक्षेत्र पवनी येथील श्रीमुरलीधराच्या मंदिरातील राधा-कृष्णाची मूर्ती. (५१-५२)



श्रीक्षेत्र हावनूर येथील श्रीस्वामीमहाराजांची २० किलो वजनाची पितळेची मूर्ती



श्रीक्षेत्र हावनूर येथील श्रीस्वामीमहाराजांच्या पितळेच्या मूर्तीची महापूजा केल्यावर मखरात बसविलेली त्यांची वस्त्रालंकारयुक्त मूर्ती.

श्रीक्षेत्र हावनूर



श्रीक्षेत्र हावनूर येथील श्रीस्वामीमहाराजांची पितळी मूर्ती व त्यांच्या पादुका.

श्रीक्षेत्र हावनूर



श्रीक्षेत्र हावनूर येथील भक्तमंडळींना श्रीस्वामीमहाराजांनी प्रसाद म्हणून दिलेल्या स्वतःच्या पादुका.



श्रीक्षेत्र हावनूर येथे श्रीस्वामीमहाराजांचा विसावा चातुर्मास जेथे झाला ते श्रीत्रिपुरान्तकेश्वर शंकराचे मंदिर. ( पृ. २९४ )



श्रीक्षेत्र हावनूर येथे श्रीगुळवणीमहाराज यांना मंत्रदीक्षा झालेली व त्या मंत्राचे जपानुष्ठान केलेली श्रीत्रिपुरान्तकेश्वर मंदिरातील डाव्या हाताची जागा. ( पृ. ३११ )



श्रीक्षेत्र हावनूर येथील भक्तमंडळींना श्रीस्वामीमहाराजांनी दिलेली आपली प्रसादाची छाटी.



श्रीक्षेत्र हावनूर येथील श्रीत्रिपुरान्तक महादेवाच्या मंदिराच्या भिंतीवर काढलेले श्री चिदंबर दीक्षितांचे चित्र.

( संदर्भ – खण्ड ३ पृ. २४२–२४३ )

॥ श्रीगुरु:शरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# ❀ श्रीथोरलेस्वामीमहाराज ❀

## श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध– सिद्धखण्ड– क्रमाङ्क ३ )

## – खण्ड चवथा –

## – अध्याय विसावा –

गुरुराया दत्तात्रेया । आठवितों तुझिये पाया ॥ ध्रु० ॥
जरि नेणें भजन उपाया । परि धरिलें तुझिये पाया ॥
जरि हरिशी तूं न अपाया । लाज ही तुझिये पाया ॥

॥ चाल ॥

गुरुराया सखया आतां । सदया शिरिं धरिं वरहस्ता ॥
तुजवांचुनि ऐशा पतिता । उद्धरील कोण जगीं या ॥
गुरुराया दत्तात्रेया । आठवितों तुझिये पाया ॥ १ ॥
मी झालों अतिशय कष्टी । एकवेळ मजवरि दृष्टि ॥
उघडुनियां करुणावृष्टी । करिं जेणें होइल तुष्टी ॥

॥ चाल ॥

व्यष्टि समष्टि ही सकळ । सृष्टि स्थिति हे तव खेळ ॥
पुष्टि दे तूं केवळ विमळ । चेष्टित तव नेणों अपाया ॥
गुरुराया दत्तात्रेया । आठवितों तुझिये पाया ॥ २ ॥

पाप ताप दैन्य विनाशी । तूं मनोरथ पुरवीसी ॥
जड पडेल तुज हें ऐसी । वार्ता तरी मानूं कैसी ॥
॥ चाल ॥
म्हातारी साठ वर्षांची । होती ती गंगा साची ॥
कन्या सुत देउनि तीसी । वांछा पुरविलीस दयाळा ॥
गुरुराया दत्तात्रेया । आठवितों तुझिये पाया ॥ ३ ॥
तूं अघटित घटना करिसी । कृष्णातटि हें सर्वांसी ॥
हे प्रसिद्ध मग आम्हांसी । तूं उपेक्षिसी कीं कैसी ॥
॥ चाल ॥
कींव न ये माझी आतां । निज बिरुदा आणुनि चित्ता ॥
मम कामना पुरविसी दत्ता । वासुदेव नमस्कारि गेया ॥
गुरुराया दत्तात्रेया । आठवितों तुझिये पाया ॥ ४ ॥

## चातुर्मास एकोणिसावा-शके १८३१-इ. स. १९०९-पवनी :–

श्रीस्वामीमहाराज मागे वर्णन केल्याप्रमाणे मंथनकाळेश्वर, नागभिडतळोदी इत्यादि ठिकाणी जाऊन नागपूरकडे जाण्यास निघाले. या प्रवासात त्यांचे पूर्वाश्रमातील धाकटे बंधू श्रीसीतारामहाराज हेही बरोबर होते. या प्रवासात कधी कधी श्रीस्वामीमहाराजांना भिक्षान्नाशिवायही राहावे लागत असे. अशावेळी श्रीसीतारामहाराज हे त्यांचे पूर्वाश्रमातील सख्खे बंधू असल्यामुळे व "संन्याशाने जवळच्या नातेवाईकांचे अन्न सेवू नये," अशी शास्त्राज्ञा असल्यामुळे शिजविलेल्या अन्नाची भिक्षा त्यांना त्यांच्या हातून देखील घेता येत नसे. त्यामुळे मग अशा प्रसंगी नुसते मूग शिजवून व दही विकत घेऊन त्याचे ताक करून मुगाची उसळ आणि ताक श्रीसीताराममहाराज त्यांना मध्यान्हकाळी देत व आपण देखील तोच फलहार

स्वीकारीत असत. मूग हे अन्नात गणले जात नाहीत. त्यामुळे फलहार समजून श्रीस्वामीमहाराज त्यांचा स्वीकार करीत असत. तो फलहार देखील अळणीच असे. याप्रमाणे या प्रवासात या दोघांनी महिनाभर मूग खाऊनच दिवस काढले.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराज व श्रीसीतारामहाराज प्रवास करीत करीत शके १८३१ अर्थात् इ. स. १९०९ मध्ये पवनी येथे आले. येथे आल्यावर त्यांनी श्रीवैनगंगानदीमध्ये स्नान करून तिच्या स्तुतीपर असे पुढील स्तोत्र लिहिले.

## ॥ श्रीवैन्यास्तोत्रम् ॥

वैन्यार्तिहाभया सिन्धुः पातु पापनाशिनी ॥
दैन्याधिहा दयासिन्धुर्जन्तुतापविनाशिनी ॥ १ ॥
वैन्याख्यभक्तेन समाहृतेयं
वैन्या नदी यद्यश ईशमेयम् ॥
ध्येयं महद्भिः कविभिश्च गेयं
पेयं पयोऽस्याः प्रपुनातु सेयम् ॥ २ ॥
अये वैन्ये धन्ये सुकृतिजनमान्ये जय महा–
रयेऽजन्ये दैन्येर्तिहृदसि वदान्ये त्वमघहा ॥
महाभंगे गङ्गेव नृदुरितभङ्गेह भवती
सती मर्त्योऽमर्त्योऽपि यदमृतपानेन भवति ॥ ३ ॥
वैनाख्यगङ्गे जनतापभङ्गे
प्रसीद मे देवि महातरङ्गे ॥
पुनीहि मां सागस आर्तबन्धो
बन्धोच्छिदे ते सरिते नमोऽस्तु ॥ ४ ॥

वैन्ये दैन्यहृते नमोऽस्तु सरिते वेनाहृते सन्मते ।
सर्वं मानसिकं च वाचिकमघं द्राक्कायिकं मे हर ॥
बाह्याभ्यन्तरशुद्धिकृत्त्वमसि यत्तन्मेम्ब दुर्वासना-
मुन्मूल्यार्पय पापतापशमनी श्रीदेवि सद्वासनाम् ॥ ५ ॥
वेणुवादनरताच्युतांचिता या पुरी पुरजिताऽपि रंजिता ॥
सन्ति यत्र विबुधा अनेकशः सन्ति विप्रसदनानि भूरिशः ॥६॥
तस्यां पद्मावतीपुर्यां वैन्यासंज्ञा महाधुनी ॥
मधुनीरा विजयते जयतेजोयशःप्रदा ॥ ७ ॥
॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्द-
सरस्वतीविरचितं श्रीवैन्यास्तोत्रं संपूर्णम् ॥

अर्थ :—ही श्रीवैन्या नावाची नदी आमचे रक्षण करो. ही नदी सर्व पापांचा नाश करणारी, सर्व प्रकारची पीडा हरण करणारी, यच्चयावत् भयांना दूर करणारी, दैन्य घालविणारी, सागराप्रमाणे विशाल, दयावती आणि मनुष्यांसह सर्व प्राणधारक मत्स्यादिजल-चरांचे ताप दूर करणारी आहे. ॥ १ ॥

ही श्रीवैन्या नावाची नदी एका भक्ताने या भूतलावर आणलेली असून हिची कीर्ती देवांनीही वाखाणण्यासारखी आहे. या नदीचे यश मोठमोठ्यांनी गाण्यासारखे असे आहे. हिचे चरित्र कवींनी काव्यात गुंफण्याइतके महान् आहे. हिचे जल ( अमृताप्रमाणे ) मधुर आहे. ही श्रीवैन्यानदी आम्हाला पवित्र व पुनीत करो. ॥२॥

हे श्रीवैन्ये महानदी ! तू धन्य आहेस. तू पुण्यवन्तांना माननीय आहेस. तू महावेगवती, स्वयंभू, दैन्याचा नाश करणारी, उदार दानशूर व पापांचा नाश करणारी आहेस. तुझी ऊर्मी अर्थात् लाट विशाल व विस्तृत आहे. तू श्रीगंगानदीप्रमाणे (अत्यंत पवित्र असून तिच्याप्रमाणेच ) सर्व मानवांची संकटे दूर करतेस. तू सती अर्थात्

पतिव्रता आहेस. तुझ्या जलाच्या सेवनाने मरणधर्मा मानवही अमर अर्थात् देव होतो. ॥ ३ ॥

हे श्रीवैन्या नामक श्रीगंगे ! तू लोकांचे ताप अर्थात् पीडा किंवा दुःखे दूर करणारी आहेस. तू पीडितांची बांधव अर्थात् भगिनी आहेस. हे महातरंगे सरिते ! तू जन्मादिबंधांचा विनाश करणारी आहेस. तुला माझा नमस्कार असो. मी अपराधी व चुका करणारा असल्यामुळे तू मला पावन कर. ॥ ४ ॥

हे श्रीवैन्ये महानदी ! तू दैन्यनाशिनी आहेस. तुला नमस्कार असो. तू सज्जनांना माननीय अशी आहेस. तू माझ्या कायिक, वाचिक व मानसिक पातकांचा नाश कर. तू बाह्यान्तर शुद्धी करणारी आहेस. हे माते ! तू माझ्या दुष्ट वासनांना मुळापासून उखडून टाक. हे पापतापांचे शमन करणाऱ्या श्रीवैन्येंदेवी ! मला सद्वासना दे आणि माझ्यावर चांगले संस्कार कर. ॥ ५ ॥

जी नगरी वेणुवादनकुशल अशा श्रीकृष्णाच्या चरणकमलांनी युक्त व सुशोभित आहे, ( जी स्वर्गपती इंद्रालाही आनंद देणारी आहे, ) जी शिवाचे मनोरंजन करणारी असून जेथे विद्वान् लोक राहतात आणि ज्या ठिकाणी ब्राह्मणांची पुष्कळ घरे आहेत अर्थात् ब्राह्मणवस्तीच अधिक आहे अशा ॥ ६ ॥

त्या पद्मावती नगरीतून ही श्रीवैन्या महानदी वाहते. ही जय, तेज व कीर्ती यांना वाढविणारी आहे. श्रीवैन्यानदी ही अमृतासम मधुर व जलयुक्ता आहे. या श्रीवैन्या महानदीचा जयजयकार असो. ॥ ७ ॥

॥ श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती यांनी रचिलेले श्रीवैन्यास्तोत्र पूर्ण झाले. ॥

पवनी हे गाव भंडारा जिल्ह्यात असून ते नागपूरापासून ५०

मैलांवर आहे. श्रीवैनगंगा नदीच्या तीरावर वसलेल्या या गावाचा पुराणात पद्मावतीपुरी असा उल्लेख आढळतो. श्रीस्वामीमहाराज येथे आल्यावर त्यांनी वर वर्णन केल्याप्रमाणे पापतापविनाशिनी अशा या श्रीवैनगंगानदीमध्ये स्नान करून तेथेंच मुक्काम केला. श्रीस्वामीमहाराज ज्यावेळी येथे आले त्यावेळी येथे बरीच वैदिक मंडळी होती. त्यामुळे वेदघोष ऐकण्यासाठी किंवा ब्राह्मणभोजन करण्यासाठी पवनी येथेंच लोक येत असत.

नागपूरच्या आग्नेय दिशेस निघून उमरेड, भिवापूर, ओलांडून आजूबाजूच्या दाट झाडीतून मार्ग काढून पुढे जाताच पवनी गावात प्रवेश करण्यापूर्वी उंच दणकट किल्ला व त्यावरील बुरुज दुरूनच दृष्टीस पडतात. आजही शाबूत स्थितीत उभ्या असलेल्या विशाल दगडी सिंहद्वारातूनच गावात प्रवेश करावा लागतो.

या गावचे आणखी एक वैशिष्टच म्हणजे येथे भरपूर देवालये असून नदीवर बांधलेले उत्तम असे घाट आहेत. वैजेश्वराचे श्रीशिव-मंदिर तसेच श्रीमुरलीधर मंदिर व श्रीदत्त मंदिर ही सर्व मंदिरे सध्या उत्तम स्थितीत आहेत. श्रीमुरलीधर मंदिराच्या कळसावर असलेले विशाल सोन्याचे चक्र तर त्याच्या गत वैभवाची साक्ष देत उभे आहे. याशिवाय बरीच जुनी मंदिरे गावात व नदीच्या काठीं आहेत. श्रीमुरलीधर मंदिराला लागूनच खाली उतरले की, एक ९–१० फूट उंचीची गणेशाची भव्य व रेखीव मूर्ती पाहून मन प्रसन्न होते. मुरलीधर मंदिराच्या गच्चीवरून श्रीवैनगंगेचे विस्तीर्ण पात्र व इतर रम्य परिसर पाहून एक वेगळाच आनंद होतो. तिन्ही बाजूंनी ६ मैल लांबीच्या डोंगरवजा टेकड्यांनी वेढलेला व थोर साधुसंतांच्या वास्तव्याने पुनीत झालेला असा निवांत व रमणीय परिसर विदर्भात पवनीशिवाय अन्यत्र आढळेल असे वाटत नाही.

पवनी हे ठिकाण अतिशय प्रसन्न व सोयीचे आहे असे पाहून शके १८३१ चा १९ वा चातुर्मास येथेच करावयाचा असे श्रीस्वामीमहाराजांनी ठरविले. मात्र येथील लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना आपल्या गावात प्रथम राहूसुद्धा दिले नाही. श्रीस्वामीमहाराज येथे आल्यावर सुरुवातीला श्रीवैजनाथाच्या मंदिरात उतरले होते; पण येथील मंडळी साधुसंतांविषयी एवढी बेफिकीर होती की, त्यांनी या देवळात श्रीस्वामीमहाराजांना उपद्रव देण्यास सुरुवात केली. श्रीस्वामीमहाराजांनी या देवळात तीन दिवस मुक्काम केला व नंतर ते श्री. दशपुत्रे यांच्या श्री विठ्ठल मंदिरात राहावयाला गेले. श्रीगांडामहाराज, श्रीसीतारामम्हाराज वगैरे मंडळी मुन्सफ श्री. विठ्ठलराव काळीकर यांच्या मुरलीधराच्या मंदिरात राहिली. पहिल्या दिवशी श्री. वैजनाथच्या मंदिरात लोकांनी श्रीस्वामीमहाराजांशी अत्यंत उर्मटपणाचे वर्तन केले; पण लोकांचे उर्मट बोलणे व उन्मत्त वागणे त्यांनी अगदी शांतपणे सहन केले. गावातील लोकांनी श्रीस्वामीमहाराजांच्या भिक्षेची सुद्धा काहीही सोय केली नाही. पहिल्या दिवशी श्रीस्वामीमहाराज श्री. नाईक नावाच्या गृहस्थांच्या घरी भिक्षेस गेले होते; पण श्री. नाईक हे दक्षिणी ब्राह्मण नसून गुजराथी ब्राह्मण आहेत असे समजल्यामुळे त्यांनी त्या दिवशी आणलेली भिक्षा तशीच ठेवली. दुसऱ्या दिवशी असाच काहीसा प्रकार होऊन त्याही दिवशी त्यांना उपोषणच घडले. तिसऱ्या दिवशी श्रीस्वामीमहाराज श्री. भट नावाच्या गृहस्थांच्या घरी भिक्षेला गेले होते. श्री. भट हे दक्षिणी ब्राह्मण होते. श्रीस्वामीमहाराजांना समोर पाहिल्यावर त्यांना भिक्षा वाढावयाच्या ऐवजी त्यांनी त्यांच्यावर प्रश्नांची सरबत्तीच सुरू केली.

त्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे प्रश्न विचारले की

"आपण कोठले राहणार ? आपणास संन्यासाश्रम स्वीकारण्याचे कारण काय ? आपल्या घरी कुटुंबात कोणी मंडळी वगैरे आहेत की नाहीत ? आपणास स्मशान वैराग्य आले म्हणून आपण संन्यास स्वीकारला का ? आपणास संन्यास घेऊन किती दिवस झाले ? आपण कोठल्या पंथाचा संन्यास घेतला आहे ? " अशाप्रकारे श्री. भट यांनी अनेक प्रश्न विचारून श्रीस्वामीमहाराजांची फारच चौकशी केली; परन्तु त्यांच्या एकाही प्रश्नाला उत्तर न देता श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "दाराशी आलेल्या अतिथीला भिक्षा घालणे एवढेच गृहस्थाचे काम आहे. त्याने त्याची जास्ती विचारपूस करू नये. "

श्रीस्वामीमहाराज श्री. भटांना असे काही समजावून सांगत होते इतक्यात बाहेर काय गडबड चालली आहे हे पाहण्यासाठी श्री. भट यांच्या विवाहित कन्या सौ. उमाबाई या बाहेर आल्या. त्यांचे सासर उमरेड येथे असून त्यांनी मागे ब्रह्मावर्त येथे श्रीस्वामी-महाराजांचे दर्शन घेतले होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांचा महिमा व कीर्ती त्यांना उत्तम माहीत होती. त्या बाहेर आल्याबरोबर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना ओळखले व त्या आपल्या वडिलांना असे म्हणाल्या की, "बाबा ! असे काय करता ? यांना आपण ओळखले नाही का ? हे तर नरसोबावाडीचे श्रीवासुदेवानंदसरस्वती-टेंबेस्वामीमहाराज आहेत ! प्रत्यक्ष श्रीदत्तावतारच आहेत ते ! आपण त्यांना इतके प्रश्न कशाला विचारता ?" इतके म्हणून त्यांनी आपल्या वडिलांना व घरातील सर्वांनाच श्रीस्वामीमहाराजांचा महिमा सांगून त्यांची माहिती करून दिली. हे ऐकल्यावर मात्र सर्व-जण आश्चर्यचकित व स्तंभित झाले. त्यानंतर श्री. भटांनी श्रीस्वामी-महाराजांची क्षमा मागून त्यांना मोठ्या आदरपूर्वक भिक्षा घातली.

श्रीस्वामीमहाराज पवनीला आले आहेत हे समजल्यामुळे सौ. उमाबाईंना अत्यानंद झाला. त्या दररोज श्रीस्वामीमहाराज राहात होते त्या श्रीविठ्ठल मंदिरात जाऊन झाडलोट करून जागा साफसूफ करू लागल्या व यावच्छक्य सर्व सेवा करू लागल्या. सौ. उमाबाईंच्यामुळे गावातील लोकांना श्रीस्वामीमहाराजांची माहिती होऊन हळूहळू श्रीविठ्ठल- मंदिरात मंडळींची ये-जा सुरू झाली.

ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचा संचार चालू असे त्यावेळी ते अमुकच ठिकाणी आहेत, हा शोध घेणे हे अत्यंत कठीण काम असे. ते आज एका ठिकाणी असले तर उद्या दुसरीकडे जात असत. एखाद्या ठिकाणी ते आहेत, असे कळल्यावर तेथे गेले, तर ते तोपर्यंन्त दुसरीकडे गेलेले असत. मात्र चातुर्मासाच्या काळातील दोन महिने ते हमखास एकाच ठिकाणी सापडणार ही खात्री असल्यामुळे त्या ठिकाणी बरीचशी लांबलांबची मंडळी त्यांच्या दर्शनाला येत असत. श्रीस्वामीमहाराजांचा हा चातुर्मास पवनीला होणार आहे असे समजल्यावर दूरदूरची भक्तमंडळी तेथे जमा होऊ लागली.

अशाप्रकारे हजारो भक्तमंडळी आपल्या गावातील श्रीविठ्ठल मंदिरात उतरलेल्या एका संन्यासी स्वामीमहाराजांच्या दर्शनाला येत आहेत असे पाहून पवनीच्या लोकांना आश्चर्य वाटले. एवढी ही सर्व मंडळी या संन्याशांना भेटावयाला का येत आहेत ? असा प्रश्न पडून पवनीच्या लोकांनी येणाऱ्या लोकांकडे जेव्हा, " एवढे हे कोण मोठे संन्यासी आहेत की, त्यांच्या दर्शनासाठी आपण इतके लोक लांबून आला आहात ? " असा प्रश्न विचारून चौकशी केली तेव्हा बाहेर गावाहून येणाऱ्या लोकांनी पवनी गावातील लोकांना असे उत्तर दिले की, " आम्ही ज्यांच्या दर्शनासाठी येथे आलो

आहोत ते श्रीस्वामीमहाराज हे नुसतेच थोर संन्यासी आहेत असे नाही; तर ते साक्षात् श्रीदत्तावतारच आहेत. आम्ही सर्वजण त्यांचे श्रीदत्तप्रभू म्हणूनच दर्शन घेतो." बाहेर गावाहून आलेल्या हजारो लोकांच्या तोंडून ज्यावेळी पवनीच्या लोकांनी श्रीस्वामी-महाराजांची महती व कीर्ती ऐकली आणि ती प्रत्यक्ष पाहिली त्यावेळी तेथील सर्व मंडळींचे डोळे उघडले. श्रीस्वामीमहाराजांबद्दल सुरुवातीला त्यांनी जी बेपर्वाईची वृत्ती दाखवली त्याबद्दल तेथील लोकांना नंतर लाज वाटू लागली. त्यामुळे त्यांनी श्रीस्वामीमहा-राजांची क्षमा मागितली व ते सर्वजण त्यांचे भक्त बनून पूर्णपणे त्यांच्या भजनी लागले. श्रीक्षेत्र पवनीच्या या चातुर्मासात श्रीगांडा-महाराज, श्रीसीतारामहाराज ही मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेसाठी येथे येऊन राहिली होती. येथे श्रीस्वामीमहाराजांच्या रोज दर्शनाला येणाऱ्या भक्त मंडळींची संख्या हजारो होती व बाहेर गावाहून त्यांच्या दर्शन, सत्संगादिसाठी येणाऱ्या लोकांची संख्या दिवसेंदिवस वाढतच जात होती. या सर्वांच्या राहण्याची आणि जेवण्याची व्यवस्था श्रीसीतामहाराज व श्री. नाना दशपुत्रे हे श्री. विठ्ठलराव काळीकर यांच्या मदतीने करीत असत. श्रीसीता-राममहाराजांची आपल्या श्रीगुरुचरणांवर नितान्त श्रद्धा होती. त्यांच्या या गुरुभक्तीमुळे जणूकाही त्यांना द्रौपदीची अक्षय्य अशी थाळीच प्राप्त झाली होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्श-नाला कितीही लोक आले; तरी त्या सर्वांच्या जेवण्याखाण्याची व राहण्याची व्यवस्था श्रीसीतारामहाराज ठेवीत असत. या कामी त्यांना कोठल्याही गोष्टीची कधी वाण भासली नाही.

श्रीस्वामीमहाराज राजमहेंद्रीस येण्यापूर्वी दक्षिणेमधील संचारात त्यांना लोकांचा फारसा उपद्रव झाला नव्हता; परन्तु राजमहेंद्री-

पासून तो वाढू लागला. उत्तरेमध्ये तर दिवसाचे वीस तास तरी श्रीस्वामीमहाराजांभोवती गर्दी असे. आता पवनीलासुद्धा तसेच होऊ लागले. इतर ठिकाणी होत असत तसेच कार्यक्रम येथेसुद्धा सुरू झाले. दररोज निरनिराळ्या ग्रंथांचे पाठ सुरू झाले. लघुरुद्र, महारुद्र, सहस्रभोजन इत्यादि विविध धार्मिक कार्यक्रम वारंवार होऊ लागले.

श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी दररोज जी हजारो भक्त-मंडळी येत असत, ती येताना त्यांना देण्यासाठी काही ना काहीतरी फळफळावळादि वस्तू घेऊन येत असत. राजा आणि गुरू यांचे दर्शन मोकळ्या हाताने घेऊ नये असा शास्त्राचा दंडकच चाहे. त्यामुळे दररोज श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे प्रसादाच्या वस्तूंचा ढीग पडू लागला. पैसेही पुष्कळच जमू लागले. या पैशांचा आणि इतर वस्तूंचा विनियोग श्रीसीतारामहाराज हे भक्तांच्या जेवण्या-खाण्याच्या व्यवस्थेसाठी, ब्राह्मण भोजनासाठी व नित्य होणाऱ्या कार्यक्रमासाठी खर्च करीत असत.

श्रीक्षेत्र पवनी येथील या चातुर्मासाच्या काळात रोज हजार–दीडहजार पान होत असे. श्रीस्वामीमहाराज आपली भिक्षा संपवून रोज पंक्तीमध्ये फिरून सर्वांना आग्रह करीत असत. मात्र धर्मबाह्य वर्तन करणाऱ्या लोकांना पंक्तीमध्ये येण्यास मज्जाव होता. अशा लोकांना श्रीस्वामीमहाराज दर्शनसुद्धा देत नसत. येथे दररोजच सर्वांना पक्वान्नाचे भोजन होत असे. पुढे-पुढे रोज पक्वान्ने खाऊन लोकांना कंटाळा आला.

श्रीक्षेत्र पवनी येथील या चातुर्मासाच्या काळात दररोज प्रवचन, पुराण, हरदासी कीर्तन वगैरे कार्यक्रम होत असत. अशा प्रकारे सेवा करणाऱ्या शास्त्री, प्रवचनकार, पुराणिक, हरिदास इत्यादि सर्व गुणी

मंडळींना श्रीस्वामीमहाराजांपुढे आलेल्या पैशातून भरपूर संभावना दिली जात असे. एवढा खर्च करूनसुद्धा शेवटी बरेच पैसे शिल्लक राहात असत. त्यातूनच सुवासिनींना खण व लुगडी आणि ब्राह्मणांना धोतरे व दक्षिणा वाटली जात असे. इतके करूनही शेवटी जे पैसे उरले ते श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेप्रमाणे श्रीसीतारामहाराजांनी, पवनीच्या या चातुर्मासाच्या काळात वाडीहून जी पुजारी मंडळी तेथे राहावयास आली होती, त्यांच्याजवळ दिले. पुढे चातुर्मास संपल्यानंतर ज्यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीची पुजारी मंडळी वाडीला परत गेली त्यावेळी त्यांनी तेथे या पैशातूनच श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेप्रमाणे संहिता स्वाहाकार केला.

यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून श्री. श्रीपादभटजी हावळे, श्री. दत्तू वामन पुजारी, श्री. वामनराव बड्ड व श्री. अंतू नरहर पुजारी ही पुजारी मंडळी व काही स्त्रिया श्रीक्षेत्र पवनी येथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी, सेवेसाठी व दोन महिने त्यांच्या सत्संगात राहण्यासाठी आली होती. श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून श्रीसद्गुरुरायांच्या दर्शनाला येताना या सर्व प्रेमळ गुरुभक्तांनी श्रीस्वामीमहाराजांना देण्याकरिता श्रीपादुकांवरील गंध, तुळशी व एक करवतकाठी छाटी महाप्रसाद म्हणून आणली होती. ही सर्व मंडळी ज्यावेळी पवनीला निघाली, त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचे परमश्रेष्ठभक्त श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हे त्या सर्व पुजारी मंडळींना असे म्हणाले की, " कसेही करून श्रीगुरुमहाराज वाडीला येऊन आम्हा सर्वांना भेटतील असे करा आणि आमचा अखंडित प्रणिपात श्रीचरणी निवेदन करा." याप्रमाणे पुजारी मंडळी जेव्हा श्रीक्षेत्र पवनी येथे आली तेव्हा त्यांनी साष्टांग नमस्कारपूर्वक श्रीगुरुचरणांना वंदन केल्यावर बरोबर आणलेला

देवांचा प्रसाद त्यांना अर्पण केला व श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-महाराजांचे वंदन श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी प्रविष्ट करून त्यांची श्रीगुरुदर्शनेच्छाही प्रकट केली. महाप्रसादप्राप्ती व परमभक्ताची प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांच्या मुखावर मंदहास्य प्रकट झाले. श्रीस्वामीमहाराज आणि श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे परमभक्त परस्परांच्या भेटीने आनंदित झाले. त्या भेटीच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील समस्त परिचित मंडळींचे नावनिशीवार कुशल विचारले. त्यानंतर श्रीसीतारामहाराजांनी या सर्व मंडळींची राहण्याची सोय केली. पुढे ही वाडीकर मंडळी एक महिनाभर पवनीला राहिली होती. दररोज जेवण्याच्यावेळी ही वाडीकर मंडळी वाढण्याचे काम करीत असत. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजही पंक्तीमध्ये फिरून सर्वांना “ सावकाश होऊ द्या, ” असे प्रेमाने सांगून कधी कधी आपल्या हाताने लोकांना वाढीत असत. श्रीस्वामीमहाराजांच्या हातच्या अन्नाच्या प्रसादप्राप्तीमुळे लोक स्वत:ला धन्य व कृतार्थ मानीत असत.

श्रीक्षेत्र पवनीला रोज नवे नवे श्रीमंत भक्त येऊन श्रीगुरुमहाराजांना भिक्षा देतात असे पाहून येथे आलेल्या श्रीक्षेत्र वाडीच्या पुजारी भक्तांना आपणही श्रीस्वामीमहाराजांना पुडी करावी अर्थात् भिक्षा द्यावी अशी इच्छा होऊन त्यांनी आपापसात वर्गणी करून श्रीसीतारामहाराजांसमक्ष शंभर रुपये श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवले व ते सर्वजण त्यांना असे म्हणाले की, “ आम्हा बालकांतर्फे ही सेवा श्रींनी स्वीकारून आम्हाला धन्य व कृतार्थ करावे अशी प्रार्थना आहे. ” ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्या सर्वांना असे म्हणाले की, “ या पैशांची काही जरुरी नाही. रोज चाललेली भिक्षा ही तुमचीच आहे असे समजा. ” त्यावेळी श्रीक्षेत्र वाडीकर

'मंडळींनीं श्रीस्वामीमहाराजांची पुन्हा अशी विनवणी केली की, ' महाराज ! श्रीमान्, गरीब असा भेदभाव न धरता ह्या विदुराच्या घरच्या कण्या आहेत असे मानून आम्हा गरिबांचा हा दूधभात स्वीकारण्याची कृपा करावी. " पुजारी मंडळींची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज क्षणभर स्वस्थ बसले व नंतर लगेच श्रीसीतारामहाराजांकडे पाहून ते त्यांना असे म्हणाले की, " उद्या यांचीच भिक्षा होऊ द्या. सर्व ग्रामस्थांना असे सांगा की, उद्या वाडीचा गुरुद्वादशीचा गुरुप्रसाद घेण्यासाठी तुम्ही सर्व स्त्री-पुरुष, लहान-थोर मंडळींनी इकडेच यावे. कोणीही घरी चूल पेटवू नये. "

श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्रीसीतारामहाराजांनी सर्व गावाला आमंत्रण दिले. दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे स्वयंपाक झाल्यावर श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजारी मंडळींना असे म्हणाले की, " वाडीला करता तशीच येथेही अन्नपूर्णेची पूजा करून तो प्रसाद सर्वांना वाढावा. " ही आज्ञा ऐकताच पुजाऱ्यांनी श्रीस्वामीमहाराजांकडून त्यांची छाटी मागून घेऊन ती तयार झालेल्या अन्नावर आच्छादिली व अन्नपूर्णेची पूजा, आरती इत्यादि सर्व झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांची देखील पूजा, आरती केली. त्यानंतर श्रीसीतारामहाराजांनी देवळात, देवळापुढे पटांगणात व चौफेर भोजनाच्या पंगती बसविल्या. भात, खीर, लाडू, शिरा इत्यादि सर्व पदार्थ श्रीस्वामीमहाराजांनी स्वत: पंक्तीत फिरून प्रेमाने आग्रह करकरून वाढावयाला लावून सर्वांना तृप्त केले. एवढेच नव्हे; तर ते सर्व भोक्त्यांना असे म्हणाले की, " आज हा वाडीच्या श्रीदत्तमहाराजांचा महोत्सव त्यांच्या पुजाऱ्यांनी केला आहे. हा श्रीदत्ताचा प्रसाद आहे. तो सर्वांनी भक्तीने ग्रहण करावा.'

इतके सांगून श्रीस्वामीमहाराजांनी भिक्षा केली व आपणही स्वतः तो प्रसाद अत्यंत प्रेमपूर्वक ग्रहण केला.

त्या दिवशी रोजच्यापेक्षा अधिक म्हणजे तीन-चार हजार पात्र झालेले पाहून सर्वांना श्रीगुरुचरित्र ग्रंथातील श्री. भास्कर ब्राह्मणाच्या कथेचे स्मरण झाले. श्री. भास्कर ब्राह्मणाने आणलेल्या तीन पात्रांच्या सामुग्रीत श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी हजारो लोकांना जेवावयास घालून जो अपूर्व चमत्कार घडविला होता तसाच लोकोत्तर चमत्कार वाडीकरांच्या शंभर रुपयात श्रीस्वामीमहाराजांनी चार हजार लोकांना जेवण घालून घडविला.

हा अपूर्व, लोकोत्तर व अद्‌भुत चमत्कार पाहून श्रीस्वामीमहाराज हे साक्षात् श्रीदत्तात्रेय भगवानच आहेत अशी लोकांची पक्की खात्री झाली. भक्तमनोरथ पूर्ण करण्याकरिताच श्रीपादश्रीवल्लभश्रीमन्नृसिंहसरस्वतीश्रीदत्तात्रेय हे श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने या भूतलावर पुन्हा अवतीर्ण झाले आहेत असे म्हणून सर्व लोकांनी मोठ्या कौतुकाने व अत्यंत प्रेमभावाने "श्रीवासुदेवानंदसरस्वतीदत्तमहाराजांचा जयजयकार असो!" असा प्रचंड जयघोष केला. खरोखर हे सर्व लोक धन्य होत! त्यांनी भक्तसखा भगवान् डोळ्यांनी पोटभर पाहिला! ही भारतमाताही धन्य होय! कारण तिला श्रीगुरुपादपंकजांचा मंगल स्पर्शलाभ होऊन कोट्यवधी लोकांच्या पातकांचा तिच्या ठिकाणी झालेला संचय दूर करण्यास ती समर्थ ठरली. खरोखर! श्रीस्वामीमहाराजांच्या परमपावन व परमसमर्थ चरणसरोजांच्या प्रसादाने सर्व प्राणीमात्रच उद्धरून गेले यात तिलःप्राय शंका नाही.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील पुजारी मंडळी वास्तविकपणे संकटाने त्रासून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र पवनी येथ

आली होती. आपल्यावरील सर्व संकटें दूर करण्यासाठी श्रीस्वामी-महाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला यावे म्हणून ते त्यांना आग्रह करणार होते. त्याचप्रमाणे या कार्यासाठी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना त्यांचे परमभक्त व एकनिष्ठ शिष्य श्रीनृसिंहसरस्वती-दीक्षितस्वामीमहाराज यांचा "आपल्या चरणदर्शनाची तीव्र इच्छा आहे. तरी येथे येण्याची कृपा करावी," असा प्रेमळ निरोपही बरोबर आणला होता.

एके दिवशी सकाळी श्रीस्वामीमहाराजांपाशी कोणी नाही व जरा शांतता आहे असे पाहून श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजारी मंडळींनी त्यांना वाडीला येण्यासंबंधीं आग्रह केला व श्रीदीक्षित-स्वामीमहाराजांचा निरोपही सांगितला. हा निरोप ऐकताच श्रीस्वामीमहाराजांच्या मनात त्यांची अलौकिक गुरुनिष्ठा व लोकोत्तर गुरुमर्यादा येऊन त्यांच्या डोळ्यात प्रेमाश्रू तरळून गेले. आपल्या शिष्यांच्या गुरुभक्तीचे श्रीस्वामीमहाराजांना फार कौतुक वाटत असे. त्यामुळेंच त्यांनी कित्येक लोकांपुढे त्यांच्या विषयी असे उद्‌गार काढले होते की, "सर्व हिंदुस्थान देश आपण फिरलो; पण ज्ञानाला अधिकारी असा शिष्य श्रीनृसिंहसरस्वतींवाचून दुसरा कोणी आम्हाला मिळाला नाही. काय त्यांचे गुरुप्रेम ! केवढी मर्यादा ! सासूजवळ जशी सून मर्यादेने वागते, तसे ते आपणापाशी अतिशय मर्यादेने वागतात." श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामी-महाराजांची गुरुभक्ती जशी पराकाष्ठेची होती तसेच त्यांचे वैराग्य-देखील पराकाष्ठेचेच होते. त्यांनी संन्यास घेतल्यानंतर उभ्या आयुष्यात कधीही आपल्यापुढे आलेल्या द्रव्याला चुकूनसुद्धा हात लावला नाही. आमरणान्त त्यांनी हा नियम अत्यंत कडक रीतीने पाळला. कनक व कान्ता त्यांना वमनप्राय वाटत असत. ते कधीच

कोणाची निंदास्तुती करीत नसत. कोणाजवळ काही मागत नसत. कोणावर कोप करीत नसत. कोणालाही त्यांच्यापासून उद्वेग होत नसे. सर्वांबरोबर प्रेम, मैत्री, कृपा व उपेक्षा या वृत्ती धारण करून ते वागत असत. आपल्या परमाराध्य श्रीगुरुदेवांवर प्रेम, श्रीगुरु भक्तांबरोबर मैत्री, दीनांवर दया व बालिश लोकांची ते उपेक्षा करीत असत. गुरुभक्तीला प्राधान्य देऊन ते वागत असल्यामुळे त्यांचे ज्ञान प्रेमरसाने युक्त व सरस होते. ज्ञानोतर भक्ति-प्रेम असण हे ज्ञानी लोकांनी मोठे भूषण मानले आहे. त्या भूषणाने मंडित असे जीवन्मुक्त व गुरुभक्तचूडामणी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-स्वामीमहाराज धन्य होत ! अशा श्रेष्ठ गुरुभक्ताने श्रीगुरुचरणी प्रस्तुत केलेल्या प्रार्थनेला किती अपरंपार महत्त्व व वजन असेल याची कल्पनाच केलेली बरी !

श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांचा निरोप ऐकून श्रीस्वामीमहाराज स्वस्थ बसले. या निरोपाला काय उत्तर द्यावे याचा ते विचार करू लागले; कारण पूर्वीही श्रीनृसिंहसरस्वती-दीक्षितस्वामीमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांना असाच निरोप पाठविला होता. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या परमप्रिय शिष्याला असे कळविले होते की, " भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या आज्ञे-प्रमाणे पुजारी वर्गाला जे काही सांगावयाचे व शिकवावयाचे होते ते सर्व सांगून व शिकवून झाले आहे. आता इतःपर काही सांगा-वयाचे व समजवावयाचे उरलेले नाही. याकरिता आता वाडीला न येता श्रींच्या आज्ञेप्रमाणे उत्तरेकडे जाणार आहे. "

श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील पुजारी ज्या पद्धतीने वागत असत त्यामुळे देवांना अतिशय त्रास होत असे. याचा अतिरेक झाला की,

वाडीकरांवर संकटांची एक परंपराच कोसळत असे. असे झाले की, पुजारी मंडळी श्रीस्वामीमहाराजांचा शोध करीत करीत त्यांच्या पायाशी धाव घेत असत; कारण श्रीस्वामीमहाराजांवर देवांचे ऐवढे प्रेम होते की, त्या प्रेमाखातर त्यांनी सांगितलेली कोणतीही गोष्ट देव मान्य करतात अशी सर्व पुजारी मंडळींची पक्की खात्री होती. श्रीक्षेत्र नरसोबावाडीला अनाचार माजल्यामुळे देवांचा कोप होऊन तेथील पुजाऱ्यांवर व लोकांवर संकटे यावीत व त्यांच्या निरसनार्थ श्रीस्वामीमहाराजांनी देवाची करुणा भाकावी आणि त्यानंतर देवाचा कोप शांत व्हावा असे अनेकदा घडले होते. यावेळी सुद्धा अशीच परिस्थिती वाडीमध्ये निर्माण झाल्यामुळे श्रीदीक्षित-स्वामीमहाराजांचा निरोप घेऊन पुजारी मंडळी पवनीला आली होती. त्यांची एकच इच्छा होती की, श्रीस्वामीमहाराजांनी वाडीला यावे व " शांत हो श्रीगुरुदत्ता " म्हणून देवांचा कोप शांत करावा. हे सगळे खरे असले; तरी देवांना व श्रीस्वामीमहाराजांना या पुनः पुन्हा घडणाऱ्या गोष्टींचा संताप आला होता. असे असले; तरी श्रीक्षेत्र नरसोबावाडीवर श्रीस्वामीमहाराजांचे अपरंपार प्रेम होते. इतकेच नव्हे; तर तेथील सर्व पुजारी मंडळींवरही त्यांचे अलोट प्रेम होते. मात्र देवांच्या आज्ञेशिवाय ते श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाणे शक्य नव्हते. त्यामुळे त्यांनी पुजारी मंडळींना असे सांगितले की, " देवांच्या आज्ञेप्रमाणे आपण उत्तरेकडे जाणार असल्यामुळे यावेळीं वाडीला येणे शक्य नाही. "

श्रीस्वामीमहाराजांच्या या निर्णयाने वाडीकर पुजारी मंडळी मनातून थोडी रुष्ट झाली; कारण त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना वाडीला घेऊन येण्याचे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांना जवळ जवळ आश्वासनच दिले होते; पण देवांच्या निर्णयाविरुद्ध

कोण बोलणार ? एवढे असूनही श्रीस्वामीमहाराजांना वाडीला घेऊन जाण्याची इच्छा त्यांनी सोडली नाही.

आपली ही इच्छा पूर्ण करण्याकरिता व "आपण वाडीला येतो," असे श्रीस्वामीमहाराजांकडून वचन घेण्याकरिता एक दोन दिवसांनन्तर श्रीक्षेत्र नरसोबावाडीची पुजारी मंडळी पंक्तीत जेवण्यास बसली असता त्यांनी एकदम सत्याग्रह केला. त्यावेळी सर्व पंक्ती बसल्या होत्या व श्रीसीतारामहाराजांनी "अवधूत चिंतन श्रीगुरुदेवदत्त" असे म्हणून सर्वांना भोजनाला सुरुवात करण्याची विनंती केली. हे ऐकताच श्रीक्षेत्र नरसोबावाडीची पुजारी मंडळी श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाली की, "आम्ही मोठी उमेद बाळगून आपणाला वाडीला घेऊन जाण्यासाठी आलो होतो; परन्तु देवांच्या आज्ञेशिवाय आपण वाडीला यावयाला तयार नाही. असे असले; तरी आपल्याकडून वाडीला येण्याचे वचन घेतल्याशिवाय आम्ही येथून परत जाणार नाही. तरी आमचे संकट दूर करण्याकरिता आपण जर वाडीला येण्याचे वचन दिले तरच आम्ही भोजन करू. आपण जर असे वचन दिले नाही तर आम्ही भोजन न करता व वाडीला न जाता वाट फुटेल तिकडे जाऊ."

श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजारी मंडळींनी अशा प्रकारे भोजनाच्या वेळी सत्याग्रह करून व श्रीस्वामीमहाराजांना निर्वाणीचे सांगून त्यांना एक प्रकारे पेचातच टाकले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज पुजारी मंडळींना असे म्हणाले की, "वाडीला येणे न येणे हे काही आमच्या हातात नाही. देवांच्या आज्ञेबाहेर जाणे आम्हाला कधीही शक्य होणार नाही. तरी तुम्ही लोकांनी भलताच आग्रह न धरता भोजनाला सुरुवात करावी म्हणजे पगंत खोळंबून राहणार नाही व सर्व मंडळींची जेवणे वेळच्यावेळी होतील."

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्रनरसोबावाडीच्या सर्व मंडळींना जरी इतके समजावून सांगितले; तरीपण ती सर्व मंडळी हट्टालाच पेटली होती. ते सर्वजण काही केल्या आपला हट्ट सोडावयास तयार होईनात. श्रीस्वामीमहाराजांची समजावणी, पुजारी मंडळींचा हट्ट व खोळंबलेल्या पंक्ती असे मोठे अद्भुत नाटच त्या दिवशी तेथे उपस्थित झाले. एवढ्या सर्व लोकांना भोजनाला उशीर होत आहे ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांना रुचली नाही. ते फार कष्टी झाले. शेवटी अगदी नाइलाजाने सर्व लोकांना क्षणभर थांबावयाला सांगून ते काही क्षण समाधी अवस्थेमध्ये गेले व त्यांनी देवांना अशी प्रार्थना केली की, "वाडीची पुजारी मंडळी वाडीला येण्यासाठी आग्रह धरून बसली आहेत आणि सर्व ब्राह्मण मंडळीही पंक्तीत खोळांबून बसली आहेत. त्याचप्रमाणे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांचाही तिकडे येण्याबद्दल आग्रहपूर्वक निरोप आला आहे. तरी आपण पुजारी मंडळींच्या इच्छेप्रमाणे वाडीला जाण्याची आज्ञा दिल्यास सर्वांचे समाधान होईल."

श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे देवांची अत्यंत करुणापूर्वक प्रार्थना केल्यावर देवांचे अंतःकरण क्षणात द्रवले व ते त्यांना असे म्हणाले की, "आता चातुर्मास संपताच उत्तरेकडे न जाता वाडीकडे जावे." ही आज्ञा मिळताच श्रीस्वामीमहाराज समाधी उतरवून पुन्हा देहभानावर आले व त्यांनी देवांची ही आज्ञा पुजारी मंडळींना सांगितली. ती ऐकताच पुजारी मंडळींचे समाधान झाले व नंतर सर्वांनी आनंदाने भोजन केले व श्रीस्वामीमहाराजांनीही भिक्षा केली.

अशा रीतीने वाडीला जाण्यासंबंधीच्या नाट्यावर पडदा पडला असे सर्वांना वाटले; परन्तु ते खरे नव्हते. त्याच दिवशी दुपारी

श्रीक्षेत्र पवनी येथील मुरलीधरच्या मंदिरामध्ये भाष्यपाठ चालू असताना श्रीस्वामीमहाराजांचे देहभान एकाएकी हरपले. त्यावेळी त्यांची मुद्रा अतिशय उग्र दिसत असून त्यांचे सर्वांग अग्नीप्रमाणे तप्त व लाल झालेले दिसत होते. त्या अवस्थेमध्येच त्यांच्या मुखातून असे उद्गार निघाले की, "वाडीला कशाला घेऊन जाता? आजपर्यन्त यापूर्वी अम्ही कितीतरी वेळा तिकडे आलो; पण आपला कोणता फायदा करून घेतलात? सांगितल्याप्रमाणे आपण कोठे वागलांत? आता तरी नेऊन काय करणार आहात? वाडीला येऊन काय बाजार मांडावयाचा आहे काय?" इतके उद्गार श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून बाहेर पडल्यानंतर ते शांत झाले. त्या समाधी अवस्थेमध्ये त्यांच्या मुखातून जे उद्गार बाहेर पडले त्यामुळे वाडीची पुजारी मंडळी अगदी घाबरून गेली. जो तो दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहू लागला; पण कोणीच काहीही बोलले नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या उद्गाराचा रोख कोणाकडे व कशाकडे आहे ते ज्यांच्या त्यांच्या लक्षांत आले असेल. थोड्या वेळाने श्रीस्वामीमहाराज वृत्तीवर आले; पण ते एक शब्दही बोलले नाहीत आणि त्या दिवशी पुढे भाष्यपाठही झाला नाही.

या चातुर्मासाच्या काळात अनुग्रहार्थ श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व माझे श्रीसद्गुरुनाथ शक्तिपाताचार्य श्री. वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराजही श्रीक्षेत्र पवनी येथे आले होते. त्यांच्या समक्षच या चातुर्मासात पवनीला एक ३०-४० दिवसांचा यज्ञ झाला. या संबंधीची हकीकत आपल्या चरणकमलसेवकाला (डॉ. श्री. केशव रामचंद्र जोशी यांना) सांगत असताना ते असे म्हणत असत की "येथे यज्ञ करण्याचे ठरल्यावर त्या यज्ञाची सर्व जबाबदारी श्रीसीता-राममहाराजांवर आली. एके दिवशी ते सकाळीच उठून आन्हिक

उरकून रानात जावयास निघाले. त्यावेळी त्यांनी तांब्याच्या बऱ्याच सळया तांब्याच्याच तारेने बांधून आपल्या उपरण्याच्या खाली झाकून घेतल्या होत्या. पुढे ते जेव्हा दोन तीन दिवसांनी परत आले तेव्हा त्यांनी उपरण्याच्या खाली झाकलेल्या सर्व तांब्याच्या सळयांचे सोन्याच्या लगडीत रूपांतर करून आणलेले आहे असे लक्षात आले. ज्यावेळी त्यांना या संबंधी विचारले तेव्हा ते मला असे म्हणाले की, "यज्ञाचा इतका मोठा खर्च भागविण्यासाठी रानात जाऊन तांब्याचे सोने करून आणले." त्यांचे ब्रह्मचर्य सिद्ध असल्यामुळे त्यांना तांब्याचे सोने करण्याची विद्या अवगत झाली होती."

"अशा रीतीने अपरंपार द्रव्य खर्च करून पवनीचा यज्ञ पार पडला या यज्ञासाठी अनेक क्षेत्रातील याज्ञिक, शास्त्री, पंडित, पुराणिक तेथे जमले होते. त्या सर्वांना दक्षिणा, वस्त्रे व पात्रे देऊन व सर्व सुवासिनींना लुगडी, खण, नारळ इ. देऊन श्रीसीतारामहाराजांनी संतुष्ट केले. शेवटी श्रीस्वामीमहाराज पवनीहून निघून पुढे गेल्यावर मागील सर्व व्यवस्था पूर्ण करून एक दोन दिवसांनी तेही जेव्हा जावयास निघाले त्यावेळी गावातील एक हरिजन स्त्री त्यांना असे म्हणाली की, "महाराज ! आपण सर्व सुवासिनी स्त्रियांना लुगडी दिली; पण मला मात्र आपण काहीच दिले नाही." हे ऐकताच श्रीसीतारामहाराज त्या स्त्रीला असे म्हणाले की; "तू कालच एक लुगडे का मागून घेतले नाहीस ? काल माझ्याकडे सर्व वस्तू भरपूर होत्या. त्या सर्व वस्तू मी कालच सर्वांना वाटून टाकल्या. आता आज माझ्याकडे माझ्या लंगोटीशिवाय काहीही नाही. तुला लुगडे कसे देणार ?"

"वरील सर्व बोलणे चालले असताना त्यावेळी तेथे त्या गावचे ब्राह्मण उपाध्याय उभे होते. ते श्रीसीतारामहाराजांना असे म्हणाले

की, "माझ्या मंडळींना यज्ञाच्या वेळी दोन लुगडी मिळाली आहेत. त्यातील एक लुगडे मी या स्त्रीला देतो. आपल्या मंडळींना दोन लुगड्यांची जरुरी नाही. "यातील एक लुगडे कोणातरी स्त्रीला दिले तर तिला त्याचा उपयोग तरी होईल," असे आमची मंडळी कालच म्हणाली होती. तरी मी या स्त्रीला आमच्या मंडळींचे एक लुगडे देतो." त्या ब्राह्मणाची ही उदार वृत्ती पाहून श्रीसीतारामनहा-राजांना फार संतोष झाला व त्यांनी त्या ब्राह्मणाच्या म्हणण्याला अनुमती दर्शविली."

वरील सर्व प्रसंग सांगून झाल्यावर श्रीगुळवणीमहाराज आपल्या परमभक्ताला असे सांगत असत की, "श्रीसीतारामनहाराज हे मोठे अनासक्त, असंग्रही, विरक्त, अपरिग्रही व ब्रह्मचर्यसिद्ध महापुरुष होते. त्यामुळेच ते तांब्याचे सोने करू शकत असत. शिवाय झाडपाल्याचा उपयोग करून तांब्याचे सोने करण्याची प्रक्रियाही त्यांना माहीत होती. मात्र कोणालाही नुसते शास्त्र किंवा प्रक्रिया माहीत असली; तरी ब्रह्मचर्य सिद्ध झाल्याशिवाय तांब्याचे किंवा लोखंडाचे सोने होऊ शकत नाही."

प. प. श्रीशंकरस्वामीमहाराज यांनी "श्रीगुरु सीतारामनहाराज यांचे चरित्र" या ग्रंथात पृष्ठ २६७ वर जो प्रसंग वर्णन केला आहे तो श्रीतारामहाराजांच्या ठिकाणी तांब्याचे सोने करण्याचे जे अलौकिक सामर्थ्य होते त्याचा सबळ पुरावाच आहे. प. प. श्रीशंकरस्वामीमहाराज त्या प्रसंगाचे वर्णन करताना असे म्हणतात की, "श्रीसीतारामनहाराजांच्या हातून होत असलेला द्रव्यखर्च पाहून एके दिवशी त्यांचे गुरुबंधू श्री. गोविंदराव पंडित शिप्रीकर यांनी त्यांना असे विचारले की, "तुम्हापाशी असलेली ही द्रव्यविद्या आम्हाला शिकवाल काय ?" त्यावर श्रीसीतारामनहाराज त्यांना

असे म्हणाले की, "तुमची हठयोगसमाधी लागत असते ती आम्हाला माहीत आहे. तुम्हाला राजयोगसमाधीची गरज असल्यास ती आम्ही लावून देतो; पण ही विद्या मात्र मागू नका."

श्रीक्षेत्र पवनी येथे श्रीस्वामीमहाराजांचा सहा महिने मुक्काम होता. त्यावेळी येथे होणारे सर्व कार्यक्रम श्रीसीतारामहाराजांच्या देखरेखीखाली होत असत. श्रीक्षेत्र पवनीला झालेल्या यज्ञात ज्याप्रमाणे मुक्तद्वार अन्नसंतर्पण झाले त्याप्रमाणे इतर वेळीही ते चालूच होते. त्याकरिता श्रीसीतारामहाराजांनी शेजारीच असलेल्या श्री. टिल्लूराम नावाच्या गरीब वाण्याला दररोज लागणारे सामान पुरविण्यास सांगितले होते. त्याने सोमवारपेठेतून सामान विकत आणून मूळ भावावर रुपयामागे एक आणा नफा घेऊन ते श्रीसीतारामहाराजांना पुरवावयाचे असे ठरले होते. रोज आदल्या दिवसाच्या सामानाचे पैसे रोख चुकते करून दुसऱ्या दिवसासाठी लागणाऱ्या मालाची यादी श्री. टिल्लूराम यांना देण्यात येत असे. सहा महिन्यानंतर जेव्हा श्रीसीतारामहाराज श्रीक्षेत्र पवनीहून जाण्यास निघाले तेव्हा त्यांनी श्री. टिल्लूराम यांना असे विचारले की, "कसे काय रामशेटजी! तुम्हाला या झालेल्या व्यवहारात काही नफा झाला की नाही?" हे एकताच श्री. टिल्लूराम त्यांना असे म्हणाले की, "काय सांगू महाराज! आपण मज दीनावर जे उपकार केलेत ते अवर्णनीयच आहेत. आपण माझे जन्माचे कल्याण केलेत. मला या व्यापारात झालेला नफा आम्ही सर्वांनी जन्मभर खाल्ला तरी संपणार नाही. आपल्या केवळ कृपेनेच मला या सहा महिन्यात तीस हजार रुपये नफा झाला. माझे दारिद्र्य नष्ट झाले. मला आता कुटुंबभरणाची चिंता मुळीच उरली नाही." हे सांगत असताना श्री. टिल्लूराम यांच्या डोळ्यातून पाणी गळत होते. शेवटी अत्यंत सद्‌गदित

होऊन श्री. टिल्लूराम यांनी श्रीसीतारामहाराजांपुढे दंडप्राय नमस्कार घातले. तेव्हा श्रीसीतारामहाराज त्यांना असे म्हणाले की, "तू सत्याने वागलास त्याचे फळ तुला श्रीगुरुमहाराजांनी दिले आहे. कोणालाही कल्पना करता येणार नाही असेच श्रीसद्गुरु-नाथांचे देणे असते. आता तू आनंदात राहा."

श्रीसीतारामहाराजांच्या बंधुप्रेमाची आणि गुरुभक्तीची एक गोष्ट येथे निवेदन केली तर ती अनाठाई होणार नाही. श्रीस्वामी-महाराज एकदा निजामशाहीतून संचार करीत असताना निजामपूर या गावी येऊन उतरले. त्यावेळी त्यांच्याबरोबर श्रीसीताराममहा-राज व श्री. गांडानुवाही होते. श्रीस्वामीमहाराज येथे आल्यावर दर्शनेच्छू लोकांची खूप गर्दी झाली व नेहमीप्रमाणे येथेही सर्व कार्यक्रम सुरू झाले. श्रीस्वामीमहाराजांचा सकाळचा व दुपारचा वेळ लोकांना उपनिषदे, भाष्य, धर्मग्रंथ सांगणे, मंत्रोपदेश देणे, त्रितापाने पोळलेल्या आर्त लोकांना दुःखहरणासाठी इलाज सांगणे, तीर्थप्रसाद व अंगारा देणे यातच जात असे. सायंकाळी पुराण, कीर्तनादि कार्यक्रम झाल्यावर संध्यावंदनादि होऊन रात्री भजनाचा कार्यक्रम होत असे. श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःही नाना चालींवर आरत्या, पदे, अभंग वगैरे रचलेले आहेत. त्यांना संगीत अतिशय प्रिय होते. त्यामुळे भजनाच्या वेळी संगीत-भजनामध्ये ते अगदी रंगून जात असत. त्यावेळी त्यांना खरी विश्रांती मिळत असे, असे म्हणावयाला हरकत नाही.

मागे जयपूर येथे असताना एके दिवशी रात्री तेथील भक्त-मंडळी अत्यंत प्रेमाने भजन करीत होती. श्रीस्वामीमहाराज भजनात अगदी रंगून गेले होते. नाना प्रकारच्या रागरागिणीत म्हटल्या-

जाणाऱ्या पदांमुळे व अभंगांमुळे त्यांच्या ठिकाणी ईश्वराच्या अपूर्व प्रेमाविष्काराच्या विविध रंगांची जणूकाही उधळणच होत होती. या अवस्थेतच त्यांनी भजनी मंडळींना झंपा म्हणावयास सांगितले; पण त्या मंडळींना तो बरोबर म्हणता येईना व श्रीस्वामीमहाराजांचेही समाधान होईना. त्यावेळी श्रोतृमंडळीत श्रीमती भागूबाई वाशीमकर या बसल्या होत्या. त्यांना उद्देशून श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, “त्याला बोलावून आण. तो झंपा म्हणून दाखवील.” हें ऐकताच श्रीमती भागूबाई श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, “त्याला म्हणजे कोणाला?” हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, “सीतारामाला.” हे ऐकताच श्रीमती भागूबाईंनी जाऊन श्रीसीतारामम‌हाराजांना असे सांगितले की, “श्रीस्वामीमहाराज आपल्याला झंपा म्हणण्याकरिता बोलावीत आहेत; तरी आपण लवकर यावे.” श्रीमती भागूबाईंचा हा निरोप ऐकताच श्रीसीतारामम‌हाराज तात्काळ उठून श्रीगुरुसन्निध येऊन त्यांना नमस्कार करून बसले. ते बसताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना झंपा म्हणावयास सांगताच “बरे आहे” असे म्हणून त्यांनी स्वतः तबला वाजवून झंपाच्या तालात “नरा दत्तगुरू हे परब्रह्म आहे” आणि “उदो देवि तूझा उदो देवि तूझा” ही श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः रचलेली दोन पदे सुस्वर व मधुर आवाजात गाऊन दाखविली. श्रीसीतारामम‌हाराजांचा आवाज मुळातच अत्यंत मधुर व मृदू असा होता. शिवाय लहानपणी त्यांनी गायनाचा चांगलाच अभ्यास केला असल्यामुळे त्यांचे गायन ऐकून लोक अगदी थक्क व आनंदित झाले. श्रीस्वामीमहाराज तर “ब्रह्मानंदी लागली टाळी। कोण देहाते सांभाळी।” या स्थितीत जाऊन पोहोचले. त्यामुळे त्यांचा वरचेवर तोल जात होता व त्यांना वारंवार सावरून

धरावे लागत होते. अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवशी भजनात मोठा रंग भरून सर्वांना आनंदीआनंद करून दिला. श्रीस्वामीमहाराज तर दिव्य अशा प्रेमाविष्कारात व भजनानंदात मग्न होऊन गेले. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी व तेथे जमलेल्या सर्व मंडळींनी श्रीसीतारामममहाराजांची फार वाहवा केली. विद्या असावी तर ती अशीच असावी की, तिच्या योगाने ब्रह्मनिष्ठ महात्मेदेखील संतुष्ट होतील !

वर उल्लेख केलेल्या श्रीमती भागूबाई वाशीमकर या अत्यंत सात्त्विक व श्रद्धाभक्तिसंपन्न अशा बाई होत्या. श्रीस्वामीमहाराजांवर तर त्यांची पराकाष्ठेची भक्ती होती. त्यांच्याकडून आपणास अनुग्रह मिळावा व त्यांनी आपला शिष्य म्हणून स्वीकार करून आपले जीवन धन्य व कृतार्थ व्हावे अशी त्यांना अंत:करणापासून तळमळ लागून राहिली होती. आपली ही मुमुक्षत्वाची तळमळ पूर्ण व्हावी म्हणून एके दिवशी श्रीस्वामीमहाराज एकांतात स्वस्थचित्त व आनंदात आहेत असे पाहून त्या त्यांना अनन्यभावाने शरण जाऊन असे म्हणाल्या की, "महाराज ! आपण मला मंत्रोपदेश देऊन माझे जीवन कृतार्थ करा व मला या जन्ममरणचक्रपरंपरेतून कायमचे सोडवा. आपली कृपा झाल्याशिवाय माझा उद्धार होणार नाही. आपले चरणच या भवसागरातून मला पार करतील अशी मला खात्री आहे. आपल्या शिवाय या भूतलावर हे काम कोणीही करू शकणार नाही. आपल्या अमोघ संकल्पानेच माझ्यासारख्या जड-जीवाचे सोने होईल." अशी प्रार्थना करून श्रीमती भागूबाई हात जोडून श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे मोठ्या विनित भावाने उभ्या राहिल्या. त्यावेळी त्यांच्या शरीराला कंप सुटला होता व डोळ्या-तून अश्रुपात होत होता.

श्रीमती भागूबाईंची ही श्रद्धाभक्तियुक्त अंत:करणाने केलेली भावपूर्ण प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांचे अंत:करण अगदी हेलावून गेले. त्यांच्या शरणागतीने ते त्यांच्यावर प्रसन्न झाले व त्यांनी त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांना एका शुभमुहूर्तावर मंत्रोपदेश दिला; परन्तु श्रीमती भागूबाईंना मंत्रदीक्षादान देऊनही श्रीस्वामी-महाराजांचे स्वत:चेच समाधान झाले नाही. त्यामुळे त्यांना पूजा करण्यासाठी चांदीच्या पादुकांचा एक जोड द्यावा अशी श्रीस्वामी-महाराजांना इच्छा झाली; परन्तु अशा प्रकारच्या चांदीच्या पादुका तेथे नव्हत्या. त्यावेळी श्रीसीतारामहाराज जवळच सोवळयाने आपली संध्योपासना, जप वगैरे करीत बसले होते. त्यांच्याकडे पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, “या बाईंना पूजेसाठी चांदीच्या पादुका देण्याची इच्छा आहे; तरी तात्काळ त्यांची व्यवस्था कर.”

श्रीस्वामीमहाराजांनी प्रदर्शित केलेली ही इच्छा नेहमीप्रमाणे तात्काळ पूर्ण करून त्यांना संतुष्ट करावे अशी संकल्पना श्रीसीता-राममहाराजांच्या चित्तात उत्पन्न होऊन ते जपादि कर्म तेथेच सोडून देऊन आपल्या आसनावरून लगेच उठले आणि अंगावर उपरणे न घेताच नेसत्या सोवळयाच्या पंचानिशीच उघडे बोडके बाजारात सोनाराच्या दुकानात जाऊन त्यांनी तेथून चांदीच्या पादुका विकत घेऊन त्या श्रीस्वामीमहाराजांना अतिशय शीघ्र आणून दिल्या.

श्रीसीताराममहाराजांनी आपल्या इच्छेप्रमाणे तात्काळ चांदीच्या पादुकांचा जोड आणलेला पाहून श्रीस्वामीमहाराजांना परमसंतोष झाला. त्यांनी त्या पादुकांवर आपले दोन अंगठे ठेवून आपली सर्व शक्ती त्यात समाविष्ट करून जणूकाही आपले आत्मस्वरूपच असलेल्या अशा त्या पादुका श्रीमती भागूबाईंना प्रसाद म्हणून दिल्या.

श्रीस्वामीमहाराजांनी आपण न मागताच आपल्या मनातील इच्छा ओळखून आपल्याला चांदीच्या पादुकांचा जोड प्रसाद म्हणून दिला हे पाहून श्रीमती भागूबाईंची स्थिती "अनंत हस्तें कमला-वराने। देतां किती घेशील दो कराने॥" अशी झाली असल्यास काही नवल नाही. श्रीमती भागूबाईंची श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी जी अनन्यसाधारण निष्ठा, उत्कट प्रेम, दिव्य भक्ती, अलौकिक श्रद्धा व परम सात्त्विक भाव होता त्याचे जणूकाही प्रतीक म्हणूनच श्रीस्वामीमहाराजांकडून त्यांना हा पादुकांचा प्रसाद मिळाला होता.

श्रीस्वामीमहाराजांनी आपण स्वतःहून दिलेला हा पादुकांचा प्रसाद श्रीमती भागूबाईंनी अनन्यसाधारण अशा परमोत्कट भावाने ग्रहण करून तो मस्तकावर धारण केल्यावर त्यांची जी दिव्य अवस्था झाली ती पाहिली म्हणजे भगवान् श्रीगोपाळकृष्णनाथांनी परमभक्त उद्धवाला आपल्या पादुकांचा प्रसाद दिल्यावर व त्याने तो आपल्या मस्तकावर धारण केल्यावर त्याची जी विलक्षण अवस्था झाली त्याचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. या सर्व प्रसंगाचे व भक्तराज उद्धवाच्या अवस्थेचे वर्णन करताना श्रीमद्भागवतात महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की –

सुदुस्त्यजस्नेहवियोगकातरो
नशक्नुवंस्तं परिहातुमातुरः॥
कृच्छ्रं ययौ मूर्धनि भर्तृपादुके
बिभ्रन्नमस्कृत्य ययौ पुनः पुनः॥ ११-२९-४६॥

याचा अर्थ असा आहे की, आपणास श्रीकृष्णांच्या प्रेमाचा व स्नेहाचा त्याग करणे कठिण असले; तरी त्यांचा विरह होणार असे पाहून उद्धव फार दुःखाकुल झाला. त्या वियोगाला घाबरल्यामुळेच

त्याला सोडण्यास असमर्थ होऊन उद्धव अत्यंत अस्वस्थ, विव्हल व कष्टी झाला. त्यानंतर श्रीकृष्णांनीच कृपाकरून दिलेल्या दोन्ही पादुका मस्तकावर धारण करून व पुन:पुन्हा प्रभूंना अभिवादन करून उद्धव तेथून मोठ्या कष्टाने निघाला.

श्रीमद्भागवतातील वरील श्लोकाचा भावार्थ प्रकट करताना एकनाथी भागवतात श्रीसंत एकनाथमहाराजांनी असे म्हटले आहे की–

आणिकाचा स्नेह अतिबाधक। त्यातें सांडवी वेदविवेक।
तैसा कृष्णस्नेह नव्हे देख। तो सुखदायक स्नेहाळुवा ।। २९.८६३ ।।
उद्धवासी स्वाभाविक। गुरु परब्रह्म दोनी एक।
इतरांसी भावनात्मक। उद्धवास देख स्वत:सिद्ध ।। ८६४ ।।
ऐसा श्रीकृष्णस्नेहो आवश्यक। उद्धवासी सुखदायक।
त्या कृष्णासी सांडिता देख। आत्यंतिक विव्हळ ।। ८६५ ।।
नि:शेष निमाली विषयावस्था। जरी वृद्ध जाहली पतिव्रता।
तरी त्यागावा निजभर्ता। हें तिशीं सर्वथा नावडे ।। ८६६ ।।
तेवीं अनुभवूनि परमार्था। उद्धव पावला जीवन्मुक्तता।
तरी सद्गुरु श्रीकृष्ण त्यागितां। अतिविव्हळता गुरुप्रेमें ।। ८६७ ।।
स्नेहें द्वेषें सकामेंसीं। जे जे वेधले श्रीकृष्णासी।
ते ते पावले परमानंदासी। त्या श्रीकृष्णासी त्यजी कोण ।।८६८ ।।
अविधीं रातले श्रीकृष्णासी। ते वंद्य जाहले ब्रह्मादिकांसी।
मा उद्धव विकला गुरुप्रेमासी। केवीं श्रीकृष्णासी त्यजील ।। ८६९ ।।
ज्यासी परब्रह्मत्वें गुरुभक्ती। त्यासी तृणप्राय जीवन्मुक्ती।
जाहलीही मुक्ति उपेक्षिती। विकिले गुरुभक्ती अनन्यत्वें ।। ८७० ।।
उल्लंघूं नये सद्गुरुवचन। करावें बदरिकाश्रमीं गमन।
श्रीकृष्णप्रेमा पढियें पूर्ण। तो सर्वथा जाण निघों नेदी ।। ८७१ ।।

ऐसें उभयतां अतिसंकट । उद्धवा वोढवेल दुर्घट ।
श्रीकृष्णप्रेमें उतटे पोट । न देखे वाट बदरीची ।। ८७२ ।।
त्यागोनि जावें जरी कृष्णनाथा । तरी हा निजधामा जाईल आतां ।
मग मी न देखें मागुता । यालागीं अवस्था अनावर ।। ८७३ ।।
जलदनवघनतनू । श्याम राजीवलोचनू ।
आनंदविग्रही श्रीकृष्णू । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ।। ८७४ ।।
मुकुटकुंडलें मेखळा । तिलक रेखिला पिवळा ।।
पदक एकावली गळां । कंठीं तेजागळा कौस्तुभ ।। ८७५ ।।
वाकीअंदुवांचा गजर । चरणीं गर्जत तोडर ।
विद्युत्प्राय पितांबर । तेणें शारंगधर शोभत ।। ८७६ ।।
कांसे विराजे सोनसळा । आपाद रुळे वनमाळा ।
घवघवीत घनसांवळा । देखतां डोळां जीवू निवे ।। ८७७ ।।
ऐसे श्रीकृष्ण दर्शन । पुढती न देखें मी आपण ।
यालागीं उद्धव जाण । प्रेमें संपूर्ण विव्हळ ।। ८७८ ।।
उद्धव पावला परब्रह्म पूर्ण । त्यासी सगुणाची अवस्था कोण ।
कृष्णप्रभाप्रकाशें चिद्घन । आत्मवस्तु संपूर्ण श्रीकृष्ण ।। ८७९ ।।
घृत थिजले कां विघुरलें । परी घृतपणा नाहीं मुकलें ।
तेवीं सगुणनिर्गुणत्वें मुसावलें । परब्रह्म संचलें श्रीकृष्ण ।। ८८० ।।
त्याज्य सगुण पूज्य निर्गुण । हेही दशा आरती जाण ।
ज्यासी परब्रह्म तृणपाषाण । त्यासी त्याज्य सगुण कदा नव्हे ।। ८८१ ।।
एवं सगुण आणि निर्गुण । उद्धवासी समसमान ।
गुरुत्वें कृष्णीं प्रेम गहन । तो त्यागितां पूर्ण विव्हळता ।। ८८२ ।।
आज्ञा नुल्लंघवे सर्वथा । म्हणोनि निघावें बदरीतीर्था ।
तंव श्रीकृष्णासी सांडूनि जातां । परमावस्था उद्धवीं ।। ८८३ ।।

उद्धव प्रयाण अवसरीं। लोळणी घाली पायांवरी।
चरण आलिंगी हृदयीं धरी। जावया दूरी धीर नव्हे ॥ ८८४ ॥
मज एथोनि गेलिया आतां। मागुती न देखें श्रीकृष्णनाथा।
तेणें अनिवार अवस्था। पाऊल सर्वथा न घालवे ॥ ८८५ ॥
मी निवालों कृष्णचरणामृतीं। मज चाड नाहीं महातीर्थीं।
त्याहीमाजीं अदृष्टगती। अंतीं श्रीपति त्यागवी ॥ ८८६ ॥
सप्रेम चळचळा कांपत। कंठ जाहला सद्गदित।
बाष्पें क्षणक्षणां स्फुंदत। स्वेदरोमांचित उद्धव ॥ ८८७ ॥
गमनालागीं अतिउद्यत। पायां लागोनि पऱ्हा जात।
सेवेंचि येऊनि पायां लागत। विगुंतलें चित्त हरिप्रेमीं ॥ ८८८ ॥
पुढती नमन पुढती गमन। पुढती घाली लोटांगण।
पुढती वंदी श्रीकृष्णचरण। सर्वथा जाण निघवेना ॥ ८८९ ॥
देखोनि उद्धवाचा भावो। परमानंदे तुष्टला देवो।
यासी माझ्या ठायीं अतिस्नेहो। गुरुत्वें पहा हो अनन्य ॥ ८९० ॥
कृपा उपजली यदुनायका। आपुले चरणींच्या पादुका।
उद्धवासी दिधल्या देखा। तेणें निजमस्तकीं ठेविल्या ॥ ८९१ ॥
पादुका ठेवितांचि शिरीं। मी जातों कृष्णापासूनि दूरी।
हें नाठवें उद्धवाभीतरीं। ऐशियापरी प्रबोधला ॥ ८९२ ॥
पादुका ठेवितांचि माथां। स्वयें उपशमें अवस्था।
नमस्कारोनि श्रीकृष्णनाथा। होय निघता तदाज्ञा ॥ ८९३ ॥
त्रिवार करोनि प्रदक्षिणा। अवलोकून कृष्णवदना।
नमस्कारोनि श्रीचरणा। उद्धव कृष्णाज्ञा निघाला ॥ ८९४ ॥

★ ★ ★

अशाच एका प्रसंगी श्रीसीतारामहाराज काही भक्त मंडळीं-बरोबर बोलत बसले होते. बोलता बोलता हळूहळू श्रीसीताराम-

महाराज यांचा आवाज वाढत गेला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज जवळच बसले होते. त्यामुळे तेथे बसलेला एक भक्तसाधक श्रीसीताराममहाराजांना अगदी सौम्य शब्दात असे म्हणाला की, "जवळच श्रीस्वामीमहाराज बसले आहेत. त्यांना आपल्या सर्वांच्या उंच आवाजाचा त्रास तर होणार नाही ना ?" त्या भक्ताने आवाज खाली आणण्याची अत्यंत कौशल्यपूर्ण शब्दात केलेली सूचना ऐकताच श्रीसीताराममहाराज जरा मोठ्यानेच श्रीस्वामीमहाराजांना ऐकू जाईल अशा स्वरात असे म्हणाले की, "महाराजांचे भय तुम्हाला वाटत असेल तर वाटू द्या. मला काही त्यांचे भय वाटत नाही. अहो ! यावेळी महाराजांचे प्रपितामह जरी वरून खाली उतरून आले; तरी मी कोणाला घाबरणार नाही." श्रीस्वामीमहाराजांना ऐकू जावेत म्हणून मुद्दामच मोठ्याने उच्चारलेले हे शब्द--बोलणे श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर पडल्यावर ते अत्यंत शांत चित्ताने व कमालीच्या संयमाने श्रीसीताराममहाराजांकडे व त्यांच्याशी बोलत बसलेल्या भक्त मंडळींकडे पाहून हसू लागले. श्रीस्वामीमहाराजांचे हे हास्य इतके मनमोकळे व निरागस होते की, त्यातून आपल्या पूर्वाश्रमातील बंधूंवरील व परमप्रिय भक्तावरील प्रेमच व्यक्त होत होते.

श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मासात श्रीस्वामीमहाराज सकाळी स्नानोत्तर श्रीविठ्ठल मंदिराच्या पाठीमागे असलेल्या एका औदुंबर वृक्षाखाली बसून उपनिषदांची आवृत्ती, श्रीगुरुचरित्राचे वाचन, जप, ध्यान वगैरे अनुष्ठान करीत असत. यावेळी श्रीवैनगंगेवरून स्नान करून आलेले लोक शंकराच्या पिंडीवर पाणी घालतात तसे अत्यंत भोळ्या भावाने व मोठ्या श्रद्धाभक्तिपूर्वक श्रीस्वामीमहा-

५

राजांच्या मस्तकावर पाणी घालीत असत. अशा प्रकारे पाणी घालणाऱ्या सर्व लोकांची निष्ठा अत्यंत अलौकिक व लोकोत्तर अशी असली; तरी त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना होत असलेली पीडा जाणून एके दिवशी त्या सर्व लोकांना उद्देशून श्रीसीतारामहाराज असे म्हणाले की, "आपण सर्वजण महाराजांच्या अंगावर थंडगार पाणी तांब्या तांब्या घालता; पण यामुळे त्यांना त्रास होतो. तरी आपण सर्व लोकांनी त्यांना त्रास होईल असे करू नये." सर्व लोकांना त्यांनी कळकळीने असे समजावून सांगितले; तरी लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना पाणी घालण्याचा आपला क्रम काही सोडला नाही. शेवटी पाणी घालण्यापासून लोकांनी परावृत्त व्हावे म्हणून श्रीसीतारामहाराजांनी श्रीस्वामीमहाराज ज्या औदुंबराच्या वृक्षाखाली अनुष्ठानाला बसत असत त्या वृक्षाभोवती बांबूचे कुंपण घातले. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांचा त्रास दूर होऊन त्यांना स्वास्थ लाभले. पुढे येणारे लोक श्रीस्वामीमहाराज सकाळी औदुंबराखाली अनुष्ठानाला बसले की, त्यांना व औदुंबराला प्रदक्षिणा घालीत असत व वृक्षाची पूजा करीत असत.

श्रीसीतारामहाराजांनी वरील प्रकारे श्रीस्वामीमहाराजांची या त्रासातून सुटका करून जणू काही असे सूचित केले की, "श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या जवळ ज्यांना सेवा करीत राहावयाचे असेल त्यांनी, त्यांना कोणत्याही प्रकारे त्रास होता कामा नये, असेच वागले पाहिजे. एवढेच नव्हे; तर आपल्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांना सर्व प्रकारे सुखच लागावे अशी बुद्धी धारण करूनच राहावे; कारण अशा बुद्धीने श्रीगुरुसहवास करणाराच सच्छिष्य होय." श्रीसीतारामहाराजांची ही सद्गुरुसेवा व त्यांची आपल्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या चरणी असलेली अनन्य श्रद्धा, निष्ठा व प्रेम पाहिले

की, श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" सच्छिष्याची जी लक्षणे सांगितली आहेत त्याचे स्मरण होऊन ही सर्व लक्षणे श्रीसीतारामहाराजांच्या ठिकाणी समूर्त झालेली दृष्टीस पडून मनाला परमानंद झाल्याशिवाय राहात नाही. श्रीसमर्थ त्यासंबंधी असे म्हणतात की–

मुख्य सच्छिष्याचें लक्षण। सद्‌गुरुवचनीं विश्वास पूर्ण।
अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य ॥ ५.३.१९ ॥
शिष्य पाहिजे निर्मळ। शिष्य पाहिजे आचारशीळ।
शिष्य पाहिजे केवळ। विरक्त अनुतापी ॥२०॥
शिष्य पाहिजे निष्ठावंत। शिष्य पाहिजे शुचिष्मंत।
शिष्य पाहिजे नेमस्त। सर्व प्रकारीं ॥ २१ ॥
शिष्य पाहिजे साक्षेपी विशेष। शिष्य पाहिजे परम दक्ष।
शिष्य पाहिजे अलक्ष। लक्षी ऐसा ॥ २२ ॥
शिष्य पाहिजे अतिधीर। शिष्य पाहिजे अति उदार।
शिष्य पाहिजे अतितत्पर। परमार्थविषयीं ॥ २३ ॥
शिष्य पाहिजे परोपकारी। शिष्य पाहिजे निर्मत्सरी।
शिष्य पाहिजे अर्थांतरी। प्रवेशकर्ता ॥ २४ ॥
शिष्य पाहिजे परम शुद्ध। शिष्य पाहिजे परम सावध।
शिष्य पाहिजे अगाध। उत्तम गुणांचा ॥ २५ ॥
शिष्य पाहिजे प्रज्ञावंत। शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त।
शिष्य पाहिजे नीतिवंत। मर्यादेचा ॥ २६ ॥
शिष्य पाहिजे युक्तिवंत। शिष्य पाहिजे बुद्धिवंत।
शिष्य पाहिजे संतासंत। विचार घेता ॥ २७ ॥
शिष्य पाहिजे धारिष्टाचा। शिष्य असावा दृढ व्रताचा।
शिष्य पाहिजे उत्तम कुळींचा। पुण्यशीळ ॥ २८ ॥

शिष्य असावा सात्त्विक । शिष्य असावा भजक ।
शिष्य असावा साधक । साधनकर्ता ।। २९ ।।
शिष्य असावा विश्वासी । शिष्य असावा कायाक्लेशी ।
शिष्य असावा परमार्थासी । वाढवूं जाणे ।। ३० ।।
शिष्य असावा स्वतंत्र । शिष्य असावा जगन्मित्र ।
शिष्य असावा सत्पात्र । सुर्व गुणें ।। ३१ ।।
शिष्य असावा सद्विद्येचा । शिष्य असावा सद्भावाचा ।
शिष्य असावा अंतरींचा । परम शुद्ध ।। ३२ ।।
शिष्य नसावा अविवेकी । शिष्य नसावा गर्भसुखी ।
शिष्य असावा संसारदुःखी । संतप्तदेही ।। ३३ ।।
जो संसारदुःखें दुखवला । जो त्रिविध तापें पोळला ।
तोचि अधिकारी झाला । परमार्थासी ।। ३४ ।।
बहु दुःख भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे ।
संसारदुःखाचेनि गुणें । वैराग्य उपजे ।। ३५ ।।
जयास संसाराचा त्रास । तयासीच उपजे विश्वास ।
विश्वासबळें दृढ कांस । धरिली सद्गुरूची ।। ३६ ।।
अविश्वासें कांस सोडिलीं । ऐसीं बहुतेकें भवीं बुडालीं ।
नाना जळचरीं तोडिलीं । मध्येंचि सुखदुःखें ।। ३७ ।।
या कारणें दृढ विश्वास । तोचि जाणा सच्छिष्य ।
मोक्षाधिकारी विशेष । अग्रगण्य ।। ३८ ।।
जो सद्गुरुवचनें निवाला । तो सायुज्यतेचा आंखिला ।
संसारपांगें पांगिला । नवचे कदा ।। ३९ ।।
सद्गुरूहूनि देव मोठा । जयास वाटे तो शिष्य करंटा ।
सुटला वैभवाचा फांटा । सामर्थ्यपिसें ।। ४० ।।

सद्गुरुस्वरूप ते संत । आणि देवास मांडे कल्पांत ।
तेथें कैचें उरेल सामर्थ्य । हरिहरांचें ।। ४१ ।।
म्हणोनि सद्गुरुसामर्थ्य अधिक । जेथें अटती ब्रह्मादिक ।
अल्पबुद्धि मानव रंक । तयासि हें कळेना ।। ४२ ।।
गुरु देवां बरोबरी । तरी तो शिष्य दुराचारी ।
भ्रांति बैसली अभ्यंतरीं । सिद्धांत नेणवे ।। ४३ ।।
देव मनुष्यीं भावला । मंत्री देवपणासि आणिला ।
सद्गुरु तो नवचे कल्पिला । ईश्वराचेनि ।। ४४ ।।
म्हणोनि सद्गुरु पूर्णपणें । देवाहूनि अधिक कोटिगुणें ।
जयास वर्णिता भांडणें । वेदशास्त्रीं लागलीं ।। ४५ ।।
असो सद्गुरुपदापुढें । दुजें कांहींच न चढे ।
देवसामर्थ्य तें केवढें । मायाजनित ।। ४६ ।।
अहो सद्गुरुकृपा जयासी । सामर्थ्य न चले तयापाशीं ।
ज्ञानबळें वैभवासी । तृणतुल्य केलें ।। ४७ ।।
सद्गुरुकृपेचेनि बळें । अपरोक्षज्ञानाचेनि उसाळें ।
मायेसहित ब्रह्माण्ड सगळें । दृष्टीस न ये ।। ४८ ।।
एसें सच्छिष्याचे वैभव । सद्गुरुवचनीं दृढ भाव ।
तेणें गुणें देवराव । स्वयेंचि होती ।। ४९ ।।
अंतरीं अनुतापें तापलें । तेणें अंतर शुद्ध झालें ।
पुढें सद्गुरुवचनें निवालें । सच्छिष्य ऐसे ।। ५० ।।
लागता सद्गुरुवचनपंथें । झालें ब्रह्माण्ड पालथें ।
तरी जयाच्या शुद्ध भावार्थें । पालट न धरिजे ।। ५१ ।।
शरण सद्गुरूंसि गेले । सच्छिष्य ऐसे निवडले ।
क्रियापालटें झालें । पावन ईश्वरीं ।। ५२ ।।

**ऐसा सद्भाव अंतरीं। तेचि मुक्तीचे वाटेकरी।**
**येर मायिक वेषधारी। असच्छिष्य॥ ५३॥**

श्रीस्वामीमहाराजांचे सकाळचे अनुष्ठान आटोपल्यावर ते प्रातः- कर्मे करून शुचिर्भूत होऊन आलेल्या ब्राह्मणांना त्यांच्या इच्छेप्रमाणे भाष्यावरून वेदान्त समजावून देत असत. त्यावेळी स्त्रियांना व पारोशा पुरुषांना आत यावयाची बंदी असे व दाराला आतून कडी लावून भाष्याचा पाठ चालू असे.

अशा प्रकारे काही ठराविक अधिकारी व्यक्तींनाच वेदान्त सांग- ण्याच्या मागे श्रीस्वामीमहाराजांची जी अपूर्व अशी दृष्टी होती ती सर्व साधक-भक्त-वाचकांनी लक्षात घेतली म्हणजे श्रेष्ठ-कनिष्ठ- तेचा तर-तमभाव किंवा जातीजमातीचे वैषम्य यात अंतर्निहित नसून श्रीसंततुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणे "अधिकार तैसा करूं उपदेश। साहे ओझें त्यास तेंचि द्यावें।" हीच दृष्टी यात सामावलेली आहे हे स्पष्ट होते. अनधिकारी व्यक्तींना वेदान्त समजावून सांगितला तर साधनसंपत्तीच्या अभावी त्यांच्या ठिकाणी तो मुरत नाही व त्याचा विपरित परिणाम होऊन त्यांचा कर्ममार्गा- वरील विश्वास उडून गेल्यामुळे ते परमार्थ व कर्ममार्गयुक्तसंसार या दोहोंपासून वंचित होऊन त्यांच्या हाती काहीही लागत नाही. अशा रीतीने उभयभ्रष्ट झाल्यामुळे त्यांचे पतन होते. जो वेदान्ताचा अधिकारी आहे त्याने आपल्या बाह्य देहाची राहाटणी शास्त्राधारे कर्ममार्गाने करून वेदान्त म्हणजे तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि, प्रज्ञानं ब्रह्म व अयमात्मा ब्रह्म या चार महावाक्यांपैकी एका महावाक्याच्या चिंतनाने ब्रह्मच सत्य आहे, जगत् मिथ्या आहे व जीव ब्रह्मच आहे अशी वृत्ती अंतःकरणात पूर्णपणे बाणवावयाची असते. यासाठी साधन चतुष्टय संपन्नतेची म्हणजे नित्यानित्यवस्तुविवेक, वैराग्य,

शम-दम-उपरती-तितिक्षा-श्रद्धा व समाधान हे शमादि षट्क व मुमुक्षुत्व यांची नितांत आवश्यकता असते. ही साधनसंपत्ती जवळ नसताना वेदान्त अंगी मुरत नाही. यामुळेच "तरी विरक्तीवांचूनि कहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं।। १५.३६ ।।" असा महासिद्धान्त श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरी"त प्रस्थापित केला आहे. या दृष्टिकोनातून आपण जेव्हा श्रीस्वामीमहाराजांच्या वेदान्त शिकविण्याच्या वरील पद्धतीचा विचार करू तेव्हाच त्यातील रहस्य आपल्या हाती येईल. श्रीस्वामीमहाराज दिवसभर सामान्यांना कर्ममार्गाचा उपदेश करून एकप्रकारे त्यांना क्रममुक्तीचेच अधिकारी करीत असत यात काही शंका नाही. या दृष्टीनेच श्रीगोपालकृष्णनाथांनी श्रीमद्भगवद्गीतेत असे म्हटले आहे की –

> न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
> जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ।। ३.२६ ।।

याचा अर्थ असा आहे की, ज्ञानी पुरुषाने असे करणे जरूर आहे की, कर्म व त्याचे फल यांमध्ये आसक्त असणाऱ्या अजाणांच्या बुद्धीत भ्रम अर्थात् कर्मात अश्रद्धा उत्पन्न करू नये; तर आपण स्वतः परमेश्वरस्वरूपी स्थित होऊन सर्व कर्मे चांगल्या रीतीने करून त्या लोकांकडूनही तशीच कर्मे करवावीत.

या श्लोकावरील श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत" प्रकट केलेला भावार्थ पाहिला म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनी वेदान्त कथनाची जी दृष्टी आयुष्यभर राबविली ती किती योग्य होती याचा प्रत्यय येऊन मन अलौकिक आनंदाने भरून जाते. ते असे म्हणतात की –

> मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।
> अलौकिक नोहावें । लोकांप्रति ।। ३.१७१ ।।

जें सायासें स्तन्य सेवी । तें पक्वान्नें केवीं जेवी ।
म्हणौनि बालका जैशी नेदावीं । धनुर्धरा ॥ १७२ ॥
तैशी कर्मीं जयां अयोग्यता । तयांप्रति नैष्कर्म्यंता ॥
न प्रगटावी खेळतां । आदिकरुनी ॥ १७३ ॥
तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी ।
नैष्कर्मींही दावावी । आचरोनी ॥ १७४ ॥
तया लोकसंग्रहालागीं । वर्तता कर्मसंगीं ।
तो कर्मबंधु आंगीं । वाजैल ना ॥ १७५ ॥
तैसी बहुरुपियांची रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं ।
परी लोकसंपादणी । तैशीच करिती ॥ १७६ ॥

याचा अर्थ असा आहे की, "थोरांनी स्वतः सन्मार्गानें वागून लोकांनाही वैदिक धर्माच्या सरळ मार्गास लावावे; परन्तु सामान्य जनाला लोकबाह्य वागण्याने आपण कोणी लोकांपेक्षा अलौकिक असे वेगळे व श्रेष्ठ पुरुष आहोत असे भासू देऊ नये. (त्याचप्रमाणे कर्माचरण करून चित्तशुद्धी होण्याच्या पूर्वी त्यांना नैष्कर्म्य ब्रह्म-स्थितीचेही ज्ञान सांगू नये.) जसे एखादे लहान मूल स्तनपानदेखील मोठ्या प्रयासाने करते ते पक्वान्ने कसे बरे खाणार ? याकरिता हे अर्जुना ! त्या तान्ह्या मुलाला पक्वान्ने देऊच नयेत. तसे यथाशास्त्र कर्माचरण करण्यास जो अनधिकारी आहे, त्याला ज्ञानमार्गाची थोरवी असलेली नैष्कर्म्यंता अर्थात् कर्मत्यागाची उच्चावस्था थट्टेने सुद्धा सांगून प्रकट करू नये. त्याला सत्कर्मांचेच आचरण करण्यास लावावे. त्याच्या समोर सत्कर्माचीच प्रशंसा करावी आणि निष्काम झालेल्या पुरुषांनीही अशा अनधिकारी लोकांना सत्कर्मांचेच आचरण करून दाखवावे. केवळ लोक कल्याणाकरिता (सिद्धपुरुषाने) कर्मयोगाचे आचरण केले असता, त्यांना कर्मबंध भोगावा लागत

नाही, हे लक्षात घेतले पाहिजे. बहुरूप्यांनी जरी राजाराणींची सोंगे घेतली, तरीही त्यांच्या मनात त्यावेळी स्त्रीपुरुषभाव मुळीच नसतो; पण आपण घेतलेल्या सोंगाची बतावणी योग्य आहे असे लोकांना दाखविण्याकरिता ते तसेच वागतात. ”

पवनी येथे मागे वर्णन केलेल्या कार्यक्रमाप्रमाणे भाष्यपाठ झाल्यानंतर भोजनापूर्वी सर्व दक्षिणी व गुजराती ब्राह्मण मिळून श्रीस्वामीमहाराजांना एका परातीत बसवून सर्वजण त्यांची सर्वोपचारांनी महापूजा करीत असत. प्रथम सर्वजण त्यांना पंचामृताने स्नान घालून रुद्राभिषेक करीत असत. त्यानंतर चंदन, केशर इत्यादि सुगंधी द्रव्यांची उटी लावून मग सुवासिक असा सुंदर पुष्पहार त्यांना घालीत असत. पुढे धूप व दीप अर्पण करून नंतर एक मोठी परात भरून खिसमिस, चारोळे, बदाम, पिस्ते इत्यादि सुक्या मेव्याचा नैवेद्य समर्पण करीत असत. त्यानंतर “ जयजय श्रीमद् गुरुवर स्वामिन् परमात्मन् हंसा । वासुदेवानंदसरस्वती आरती तदहंसा ।। ” ही प. प. श्रीमन्नृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज यांनी केलेली आरती म्हणून त्यांना तुपाचे दिवे भक्तिभावाने ओवाळीत असत. शेवटी तेथे जमलेले सर्वजण श्रीस्वामीमहाराजांना मंत्रपुष्पांजली वाहत असत. इतकेच नव्हे; तर तेथे आलेला प्रत्येकजण श्रीस्वामीमहाराजांना बेल, तुळशी व फुले वाहून त्यांच्या श्रीचरणांवर मस्तक ठेवून वारंवार नमस्कार करून स्वतःला धन्य मानीत असे. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज मुखाने नारायण, श्रीदत्त, श्रीगुरुदेवदत्त, दत्तात्रेय इत्यादि मधुर भगवन्नामाचे उच्चारण करून प्रत्येकाला आपल्या हाताने परातीमध्ये ठेवलेला सुकामेवा ओंजळ ओंजळ प्रसाद म्हणून वाटीत असत.

६

श्रीक्षेत्र पवनी येथे हा सर्व कार्यक्रम चालू असताना श्रीस्वामी-महाराज कोणालाही "शिवू नका" असे म्हणत नसत. श्रीदत्त-प्रभूंच्या अतर्क्य इच्छाशक्तीमुळे ते सर्वांना सुलभ झाले होते हेच खरे ! हा सर्व कार्यक्रम पाहताना लोकांच्या डोळयांचे पारणे फिटून जात असे. आबालवृद्ध, स्त्रीपुरुषादि सर्व जातीच्या सर्व लोकांवरील श्रीस्वामीमहाराजांचे पोटच्या पोराप्रमाणे असलेले लोकोत्तर प्रेम व प्रेमळ वागणूक पाहून सर्वांच्या डोळयातून अश्रू पाझरत असत. श्रीस्वामीमहाराजांसारखे लोकोत्तर महापुरुष "सर्वत्र समदर्शिनः।" या मूर्त व दुर्मिळ अशा गुणाने मंडित झालेले असतात हेच खरे आहे. त्यांच्यामुळेच हा गुण समूर्त झालेला दृष्टीस पडून धन्यता प्राप्त होते. महापुरुषांच्या या एकमेवाद्वितीय अशा गुणाचे वर्णन करताना श्रीगोपालकृष्णनाथांनी श्रीमद् भगवद्गीतेत असे म्हटले आहे की –

> विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनी।
> शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः॥ ५·१८॥
> इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः।
> निर्दोषं हि समं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः॥ १९॥

याचा अर्थ असा आहे की, "ब्रह्मज्ञानी किंवा ब्रह्मनिष्ठ असे ज्ञानीजन हे विद्या व विनय यांनी संपन्न असलेल्या ब्राह्मण तसेच गाय, हत्ती, कुत्रा आणि चांडाळ यांमध्ये समदृष्टी ठेवणारे म्हणजेच समब्रह्म पाहणारे असेच असतात.॥ १८॥ ज्यांचे मन किंवा अंतःकरण समत्वभावात अर्थात् सर्व भूतातील साम्यामध्ये स्थित असते त्यांनी या शरीरात असताना जिवंतपणीच अर्थात् या जन्मीच संपूर्ण संसार जिंकला आहे अर्थात् पुढील जन्म जिंकला आहे म्हणजे ते जिवंतपणीच संसारापासून मुक्त आहेत; कारण सच्चिदानंदघन

परमात्मा अर्थात् अक्षर आत्मतत्त्व सर्वदोषशून्य व सर्वत्र सम आहे म्हणून ते सच्चिदानंदघन परमात्म्यातच अर्थात् ब्रह्मामध्येच स्थित असतात. ॥ १९ ॥

श्रीभगवंतांनी वर्णिलेल्या या गुणाचा भावार्थ प्रकट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञानेश्वरीत असे म्हटले आहे की--

मग हा मशकु हा गजु । कीं हा श्वपचु हा द्विजु ।
पैल इतरु हा आत्मजु । हें उरेल कें ? ॥ ५·९३ ॥
ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन ।
हें असो कैंचें स्वप्न । जागतया ॥ ९४ ॥
एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा ।
तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषमु काई ॥ ९५ ॥
म्हणौनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म ।
हें संपूर्ण जाणे वर्म । समदृष्टीचे ॥ ९६ ॥
जिहीं विषयसंगु न सांडिता । इंद्रियांतें न दंडितां ।
परी भोगिली निसंगता । कामनेंविण ॥ ९७ ॥
जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि व्यापारें ।
परि सांडिलें निदसुरें । लौकिकु हें ॥ ९८ ॥
जैसा जनामाजि खेचरु । असतचि जना नोहे गोचरु ।
तैसा शरीरीं परी संसारु । नोळखे तयांतें ॥ ९९ ॥
हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळींचि जळ लोळे ।
तें आणिकें म्हणती वेगळे । कल्लोळ हे ॥ १०० ॥
तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवी ब्रह्मचि तो साचें ।
मन साम्या आलें जयाचें । सर्वत्र गा ॥ १०१ ॥

याचा अर्थ असा आहे की, "मग हे चिलट किंवा हा हत्ती, तसेच हा अत्यंज, हा ब्राह्मण अथवा हा आपला मुलगा किंवा हा दुसऱ्याचा

असलेला परका हा भेद त्यांच्यापाशी कोठून राहणार ? ॥ ९३ ॥ किंवा ही गाय आणि हा कुत्रा अथवा एक थोर किंवा श्रेष्ठ आणि एक लहान किंवा एक कनिष्ठ अशा तऱ्हेचे द्वैतभावाचे स्वप्न अद्वैतबोधाच्या ठिकाणी जागृत झालेल्या पुरुषांना कोठून पडणार ? ॥ ९४ ॥ जेथे अहंकार उरला असेल तेथेच भेदाची किंवा भ्रांतीची प्रतीती होते. तो अहंकारच जर अगोदर सर्वतोपरी नाहीसा झाला; तर आता भेद प्रतीती होणार कोणाला ? ॥ ९५ ॥ त्यामुळे सर्वत्र, सर्वकाळ आणि सर्वात सम म्हणजे पूर्णपणे व्याप्त असणारे जे एकमेवाद्वितीय ब्रह्मच मी स्वतः आहे, हे समदृष्टीचे मार्मिक तत्त्व तो संपूर्णपणे जाणतो. ॥ ९६ ॥ ज्यांनी विषयसंग न सोडता आणि इंद्रियांचे दमन न करता विषय कामनेचा त्याग केल्यामुळे अर्थात् वासनांचा बाध केल्यामुळे अलिप्तपणाचा किंवा अकर्तेपणाचा उपयोग अर्थात् अनुभव घेतला आहे, ॥ ९७ ॥ जे बाह्यतः लोकांच्या राहाटीप्रमाणे त्यांच्या आधाराने सर्व लौकिक व्यवहाराचे किंवा व्यापाराचे आचरण करतात; पण ज्यांनी लौकिकात असलेल्या आत्मस्वरूपविषयक अज्ञानरूपी महानिद्रेचा ( व त्याचे कार्य जी अहंता व ममता यांच्या अध्यासाचा म्हणजे मिथ्या आरोपाचा) त्याग केला आहे ॥ ९८ ॥ ( आणि ) ज्याप्रमाणे पिशाच्च सर्व लोकात असूनही लोकांना दिसत नाही; त्याप्रमाणे तो तत्त्ववेत्ता पुरुष शरीरधारी असतो; तरीपण संसारी लोक त्याला ओळखीत नाहीत. ॥ ९९ ॥ हे असो. ज्याप्रमाणे वाऱ्याच्या संबंधामुळे पाण्यावरच पाणी लाटांच्या रूपाने खेळते; पण इतर लोक मात्र त्या लाटा पाण्याहून वेगळ्या आहेत असे म्हणतात ॥ १०० ॥ त्याचप्रमाणे तत्त्ववेत्याचे नामरूप व जगत् ही व्यष्टी-समष्टी विक्षेपाची प्रतीती असली; तरीसुद्धा ज्याचे मन सर्व ठिकाणी

समतेला अर्थात् सर्वत्र ब्रह्मभावयुक्त झाले आहे, तो खरोखर साक्षात् ब्रह्मच आहे.।। १०१ ।। "

श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मासात श्रीस्वामीमहाराजांचा जो दिनक्रम चालू असे त्यात ते चौथ्या प्रहरी श्रीविठ्ठल मंदिरामध्ये बसून भक्तांच्या व्यावहारिक पीडा दूर करण्यासाठी व कामनिकांच्या इच्छा पूर्ण करण्यासाठी मंत्र-तंत्र औषधे-वगैरे देऊन उपचार सांगत असत. त्यानंतर नवीन आलेल्या हरिदास किंवा पुराणिकांची कीर्तने व पुराणे करवून घेऊन आपणही ती सर्वांसह ऐकत बसत असत. त्यानंतर " दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा " हे भजन म्हणणाऱ्या भक्तांसहित श्रीवैनगंगेवर जाऊन सायंसंध्या करून येत असत. केव्हा केव्हा भजन किंवा कीर्तन ऐकता ऐकता श्रीस्वामी-महाराज समाधिमग्न होत असत. अशा प्रकारे श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मासाच्या काळात नित्य नवा उत्सव आणि नित्य नवा आनंद सर्वांना होऊन तेथे जमलेल्या सर्व साधक-भक्त मंडळींना असे वाटत असे की, हा सुखसोहळा स्वर्गातील देवांना देखील दुर्लभ असा आहे.

श्रीस्वामीमहाराज पवनीला असताना श्रीमती दुर्गामावशी तेथे येऊन त्यांच्या सेवेसाठी राहिल्या होत्या. वास्तविक पाहता त्या श्रीस्वामीमहाराजांपेक्षा वयाने खूपच मोठ्या होत्या; परन्तु त्यांच्या लेखी श्रीस्वामीमहाराज हे चालते बोलते परब्रह्म असल्यामुळे त्या त्यांना देव मानून त्यांची अत्यंत प्रेमपूर्वक सेवा करीत असत. श्रीस्वामीमहाराज रोज सकाळी श्रीवैनगंगेवर स्नानासाठी गेल्यावर त्या त्यांची बसण्याची जागा वगैरे झाडून सारवीत असत व तेथे रांगोळी घालीत असत. श्रीस्वामीमहाराज परत आल्यावर त्या त्यांना अत्यंत भक्तिभावाने वंदन करीत असत. आपणास ही सेवा

व वंदन करण्यास मिळते यापरते दुसरे परमभाग्य ते कोणते असू शकते याचा मनोमन प्रत्यय येऊन या प्रत्ययात्मक सुखानुभूतीमुळे त्यांना आपले जीवन धन्य व कृतार्थ झाले आहे असे वाटत असे.

श्रीमती दुर्गामावशीनें हा जो सद्गुरुसेवेचा मार्ग स्वीकारला होता त्यातच ज्ञानप्राप्तीचे सर्व रहस्य दडलेले आहे हे साधक-भक्त-वाचकांनी लक्षात घेतले पाहिजे. सेवा हे ज्ञानप्राप्तीचे महान् साधन असून त्याचा आश्रय कसा करावा हे सांगताना श्रीगोपाल-कृष्णनाथांनी श्रीमद् भगवद्गीतेत असे म्हटले आहे की–

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ।। ४.३४ ।।**

याचा अर्थ असा आहे की, "ते आत्मज्ञान तत्त्वज्ञानी अर्थात् स्वानुभूत्यात्मक आत्मज्ञानी महापुरुषांना साष्टांग नमस्कार करून, त्यांची सेवाशुश्रूषा करून व निष्कपट भावाने त्यांना बंधमोक्षादि साधनांविषयीं प्रश्न विचारून तू समजावून घे. ते तत्त्व जाणणारे ज्ञानी महापुरुष तुला त्या ज्ञानाचा उपदेश करतील."

याचा भावार्थ प्रकट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीज्ञाने-श्वरीत असे म्हटले आहे की –

**तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि आणावें ।**
**तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंसीं ।। ४. १६४ ।।**
**जें ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंठा ।**
**तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ।। १६५ ।।**
**तरी तनुमनुजीवें । चरणांसीं लागावें ।**
**आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ।। १६६ ।।**
**मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगती पुसिलें ।**
**जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ।। १६७ ।।**

याचा अर्थ असा आहे की, "असे सर्वोत्कृष्ट ज्ञान आपल्याला प्राप्त व्हावे असे मनात असेल; तर तू (शाब्द अर्थात् शास्त्रार्थ-ज्ञानसंपन्न आणि परब्रह्मनिष्णात म्हणजे स्वतः ब्रह्मानुभूतिसंपन्न असून दुसऱ्यालाही तशी संपन्नता प्राप्त करून देण्यात निष्णात असलेल्या) अशा संतांना सर्वभावाने भजावेस अर्थात् त्यांची प्रथम सेवा करावी; ॥ १६४ ॥ कारण ते संत म्हणजे साक्षात् ज्ञानाचे घरच आहेत. त्यांच्या घराचा सेवाधर्म हा उंबरठा आहे. त्याकरिता हे अर्जुना ! तू तिकडे वळून सेवाधर्मरूपी उंबरठा प्रथम आपल्या स्वाधीन करून घे म्हणजे त्या संतांची पुढीलप्रमाणे सेवा कर. ॥ १६५ ॥ तू शरीराने मनाने व जीवाने त्यांच्या चरणी लागावेस आणि शरणागतीपूर्वक सर्व प्रकारांनी गर्वरहित होऊन त्यांच्या चरणांची सेवा करावीस. ॥ १६६ ॥ अशा प्रकारच्या सेवेने ते प्रसन्न झाल्यानन्तर त्या प्रसन्न स्थितीत त्यांना शिष्यांनी आपणास अपेक्षित असा जन्ममरणदुःखरूपसंसारनिवृत्ती व परमानन्दप्राप्ती याविषयी प्रश्न केला म्हणजे तेही त्यास कृपेने म्हणजे शक्तिपातदीक्षेने शक्तिसंचार करून ज्ञानाचा उपदेश करतात. (याचा अर्थच असा आहे की, श्रीसद्गुरूंनी मुमुक्षू पुरुषास शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्याची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती महामाया कुण्डलिनी जागृत करून तिचे सहस्रारस्थ शिवाशी महामिलन व्हावे म्हणून तिला मार्गस्थ केल्याशिवाय कोणताही साधक-भक्त कधीही या जगद्भ्रमातून मुक्त होत नाही; कारण या बाबतीत अन्य कोणताही दुसरा उपाय किंवा पर्याय उपलब्ध नाही.) अशा प्रकारे शक्तिपाताने केल्या जाणाऱ्या उपदेशापासून होणाऱ्या बोधाचे ऐश्वर्य असे आहे की, त्यामुळे शिष्याचे अंतःकरण ज्ञानसंपन्न होऊन पुन्हा ते संकल्पविकल्पात्मक वृत्तीवर मुळीच येत नाही."

श्रीक्षेत्र पवनी या गावी अंत्यजांची संख्या फार मोठी होती. या सर्व लोकांची श्रीस्वामीमहाराजांवर व श्रीसीतारामममहाराजांवर फार श्रद्धा होती. श्रीक्षेत्र नरसोबावाडी व श्रीक्षेत्र शिरोळ या दोन गावांहून श्रीक्षेत्र पवनी येथील चतुर्मासात श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेसाठी आलेल्या स्त्रियांकरवी या लोकांना अन्न देण्याची व्यवस्था श्रीसीतारामममहाराजांनी केली होती. श्रीस्वामीमहाराजांच्या आशीर्वादाने व तेथील पवित्र अन्नामुळे या मूढ व अडाणी लोकांच्याही मनात भक्ती उपजून ते पुढे पुढे श्रीक्षेत्र नरसोबावाडी व श्रीक्षेत्र शिरोळ येथून तेथे आलेल्या त्या स्त्रियांच्या हातून अन्न घेईनात. ते लोक त्या स्त्रियांना असे म्हणत असत की, "तुम्ही हे अन्न आम्हाला देऊ नका. तुम्ही मोठी पक्वान्ने दिलीत तरी ती आम्हाला नकोत. ह्या महाराजांनी काहीतरी एवढासा प्रसाद आपल्या हातांनी दिला; तरी तोच आम्हाला प्रिय वाटेल व तोच आम्हाला पाहिजे आहे," असे त्या श्रीसीतारामममहाराजांकडे हात करून म्हणत असत. त्यांचे ते काकुळतीचे भाषण ऐकूत व त्यांचा तो सद्भाव पाहून भावप्रिय श्रीसीतारामममहाराज आपला मोठेपणा दूर ठेवून रोज पाच-पाचशे लोकांना स्वतःच्या हातांनी पत्रावळी भरून देत असत. अशा प्रकारे रोज मिळणाऱ्या प्रसादामुळे हे सर्व लोक अत्यंत संतुष्ट व समाधानी होऊन श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी शरणागतीपूर्वक व अंतःकरणपूर्वक मनोमन प्रार्थना करीत असत. श्रीसीतारामममहाराजांच्या समदर्शित्वाला पारावार नव्हता हेच खरे! अशा प्रकारच्या कितीतरी गोष्टींमुळे श्रीक्षेत्र पवनी येथे झालेला श्रीस्वामीमहाराजांचा हा चातुर्मास फार गाजला; कारण इतर चातुर्मासांपेक्षा तो मोठ्या समारंभाचा झाला अशीच त्याची प्रसिद्धी आहे.

श्रीक्षेत्र पवनीमध्ये अंत्यजांची संख्या फार मोठी होती आणि

त्यांच्यापैकी पुष्कळ लोक श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला व प्रसादाला येत असत, असा उल्लेख वर आलाच आहे. या लोकांमध्ये एक श्रद्धाळू महार होता. श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी त्याची फार भक्ती होती. श्रीस्वामीमहाराज स्नान-संध्येसाठी श्रीवैनगंगेवर तिन्हीत्रिकाळ जात असत. हा महारभक्तही श्रीस्वामीमहाराजांच्या नजरेला येणार नाही अशा तऱ्हेने दूर आडबाजूला उभे राहून मोठ्या भक्तिभावाने हात जोडून त्यांचे दर्शन घेत असे. श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणांवर मस्तक ठेवून कृतार्थ व्हावे. अशी त्याची फार इच्छा होती; पण हे शक्य नव्हते. त्यामुळे हा परमभक्त दररोज लांबूनच आपल्या इष्टदेवतेचे दर्शन घेत असे. परमेश्वर सर्वांतर्यामी आहे. श्रीस्वामीमहाराज परमेश्वरस्वरूप होते. त्यामुळे त्यांना या भक्ताच्या प्रेमळ अंतःकरणाची पूर्ण कल्पना होती. महार झाला म्हणून काय झाले ? श्रीस्वामीमहाराजांनी मुसलमानादि सर्व लोकांना दर्शन देऊन पावन केले होते. मग या भक्ताची तरी ते उपेक्षा कशी करणार ? असेना का तो महार ! जगात भक्ताची जात फक्त एकच. ती म्हणजे भक्त !

एके दिवशी सकाळच्या प्रहरी आपले आन्हिक उरकल्यावर श्रीस्वामीमहाराज पऱ्हईतून श्रीवैगंगेच्या पैलतीराला जावयाला निघाले. ते यावेळी पैलतीराला जावयाला कशा करिता निघाले असतील या विचाराने सर्व लोक मोठ्या विचारात पडले. त्यावेळी काहीजण त्यांच्याबरोबर जावयासही निघाले; परंतु सर्वांना ऐलतीराला सोडून ते एकटेच नावाड्याला बरोबर घेऊन निघाले. त्यावेळी त्यांच्या चरणस्पर्शाने पावन झालेली श्रीवैनगंगानदी उत्साहाने दुथडी भरून वाहत होती. श्रीस्वामीमहाराजांची नाव

पाण्यात शिरल्यावर बाजूलाच उभ्या असलेल्या त्या महारभक्ताने नदीमध्ये उडी मारली आणि नावेपासून दूर अंतरावरून तो नावेबरोबर पोहत जाऊ लागला. काही वेळातच श्रीस्वामीमहाराजांची नाव पैलतीराला लागली. ते नावेतून खाली उतरले. त्यांच्याबरोबर आलेला तो भक्त किनाऱ्यावर आल्यावर श्रीस्वामीमहाराजांपुढे हात जोडून उभा राहिला व अश्रू भरल्या नेत्रांनी तो आपल्या इष्टदेवतेकडे एकटक पाहू लागला. त्याचवेळी श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीला त्याची दृष्टी भिडली आणि त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. डोळ्यातून तीव्र अश्रुपात सुरू झाला आणि आपण काय करीत आहोत याचे भान न राहून त्याने श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांना मिठी मारली. त्यावेळी आपल्या नेत्रातून वाहणाऱ्या अश्रूंनी जणूकाही तो श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलांना अभिषेकच करू लागला. हे सर्व चालू असताना श्रीस्वामीमहाराज रतीभरही आपल्या जागेवरून हलले नाहीत; उलट शेवटी त्यांनी त्याच्या पाठीवरून हात फिरविला व त्याला दंडाला धरून उभे केले. त्यावेळी त्याचा कंठ अगदी भरून आल्यामुळे तो सद्‌गदीत झाला होता. श्रीस्वामीमहाराजांनी केलेल्या या अपार प्रेमामुळे व कृपेमुळे त्याच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. त्यावेळी पुन्हा एकदा श्रीस्वामीमहाराजांनी त्या भक्ताच्या डोळ्यात रोखून पाहिले. त्यावेळी आपला सर्व जीवभाव नष्टभ्रष्ट होऊन आपण सामरस्याच्या राऊळात जणूकाही महासुखाची दिवाळी करीत आहोत याचा प्रत्यय घेत तो ब्रह्मानंदात निमग्न झाला.

आपल्या भक्ताला त्या दिव्य अवस्थेत तसेच सोडून देऊन श्रीस्वामीमहाराजांनी पुन्हा एकदा श्रीवैनगंगेत स्नान केले आणि पऱ्हईत बसून ते पुन्हा ऐलतीरावर येण्यास निघाले. हा सर्व प्रसंग

ऐलतीरावरून लोक पाहात होते. श्रीस्वामीमहाराजांची ही भक्तवत्सलता पाहून ते सर्वचजण अगदी गहीवरून गेले होते. अशा रीतीने सर्वजण त्या भारावलेल्या अवस्थेत असतानाच श्रीस्वामीमहाराजांची नाव ऐलतीराला लागली. त्यावेळी तेथे जमलेल्या सर्व लोकांनी "श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्द सरस्वती स्वामीमहाराज की जय" असा प्रचंड जयजयकार केला व ते सर्व लोक धन्य झाले !

श्रीक्षेत्र पवनी येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू असताना आसपासच्या गावांमध्ये प्लेगची साथ सुरू झाली. प्लेगग्रस्त भागातूनसुद्धा लोक श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी येत असत. त्यामुळे आपल्याही गावातील हवा बिघडण्याची भीती आहे असे सर्वांना वाटू लागले. इतकेच नव्हे; तर कधी नव्हे एवढी गर्दी त्या दिवसात श्रीक्षेत्र पवनी येथे झाल्यामुळे जर का येथेसुद्धा प्लेग उद्भवला तर शेकडोशे माणसे प्लेगच्या साथीला बळी पडतील या शंकेने सर्वांच्या पोटात भीतीचा गोळाच उभा राहिला. स्थानिक लोकांची अशी मन:स्थिती झाली असली; तरी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी येणाऱ्या सर्व लोकांची अशी श्रद्धा होती की; ज्याप्रमाणे देवळात देवदर्शनाला गेल्यावर देऊळ अंगावर पडून भक्ताला मरण येत नाही त्याप्रमाणेच आपण येथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आलो असल्यामुळे त्यांच्या संगतीत आपणास प्लेगची बाधा होणार नाही.

एक दिवस श्रीगांडामहाराज राहात होते त्या श्रीमुरलीधराच्या देवळात उंदीर पडल्याची वार्ता श्रीस्वामीमहाराजांच्या कानांवर गेली. आता हाहा:कार होण्याचा प्रसंग येणार या कल्पनेने सर्वांच्याच अंत:करणात भीतीची लहर चमकून गेली. सर्व लोकांच्या

मनातील भीती जाणून श्रीस्वामीमहाराजांनी देवांची अशी प्रार्थना केली की, "प्रभो! आपल्याच आज्ञेप्रमाणे येथे चातुर्मासाला आरंभ केला आहे. येथे आलेली सर्व बालगोपाळ मंडळी आपली भक्त असून श्रद्धेने आपल्या दर्शनासाठी येथे आली आहेत. त्यांपैकी कोणाही भक्ताच्या जीवितास धोका उत्पन्न झाला किंवा कोणीही या प्लेगच्या रोगास बळी पडला; तर आपल्याला कमीपणा येऊन आपल्या नावाला बट्टा लागून भक्तवत्सल या आपल्या बिरुदावलीला कलंकही लागेल. त्यामुळे असे जर काही घडले; तर आपल्या आज्ञेने सुरू केलेला हा चातुर्मास अर्धवटच सोडून येथून निघून जाणे भाग पडेल. तेव्हा या सर्व भक्तमंडळींना अभय द्या." श्रीस्वामीमहाराजांनी केलेली ही प्रार्थना ऐकताच देव त्यांना असे म्हणाले की, "चातुर्मास संपेपर्यन्त येथे कोणालाच त्रास होणार नाही व कोणाच्याही जीविताला धोका नाही. तरी चातुर्मास सोडून अन्यत्र जाऊ नये." देवांनी असे आश्वासन देताच श्रीस्वामीमहाराजांनी सर्व लोकांना असे सांगितले की, "चातुर्मास संपेपर्यन्त येथे कोणतीच भीती नाही व कोणाच्याही जीवितास साथीपासून धोका नाही, असे देवांनी आश्वासन दिले आहे. त्यामुळे तोपर्यन्त कोणी कोठेही राहण्यास हरकत नाही." श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे आश्वासन दिल्यावर सर्वांना अत्यंत धीर आला. अशा स्थितीत त्यांचा सत्संग सोडून मग दूर कोण राहणार ?

अशा रीतीने काही दिवस निर्भयपणे निघून गेले. एक दिवस श्री. गोविंदराव इनामदार नावाचे एक गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले. त्यांना ताप आल्यामुळे ते श्रीमुरलीधर मंदिरातील एका खोलीत निजले असता तेथे उंदीर पडला. ही गोष्ट कारकुनाच्या नजरेला येताच श्री. इनामदार यांना दुसरीकडे हलवावे

म्हणून त्याने ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घातली. हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी पुन्हा एकदा देवांचा धावा करून त्यांची मनःपूर्वक प्रार्थना केली आणि प्लेगचा त्रास होणार किंवा कसे या संबंधी पुन्हा विचारले. त्यावेळी देव त्यांना असे म्हणाले की, "भाद्रपद वद्य प्रतिपदेपर्यन्त या गावात प्लेग होणार नाही; तरी तोपर्यंन्त येथे राहण्यास हरकत नाही. त्यानंतर मात्र येथे कोणी राहू नये." श्रीस्वामीमहाराजांनी ही गोष्ट सर्वांना सांगितल्यावर सर्व लोक निश्चिन्त झाले.

श्रीक्षेत्र पवनी येथील ज्या श्रीविठ्ठल मंदिरात श्रीस्वामीमहाराज उतरले होते त्या मंदिरात रोज सायंकाळी श्री. नानाशास्त्री दशपुत्रे हे पुराण सांगत असत. त्यांचा पुराणांचा व्यासंगा दांडगा असून श्रीक्षेत्र पवनीमध्ये व त्याच्या आसपासच्या परिसरात त्यांची पुराणिक म्हणून चांगलीच ख्याती होती. चातुर्मासात पुराण सांगताना त्यांना एक श्लोक अडला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रवणाला बसलेले होते. त्यांनी अडलेल्या श्लोकाचा सविस्तर अर्थ श्री. नानाशास्त्र्यांना व तेथे जमलेल्या सर्वांना समजावून सांगितला. इतकेच नव्हे; तर त्या दिवशी त्या श्लोकाचा अर्थ सांगण्याच्या ओघात आणखीही काही महत्त्वाच्या श्लोकांचे दोन-दोन तीन-तीन अर्थ करून त्या श्लोकांच्या अर्थान्तरात सर्वांचा प्रवेश करून देऊन त्यांचे रहस्य कथन केले. अशा रीतीने त्या दिवशी पुराण संपल्यावर श्रीस्वामीमहाराज श्री. नानाशास्त्र्यांना असे म्हणाले की, "आज आम्ही कथन केलेल्या अर्थांचे पुस्तक तुमच्या घरातच आहे. ते शोधून पाहा म्हणजे मिळेल व पुढे आपल्याला अशी अडचणही येणार नाही. श्री. नानाशास्त्र्यांनी घरी जाताच त्या पुस्तकाचा शोध करण्यास सुरुवात केली. थोड्याच वेळात त्यांना ते पुस्तक सापडले. "एक अमोल ठेवा आपल्या

घरातच असून तो आपल्याला माहीत नव्हता; मात्र श्रीस्वामीमहा-राजांच्या दिव्यदृष्टीमुळे व कृपेमुळे तो आपणास प्राप्त झाला," या विचाराने त्यांना परमानंद होऊन श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी प्रथमपासून असलेली त्यांची निष्ठा शतगुणित होऊन त्यांच्या विद्वत्ते-बद्दल व सामर्थ्याबद्दल पराकोटीचा आदरभाव निर्माण झाला. दुसऱ्या दिवशी श्रीविठ्ठल मंदिरात पुराण सांगताना श्री. नाना-शास्त्र्यांनी पुराण ऐकावयास जमलेल्या सर्व विद्वान् मंडळींना श्रीस्वामीमहाराजांची विद्वत्ता व सामर्थ्य खरोखरच किती अपार आहे याचे वर्णन करून आपली वाणी धन्य केली. श्री. नानाशास्त्र्यांनी श्रीस्वामीमहाराजांची अशा प्रकारे महती गायिलेली पाहून श्रीक्षेत्र पवनीला आलेल्या भक्तमंडळींच्या मनात श्रीस्वामीमहाराजांच्या बद्दल अपरंपार श्रद्धा उत्पन्न होऊन ते त्यांचे अनुयायी झाले.

श्री. नानाशास्त्री दशपुत्रे यांचे सुपुत्र श्री. बाळशास्त्री हेही या चातुर्मासाच्या काळात मधून मधून कीर्तन करीत असत. श्री. बाळ-शास्त्री हे एक उत्तम व पट्टीचे कीर्तनकार असून श्रीस्वामीमहा-राजांच्या कृपादृष्टीमुळे त्यांच्या कीर्तनाला नेहमीच अत्यंत रंग भरत असे. कीर्तन हे समाजशिक्षणाचे, लोकप्रबोधनाचे, धर्मजागृतीचे व संस्कार दृढीकरणाचे एक प्रभावी साधन असल्यामुळे त्याचाही उपयोग श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेप्रमाणे वर्णाश्रमधर्माच्या पुनर्स्थापने-करिता श्रीस्वामीमहाराजांनी प्रभावीपणे केल्याचे दिसून येते; कारण श्री. बाळशास्त्री यांना श्रीस्वामीमहाराजांनी नवीन नवीन आख्याने स्वतःहून करून दिली होती. मात्र कीर्तनामध्ये श्रुतिवाक्य म्हणा-वयाचे नाही, अशी त्यांना सक्त ताकीदही दिली होती.

याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेने श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मासात श्री. बाळशास्त्री यांची कीर्तने चालू असत. ती ऐकण्या-

साठी श्रीस्वामीमहाराज स्वतः समोर बसत असत. त्यामुळे सर्व लोकही मोठ्या आनंदाने व उत्साहाने कीर्तनानंदाचा लाभ घेत असत. एकदा श्री. बाळशास्त्र्यांचे कीर्तन श्रीस्वामीमहाराजांच्या समोर चालू असताना सांगण्याच्या ओघात श्रीबाळशास्त्र्यांच्या तोंडून चुकून एक श्रुतिवाक्य उच्चारले गेले. ते ऐकल्याबरोबर एकदम "श्रीगुरुदेवदत्त" असे म्हणून श्रीस्वामीमहाराज तेथून निघून जाण्यासाठी उभे राहिले. श्रीस्वामीमहाराज अशा प्रकारे जाण्यासाठी उठलेले पाहताच आपली चूक श्री. बाळशास्त्री यांच्या ध्यानात आली. कीर्तन तेथेच सोडून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे जाऊन साष्टांग नमस्कार घातला व त्यांचे चरण धरून ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज! कीर्तनाच्या ओघात माझ्या हातून अनवधानाने चूक झाली; तरी आपण माझ्या चुकीबद्दल क्षमा करावी. पुन्हा अशी चूक माझ्या हातून होणार नाही." इतके अत्यंत कळकळीने सांगून श्री. बाळशास्त्र्यांनी आपल्या तोंडात मारून घेतले. श्री. बाळशास्त्र्यांची ती क्षमायाचनेची वृत्ती पाहून श्रीस्वामीमहाराज एकदम शांत झाले व पुन्हा अशी चूक न करण्याबद्दल ताकीद देऊन ते आपल्या जागी बसले व त्यांनी श्री. बाळशास्त्र्यांना कीर्तन पुढे सुरू करण्यास सांगितले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे हे लक्षात येते की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत" म्हटल्याप्रमाणे "तैसा अशेषांही पुरुषार्थां। जो गोसावी हो म्हणे पार्था। तेणें श्रुतिस्मृति माथां। बैसणें वापे ॥ १६.४५९ ॥" या न्यायाने, जो "सर्व पुरुषार्थांचा स्वामी होईन," असे जिज्ञासा बुद्धीने म्हणतो त्याने श्रुती व स्मृती यांना आपल्या मस्तकावर धारण केले पाहिजे. याचा अर्थ असा आहे की, श्रुतिस्मृतिरूपाने वेदाचे अर्थात् शब्दाचे अर्थात् शक्तीचे ( शब्द =

शक्ती ) साधन हे पवित्रकाळी, पवित्रपणाने व पवित्र ठिकाणी ब्रह्मप्राप्तीसाठी करावयाचे असते. जर अतींद्रिय व अतिमानुष अशा अपारावार व अपरंपार शक्तीचे देहात अवतरण होऊन तद्वारा जो सामरस्याचा, आत्मसाक्षात्काराचा, कैवल्याचा किंवा दिव्यतेचा आविष्कार देहात होऊन परमोच्चावस्थेची प्राप्ती व्हावयाची असते त्यासाठी साधन व तदंगभूत सर्व गोष्टींचे पावित्र्य अत्यंत कटाक्षाने जपलेच पाहिजे, अशी श्रीस्वामीमहाराजांची दृढ धारणा होती. साधनपावित्र्याची ही धारणा समाजात पक्की रुजावी व वेदरूप अर्थात् शब्दशक्तिरूप साधनाचा डिंडिम यावच्चंद्रदिवाकरौ गर्जत राहून त्याचा साधकभक्तांनी लाभ घेऊन कृतार्थ व्हावे म्हणूनच श्रुतिस्मृतीच्या साधनपावित्र्याचे त्यांनी उपरोक्त कथेत वर्णन केल्याप्रमाणे यावज्जीव कटाक्षाने व आग्रहाने रक्षण केले. साधन शुचितेच्या या आग्रहाचा व कटाक्षाचा विचार सर्व साधकभक्तांनी आपल्या अंगी मुरविल्याशिवाय अंतिम सिद्धीची प्राप्ती कदापीही होणार नाही, हाच जणू काही श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा एक अमोलिक महान् संदेश आहे, असे जाणवत राहते.

श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मास चालू असताना एक दिवस एक ब्राह्मण श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती ऐकून त्यांच्या दर्शनासाठी आला. त्याच्या डोळ्यांमध्ये व्याधी निर्माण होऊन त्याला जवळ जवळ दिसेनासे झाले होते. ही व्याधी श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने दूर व्हावी अशी त्याची इच्छा होती. तो ज्यावेळी श्रीक्षेत्र पवनीला आला त्यावेळी एका वेश्येलाही आपल्या बरोबर घेऊन आला होता. मात्र श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाण्यासाठी जेव्हा तो गेला त्यावेळी त्याने आपल्या बरोबर आणलेल्या वेश्येला मात्र बिऱ्हाडीच ठेवले होते. त्या दिवशी श्रीस्वामीमहाराज श्रीविठ्ठलाच्या मंदिरात

बसले होते. तो ब्राह्मण तेथे आल्यावर त्याने श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार केला व तो त्यांना असे म्हणाला की, " महाराज ! माझी दृष्टी गेल्यामुळे मला अगदी दिसेनासे झाले आहे. माझे डोळे बरे होण्यासाठी आपण काहीतरी उपाय सांगून माझ्यावर कृपा करा." श्रीस्वामीमहाराजांना अशी विनंती करून तो ब्राह्मण त्यांच्यासमोर बसल्यावर त्यांनी त्याच्याकडे एकदा पाहिले व ते एकदम त्याला अत्यंत कठोर शब्दात असे म्हणाले की, " आपल्या बरोबर घेऊन आलेल्या त्या बाईला सोडून मग इकडे या म्हणजे मग आपल्या डोळ्यांसाठी काय इलाज करावयाचा ते पाहता येईल." श्रीस्वामीमहाराजांचे हे शब्द ऐकताच तो अत्यंत खजील झाला व पुन्हा एकदा श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून तो अत्यंत कष्टी होऊन निघून गेला.

एके दिवशी सकाळी श्री. गांडामहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांच्या सर्वांगाला केशरी गंधाची उटी लावून त्यांची महापूजा केली. अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांची महापूजा करून श्री. गांडामहाराजांनी केलेली सेवा पाहून श्री. थत्ते यांना आपणही श्रीस्वामीमहाराजांची अशीच सेवा करावी असे वाटून त्यांनीही मोठ्या भक्तिभावाने केशरगंधयुक्त उटी लावून षोडशोपचारे श्रीस्वामीमहाराजांची महापूजा केली. आपल्याप्रमाणे श्री. थत्ते यांनी श्रीस्वामीमहाराजांची केशरगंध लावून महापूजा केली हे पाहून श्री. गांडामहाराजांचा मत्सर जागृत होऊन त्यांना श्री. थत्ते यांचा राग आला व त्या रागाच्या भरातच ते श्री. थत्ते यांना असे म्हणाले की, " तुम्ही मंडळी रोज अशी उटी लावून जर महाराजांची महापूजा करू लागलात; तर त्यांना फार त्रास होईल. आपण आज पूजा केलीत

ती केली; परंतु पुढे मात्र अशा प्रकारे रोज पूजा करून महाराजांना त्रास होईल असे काहीही करू नये." अशा प्रकारे श्री. गांडामहाराज श्री. थत्ते यांना त्या दिवशी रागाने खूपच बोलले. श्री. गांडामहाराज इतके बोलले; तरी श्री. थत्ते मात्र अगदी शांत राहिले. ते एका शब्दानेही श्री. गांडामहाराजांना काही बोलले नाहीत.

हा सर्व प्रकार श्रीस्वामीमहाराजांच्या अपरोक्ष घडला असला; तरी श्रीदत्तस्वरूप श्रीस्वामीमहाराज हे भक्तवत्सल व भक्ताभिमानी असल्यामुळे त्यांनी श्री. गांडामहाराजांना शिक्षा करून सुधारण्याचे व सर्वांशी प्रेमाने वागण्याचा धडा देण्याचे ठरविले. त्याच दिवशी श्रीस्वामीमहाराज श्री. गांडामहाराजांच्या स्वप्नात आले व त्यांच्या थोबाडीत मारून रागाने त्यांना असे म्हणाले की, 'तू लोकांना रागाने का बोलतोस ? अंतःकरणातून कामक्रोधादि काढून टाकून निर्वेद व निर्मत्सर झाल्याशिवाय अध्यात्माची सिद्धी होत नाही. पुन्हा असे कोणाला बोलशील तर खबरदार !"

दुसऱ्या दिवशी सकाळी श्री. गांडामहाराज उठून पाहतात तों त्यांना आपला गाल बराच सुजला आहे असे दिसले. त्या सुमारास श्रीमती दुर्गामावशी तेथे आल्या. त्यांनी श्री. गांडामहाराजांच्या स्वप्नाची सर्व हकीकत ऐकल्यावर त्यांना श्रीस्वामीमहाराजांची क्षमा मागण्यास सांगितले. त्यावेळी श्रीमती दुर्गामावशीच्या सांगण्याप्रमाणे श्री. गांडामहाराजांनी लगेच श्रीस्वामीमहाराजांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागितली. श्री. गांडामहाराजांनी क्षमायाचना केल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांच्याकडे पाहून एकदा हसले. त्यानंतर श्री. गांडामहाराजांचा गाल लगेच बरा झाला.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराज आपल्या शिष्यांच्या आध्यात्मिक प्रगतीसाठी किती जागरूक होते व वेळप्रसंगी

त्यांना शिक्षा करूनही ते त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करीत होते याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. " मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः। निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेती पाण्डव ॥ ११.५५ ॥" म्हणजे " हे अर्जुना ! जो केवळ माझ्याच करिता सर्वकाही माझेच आहे असे समजून यज्ञ, दान आणि तप आदि संपूर्ण कर्तव्य कर्मे करणारा आणि माझ्या ठिकाणी परायण अर्थात् मला परम आश्रय व परमगती मानून माझ्या प्राप्तीकरिता तत्पर असलेला तसेच माझा भक्त अर्थात् माझे नाम, गुण, प्रभाव आणि रहस्य यांचे श्रवण, कीर्तन, मनन, ध्यान आणि पठणपाठण यांचा प्रेमाने व निष्काम भावाने निरंतर अभ्यास करणारा आणि आसक्तीरहित अर्थात् स्त्री-पुत्र-धनादि संपूर्ण सांसारिक पदार्थांमध्ये ममतारहित असलेला आणि सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी वैरभावरहित असतो तो अनन्य भक्तीचा पुरुष मलाच येऊन मिळतो." असे श्रीगोपाळकृष्णनाथांनी श्रीमद् भगवद्गीतेत म्हणून जो महासिद्धान्त प्रस्थापित केला आहे तो आपल्या शिष्यांच्या ठिकाणी ठसल्याशिवाय ते निर्वैरात्मक अशा अंतिम महासिद्धीस प्राप्त होणार नाहीत याची श्रीस्वामीमहाराजांना पुरेपूर खात्री होती.

उपरोक्त श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करतांना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ज्ञानेश्वरीत " असे म्हटले आहे की –

जो मजचि एकालागीं। कर्मे वाहातसे आंगीं।
जया मजवांचोनि जगीं। गोमटें नाहीं ॥ ११.६९६ ॥
दृष्टादृष्ट सकळ। जयाचें मीचि केवळ।
जेणें जिणयाचें फळ। मजचि नाम ठेविलें ॥ ६९७ ॥
मग भूतें हें भाष विसरला। जे दिठी मीचि आहें सूदला।
म्हणौनि निर्वैर जाहला। सर्वत्र भजे ॥ ६९८ ॥

**ऐसा जो भक्तु होये । तयाचे त्रिधातुक हें जैं जाये ।**
**तैं मीचि होऊनि ठायें । पांडवा गा ॥ ६९९ ॥**

याचा अर्थ असा की, " भक्त मलाच एकटयाला स्वत: केलेली सर्व कर्तव्यकर्मे अर्पण करतो व त्याला जगात माझ्यावाचून दुसरे काहीही आवडत नाही. त्याचे ऐहिक व पारलौकिक हे सर्व केवळ मीच होऊन राहिलो असतो आणि तो मलाच म्हणजे मत्प्राप्तीलाच जीवनाचे फल असे मानतो. तो भक्त प्राणिमात्र हे नावच विसरतो; कारण तो मलाच सर्वत्र पाहतो. त्यामुळे भूते ही माझ्यापासून वेगळीं आहेत ही भाषाही तो जाणत नाही आणि सर्वांशी निर्वैर व निर्मत्सर होऊन जगातील जी जी वस्तू दृष्टीस पडेल त्यात व्याप्त असणाऱ्या सर्वेश्वरास तो भजतो. हे अर्जुना ! याप्रमाणे ज्या भक्ताची वृत्ती बनते आणि ज्यावेळेस त्याचे कफपित्तवातात्मक हे शरीर पडते त्यावेळेस तो मद्रूपच होऊन राहतो.

श्री. गांडामहाराजांसारख्या आपल्या अंतरंग शिष्याला निर्वैरत्वाचे महासाधन प्राप्त होऊन अहिंसेच्या महासिद्धीत त्याची परिणती व्हावी यासाठी श्रीस्वामीमहाराजांनी जो बलप्रयोग केला तो किती योग्य, अचूक व अपूर्व होता याची कल्पना साध्यसाधनरूपाने विराजमान झालेल्या निर्वैराची जी महती श्रीसंततुकाराममहाराजांनी आपल्या अभंगात गायिली आहे त्यावरून आल्याशिवाय राहात नाही. ते असे म्हणतात की —

**निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ॥ १ ॥**
**तरीच अंगीकार करील नारायण । बडबड तो सीण येणेंविण ॥ २ ॥**
**सोईरें पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारी ॥ ३ ॥**
**तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ । तरिच सकळ केलें होय ॥ ४ ॥**

एके दिवशी सकाळी श्रीस्वामीमहाराज नदीवर स्नानाला

निघाले होते. इतक्यात त्यांचा एक भक्त तेथे आला व त्याने श्रीस्वामीमहाराजांची अशी प्रार्थना केली की, " महाराज ! या भवसागरातून मला तारा ! " त्याची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामी-महाराजांनी त्याला आपल्या मागून येण्यास सांगून ते त्याला आपल्या बरोबर नदीवर घेऊन गेले. ते दोघे श्रीवैनगंगेच्या तीरावर आल्यावर श्रीस्वामीमहाराज एकदम नदीच्या पात्रात शिरले व तीरावर उभे राहिलेल्या आपल्या त्या भक्ताला असे म्हणाले की, " तूही पाण्यात उतरून माझ्या मागून ये. घाबरू नको. बुडण्याची भीती नाही. " असे म्हणून श्रीस्वामीमहाराज अधिकाधिक खोल पाण्यात शिरू लागले. श्रीस्वामीमहाराज त्याला न बुडण्याचे आश्वासन देत असले; तरी त्या भक्ताला नदीच्या पाण्यात उतरण्याचे व श्रीस्वामीमहाराजांच्या पाठीमागून जाण्याचे धैर्य झाले नाही. तो काठावरच उभा राहिला. थोड्यावेळाने श्रीस्वामीमहाराज जेव्हा काठावर परत आले त्यावेळी ते त्या भक्ताला असे म्हणाले की, " भल्या गृहस्था ! माझ्यावर भरवसा ठेवून या साध्या नदीतून तरून जाण्याची तुझी छाती होत नाही; मग माझ्या शब्दावर विश्वास ठेवून तू भवसागर कसा पार पडशील ? तुला तशी योग्यता येण्याकरिता दीर्घकाल, निरंतर व श्रद्धाभक्तिपूर्वक भगवंताची उपासना केली पाहिजे; असे केले म्हणजे कालौघात तू हा भवसागर पार करून जाऊ शकशील. " इतके सांगून श्रीस्वामीमहाराज मंदिरात परत जाण्यासाठी निघाले.

उपरोक्त कथेतील श्रीस्वामीमहाराजांची कृती व त्यांनी भक्ताला केलेला उपदेश यांचा साकल्याने विचार केला म्हणजे ब्रह्मप्राप्तीसाठी नित्यानित्यवस्तुविवेक, वैराग्य, शमादि षट्संपत्ती व मुमुक्षुत्व या साधन चतुष्टयाने संपन्न असा साधक असावा असा

जो शास्त्रकारांनी उद्घोष केला आहे, त्यातील शम, दम, उपरती तितिक्षा, श्रद्धा व समाधान या षट्संपत्तीत श्रद्धेची जी आवश्यकता प्रतिपादन केली आहे तिचा सर्वांगांनी विचार करून ती आपल्या अंगी बाणविण्यासाठी साधकाने प्रयत्न केला पाहिजे. "सर्व वेदान्त-सिद्धांतसारसंग्रहामध्ये" श्रीमद् आद्यशंकराचार्यांनी श्रद्धेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की –

> गुरुवेदान्तवाक्येषु बुद्धिर्या निश्चयात्मिका।
> सत्यमित्येव सा श्रद्धा निदानं मुक्तिसिद्धये ॥ २१० ॥

गुरू व वेदान्तवाक्य ह्या मुक्तीच्या सिद्धीला कारणीभूत होणाऱ्या सत्य गोष्टी आहेत अशी ज्यांची निश्चयात्मक बुद्धी असते तिला श्रद्धा असे म्हणतात. वेदांनी "श्रद्धापत्नी व श्रद्धावित्तौ" म्हणून श्रद्धेचा गौरव केला आहे. पातंजल योगसूत्रात महर्षी पतंजलींनीही "स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ॥ समाधिपाद ॥ १४॥" व "श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् ॥ २०॥" या दोन सूत्रातून "पण तो अभ्यास दीर्घकाल, खंड न पडता व्यवधानरहित पद्धतीने निरंतरपणे व श्रद्धा–वीर्य–भक्तिपूर्वक केला म्हणजे दृढावस्थेला प्राप्त होतो" व "ज्यांना नैसर्गिक, स्वयमेव व काही साधन केल्याशिवाय निरोध होत नाही ते लोक श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी आणि प्रज्ञा या पाच गुणांच्या साहाय्याने कैवल्य अवस्था प्राप्त करून घेतात," असे सांगून श्रद्धेचा महिमा स्पष्ट केला आहे. श्रीगुलाबराव महाराजांनी श्रद्धेला माता म्हटले असून तिच्या-मुळे ऋतंभरा प्रज्ञा प्राप्त होते असे त्यांनी प्रतिपादन केले आहे.

अशा रीतीने श्रद्धेची साधनसंपत्ती साधकाजवळ असणे नितांत आवश्यक असल्याने श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या भक्ताला कृतीने व शब्दाने त्याची आवश्यकता पटवून दिली. श्रीमद्भगवद्गीतेत तर

अन्वय व व्यतिरेक अशा दोन्ही पद्धतींनी श्रद्धेची आवश्यकता वारंवार प्रतिपादन केलेली असल्यामुळे तिचे साधन राज्यात किती अपरंपार महत्त्व आहे हे स्पष्ट होवे. श्रीगोपाळकृष्णनाथ तेथे असे म्हणतात की--

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।
श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३.३१ ॥
श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ४.३९ ॥
अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४.४० ॥
योगिनामपि सर्वेषां मद्‌गतेनान्तरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ६.४७ ॥
अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ९.३ ॥
मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ १२.२ ॥
ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ १२.२० ॥
सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ १७.३ ॥
अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ १७.२८ ॥

याचा अर्थ असा आहे की, "जे कोणीही साधक--भक्त दोषबुद्धि-रहित व श्रद्धायुक्त होऊन नेहमी माझ्या या मताला अनुसरून वागतात अर्थात् माझ्या सांगण्याप्रमाणे आचरण करतात ते सर्व

साधक–भक्त सर्व कर्मांपासून अर्थात् पुण्यपापांपासून मुक्त होतात. ।। ३.२१ ।। श्रद्धाळू असलेल्या श्रीसद्‌गुरूंची सेवा, उपासना इत्यादि ज्ञानप्राप्तीच्या उपायांमध्ये अत्यंत तत्पर किंवा आसक्त अशा व ज्याने शम, दमादि साधनांनी इंद्रियांना विषयांपासून निवृत्त केले आहे अशा साधकाला ज्ञान प्राप्त होते. ज्ञान प्राप्त होताच तत्क्षणीच साधक–भक्ताला भगवत्प्राप्तिरूप मोक्ष या नावाची शांती प्राप्त होते. ।।४.३९।। आत्म्याला न जाणणारा त्याचप्रमाणे श्रद्धारहित व संशयी पुरुष परमार्थापासून भ्रष्ट होऊन विनाश पावतो. त्यातही संशयी पुरुषाला तर हा लोकही नसतो व परलोकही साधत नाही अर्थात् तो दोन्ही लोकी भ्रष्ट होतो आणि त्याला सुख होत नाही. ।। ४.४० ।। रुद्र आदित्यादिकांचे ध्यान करणाऱ्या इतर सर्व योग्यां-मध्येही जो श्रद्धावान् योगी-ध्यानी माझ्या ठिकाणी अंतःकरण स्थिर करून मला निरंतर भजतो तो योगी मला परमश्रेष्ठ वाटतो. ।। ६.४७ ।। हे परंतप अर्जुना ! या आत्मज्ञानरूप किंवा तत्त्वज्ञानरूप धर्मावर श्रद्धा नसलेले पुरुष मला कधीही प्राप्त होत नाहीत. मात्र या मृत्युरूप संसारचक्रात ते सतत भ्रमण करीत असतात. ।। ९.३ ।। जे साधकभक्त अत्यंत श्रेष्ठ अशा श्रद्धेने युक्त होऊन माझ्या ठिकाणी मनाला एकाग्र करून निरंतर माझ्या भजनात व ध्यानात रत होऊन माझी उपासना करतात किंवा मला भजतात ते मला योग्यांमध्येही अति उत्तम योगी वाटतात. ।।१२.२।। आणि जे श्रद्धावान् असे मत्पर झालेले भक्त अर्थात् माझे एकनिष्ठ भक्त हे वर सांगितलेले धर्मरूप अमृताचे अर्थात् मोक्षाचे साधन करतात ते भक्त मला अत्यंत प्रिय होतात. ।। १२.२० ।। हे अर्जुना ! सर्व माणसांची म्हणजे प्रत्येक मनुष्याची श्रद्धा ही ज्याच्या त्याच्या विशिष्ट अशा संस्कारांनी युक्त अशा अंतःकरणानुरूप असते. हा संसारी जीव प्रायः श्रद्धायुक्तच

असतो. त्यामुळे ज्या श्रद्धेने तो युक्त असतो त्या श्रद्धेनुरूपच तो जीव असतो अर्थात् जशी ज्याची श्रद्धा असते तसेच त्याचे स्वरूप असते. ।।१७.३।। हे अर्जुना ! श्रद्धेविना केलेले हवन, दिलेले दान, कष्ट सोसून केलेले तप आणि जे काही कर्म केले असेल ते सर्व असत् असे म्हटले जाते. ते इहलोकी व परलोकी लाभदायक होत नाही. ।। १७.२८ ।।

श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या भक्ताला कृतिद्वारा व शब्दद्वारा व्यक्त केलेल्या श्रद्धेचे हे माहात्म्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ज्ञानेश्वरीत " भावार्थाच्या रूपाने व्यक्त करताना असे म्हटले आहे की--

जो मनासीं चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें ने घे ।
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ।। ४.१८७ ।।
मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला ।
तो ऐहिक परत्रा मुकला । सुखासि गा ।। ४.१९८ ।।
कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पंडुसुता ।
तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ।। १२.३६ ।।
तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचे ठायीं विस्तरें ।
जीवीं जयां थारे । जे अनुष्ठिती ।। १२.२३१ ।।

याचा अर्थ असा आहे की, "जो आपली इच्छा आपल्या मनालाही कळू देत नाही आणि जो प्राचीन संस्काराने उत्पन्न होणारे प्रकृति-कार्य-कर्मे अर्थात् त्यांचे कर्तृत्व आपल्याकडे बळेच घेत नाही, तो श्रीगुरूंवरील व त्यांनी उपदेशिलेल्या साधन मार्गावरील अढळ श्रद्धेने सुखी झालेला असतो; कारण अशा श्रद्धावान् साधकालाच ज्ञानप्राप्ती होते. ।।४.१८७।। जर साधकाची श्रद्धा नाहीशी होऊन तो संशयात पडला तर त्याचा परमार्थतः निःसंशय नाश होतो; कारण असा साधक ऐहलौकिक व पारलौकिक सुखास आचवतो.

॥ ४.१९८ ॥ हे अर्जुना ! ज्याप्रमाणे पावसाळ्यात नदी दररोज पाण्यामुळे अधिकच वाढते त्याप्रमाणे माझी भक्ती करताना साधकाच्या ठिकाणी नित्य नवी वाढती श्रद्धा दृष्टीस पडते. ॥ १२.३६ ॥ असे साधकभक्त त्या योगाच्या ठिकाणी पूर्ण श्रद्धायुक्त आदर ठेवून श्रीसद्‌गुरूंनी दिलेल्या साधनाचे अनुष्ठान करतात व शिवस्वरूप होतात. ॥ १२.२३१ ॥

श्रीक्षेत्र पवनी येथील एका बाईंचे यजमान एकदा घरात काही कारणावरून भांडण झाल्यामुळे रागारागाने घरातून निघून गेले होते. या गोष्टीला बारा वर्षे झाली; तरी त्यांचा काही पत्ता लागला नाही. या गृहस्थांच्या पत्नीने त्यांना शोधण्याचे पुष्कळ प्रयत्न केले होते; पण ते सर्व व्यर्थ गेले. पतिचरणांचे स्मरण करीत त्या बाई अत्यंत दुःखात दिवस कंठीत होत्या. गावातील श्रीविठ्ठल मंदिरात उतरलेले श्रीस्वामीमहाराज सर्वांच्या मनोकामना पूर्ण करतात असे ऐकल्यावर ती त्यांच्या दर्शनाला गेली व आपली सर्व करुण कहाणी त्यांना सांगून तिने त्यांच्याकडे आपल्या सौभाग्याचे दान मागितले. तिची ही मागणी ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी तिच्याकडे एकदाच आपल्या दिव्य दृष्टीने असे काही पाहिले की, जणूकाही तिच्या भाग्याचा संपूर्ण आलेखच त्यांच्यापुढे साकर झाला आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य व आरपार पाहणाऱ्या दृष्टीने जेव्हा तिच्या प्रारब्धाचा आलेख वाचला त्यावेळी दुसऱ्याच क्षणी ते त्या बाईंना असे म्हणाले की, "हा मंत्र लिहून देत आहे. त्याचा आपण रोज मानसिक जप करा. लवकरच आपले यजमान घरी परत येतील. काही काळजी करू नका. तुमचे सौभाग्य अढळ आहे." इतके सांगून श्रीस्वामीमहाराजांनी आशीर्वादासह मंत्र लिहिलेला कागद त्यांना दिला. त्या बाईंनी तो मंत्र मस्तकावर

धारण केला व आपले यजमान आता श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने लवकरच परत येतील या दृढ आशेने व आनंदाने ती घरी परत आली. पुढे श्रीस्वामीमहाराजांनी तिला सांगितल्याप्रमाणे तिने अत्यन्त नियमितपणे, शुचिर्भूतपणे व श्रद्धाभक्तिपूर्वक जप केल्यावर त्या बाईंच्या यजमानांचे एक महिन्याभरातच असे पत्र आले की, "आपण सुखरूप असून लवकरच घरी परत येत आहोत, काळजी नसावी." त्याप्रमाणे ते लवकरच घरी परत आले व त्या उभयतांचा पुढील संसार अत्यंत सुखासमाधानाने पूर्ण झाला.

श्रीनर्मदा महानदीच्या तीरावर मंडलामहापूर या नावाचे एक गाव होते. या गावात श्री. भैरवप्रसाद या नावाचे एक ब्राह्मण गृहस्थ राहात असत. श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास सध्या पवनी येथे चालू आहे असे कळल्यावर ते तेथे आले व श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर त्यांना आपली सर्व दुःखद कर्मकहाणी सांगताना ते असे म्हणाले की, "महाराज! मला आत्तापर्यन्त पाच मुले झाली; परंतु ती सर्व जन्मल्याबरोबर मृत झाली. मात्र माझा पाचवा मुलगा जन्माला येऊन मृत होताच, एक अघटित अशी घटना घडली. ज्यावेळी माझा पाचवाही मुलगा जन्मताच हे जग सोडून गेला त्यावेळी माझी पत्नी व इतर नातेवाईक मंडळी अत्यंत शोकमग्न अशा अवस्थेत त्या मुलाच्या शेजारी बसली असता अकस्मात् एक जटाधारी बुवा तेथे आला व त्याने कोणाच्या काही लक्षात येण्यापूर्वीच माझ्या मुलाला उचलले व अत्यंत त्वरित गतीने तो तेथून निघून गेला. काही क्षणातच तो दृष्टिआड झाला. अशा प्रकारे एका जटाधारी बुवाने मुलगा पळवून नेल्याने घरातील सर्वच जण घाबरून गेले. त्यामुळे मी माझ्या गावातील लोकांच्या व नातेवाईकांच्या साहाय्याने त्या जटाधारी बुवाचा शोध घेण्याचा

पुष्कळ प्रयत्न केला; परंतु आमच्या प्रयत्नांना यश आले नाही व आजपर्यन्त तो जटाधारीबुवा काही सापडला नाही. अशा संकटात असताना मला एकाने आपले नाव सांगितल्यावरून मी आपणाला शरण आलो आहे. तरी महाराज! आपण माझ्याकडे दयादृष्टीने पाहा व माझी संतती जगेल असा काहीतरी उपाय सांगा."

श्री. भैरवप्रसाद यांची सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज डोळे मिटून काही वेळ ध्यानमग्न व विचारमग्न अवस्थेत बसले. काही वेळानंतर भानावर आल्यावर श्रीस्वामीमहाराज श्री. भैरवप्रसाद यांना असे म्हणाले की, "तुमच्या वंशात कोणीतरी पूर्वज पिशाच्च योनीत गेला आहे. आत्तापर्यंन्त त्याने पाचही मुलांचा नाश केला असून आपली वंशपरंपरा पुढे चालू नये म्हणून त्यानेच तुमच्या सर्व संततीचा उच्छेद केला आहे. पिशाच्चानेच जटाधारीबुवाचे रूप घेऊन आपल्या पाचव्या मुलाचे प्रेत पळवून नेले. त्या पिशाच्चाची इच्छा पूर्ण करून त्याचा पूर्ण बंदोबस्त केल्याशिवाय आपली संतती जगणार नाही आणि आपल्या मागचा त्रासही कमी होणार नाही."

श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे अकल्पित व अकस्मात् घडलेल्या सर्व प्रकारचा उलगडा केलेला ऐकल्यावर श्री. भैरवप्रसाद अत्यंत काकुळतीने व शरणागतीपूर्वक त्यांच्या चरणी प्रार्थना करताना त्यांना असे म्हणाले की, "महाराज! माझ्या मागची ही पीडा दूर होऊन माझी संतती वाढावी व वंशवृक्ष फुलावा म्हणून आपण काहीतरी उपाय सांगावा. आपण सांगाल ते मी अत्यंत निष्ठापूर्वक व श्रद्धाभक्तीने करीन. तरी आपण माझ्यावर कृपा करून माझी या सर्व त्रासातून सुटका करा. आपले चरणच माझी पीडा दूर करतील असा माझा पूर्ण विश्वास आहे."

श्री. भैरवप्रसादांची ही प्रार्थना ऐकताच पिशाच्चपीडेच्या

निवारणार्थ श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना नारायणबली, विष्णुसहस्र-नामाचे एक हजार पाठ व काही प्रायश्चित्ते करावयास सांगितली व त्यांना एक यंत्रही लिहून देऊन ते गळ्यात बांधावयास सांगून घरी पाठवून दिले. पुढे घरी गेल्यावर श्री. भैरवप्रसाद यांनी श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे सर्व अनुष्ठान केल्यावर त्यांच्या मागची सर्व पीडा दूर होऊन व त्यांची संतती जगू लागून ते सुखी झाले.

श्रीक्षेत्र पवनी येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू असताना काही दाक्षिणात्य मद्रासी स्त्रिया त्यांची कीर्ती ऐकून त्यांच्या दर्शनासाठी आल्या. या सर्व स्त्रिया विधवा असूनसुद्धा त्या काळी समाजात रूढ असलेल्या रूढीप्रमाणे त्यांनी केशवपन केले नव्हते. त्या ज्यावेळी श्रीमुरलीधराच्या मंदिरात श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आल्या त्यावेळी त्यांना पाहताच ते भिंतीकडे तोंड करून बसले. आपल्याला पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी तोंड फिरविले व त्यांची आपणास दर्शन देण्याची इच्छा नाही, हे लक्षात येताच त्या स्त्रियांना वाईट वाटून त्या त्यांना असे म्हणाल्या की, " महाराज ! आपणास आम्हाला दर्शन देण्याची इच्छा नाही का ? असा आमचा अपराध तरी काय झाला ? "

आपल्या दर्शनासाठी आलेल्या स्त्रियांनी असा प्रश्न विचारताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " शास्त्राविरुद्ध वर्तन करणाऱ्यांचे तोंड आपण पाहू इच्छित नाही. " हे एकताच त्या स्त्रिया त्यांना असे म्हणाल्या की, " महाराज ! केस हे तर जन्मल्यापासूनच आम्हा स्त्रियांना असतात. ते काही नवऱ्यांकडून आम्हाला मिळालेले नाहीत. तसेच कुंकूसुद्धा आम्ही अगदी लहानपणापासूनच लावीत आलो आहोत. त्यामुळे पतिनिधनानन्तर केशवपन करून कुंकू पुसून टाकण्याचे कारण काय आहे ? "

अशा प्रकारे त्या स्त्रियांनी युक्तिवाद केल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " माणसाचा जन्मतःच जसा आकार असतो तसाच पुढेही का राहात नाही ? लहानपणाच्या व मोठेपणाच्या आकारात, वागण्यांत, ज्ञानात, विचारात, बुद्धीत सर्व दृष्टीने फरक का दिसतो ? तुम्ही जन्मतःच जसे होता तसे होऊन या म्हणजे तुम्हाला दर्शन देता येईल. अन्यथा शास्त्राप्रमाणे आचरण केले तरच दर्शन होईल. एरवी दर्शन होणार नाही. आपणास हे जर जमणार नसेल; तर आपण पुन्हा इकडे न आलेले बरे ! "

श्रीस्वामीमहाराजांचे हे मुद्देसूद व निस्पृह भाषण ऐकून त्या सर्व स्त्रिया अत्यंत खजील झाल्या. श्रीस्वामीमहाराजांच्या विचारांचा त्यांच्या मनावर परिणाम होऊन त्यांनी सांगितल्याप्रमाणे शास्त्रीय पद्धतीने वागून त्यांच्या दर्शनानेच आपल्या आयुष्याचे सार्थक होईल ही पक्की खात्री मनाशी झाल्यामुळे त्या स्त्रियांनी दुसऱ्या दिवशी केशवपन केले व नंतरच त्या श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आल्या. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनीही मोठ्या प्रसन्न मनाने व आनंदाने त्यांना दर्शन दिले व त्यांना उपदेश करून कृतार्थ केले.

उमरेडचे एक श्रीमंत गृहस्थ श्री. बळवंतराव ऊर्फ आप्पा नाईक श्रीक्षेत्र पवनी येथे वारंवार श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी येत असत. श्री. बळवंतराव हे श्रीमंत असले; तरी ते अत्यन्त धार्मिक व श्रद्धावान् होते. आपण येथे आल्यावर काहीतरी श्रीगुरुसेवा करावी अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळे प्रत्येक वेळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आल्यानंतर ते त्यांची अशी प्रार्थना करीत असत की, " महाराज ! माझ्याकडून आपण येथे काहीतरी सेवा करून घेत जावी. आपल्या इच्छेप्रमाणे आपण आपली काही सेवा करून घेतली तर माझे जीवन धन्य व कृतार्थ होईल. "

श्री. बळवंतराव नाईक श्रीक्षेत्र पवनी येथे आल्यावर प्रत्येक-वेळी श्रीस्वामीमहाराजांची जरी अशी प्रार्थना करीत असले तरी ते त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून काही सुद्धा बोलत नसत. श्रीस्वामीमहाराज आपल्या प्रार्थनेप्रमाणे आपल्या सेवेचा स्वीकार करीत नाहीत असे लक्षात आल्यानंतर श्री. बळवंतरावांनी आपली इच्छा एकदा एका मध्यस्थ गृहस्थांमार्फत त्यांच्या कानावर घातली. श्री. बळवंतरावांची सेवातत्पर भावना व सेवेची उत्कट इच्छा श्रीस्वामीमहाराज जाणून होते. त्यामुळे यावेळी श्रीस्वामीमहाराज श्री. बळवंतरावांना असे म्हणाले की, " येथे पाणी मिळण्याची फार गैरसोय होते. त्यासाठी खूपच त्रास पडतो. तरी तुम्ही येथे पाणी भरण्याचे काम स्वतः करावे. "

वास्तविक पाहिले तर नोकर ठेवून पाहिजे तेवढे पाणी भरण्याची सोय करता येईल इतकी श्री. बळवंतरावांची आर्थिक स्थिती चांगली होती. परंतु श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः आज्ञा करून आपणास पाणी भरण्याची सेवा करण्यास सांगितले व सेवेची अमोलिक संधी उपलब्ध करून दिली हे पाहून श्री. बळवंतरावांना परमानंद होऊन ते तात्काळ स्वतः घागर घेऊन नदीवर पाणी आणण्यास गेले. इतकेच नव्हे; तर दुसऱ्या दिवसापासून त्यांनी आपल्या सर्व मुलांना व सुनांनाही ही सेवा करण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मास संपेपर्यंत श्री. बळवंतराव नाईक व त्यांची कुटुंबीय मंडळी ही पाणी भरण्याची सेवा करीत होते. श्रीस्वामीमहाराजांच्या दरबारात गरीब, श्रीमंत असे सर्वजण सारखेच आहेत, ही वृत्ती बाळगूनच श्री. बळवंतराव व त्यांच्या कुटुंबीय मंडळींनी ही सेवा केली. श्री. बळवंतराव नाईकांची व त्यांच्या सर्व कुटुंबीय मंडळींची निरभिमान वृत्ती पाहून श्रीस्वामीमहाराज अत्यंत संतुष्ट झाले.

त्यानंतर एक दिवस श्री. बळवंतराव श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "महाराज ! आपली महापूजा करावी अशी इच्छा आहे. तरी आपण संमती दिली तर मला आनंद होईल." श्री. बळवंतरावांची ही प्रार्थना ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी मोठ्या आनंदाने या गोष्टीला संमती दिली. श्रीस्वामीमहाराजांच्या कसोटीला माणूस एक वेळ उतरला की, मग त्याने सांगितलेली; पण नियमांच्या चौकटीत बसणारी कोणतीही गोष्ट ते कबूल करीत असत. श्री. बळवंतरावांच्या इच्छेप्रमाणे ज्या दिवशी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांची महापूजा केली त्या दिवशी त्यांनी मोठा भंडाराही केला. त्याचप्रमाणे श्री. बळवंतराव यांच्या आग्रहावरून त्यादिवशी श्रीस्वामीमहाराजांनीं त्यांचे चिरंजीव श्री. लक्ष्मणराव यांना अनुग्रहही दिला. आपल्या वडिलांप्रमाणेच श्री. लक्ष्मणराव हे सुद्धा अत्यंत भाविक व निरभिमानी असे होते.

कालौघात श्री. बळवंतराव व त्यांची सर्व कुटुंबीय मंडळी घरी परत गेली. तेथेही श्री. बळवंतराव यांनी श्रीस्वामीमहाराजांची उत्तमप्रकारे साधन-सेवा केली. पुढे देवास नमस्कार घालीत असताना श्रीं. बळवंतराव यांचे देहावसान झाले. श्री. बळवंतराव हे मोठे पुण्यात्मे असल्यामुळे व त्यांची श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी अनन्य भक्ती असल्यामुळे त्यांना असे देवदुर्लभ मरण प्राप्त झाले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे सेवा हे साधन किती अपूर्व व श्रेष्ठ आहे याची जाणीव झाल्याशिवाय राहात नाही. सेवेनेच ज्ञान होत असल्याने श्रीगोपालकृष्णनाथांनी श्रीमद् भगवद्गीतेत असे म्हटले आहे की –

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ४.३४ ॥

याचा अर्थ असा आहे की, "ते आत्मज्ञान संतांपाशी जाऊन, त्यांना साष्टांग नमस्कार करून,त्यांची सेवासुश्रूषा करून व निष्कपट-भावाने त्यांना बंधमोक्षादिकांविषयी प्रश्न करून तू समजावून घे. ते तत्त्ववेत्ते ज्ञानी संत पुरुष तुला त्या ज्ञानाचा उपदेश करतील."

याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत" असे म्हटले आहे की –

तें ज्ञान पैं गा बरवें। जरी मनीं आथि आणावें।
तरी संतां यां भजावें। सर्वस्वेंसीं ॥ ४.१६४ ॥
जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंठा।
तो स्वाधीन करी सुभटा। वोळगोनी ॥ १६५ ॥
तरी तनुमनुजीवें। चरणांसीं लागावें।
आणि अगर्वता करावें। दास्य सकळ ॥ १६६ ॥
मग अपेक्षित जें आपुलें। तेंही सांगती पुसिलें।
जेणें अंतःकरण बोधलें। संकल्पा न ये ॥ १६७ ॥

याचा अर्थ असा आहे की,"जे सर्वोत्कृष्ट असे ज्ञान आहे ते जर आपल्याला प्राप्त व्हावे असे मनात असेल तर तू ( शब्दज्ञान अर्थात् शास्त्रार्थज्ञानसंपन्न आणि स्वतः ब्रह्मानुभूतिसंपन्न व शक्ति-शक्तिपातयोग सामर्थ्याने दुसऱ्यांनाही अशा ब्रह्मानुभूतीने संपन्न करण्यास समर्थ ) अशा संतांची सर्वभावाने प्रथम सेवा करावीस; ॥ १६४ ॥ कारण ते संत म्हणजे साक्षात् ज्ञानाचे घरच आहेत. त्यांच्या घराचा सेवाधर्म हाच उंबरठा आहे. हे अर्जुना ! तू तिकडे वळून सेवाधर्मरूपी उंबरठा प्रथम आपल्या स्वाधीन करून घे. ॥ १६५ ॥ त्यासाठी तू शरीराने, मनाने व जीवाने त्यांच्या चरणी लाग आणि शरणागतीपूर्वक सर्व प्रकारांनी गर्वरहित होऊन त्यांच्या

१०

चरणांची सेवा कर. ॥ १६५ ॥ अशा प्रकारच्या सेवेने ते प्रसन्न झाल्यानन्तर त्या प्रसन्नस्थितीत त्यांना शिष्यांनी आपणास अपेक्षित असा जन्ममरणदुःखरूप संसारनिवृत्ती व परमानंदप्राप्ती यांविषयी प्रश्न केला म्हणजे तेही त्यास कृपेने ( तत्त्वमस्यादि महावाक्यद्वारा शब्दाने व शक्तिपातयोगदीक्षेने शक्तिसंक्रमणद्वारा ) ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा उभयविध पद्धतीने उपदेश करतात. त्यांच्या या सांख्ययोगोपदेशामुळे व सिद्धयोगोपदेशामुळे होणाऱ्या उभयविध बोधामुळे शिष्य सामरस्यात्मक ज्ञानैश्वर्यात संपन्न होऊन पुन्हा तो संकल्प-विकल्पात्मक वृत्तीवर मुळीच येत नाही.

एकदा एक बाई श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आल्या. श्रीगुरूंचे, संतांचे, महात्म्यांचे व राजाचे दर्शन रिक्त हाताने घेऊ नये म्हणजे त्यांच्या भेटीला जाताना यथाशक्ती काहीतरी घेऊन जावे म्हणून त्यांनी जातानाच एक नारळ व आठ आणे घेतले. तेथे आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करण्यापूर्वी आपल्या मनातील संकल्पाप्रमाणे त्यांच्यापुढे एक नारळ ठेवला व त्यावर आठ आणे ठेवण्यासाठी बटव्यात हात घातला. त्यावेळी त्यांच्या हातात आठ आणे येण्याऐवजी चुकून बटव्यात ठेवलेले सोन्याचे गिनीचे नाणे आले. ते आठ आणेच आहेत असे समजून त्यांनी ते श्रीस्वामीमहाराजांच्या समोर ठेवले. त्यानंतर त्यांनी नमस्कार केला व त्या तेथे बसल्या.तेथे बसताक्षणीच आपण श्रीस्वामीमहाराजांपुढे आठ आणे ठेवण्याऐवजी सोन्याचे नाणे ठेवले आहे असे त्या बाईंच्या लक्षात आल्यावरोबर त्यांच्या मनाची अत्यंत चलविचल झाली. ती सोन्याची गिनी परत कशी घेता येईल या विचाराने अत्यंत अस्वस्थ होऊन त्या तेथेच स्वस्थ बसून राहिल्या.

त्यावेळी आपल्यापुढे नारळ व सोन्याची गिनी ठेवणाऱ्या बाईं-

कडे श्रीस्वामीमहाराजांनी एकदा दृष्टिक्षेप टाकल्याबरोबर त्यांच्या आरपार जाणाऱ्या दृष्टीला त्या बाईंच्या अंतःकरणात गिनी परत मिळविण्याच्या विचारांची प्रचंड खळबळ दृष्टीस पडली. ती खळबळ पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईंना असे सांगितले की, "बाई! तुमच्या हातून चुकून नारळाबरोबर सोन्याची गिनी ठेवलेली दिसते; तरी ती परत घ्या."

श्रीस्वामीमहाराजांनी गिनी परत घेण्यास सांगितल्यावर आपल्या मनातील विचारांची सर्व खळबळ श्रीस्वामीमहाराजांना माहीत झाली हे पाहून त्यांना अत्यंत लाज वाटली व विचारांची ती सर्व खळबळ खरी नाही हे दर्शविण्यासाठी त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "महाराज! आपल्यापुढे एकदा दक्षिणा ठेविली ती ठेवली.ती काही मी परत घेणार नाही." त्या बाईंचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी मंदस्मित केले व ते स्वस्थ राहिले. आपल्या मनातील खरे विचार लपविण्यासाठी त्या बाईंनी दुसरे विचार पुढे करून मूळ विचारांना दिलेला मुलामा खोटा आहे, हे श्रीस्वामीमहाराजांच्या लगेच ध्यानात आले. ज्यावेळी त्या बाई परत जावयास निघाल्या त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांचा नारळ प्रथेप्रमाणे परत दिला.

श्रीस्वामीमहाराजांनी दिलेला तो प्रसादाचा नारळ घेऊन ज्यावेळी त्या बाई घरी येण्यास निघाल्या, त्यावेळी त्यांच्या मनात विचार-द्वंद्वाचे तुफान उसळले होते. त्यांचे एक मन असे म्हणत होते की, "आपले मन ओळखून चांगले श्रीस्वामीमहाराजांनी आपली सोन्याची गिनी परत घेण्यास सांगितले होते; पण आपण ती घेतली नाही, हे काही योग्य झाले नाही." त्याच वेळी त्यांचे दुसरे मन असे म्हणत होते की, "एकदा श्रीस्वामीमहाराजांना अर्पण केलेली वस्तू

परत घेणे म्हणजे सर्व प्रतिष्ठाच गमाविल्यासारखे झाले असते." अशा विचारद्वंद्वात त्या घरी आल्या. श्रीस्वामीमहाराजांनी दिलेला प्रसादाचा नारळ खावा म्हणून त्यांनी तो फोडला.तो नारळ फोडताक्षणीच त्या नारळातून त्या बाईंनी श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवलेली सोन्याची गिनी बाहेर पडली. त्याक्षणी त्यांना अत्यंत आश्चर्य वाटले व ती हातात घेताच त्यांना कमालीचे समाधानही वाटले. गिनी परत मिळावी अशी जी आपली खरी आंतरिक इच्छा होती, तीच खरी होती व ती ओळखून श्रीस्वामीमहाराजांनी ती अशा रीतीने पूर्ण केल्याचे पाहून त्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले व तेथूनच त्यांनी त्यांना मनःपूर्वक अनंत प्रणाम केले.

देशस्थ ब्राह्मणाचे एक कुटुंब श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी, सत्संगासाठी व सेवेसाठी श्रीक्षेत्र पवनी येथे या चातुर्मासात येऊन राहिले होते. या कुटुंबामध्ये तरुण, वृद्ध, स्त्री, पुरुष, मुले अशी बरीच मंडळी होती. या कुटुंबातील एका तरुण मुलाने नवीन पद्धतीप्रमाणे केस राखले होते. श्रीस्वामीमहाराजांना कोणाही ब्राह्मण पुरुषाने केस राखलेले आवडत नसत व अशा पुरुषाला ते दर्शनही देत नसत. त्यामुळे या तरुण मुलाच्या तीर्थरूपांनी आपल्या मुलाला असे सांगितले की, " तू केस काढून घे म्हणजे तुला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाता येईल व त्यांच्याकडून अनुग्रहही घेता येऊन तुला तुझे जीवन धन्य व कृतार्थ करता येईल."

आपल्या वडिलांचे हे बोलणे ऐकून तो मुलगा त्यांना असे म्हणाला की, " बाबा ! मला श्रीस्वामीमहाराजांकडे काहीही मागावयाचे नाही व त्यांच्याकडून अनुग्रहही घ्यावयाचा नाही. मला फक्त त्यांचे दर्शन घ्यावयाचे आहे. ते मी दुरून घेईन. त्यामुळे केस काढावयाचा प्रश्न येत नाही. तरी आपण मला काही तसा आग्रह करू नका."

आपल्या मुलाचे हे सर्व विचार ऐकल्यावर त्याच्या वडिलांनी त्याला पुन्हा कधीही केस काढण्यासंबंधी आग्रह केला नाही. मुलाच्या या आग्रहामुळे, घरची सर्व मंडळी दररोज श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जात असली; तरी हा मुलगा मात्र कधीसुद्धा त्यांच्या बरोबर गेला नाही.

त्या मुलाचा देवाधर्मावर विश्वास नव्हता असे नाही; पण आधुनिक शिक्षणामुळे केस राखण्याचा आणि साधुदर्शनाचा काहीसुद्धा संबंध नाही असे त्याला वाटत होते. असे असले; तरीसुद्धा आपल्या मनातील संकल्पनेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचे दुरून दर्शन घेता यावे म्हणून ते गंगेवरून स्नान करून कोणत्या वेळी व कोणत्या रस्त्याने येतात ते त्याने पाहून ठेवले होते. रोज पहाटे ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीवैनगंगेवरून स्नान करून परत येत असत त्यावेळी काळोखात एका आड बाजूला उभे राहून तो श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेत असे.

अशा रीतीने त्याची ही साधना काही दिवस चालल्यानंतर एक दिवस मनाचा हिय्या करून त्याने श्रीस्वामीमहाराज स्नान करून परत येत असताना त्यांना सन्मुख जाऊन साष्टांग नमस्कार घातला. त्याच्या नमस्काराचा स्वीकार करण्याकरिता श्रीस्वामीमहाराज क्षणभर थांबले व तो उठून उभा राहिल्यावर त्यांनी त्याच्याकडे इतक्या प्रेमळ दृष्टीने पाहिले व अशा अलौकिक गोडीने ते त्याच्याकडे पाहून हसले की, त्यांची ती दृष्टी व हास्य त्याचे हृदय अगदी आरपार भेदून गेली. त्यामुळे त्याच्या अंतःकरणात आनंदाचे कारंजेच उसळले. इतकेच नव्हे; तर कंप, स्वेद, रोमांचादि उत्पन्न होऊन तो मुलगा अगदी दिङ्मूढ अवस्थेत श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करीत डोळे मिटून तेथेच स्तब्ध उभा राहिला.

त्या मुलाला त्या अवस्थेत सोडून श्रीस्वामीमहाराज काहीसुद्धा न बोलता पुढे निघून गेले.आपल्या दृष्टिपाताने व हास्याने श्रीस्वामी-महाराजांनी त्या तरुण मुलावर जणू काही कृपेचा अपरंपार वर्षावच केला होता. कालान्तराने त्या तरुण मुलामध्ये श्रीस्वामी-महाराजांच्याबद्दल आत्यंतिक भक्ती निर्माण झाली व तो त्यांच्या इच्छेप्रमाणे वर्णाश्रमधर्मांगभूत समस्त नियमांचे यथासांग पालन करू लागला.

श्रीक्षेत्र पवनी येथील श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास संपल्यावर हे सर्व ब्राह्मण कुटुंब आपल्या गावी परत गेले. कालौघात तो मुलगा डॉक्टर झाला. उच्चविद्याविभूषित होऊनसुद्धा त्याच्या ठिकाणच्या श्रीस्वामीमहाराजांच्या भक्तीमध्ये यत्किंचितही फरक पडला नाही व न्यूनताही आली नाही. सूक्ष्मरूपाने श्रीस्वामीमहाराजांचे चरण त्याच्या हृदयमंदिरात कायमचे विराजमान झालेले होते व स्थूला-र्थाने त्यांचा फोटो त्याच्या पूजेमध्ये होता. रोग्याला औषध देताना औषधाबरोबरच श्रीस्वामीमहाराजांनी रचलेले संकटहरणस्तोत्र किंवा जयलाभादिस्तोत्रही तो आग्रहाने म्हणावयास सांगत असे. हे डॉक्टर म्हणजे व्यवहार, भक्ती, अध्यात्म व श्रद्धा या सर्वांचे मिश्रण होऊन तयार झालेले एक अलौकिक व्यक्तिमत्व होते हेच खरे !

श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील स्नेही आणि भक्त श्री. नारोपंत उकिडवे यांना एकदा श्रीस्वामीमहाराजरचित द्विसाहस्री गुरुचरित्राचा स्वाहाकार करावा अशी तीव्र इच्छा झाली. आश्चर्याची गोष्ट म्हणजे काही दिवसातच त्यांना अशा प्रकारे स्वाहाकार करण्यासंबंधीचा स्वप्नदृष्टान्तही झाला. अशा रीतीने स्वप्नदृष्टान्त झाल्यामुळे श्री. नारोपंत यांना परमानंद होऊन त्यांनी ही गोष्ट सावंतवाडी संस्थानचे न्यायाधीश श्री. गोविंदराव पाडगावकर

यांच्या कानी घातली. श्री. गोविंदराव हे उच्चपदावर असूनही अत्यंत भाविक व परम ईश्वरभक्त होते. त्यामुळे द्विसाहस्रीच्या स्वाहाकाराकरिता लागेल ती मदत करण्याचे श्री. नारोपंतांना श्री. पाडगावकर यांनी आश्वासन दिले.

अशा प्रकारे श्री. नारोपंत यांनी स्वाहाकार करण्याचे ठरविले; परंतु त्याचे विधान माहीत नसल्यामुळे त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना श्रीक्षेत्र पवनीला पत्र लिहून असे विचारले की, "द्विसाहस्रीचा स्वाहाकार करण्याची तीव्र इच्छा झाली असून त्याप्रमाणे स्वप्न-दृष्टान्तही झाला आहे. तरी आपण कृपावंत होऊन या स्वाहा-काराचे विधान कळवून तो कसा करावा हे कळवावे."

श्री. नारोपंत उकिडवे यांचे पत्र पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे उत्तर लिहिले की– "श्रावण शु ।। ९ पवनी. ऋपिप्रणीत ग्रंथाशिवाय अन्य ग्रंथांचा स्वाहाकार होऊ शकत नाहीं; तरी तुम्हाला काही कर्तव्य असल्यास गुरुचरित्राची १० पारायणें करून ब्राह्मण भोजन घाला. मंत्रशास्त्रांत, मनुष्यांनीं केलेले अनार्ष ग्रंथ यांचें अनुष्ठान करूं नये असे आहे. मग त्याचा स्वाहाकार करण्यास कोणी सांगावा ? व हा ग्रंथ मीं केला असाही अभिमान. श्रीगुरूंची जशी इच्छा असेल तसें घडो. अनुमोदन द्यावें अशी प्रवृत्ति होत नाहीं. गुरुचरित्र स्वाहाकारासंबंधीं स्वतः निराधार काहीच सांगता येत नाहीं. अतएव देवता, निर्वाप, हवनप्रकार वगैरे कामीं कांहीं अप्रामाणिक बोलता येत नाहीं. नारायण." शास्त्राज्ञेविरुद्ध केलेली कोणतीही गोष्ट करणे श्रीस्वामीमहाराजांना पसंत नसल्यानेच त्यांनी असे उत्तर श्री.नारोपंत यांना लिहिले यात काहीच शंका नाही.

श्रीक्षेत्र पवनी येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू असतानाच महायोगी श्री. गुळवणीमहाराज यांचे बंधू श्री. शंकर-

शास्त्री गुळवणी यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे पत्र लिहिले की, "श्रावण शुद्ध १० ला ती. वडील कैलासवासी झाले. आता पावेतो और्ध्वदेहिकादि सर्व उरकले असून आपल्या दर्शनास येण्याची तीव्र इच्छा झाली आहे. तरी आपण अनुज्ञा दिल्यास तिकडे येईन." श्री. शंकरशास्त्री गुळवणी यांचे हे पत्र पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे उत्तर लिहिले की, "पत्र पावले. आपणच वाडीस येऊ तेव्हा दर्शन घडेल. तरी यावेळी इकडे येऊ नये." श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे येऊ नये म्हणून कळविले तरी श्री. शंकरशास्त्रींना श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची एवढी तळमळ लागली होती की, केव्हा एकदा श्रीगुरुमाउलीचे दर्शन घेईन असे त्यांना झाले होते. या आत्यंतिक तळमळीमुळे व आतुरतेमुळे श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेचे उल्लंघन करून श्री. शंकरशास्त्री गुळवणी पवनीला निघून गेले.

श्री. शंकरशास्त्री पवनीमध्ये येताच त्यांना एकाएकी ताप येऊ लागला. पाहिले दोन-चार दिवस ते तापातच श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेले होते; पण त्यावेळी यासंबंधी त्यांनी त्यांना काहीच सांगितले नाही. परंतु पुढे उत्तरोत्तर ताप वाढतच गेला. त्यामुळे बरोबरीच्या लोकांनी श्री. शंकरशास्त्र्यांची प्रकृती पाहण्यासाठी वैद्यांना मुक्कामी बोलाविले. त्यांना तपासून वैद्यांनी असे सांगितले की, "हा ताप ४० दिवस जाणार नाही. तरी औषध व पूर्ण विश्रांती घेतली पाहिजे." हे ऐकताच सर्व परिचित मंडळींच्या मनात चिंता उत्पन्न झाली. वैद्यांनी अशा प्रकारचे निदान केले व सर्वांना चिंता वाटली; तरी श्री. शंकरशास्त्र्यांनी मात्र आपणास ताप का आला व त्याने इतके उग्र स्वरूप धारण का केले याचे कारण मनोमन बरोबर ओळखले होते. आपण श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेचा भंग

केल्यामुळेच आपण आजारी पडलो असल्यामुळे त्यांची क्षमा मागी-तल्याशिवाय हा आजार बरा होणार नाही याबद्दल त्यांची खात्री झाली. श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञाभंगाच्या पातकाचे फल म्हणून प्राप्त झालेल्या या आजारामुळे ते मनातून पार घाबरून गेले.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते तापातच श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले व त्यांना साष्टांग नमस्कार करून असे म्हणाले की, " महाराज ! आपण यावेळी येथे येऊ नको अशी आज्ञा केली असतानासुद्धा मी आपल्या आज्ञेचा भंग केला. त्यामुळेच मला अत्यंत ताप येत असून वैद्यांनी ४० दिवस ताप जाणार नाही म्हणून सांगितले. आपल्या चरणांच्या दर्शनासाठी लागलेल्या तळमळीमुळे हा प्रमाद घडला. तरी माझ्याकडून घडलेल्या या अक्षम्य प्रमादा-बद्दल आपण मला क्षमा करावी व माझ्यावर कृपा करून माझा ज्वर बरा करावा. पुन्हा अशा प्रकारची आज्ञाभंगाची चूक माझ्या हातून कधीही घडणार नाही. "

श्री. शंकरशास्त्र्यांनी अशा प्रकारे अंतःकरणपूर्वक प्रार्थना करताच श्रीस्वामीमहाराजांचे अंतःकरण कळवळले व ते त्यांना असे म्हणाले की, " घाबरू नकोस. रात्री झोपताना हा तीर्थअंगारा सर्वांगाला लावून झोप म्हणजे ताप उतरून उद्या बरे वाटेल. " श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगून श्री. शंकरशास्त्र्यांना तीर्थअंगारा देऊन बिऱ्हाडी पाठवून दिले. त्या दिवशी रात्री तो तीर्थअंगारा सर्वांगाला लावून श्री. शंकरशास्त्री झोपले असता त्या रात्रीच घाम येऊन त्यांचा सर्व ताप उतरला व दुसऱ्या दिवशी त्यांची प्रकृती बरी झाली. पुढे श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मास संपेपर्यंत श्री. शंकर-शास्त्री श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगाचा लाभ घेत तेथेच राहिले.

श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगाचा लाभ आपल्याप्रमाणे आपल्या घरातील सर्व मंडळींना व्हावा या हेतूने श्री. शंकरशास्त्र्यांनी श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा घेऊन आपल्या गावी कुडुत्रीला पत्र टाकून आपल्या मातुश्री ती. उमाबाई, कनिष्ठ बंधू अर्थात् माझे सद्गुरुनाथमहाराज श्रीवामनरावजी व धाकटी बहीण श्रीमती गोदावरीताई यांना पत्र पाठवून श्रीक्षेत्र पवनी येथे बोलावून घेतले. श्रीशंकरशास्त्र्यांच्या पत्राप्रमाणे ही सर्व मंडळी तात्काळ श्रीक्षेत्र पवनी येथे आली.

श्रीक्षेत्र पवनी येथे आल्यावर पुढे महायोगी व शक्तिपाताचार्य म्हणून सर्व भारतवर्षात विख्यात झालेले माझे श्रीसद्गुरुनाथ श्रीसंत वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांनी एक दिवस संधी पाहून श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी बीजमंत्रानुग्रहाची दीक्षा व्हावी म्हणून प्रार्थना केली. श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्गुरुनाथ-महाराजांची प्रार्थना मान्य करून चातुर्मास समाप्तीच्या पूर्व दिवशी म्हणजे भाद्रपद शु. १४ अर्थात् अनन्त चतुर्दशीच्या दिवशी त्यांना व त्यांच्याबरोबर त्यांच्या ती. मातुश्री उमाबाई व भगिनी श्रीमती गोदावरीताई यांनाही मंत्रदीक्षा दिली.

अनन्त चतुर्दशीच्या दिवशी सकाळीच स्नानसंध्यादि नित्यविधी झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना प्रथम बीजमंत्राचे न्यास, ध्यान व विधी समजावून सांगून मग तीन वेळा मंत्र सांगितला. त्यानंतर न्यास ध्यानादि विधी लिहूनही दिला. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेला मंत्र ग्रहण करताच श्रीसद्गुरुनाथ-महाराजांची सर्व गात्रे पुलकित झाली. अंगावर रोमांच उभे राहिले. सर्वांगाला कंप सुटला. एका अवर्णनीय अशा आनंदाच्या डोहात आपण तरंगत आहोत असे त्यांना वाटू लागले. त्या आनंदाच्या डोहात

ब्रह्मानंदाच्या आनंदाचेच तरंग उसळत होते. इतक्यात नील बिंदूच्या प्रकाशाने त्यांचे सर्व अंतरंग उजळून गेले. आपणास जणूकाही शरीरच नाही अशी एक दिव्य अवस्था त्यांना प्राप्त झाली. त्यावेळीच हजारो घंटांचा सुमधुर नाद त्यांना ऐकू येऊ लागला. त्या नादात त्यांचे मन हळूहळू लीन होऊ लागले. नाद हे ईश्वराचे नाम असून प्रकाश हे ईश्वराचे रूप आहे. अशा प्रकारे नामरूपाच्या अनिर्वचनीय दर्शनाने श्रीसद्गुरुनाथमहाराज परमानंदाच्या परमोच्च अवस्थेत असतानाच त्यांना कलारूपाने आपले परमाराध्य श्रीगुरुदेवांचे दर्शन झाले आणि पुढील काही क्षणातच नाद, बिंदू व कलातीत अशी महावस्था श्रीसद्गुरुनाथ महाराजांना प्राप्त झाली. या स्थितीमध्ये काल नावाचे परिमाण अस्तित्वातच नव्हते. देशकालवस्तुपरिच्छेदरहित अवस्था प्राप्त झालेल्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांना श्रीस्वामीमहाराजांनी जेव्हा भानावर आणले तेव्हा निरतिशय समाधानाने व आनंदाने त्यांनी त्यांच्या चरणी साष्टांग नमस्कार घालून जणू काही आपले सर्वस्वच त्यांना अर्पण केले. त्यानंतर श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी बरोबर आणलेला नारळ व एक रुपया दक्षिणा श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेविली. श्रीस्वामीमहाराजांनी नारळ प्रसाद म्हणून परत देऊन त्यांना बिऱ्हाडी परत पाठविले. मंत्रदीक्षेच्या त्या संबंध दिवसभर श्रीसद्गुरुनाथमहाराज एका दिव्य अशा अस्थूल अवस्थेत होते की, त्याचे स्थूलार्थाने वर्णनच करता येणे शक्य नाही. यासंबंधी खरे वर्णन करावयाचे म्हणजे त्या दिवशी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना जी नित्यानित्य व द्वैताद्वैतविवर्जित अशी सामरस्यात्मक लोकोत्तर अवस्था प्राप्त झाली, त्या अवस्थेतच ते आयुष्यभर राहिले, हे नि:संशय सत्य आहे.

वास्तविक पाहता इ. स. १९०६–१९०७ मध्ये श्रीसद्गुरुनाथ-

महाराजांची व श्रीस्वामीमहाराजांची पहिली भेट श्रीक्षेत्र नरसोबा-वाडी येथे जेव्हा झाली होती तेव्हा त्यांना नामस्मरणाची दीक्षा झाली होती. त्या संबंधीचे सविस्तर वर्णन श्रीथोरलेस्वामीमहाराज-चरित्र, खंड ३ रा, पृष्ठ १७९ ते १८७ वर केले आहे. यावेळी श्रीक्षेत्र पवनी येथे बीजमंत्राची दीक्षा झाली व पुढे श्रीस्वामीमहाराजांचा हावनूर येथे जो २० वा चातुर्मास इ. स. १९११ मध्ये झाला त्यावेळीही त्यांची पुन्हा मंत्रदीक्षा झाली. अशा प्रकारे त्यांना वेळो-वेळी ज्या मंत्रदीक्षा झाल्या त्या संबंधीचे रहस्य बहिश्चरप्राणरूपाने त्यांच्या चरणरजांची १८ वर्षे रात्रंदिवस अखंड सेवा करणारे त्यांचे एकनिष्ठ सेवक श्री. केशवराव यांच्या जवळ सांगताना ते असे म्हणाले होते की, "थोरल्यास्वामीमहाराजांनी वेळोवेळी निरनिराळ्या ठिकाणी श्रीदत्तयंत्रात गुंफलेल्या सर्व मंत्राच्या दीक्षा दिल्या." या संबंधीचा उलगडा करताना श्री. केशवराव यांनी असे सांगितले की, "श्रीगुरुमहाराजांना श्रीदत्तयंत्रातील मंत्रांशिवायही "सोऽहं," "हरे राम हरे राम, राम राम हरे हरे। हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे॥" या कलिसंतरणोपनिषदोक्त मंत्राची व इतरही अनेक मंत्रांच्या दीक्षा झाल्या होत्या. श्रीसद्गुरुनाथमहाराज आपल्या मंत्रदीक्षेचा दिवस म्हणून अनन्त चतुर्दशीचा दिवस श्रीस्वामीमहाराजांच्या फोटोला सुंदर हार घालून, श्रीमन्नृसिंह-सरस्वतीस्वामीमहाराजांकडून त्यांच्या मातुश्री ती. उमाबाईंना मिळालेल्या प्रसादरूपी चांदीच्या पादुकांवर अभिषेक करून व ब्राह्मण सुवासिनी भोजन करून मोठ्या प्रेमाने, आनंदाने व भावपूर्ण पद्धतीने साजरा करीत असत. त्याचप्रमाणे श्रीक्षेत्र पवनी येथे झालेल्या मंत्राचाच श्रीसद्गुरुनाथमहाराज रोज १२०० जप करीत असत व इतर मंत्रांचा १२ वेळा किंवा २८ वेळा जप करीत असत.

त्यामुळे असे वाटते की, "ॐ द्रां दत्तात्रेयाय नमः।" या श्रीदत्त-संप्रदायातील महामंत्राचीच त्यांना श्रीक्षेत्र पवनी येथे दीक्षा झाली असावी."

श्रीसद्गुरुनाथमहाराजांना मंत्रदीक्षेमुळे प्राप्त झालेली ही दिव्य अवस्था पाहिली म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीनिवृत्तीनाथ-महाराजांच्या कृपेनंतर जे कृतज्ञतेचे व स्वानुभूतीचे उद्गार अभंगातून व्यक्त केले आहेत त्याचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. ते असे म्हणतात की—

मोतियाचा बोगरु। गुरुवाक्यें सदन्नीं।
वाढियेला भाजनीं। नभाचिया॥ १॥
धारणेच्या हातें। जेवा दृष्टीमुखें।
गोडियेच्या सुखें। अंगें भरा॥ २॥
चाखवितां विरळा। बहुतामाजीं एक।
आहेत दांभिक। घरोघरीं॥ ३॥
ज्ञानदेव म्हणे। जो दावी या खुणें।
त्याचे पायीं होणें। लीन सदा॥ ४॥

★ ★ ★

शून्य शोधिलें नाहीं जेणें। काय विवरण केलें तेणें।
अज्ञानपणें फुगणें। गाढव जिणें पशूचें॥ १॥
वर्णाकृति शून्याचार। हा नाहीं ज्या विचार।
न घडे न घडे साक्षात्कार। जाण सर्वथा तया नरा॥ २॥
आधीं शून्याची शोधणी केली। मग सद्वस्तु प्राप्ति झाली।
अमृत वेळाची बोली। बोलतां नये॥ ३॥
आधी शून्य ते शुभ्रवर्ण। मध्ये श्वेत रचिलें जाण।
अर्धशून्य तें ताम्रवर्ण। प्रत्यक्ष जाण दिसतसे॥ ४॥

महाशून्याचा वर्ण निळा। अव्यक्त तेजाचा ओतिला गोळा ॥
ग्रासूनी ठेला भूगोळा। योगी डोळां पाहती ॥ ५ ॥
ऐसें शून्याचें नाहीं ज्ञान। तंववरी अवघेंच अज्ञान।
जनीं अवघा जनार्दन। अज्ञान सज्ञान काय बोलूं ॥ ६ ॥
ब्रह्मज्ञानाची किल्ली। सांगितली एकेंच बोली।
निवृत्तिराजें बोलविली बोली। तेंची बोलीं बोलिलों ॥ ७ ॥

★ ★ ★

याचा अर्थ असा आहे की, श्रीगुरूंच्या मुखातून निघणारी वाक्‌रत्ने आकाशरूपी ताटात मोत्यांप्रमाणे वाढलेली आहेत. ॥ १ ॥ अष्टांग योगातील योगाचे सहावे अंग जे धारणा, त्या धारणाबलाने श्रीगुरूंनी दिलेल्या शब्दसाधनेचा अभ्यास करा. अशा प्रकारे साधना भ्यासाच्या जोरावर अंतिम सामरस्याच्या महासिद्धीने संतुष्ट होऊन-त्या गोडीनेच अंगांगांनी व्याप्त होऊन जा. ॥ २ ॥ अशा प्रकारची साक्षात् अनुभूती देणारा किंवा चाखविणारा असा विरळा महात्मा हाच सद्‌गुरू असतो. एरवी बहुतेक अनुभूतिशून्य व अनुभूती प्रदान करण्यास सर्वथा असमर्थ असे दांभिक गुरूच घरोघरी आढळतात. ॥ ३ ॥ श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, जो सामरस्यात्मक महासिद्धीची साक्षात् अनुभूती देतो त्याच्या चरणी नेहमी लीन असावे. ॥ ४ ॥

★ ★ ★

ज्याने शून्य म्हणजे तेजोमय नीलबिंदूच्या प्राप्तीचे शोधन अर्थात् साधन केले नाही त्याने खरोखर आयुष्यात काय साध्य केले ? साधना न करता अज्ञानाने ज्याचा अहंकार वाढला आहे, अशा पुरुषाचे जिणे गाढवासारखे व्यर्थ होय. ॥ १ ॥ ज्या ब्रह्माच्या ठिकाणी ब्राह्मणक्षत्रियादि वर्णभेद नाही आणि लहान, मोठा, स्थूल,

कृश इत्यादि आकारभेद ज्या ब्रह्माला नाही अशा ब्रह्माचा साक्षात्कार साधकयोगी पुरुषावाचून इतर कोणालाही होणार नाही. ॥ २ ॥ यासाठी आम्ही आधी योगाभ्यासाने अर्थात् साधनाने त्या शून्यरूप नीलबिंदूचे दर्शन घेतले. मग आम्हाला आत्मवस्तूचा लाभ झाला. ज्यावेळी आम्हाला आत्मदर्शन झाले त्या अमृतानुभवमय वेळेचे वर्णन शब्दांनी करता येणे शक्य नाही. ॥ ३ ॥ ते शून्य बाहेरील बाजूला पांढऱ्या रंगाचे, मध्यभागी शुभ्रवर्णाचे आणि त्याच्या आतील अर्धा-भाग म्हणजे अर्धशून्य हे तांबूस वर्णाचे असलेले प्रत्यक्ष दिसते. ॥४॥ शून्याच्या अगदी आतील बाजूला महाशून्य असून ते निळ्या रंगाचे असते. हे महाशून्य म्हणजे अव्यक्त तेजाचा अर्थात् ब्रह्मतेजाचा ओतलेला महागोलक असून त्यात सर्व ब्रह्मांड सामावून राहिलेले असते. योगी लोक देहात्मबोधाचा व जगाचा बाध करून हे शून्य पाहतात. ॥ ५ ॥ या शून्याचे जोपर्यंत ज्ञान झाले नाही तोपर्यंत सर्व अज्ञानच आहे असे समजावे. सर्व जगात परमेश्वरच संचला असल्या-मुळे कोणाला ज्ञानी व कोणाला अज्ञानी म्हणावे ? ॥ ६ ॥ श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, श्रीनिवृत्तीनाथमहाराजांनी एका शब्दाने सांगितलेली ही ब्रह्मज्ञानाची किल्ली, त्यांनी माझ्या मुखातून जशी व्यक्त केली तशी मी प्रकट केली आहे. ॥ ७ ॥

अशा प्रकारे भाद्रपद पौर्णिमेपर्यन्त म्हणजे चातुर्मास समाप्ती-पर्यन्त श्रीक्षेत्र पवनी येथे नित्य आनन्दोत्सव चालू होता. त्यानंतर त्याच दिवशी सायंकाळी श्रीस्वामीमहाराज सीमोल्लंघनासाठी निघ-णार होते. श्रीक्षेत्र पवनीमध्ये श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगतीमध्ये काळ जावा व त्यांचे दर्शन व्हावे म्हणून जमा झालेल्या लोकांच्या दृष्टीने आणि गावात राहणाऱ्याही सर्व भक्तमंडळींच्या दृष्टीने सीमोल्लंघन हा एक अदृष्टपूर्व व अपूर्व असा सोहळा होता. हा

आनंद सोहळा संपल्यानंतर वियोगाच्या दुःखाचे दिवस येणार याची सर्वांना जाणीव असूनही प्रत्येकजण त्या दुःखद स्थितीची जाणीवही नको म्हणून त्यासंबंधीचे विचार किंवा कल्पना मनातून दूर लोटीत होता. जे काही कटू घडावयाचे असेल ते उद्या घडणार आहे, आज नव्हे; या विचाराने सर्व जण सायंकाळी होणाऱ्या सोहळ्याची आतुरतेने वाट पाहात होते व आजचा दिवस श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगामध्ये मोठ्या आनंदात व्यतीत करीत होते. लोकांच्या दृष्टीने तो यात्रेचाच दिवस होता.

भाद्रपद पौर्णिमेच्या सायंकाळी श्रीस्वामीमहाराज सीमोल्लंघनाला निघाले. त्या दिवशी लोकांनी घरोघर दिवे लावले होते. आपल्या घरासमोरील अंगणात सडे घालून त्यावर सुंदर सुंदर रांगोळ्या काढल्या होत्या. ज्या रस्त्यावरून श्रीस्वामीमहाराज श्रीवैनगंगानदीतीरावर जाणार होते. त्या रस्त्यावर लोकांनी अत्यंत उत्साहाने व भक्तिभावाने सडासंमार्जन करून ठिकठिकाणी फुले उधळली होती. इतकेच नव्हे; तर रस्त्याच्या दुतर्फा श्रीवैनगंगानदीच्या तीरापर्यन्त तुपाचे दिवे एकामागून एक असे तीन रांगांनी लावून रस्त्याला शोभा आणली होती.

श्रीस्वामीमहाराज रस्त्याने जाऊ लागले तेव्हा मंगल वाद्ये वाजू लागली. ब्राह्मण मंडळी त्यांच्याबरोबर वेदघोष करीत चालली होती. नवीन वस्त्रे व उत्तमोत्तम सौभाग्यालंकार धारण केलेल्या सुवासिनी स्त्रियांनी त्यांना जागोजागी पंचारतींनी ओवाळले. अशा रीतीने देवदुर्लभ सत्काराचा स्वीकार करीत करीत श्रीस्वामीमहाराज श्रीवैनगंगेच्या तीरावर आले. त्यावेळी असंख्य दीपांनी किनारा उजळून निघाला होता. श्रीवैनगंगेच्या तीरावरील श्रीक्षेत्र पवनीचा तो सर्व परिसरच एखाद्या इंद्राच्या नगरीसारखा झळकत होता.

तेथें जमलेल्या लोकांच्या उत्साहाला तर सीमाच नव्हती. मुलेबाळे आनंदाने नाचत होती. तरुण मंडळी भजनानंदात निमग्न झाली होती व वृद्ध मंडळी "जे थांबतात आणि पाहतात तेही सेवा करतात," या अमर न्यायाने तेथें चाललेला सोहळा मोठ्या कौतुकाने पण शांतपणे पाहात होती.

श्रीस्वामीमहाराज जेव्हा श्रीवैनगंगेच्या तीरावर आले तेव्हा त्या ठिकाणी जमलेल्या लोकांना पैलतीराला घेऊन जाण्यासाठी कितीतरी नावा सज्ज होत्या. त्यातील एक नाव फुलांच्या माळा घालून सजविली होती व त्यावर दोन ध्वज लावले होते. या नावेत श्रीस्वामीमहाराज बसल्यावर त्या नावेत श्रीसीतारामम‌हाराज, श्रीगांडामहाराज, श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील पुजारी मंडळी व आणखी काही प्रमुख प्रमुख मंडळी बसली. त्यानंतर ती नाव परतीराला जाण्यासाठी निघाली. त्या नावेबरोबरच इतरही अनेक नावा आजूबाजूने चालू लागल्या व कित्येक लोक श्रीस्वामीमहा-राजांच्या बरोबर पैलतीराला जाण्यासाठी निघाले. त्या सर्व नावा निघाल्याबरोबर तेथें जमलेल्या हजारो लोकांनी श्रीस्वामीमहा-राजांवर पुष्पवृष्टी करून व त्यांच्या नावाचा जयजयकार करून आकाश दुमदुमून टाकले. याप्रमाणे समारंभानें निघालेली ती नाव सायंकाळी ७ वाजता पैलतीराला जाऊन पोहोचली. अशा रीतीने नाव पैलतीरावर जात असताना ज्याप्रमाणे ऐलतीरावर उभे असलेले हजारो लोक, "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ॥" या महामंत्राचा जप करीत होते त्याप्रमाणे नावेतील लोकही मोठ्या प्रेमाने दिगंबराचे भजन करीत होते.

नाव पैलतीरावर गेल्यावर श्रीस्वामीमहाराज व नावेतील सर्व

मंडळी खाली उतरली. इतरही नावांतील सर्व मंडळी खाली उतरली. त्यानंतर श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांची महापूजा केली. या महापूजेनंतर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीमद् भगवद्‌गीतेचा अकरावा अध्याय म्हटला व तेथील सर्व भक्तमंडळींना स्वहस्ते प्रसाद वाटला.

अशा प्रकारे तेथील सर्व कार्यक्रम आटोपल्यावर श्रीस्वामीमहाराज व इतर सर्व भक्त मंडळी परत येण्यासाठी पुन्हा त्या नावेत बसली. इतरही सर्व मंडळी आपापल्या नावांमध्ये बसली. त्यानंतर सर्व नावा ऐलतीराला येण्यासाठी निघाल्या. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांची नाव मधोमध चालून इतर सर्व नावा त्यांच्या बाजूने चालल्या होत्या. इतक्यात अकस्मात् एक नाव कलंडून तिरपी होऊन उलटून बुडेल की काय, असे वाटून सर्व लोकांनी आरडाओरड केली. तो गलबला ऐकताच इतर नावांतील व किनाऱ्यावर उभे असलेल्या सर्व लोकांचे लक्ष बुडणाऱ्या नावेकडे जाऊन आता काय घडते असे वाटून सर्वचजण स्तंभित झाले. कलंडत चाललेल्या नावेवरील वाढत्या गलबल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांचेही तिकडे लक्ष गेले त्यावेळी एकंदर स्थिती लक्षात घेऊन श्रीस्वामीमहाराजांनी आपला नुसता हात हलवून ती नाव पूर्ववत् सुस्थितीत आणली. अशा प्रकारे नाव सुस्थितीत आलेली पाहताच इतर सर्व नावांतील व किनाऱ्यावरील सर्व लोकांनी सुटकेचा निश्वास टाकला. हा अपूर्व चमत्कार पाहून श्रीस्वामीमहाराज साक्षात् श्रीदत्तप्रभूच आहेत असे सर्वांना भासून, आपणा सर्वांना आपल्या भाग्याने चालत्या बोलत्या परमेश्वराचे दर्शन होत आहे, हे पाहून धन्य व कृतार्थ वाटले. त्यावेळी सर्वांनीच "श्रीगुरुदेवदत्त" व "परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज की जय" असा जयघोष केला.

त्या जयजयकाराच्या घोषाने श्रीवैनगंगानदीचे दोन्ही तीर निनादून गेले. हा भक्तीचा सोहळा आपल्या पृष्ठभागावर होत आहे हे पाहून श्रीवैनगंगानदीही आनंदाने हर्षभरित झाली होती. पाण्याच्या पृष्ठभागावर उठणाऱ्या लहान लहान लाटांवर श्रीस्वामीमहाराजांच्या नावेतील दिव्यांचा प्रकाश पडून पाताळदेवताच हातात रत्नदीप घेऊन त्यांना आरती ओवाळीत आहेत की काय, असे भासत होते. अशा रीतीने माणसांनीच काय; परंतु देवदेवतांनीही स्तुती व आरत्या करून श्रीस्वामीमहाराजांचे यश दिक्कोन गर्जून टाकील दशदिशा पसरविले.

याप्रमाणे सीमोल्लंघनाचा देवदुर्लभ सोहळा पूर्ण करून रात्री ११ वाजता श्रीस्वामीमहाराज अलीकडील तीरावर येऊन पोहोचले. तेथून श्रीस्वामीमहाराज श्रीमुरलीधराच्या मंदिरात परत आले. त्यानन्तर त्या मंदिराचे मालक व तेथील मुन्सफ श्री. विठ्ठलराव काळीकर यांनी तेथे जमलेल्या सर्व मंडळींना प्रसाद वाटला व एक अप्रतिम गायनाचा कार्यक्रम करविला. तो झाल्यावर मंडळी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून आपापल्या घरी गेली.

दुसऱ्या दिवशी श्री. विठ्ठलराव काळीकर यांनी श्रीस्वामीमहाराजांना भिक्षा करून ब्राह्मण समाराधना केली. त्यानंतर देवदर्शनादि करून आणि सर्वांना प्रसाद व आशीर्वाद देऊन श्रीस्वामीमहाराज पुढील संचारासाठी श्रीक्षेत्र पवनीतून बाहेर पडले. श्रीस्वामीमहाराजांचे पाऊल बाहेर पडताच आत्तापर्यन्त थांबलेला प्लेग जोराने गावात शिरल्यामुळे गावात प्रचंड गडबड उडाली. त्या प्लेगने कित्येक लोकांचे बळी घेऊन भीषण संहार घडवून आणला.

श्रीक्षेत्र पवनीची सध्याची स्थिती काय आहे हे पाहण्यासाठी दि. ६।५।१९८८ ला डॉ. श्री. केशवराव जोशी नागपूरहून तेथे गेले

होते. त्यांनी सांगितलेली हकीकत सर्वांनाच मोठी उद्बोधक वाटेल म्हणून येथे देत आहोत.

" श्रीक्षेत्र पवनी येथील ज्या श्रीविठ्ठल मंदिरात श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास झाला तेथे गाभाऱ्याच्या बाहेर उजव्या बाजूला त्याकाळी एक ओटा असून तेथे एक पाट मांडून त्यावरच श्रीस्वामीमहाराज बसत असत. सध्या मुळातील ओटा काढून टाकून तेथे एक छोटेसे मंदिर तयार केले असून त्या ठिकाणी श्रीस्वामीमहाराज ज्या पाटावर बसत असत तो पाटच त्यांच्या पादुकांच्या रूपाने तेथे पूजेत ठेवला आहे. तो खराब होऊ नये म्हणून त्याला पितळेचा पत्रा चढविला आहे. सध्या तेथे श्री. बाळकृष्ण दत्तात्रेय जोशी हे त्या पाटाच्या रूपाने असलेल्या पादुकांची एकनिष्ठपणे पूजा करीत असतात. श्री. जोशी यांचे वय सध्या ८४ वर्षांचे आहे. ते जरी श्रीस्वामीमहाराजांचे पट्टशिष्य प. प. श्रीमन्नृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज यांचे शिष्य असले; तरी त्यांच्या मुखातून " वासुदेव, वासुदेव " असा अखंड जप चाललेला होता. हा जप ऐकून त्यांची श्रीस्वामीमहाराजांच्या चरणावर किती दृढ निष्ठा आहे याचाच प्रत्यय आला. ज्यावेळी श्री. बाळकृष्णपंत जोशी यांना ते करीत असलेल्या " वासुदेव, वासुदेव " या जपासंबंधी व पाटाच्या पूजेसंबंधी विचारले तेव्हा ते असे म्हणाले की, " आमच्या श्रीगुरुमहाराजांच्या श्रीगुरूंच्या म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलाच्या स्पर्शाने पवित्र झालेला हा पाट म्हणजे माझ्या दृष्टीने जणूकाही या त्यांच्या पादुकाच आहेत. त्यांच्या अखंड नामस्मरणाने व या पादुकांच्या पूजनाने हा दुस्तर संसार आपण सहज तरून जाऊ शकू असा माझा विश्वास आहे. श्रीथोरलेस्वामीमहाराज सर्व जीवनसूत्रे हलवीत असतात असा माझा अनुभव असून तेच माझ्याकडून त्यांच्या

चरणांची सेवा करून घेत आहेत. मला हे पक्के माहीत आहे की, त्यांच्या इच्छेनेच जन्ममृत्यूचे चक्र चालू असते. त्यांच्या सेवेने मी धन्य व कृतार्थ झालो आहे. मी खरोखरच तृप्त आहे. ते जेव्हा मला बोलावितील तेव्हा मी जाण्यास तयार आहे. त्यांच्या चरणांच्या कृपेने माझे मन पूर्ण निर्वासन झाले आहे."

ज्या श्रीविठ्ठल मंदिरात श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास झाला त्याच्या मागे सध्या एक श्रीदत्तमंदिर असून ते श्री. विठ्ठलराव काळीकर यांनी बांधले आहे. ते मंदिर त्यांच्याच मालकीचे आहे. या मंदिरासंबंधीची हकीकत पुढीलप्रमाणे आहे.

श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र पवनी येथील चातुर्मास संपण्यास दोन-तीन दिवस राहिले असता तेथील पुजारी श्री. कडू यांच्या श्री. मामांनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, "महाराज! चातुर्मास संपला की, आपण येथून जाणार. आपण येथून गेला की, आम्हाला काहीच आधार राहणार नाही. तरी आपण कृपावंत होऊन आम्हाला आपल्या पादुकांचा प्रसाद देऊन जा. आपल्या चरण पादुका याच पुढील काळात आमचा जीवनाधार होतील." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज श्री. कडू यांच्या मामांना असे म्हणाले की, "इतक्या दिवस काय झोपला होता काय? बरे तर! आपण सांगतो तसे दगडावर श्रीदत्तयंत्र कोरून आणा व एका शिळेवर पादुकाही कोरून आणा."

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे पुजाऱ्यांच्या श्री. मामांनी श्रीदत्तयंत्र व पादुका तयार करून आणल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या यंत्राची प्राणप्रतिष्ठा करून त्यावर स्वतःच्या पादुकांची स्थापना करण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे तेथील पुजाऱ्यांनी श्रीदत्तयंत्राची व पादुकांची स्थापना केली. त्यावेळीच

श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक पितळेची श्रीदत्तमूर्ती दिली होती. तिची स्थापनाही पुजाऱ्यांनी तेथील श्रीदत्तमंदिरात केली होती. पुढे कालौघात ती श्रीदत्तमूर्ती कोणीतरी चोरून नेली; पण शोधाशोध केल्यावर ती श्रीदत्तमूर्ती त्या मंदिरा शेजारी असलेल्या विहिरीतच सापडली त्यानन्तर ती श्रीदत्तमूर्ती पुन्हा दुसऱ्यांदा चोरीला गेली; परंतु पुढे ती उमरेड या गावी सापडली. त्यानन्तर आश्चर्य म्हणजे ती श्रीदत्तमूर्ती तिसऱ्यांदा चोरीला गेली; परंतु खूप शोधाशोध व तपास करूनही ती पुन्हा कधीही सापडली नाही. पुढे श्रीदत्तजयंती जवळ आल्यामुळे तेथील मंडळींनी जयपूरहून संगमरवराची त्रिमुखी मूर्ती तयार करवून आणून तिची श्रीदत्तमंदिरात स्थापना केली. आज या श्रीदत्तमंदिरात श्रीदत्तयंत्रावर विराजमान झालेल्या श्रीस्वामीमहाराजांच्या पादुकांचे व त्यामागे विराजमान झालेल्या श्रीदत्तात्रेयांच्या षड्भुज व त्रिशिरयुक्त श्रीदत्तमूर्तीचे दर्शन होते."

श्रीक्षेत्र पवनीहून निघून श्रीस्वामीमहाराज, श्रीगांडामहाराज व श्रीक्षेत्र नरसोबावाडीची पुजारी मंडळी बोरी गावात मुक्कामाला आली. येथे आल्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीच्या पुजारी मंडळींना वाडीस परत जाण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे ती सर्व मंडळी तेथून वाडीस गेली. चातुर्मासातील स्वयंपाकासाठी आणलेली लोकांची भांडी वगैरे सामान परत करणे, हिशेब चुकते करणे इत्यादि सर्व कामे पूर्ण करण्याकरिता श्रीसीता-राममहाराज दोन दिवस मागेच राहिले होते. पुढे श्रीक्षेत्र पवनी येथील सर्व व्यवहार पूर्ण करून ते बोरी येथे आले. श्रीस्वामीमहा-राजांचा बोरी येथे एक-दोन दिवस मुक्काम झाला. चातुर्मासाच्या काळात श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आसपास पसरलेली असल्या-मुळे येथेही दर्शनासाठी लोकांची गर्दी उसळली.

श्रीस्वामीमहाराज आपल्या गावी मुक्कामाला आले आहेत असे समजताच तेथील पटवाऱ्यांची पत्नी अत्यंत पीडित झाल्यामुळे आर्त होऊन श्रीस्वामीमहाराजांच्याकडे आली व तिने त्यांना असे सांगितले की, " महाराज ! काही दिवसांपूर्वी मला एक मूल झाले. त्याला फक्त तोंडच होते. हात–पाय वगैरे इतर कोणतेही बाकीचे अवयव त्याला नव्हते. अशा तऱ्हेचे विचित्र व विद्रूप मूल माझ्या पोटी जन्माला आल्याचे पाहून मला जी भीती वाटली त्यामुळे घाबरून जाऊन त्या दिवसापासून मी अत्यंत आजारी पडले. आत्ता-पर्यंत माझी प्रकृती बरी व्हावी म्हणून मी पुष्कळ औषधोपचार केला; परंतु माझी प्रकृती काही अद्याप बरी होत नाही. आपण सर्वज्ञ व सर्व शक्तिमान् आहात. तरी आपण काहीही उपाययोजना करून माझी या पीडेतून मुक्तता करा. "

त्या बाईंची ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " तुमच्या वंशात कोणीतरी व्यक्ती पिशाच्च झालेली असल्यामुळे तुम्हाला अशी विचित्र संतती झाली. तरी याकरिता घाबरण्याचे कारण नाही. एक यंत्र करून देतो. ते हातात बांधा म्हणजे आपली भीती दूर होऊन पुढे कालौघात चांगली संतती होऊन ती जगेलही. " त्या बाईंना असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी लगेच त्यांना एक यंत्र तयार करून देऊन ते पेटीत घालून हातात बांधण्यास सांगितले. त्यामुळे पुढे त्या बाईंची त्या बाधेपासून मुक्तता होऊन त्यांना चांगली संतती झाली व ती जगलीही.

श्रीगांडामहाराज व श्रीसीतारामहाराज यांना घेऊन श्रीस्वामी-महाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या मार्गाला जाण्याच्या विचाराने निघाले. त्यावेळी बरोबर श्री. विष्णुबुवा, श्री. किसनराव व श्री. बापूराव ही भक्त मंडळी होती. बाकीची मंडळी आगगाडीने पुढे

निघाली. श्रीस्वामीमहाराज बोरी गावाहून पुढे निघाले तेव्हाच श्रीगोदावरीच्या किनाऱ्या किनाऱ्याने प्रवास करावा अशी त्यांची इच्छा होती. परंतु जाताना श्रीक्षेत्र माहूर येथे जाऊन देवीचे व श्रीदत्तात्रेयांचे दर्शन घेऊन पुढे जावे असा श्रीगांडामहाराजांनी आग्रह धरल्यामुळे श्रीक्षेत्र माहूर वरून पुढे जाण्याचे ठरले.

श्रीक्षेत्र माहूरच्या अलीकडे १०–१५ मैलांवर श्रीशरभंगऋषींचा आश्रम आहे. त्या ठिकाणी उनकेश्वराचे स्थान असून तेथे ऊन पाण्याचे एक व थंड पाण्याचे एक अशी दोन कुंडे आहेत. या दोन कुंडांच्या निर्मितीची अशी आख्यायिका आहे की, एकदा श्रीशरभंगऋषींना कुष्ठरोग झाला. त्या बाधेतून मुक्तता व्हावी म्हणून त्यांनी या स्थानावर तीव्र तपश्चर्या आरंभिली. त्यांच्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन प्रभू श्रीरामचंद्रांनी या ठिकाणी बाण मारून ही दोन कुंडे निर्माण केली. या कुंडांमध्ये स्नान करून श्रीशरभंगऋषी रोगमुक्त झाले व ते ब्रह्मलोकाला गेले.

या दोन कुंडांपैकी एका कुंडात शिवलिंग आहे व येथील मंदिरात श्रीराम, श्रीलक्ष्मण व श्रीसीतामाई यांच्या वनवासी वेषातील मूर्ती असून श्रीशरभंगऋषींच्या पादुकाही आहेत. येथील दोन कुंडांपैकी गरम पाण्याच्या कुंडात फार मोठ्या प्रमाणामध्ये गंधक आहे. या पाण्यात स्नान केल्याने चर्मरोग, कुष्ठरोग वगैरे बरे होतात. तसेच या पाण्याने स्नान करून पांघरूण घेऊन निजले असता शरीराला घाम सुटून शरीर अगदी हलके झाल्यासारखे वाटते. या ठिकाणी दोन दिवस मुक्काम करून श्रीस्वामीमहाराज पुढे जावयास निघाले. येथून श्रीवैनगंगानदी ४–५ फर्लांगावर आहे.

श्रीक्षेत्र माहूरगडाच्या पायथ्याशी येताच श्रीगांडामहाराजांची प्रकृती एकाएकी बिघडली. गडावर जावयाला तीन मैलांची चढण

चढावी लागते. प्रकृती बरी नसल्यामुळे इतकी मोठी चढण चढून जाणे श्रीगांडामहाराजांना शक्य नसल्यामुळे त्यांना पायथ्याशीच राहावे लागले. वास्तविक पाहता श्रीगांडामहाराजांच्या इच्छेस्तवच श्रीक्षेत्र माहूरमार्गे जावयाचे ठरले होते आणि त्यांच्या इच्छे करिताच श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगोदावरीतटाने जाण्याची आपली इच्छा दूर सारली होती. इतके झाले; तरी ईश्वराची इच्छा काही निराळीच असल्यामुळे श्रीक्षेत्र माहूरगडावर जाऊन श्रीरेणुकामातेचे व श्रीदत्तात्रेयांचे दर्शन घेण्याची श्रीगांडामहाराजांची इच्छा सफळ झाली नाही.

आश्विन शुद्ध ११ शके १८३१ रोजी श्रीस्वामीमहाराजांनी व बरोबरच्या मंडळींनी प्रथम मातृतीर्थात स्नान केले. त्यानंतर सर्व मंडळी डोंगरावर गेली. तेथे श्रीरेणुकामाता, श्रीदत्तात्रेय, श्रीअत्री व श्रीअनसूयामाता यांचे दर्शन करून सर्व मंडळी खाली उतरून आली व जवळच असलेल्या फुलसुंगी या गावातील श्री. विष्णुदास कवींच्या मठात त्यांनी मुक्काम केला. द्वादशीचे पारणे याच ठिकाणी झाले. येथील दोन दिवसाच्या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी दिवसभर बरीच मंडळी येत होती; पण येथे जेव्हा रात्रीसुद्धा १०-१५ माणसांचा घोळका दर्शनाला आला तेव्हा लोकांचा उपसर्ग टाळण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांनी रागवल्याचा आविर्भाव केला व ते दंड घेऊन त्यांच्या पाठीमागे लागले.

श्रीगांडामहाराजांच्या आग्रहामुळे श्रीक्षेत्र माहूरला येणे झाले; तरी येथे आल्यावर ते आजारी पडले. त्यामुळे त्यांना गडावर चढता येणे अशक्य होऊन पायथ्याशीच राहावे लागले. शेवटी सर्व लोक श्रीक्षेत्र माहूरहून निघाल्यावर एक मैलभर अंतर चालून जाताच

श्रीगांडामहाराजांची प्रकृती सुधारून ते गाडीतून उतरून सर्वांच्या बरोबर पायी चालू लागले. हे पाहिल्यावर सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटले. श्रीस्वामीमहाराज साक्षात् श्रीदत्त असून व तशा प्रकारची वेळोवेळी प्रचीती येऊनही श्रीगांडामहाराजांनी त्यांच्या इच्छेप्रमाणे मोडता घातला व त्यांनी त्यांना श्रीक्षेत्र माहूरला जाणे भाग पाडले; परंतु श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेविरुद्ध आग्रह धरल्यामुळे अखेर त्यांना श्रीदत्त दर्शन झाले नाही ते नाहीच. वास्तविक पाहता श्रीसद्गुरुनाथमहाराजांची इच्छा तीच आपली इच्छा असे श्रीगांडा-महाराज यांना वाटावयास पाहिजे होते; परंतु प्रत्यक्षात तसे घडले नाही, हेच खरे !

अशा रीतीने श्रीक्षेत्र माहूरहून निघून पुढे प्रवास चालू असताना वाटेत एका गावी एका मारुतीच्या मंदिरात सर्वजण उतरले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजही बरोबर होते. मध्यान्हकाळपर्यन्त आपापले स्नान, संध्या, जप, ध्यानादिक आटोपल्यावर श्रीस्वामीमहाराज गावात भिक्षेला गेले. त्यावेळी एका घरातील एक वृद्ध स्त्री डाव्या हातात भाकरीवर भात-भाजी घेऊन उजव्या हातात आंबिलीने भरलेले लहानसे मातीचे गाडगे घेऊन मोठ्या आनंदाने त्यांना भिक्षा वाढण्याकरिता त्यांच्यापुढे आली. प्रथम आपल्या हातातील भाजी-भाकरी श्रीस्वामीमहाराजांच्या झोळीत घातल्यावर तिने त्यांच्यापुढे ते आंबिलीने भरलेले गाडगे ठेवले व ती त्यांना असे म्हणाली की, " महाराज ! आपण हे आंबिलीचे गाडगेही बरोबर घेऊन जा म्हणजे माझ्या मनाला मोठे समाधान लाभेल ! "

त्या वृद्ध स्त्रीने असा आग्रह करताच श्रीस्वामीमहाराज तिला असे म्हणाले की, " आपण आम्हाला भाकरी-भाजी-भात वाढला आहे तेवढा पुरे आहे. आंबिलीचे काही कारण नाही. ती ठेवून द्या. "

इतके सांगून श्रीस्वामीमहाराज परत जाण्यासाठी निघणार इतक्यात ती वृद्ध स्त्री हात जोडून त्यांना अत्यंत नम्रपणे असे म्हणाली की, "महाराज ! नको म्हणू नका हो ! संपूर्ण घरच पेटले आहे. त्याचा एक वासा तरी ओढून द्या. जळत्या घराचा एक वासा जरी खटपट करून निघाला तरी तो मोठा लाभच होय, असे गरीब मनुष्य मानीत असतों. याप्रमाणे माझे संपूर्ण आयुष्य फुकटच गेले आहे. आपणासारख्या महाविष्णुमूर्तीला मध्यान्हकाळची अन्नाची भिक्षा या हातांनी वाढण्याचा सुयोग दैववशात् मला आजच आला आहे. या माझ्या गरीब अन्नाचा आपण स्वीकार केलात म्हणजे एवढ्या एका पुण्याईनें मी कृतार्थ होईन. माझा जन्म सफळ होईल, अशी माझी तुमच्या दर्शनावरोबर दृढ भावना झाली आहे. म्हणून ही आंबिल नको म्हणू नका. ही घ्या व मला पुण्यवती, धन्य करा." त्या बाईंची भक्ती व प्रेम पाहून श्रीस्वामीमहाराजांना तिचा अनादर करवेना. त्यामुळे ते तिला असे म्हणाले की, "बाई ! हे गाडगे येथेंच असू द्या. आमच्या शिष्याला पाठवून ते आम्ही घेऊन जातो बरे !" असे म्हणून दयार्द्र दृष्टीने तिच्याकडे पाहून श्रीस्वामीमहाराज श्रीमारुतीच्या मंदिरात परत आले.

श्रीस्वामीमहाराज श्रीमारुतीच्या मंदिरात आल्याबरोबर त्यांनी श्रीसीताराममहाराजांना भिक्षेच्या वेळी झालेला सर्व प्रकार सांगून त्या घराची खूण सांगितली व ते त्यांना असे म्हणाले की, "आम्ही त्या घरातील स्त्रीला कबूल केल्याप्रमाणे तू तेथे जाऊन ते आंबिलीचे गाडगे घेऊन ये." ही आज्ञा ऐकताच श्रीसीताराममहाराज श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "उन्हातून मुद्दाम इतक्या दूर जाऊन ते आंबिलीचे गाडगे आणण्याचे काही प्रयोजन दिसत नाही; कारण आंबिलीवाचून भिक्षेचे काही अडेल असे वाटत नाही." हे ऐकताच

श्रीस्वामीमहाराज श्रीसीतारामहाराजांना असे म्हणाले की, "तू म्हणतो त्याप्रमाणे आत्ता आंबिलीवाचून काही अडले नाही हे खरेच आहे. अरे ! आम्ही देखील त्या बाईंना नकोच म्हणालो होतो; पण त्या बाईंनी फार काकुळतीने "आंबील तुम्ही घ्याच, म्हणजे माझे समाधान होईल," असे म्हणून हट्टच धरला. त्यामुळे आम्ही आपल्या शिष्याला पाठवून ती घेऊन जातो असे तिला कबूल केले आहे. याकरिता तू जाऊन ती घेऊन ये." इतके सांगितल्यावर देखील भर दुपारच्या उन्हातून जाऊ लागू नये म्हणून श्रीसीतारामहा-राजांनी नकाराचेच उत्तर दिले. त्यावेळी श्रीगुरुमहाराज त्यांना असे म्हणाले की, "अरे ! ती बाई मोठी साध्वी भक्त आहे. तिने प्रीतीने दिलेली आंबिल आणल्यावाचून आपण आज काही अन्न घेणार नाही."

श्रीस्वामीमहाराजांचा अशा प्रकारचा निश्चय पाहिल्यावर आता मात्र काही इलाज नाही असे लक्षात घेऊन श्रीसीताराम-महाराजांनी त्या बाईंच्या घरी जाऊन ती आंबिल आणली. तेव्हा श्रीस्वामीमहाराजांना फार आनंद होऊन त्यांनी ती आंबिल स्वतःला वाढावयाला सांगून त्यांना देखील ती घ्यावयाला लावली. अशाप्रकारे दोघाही गुरुशिष्यांनी त्या बाईंनी प्रेमभावनेने दिलेली ती आंबिल आवडीने खाऊन ते अतिशय संतुष्ट झाले व त्यांनी त्या बाईंना पूर्ण आशीर्वाद देऊन कृतार्थ केले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांची भक्ति-प्रियता स्पष्ट दिसून येते. माधुकरी वाढणाऱ्या बाईला दिलेल्या शब्दाप्रमाणे त्यांनी ती आंबिल तिच्या घरून आणवून घेतली व ती मोठ्या प्रेमाने खाल्ली. वास्तविक पाहिले तर आंबिलीचे काय महत्त्व होते ? किंवा त्यांना आंबिलीची त्या दिवशी गरज तरी अशी

किती होती ? पण ते सत्त्विक प्रिय भगवान् असल्यामुळे त्यांना त्या साध्वी स्त्रीची भक्ती व प्रेमच केवळ आवडले व त्याचाच जणूकाही त्यांनी त्या आंबिलीच्या रूपाने स्वीकार केला हेच खरे आहे. या दृष्टीने "श्रीगुरूंची सात्त्विकांवरी प्रीती ।। "व" ओळखावया श्रीगुरुमूर्तीसी। आपुला आचार परियेसीं। दृढ भक्ती धरोनि मानसीं। ओळखिजे मग श्रीगुरू ।। ३.२१ ।। " असे जे श्रीसरस्वती-गंगाधरांनी श्रीगुरुचरित्र या ग्रंथात म्हटले आहे ते सदैव लक्षात ठेवण्यासारखे आहे. इतकेच नव्हे; तर साधक भक्तांनी, या दृष्टीने त्यांनी सिद्धान्तरूपाने ज्या ओव्या लिहिल्या आहेत, त्याचे अखंड मनन करणे आवश्यक आहे असे वाटते. ते असे म्हणतात कीं –

ज्यांसी नाहीं दृढ भक्ती। सदा दैन्यें कष्टती।
श्रीगुरुवरी बोल ठेविती। अविद्यामाया वेष्टुनी ।। ३.२७ ।।

संशय धरोनी मानसीं। श्रीगुरु काय देईल म्हणसी।
तेणें गुणें हा भोग भोगिसी। नाना कष्टें व्याकुळित ।।२८।।

सांडोनि संशय निर्धार। गुरुमूर्ति देईल अपार।
ऐसा देव कृपासागर। तुज नुपेक्षी सर्वथा ।। २९ ।।

गुरुमूर्ति कृपासिंधू। प्रख्यात असे वेदान्तबोधू।
तुझें अंतःकरणीं वेधू। असे तया चरणांवरी ।। ३० ।।

तो दातार अखिल महीं। जैसा मेघाचा गुण पाहीं।
पर्जन्य पडतो सर्वां ठायीं। कृपासिंधू ऐसा असे ।। ३१ ।।

त्यांतचि पाहे पात्रानुसार। सांगेन साक्षी एक थोर।
सखोलभूमी उदक स्थिर। उन्नतीं उदक नाहीं जाणा ।।३२।।

दृढ भक्ति जाणा सखोल भूमी। दांभिक ओळखा उन्नत तुम्ही।
याचिया कारणें मनोवाक्कर्मीं। निश्चयावें श्रीगुरूसी ।।३३।।

म्हणोनि श्रीगुरुउपमा । ऐसा कवण असे महिमा ।
प्रपंच होय परब्रह्म । हस्त मस्तकीं ठेवोनियां ।। ३४ ।।
कल्पतरूची द्यावी उपमा । कल्पिलें लाभे त्याचा महिमा ।
न कल्पितां पुरवी कामा । कामधेनू श्रीगुरू ।। ३५ ।।
ऐसा श्रीगुरु परब्रह्ममूर्ती । ख्याती असे श्रुतिस्मृती ।
संदेह सांडूनि एकचित्तीं । ध्याय पदांबुज श्रीगुरूचें ।। ३६ ।।

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोवाच्या वाडीला जात असताना सर्व लोक त्यांच्या बरोबर पायी चालतच चालले होते. मात्र श्रीक्षेत्र माहूरला आजारी पडल्यामुळे मधून मधून श्रीगांडामहाराज बैलगाडीतून प्रवास करीत होते. या प्रवासात वाटेत एक ब्राह्मण गृहस्थ भेटले. त्यांनीही श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर जाण्याचा हट्ट धरला. मात्र श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आपल्या बरोबर येऊ नको म्हणून निक्षून सांगितले; पण त्या ब्राह्मण गृहस्थांनी आपला हट्ट सोडला नाही. तेही सर्व लोकांच्या बरोबर प्रवास करू लागले. वाटेत श्रीगांडामहाराजांना घेऊन बैलगाडी हळूहळू चालली होती. बैलांनी लवकर चालावे म्हणून मध्येच त्या ब्राह्मण गृहस्थांनी बैलांची शेपटी पिरगाळून त्यांना डिवचले. त्यामुळे बैल एकदम उधळले व ते जोरात धावू लागल्यामुळे बैलगाडी जोरात पळू लागली. तेवढ्यात त्या बैलगाडीच्या चाकाखाली एक मोठा दगड आला व गाडी एकदम तिरपी होऊन तिचे चाक त्या ब्राह्मण गृहस्थांच्या पायावरून गेले. या सर्व प्रकारामुळे श्रीगांडामहाराजांना काही विशेष इजा झाली नाही; मात्र त्या ब्राह्मण गृहस्थांच्या पायाला दुखापत झाल्याने ते मात्र श्रीस्वामीमहाराजांबरोबर प्रवास करू शकले नाहीत. ते तेथूनच श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून

माघारी परतले. श्रीस्वामीमहाराजांची इच्छा अनुल्लंघनीय होती हेच खरे !

याप्रमाणे प्रवास चालू असतानाच श्रीस्वामीमहाराजांना देवांनी असे सांगितले की, "वाडीला न जाता मागे फिरावे." परंतु श्रीक्षेत्र पवनी येथे आपण श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजाऱ्यांना "येथून निघाल्यावर तेथे येतो," असे आश्वासन दिल्यावर आता देवांच्या इच्छेखातर वचन मोडणे हे काही श्रीस्वामीमहाराजांच्या मनाला पटेना. देवांच्या आज्ञेचे पालन करावयाचे की वचनपूर्ती करावयाची या विलक्षण द्वंद्वाचा निर्णय श्रीस्वामीमहाराजांनी एका क्षणात घेतला आणि वचनपूर्तीचा आपला निर्धार कायम ठेवून त्यांनी देवांच्या आज्ञेकडे दुर्लक्ष केले. श्रीस्वामीमहाराजांच्या या निर्णयाने देवभक्तांच्या एका अपूर्व संघर्षालाच जणूकाही सुरुवात झाली.

श्रीस्वामीमहाराज आपले न ऐकता आपल्या आज्ञेचे उल्लंघन करून श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या मार्गानेच पुढे चालले आहेत हे पाहताच देवांना राग आला व त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या शरीरात अकस्मात् संधिवाताची व्याधी उपस्थित केली. एकदोन दिवसात या व्याधीने उग्र रूप धारण केल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना त्याचा इतका त्रास होऊ लागला की, त्यांना नीट उठताबसताही येईना. असे जरी झाले; तरी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाण्याच्या निश्चयात श्रीस्वामीमहाराजांनी अणुमात्रही बदल केला नाही.

देव संधिवाताचे दुखणे थांबवीत नाहीत व आपला निर्णय बदलून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाऊ देत नाहीत असे पाहून श्रीस्वामी-महाराज त्यांची समजूत घालताना त्यांना असे म्हणाले की, "प्रभो ! आपल्याला विचारून आपल्याच आज्ञेने पवनीला वाडीकर पुजाऱ्यांना वाडीस येऊ असे वचन दिले होते; मग आता येथून

परत जाऊन कसे चालेल ? वाडीला गेलेच पाहिजे. मग काहीही झाले तरी चालेल. आपणास आमचे हे वागणे मान्य नसेल; तर हे शरीर आपल्या ताब्यात आहे. आपण याचे वाटेल ते करू शकता; पण एकदा दिलेल्या वचनाचा भंग होणे हे बरे नाही." अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी देवांना त्यांनीच दिलेल्या पूर्वीच्या आज्ञेचे स्मरण करून दिले, समजूत घातली व वचनभंगाच्या दोषातून मुक्त होण्यासाठी वाडीला गेले पाहिजे हे समजावून सांगितले. इतके सांगितल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी देवांची प्रार्थना करून अत्यंत भक्तिभावाने स्तुती केली.

श्रीस्वामीमहाराजांनी देवांची समजावणी, प्रार्थना, स्तुती इत्यादि सर्व केले; तरी देवांच्या निर्णयात काहीच बदल झाला नाही. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या सांगण्याप्रमाणेच वागले पाहिजे असा देवांचा कृतनिश्चय होता व आपण वचनभंग न करता आपल्या वचनाची पूर्तता केलीच पाहिजे; मग देह जावो अथवा राहो, असा श्रीस्वामीमहाराजांचा कृतनिश्चय होता. अशा प्रकारे देवभक्तांच्या परस्पर कृतनिश्चयामुळे भीषणच संग्राम उपस्थित झाला. अशा या संग्रामाच्या कष्टमय स्थितीत संधिवातयुक्त शरीरानेच श्रीस्वामीमहाराजांनी रोज ७–८ कोस प्रवास सुरू केला. अशा प्रकारे देवांचे काहीएक न ऐकता त्यांनी २५ दिवसपर्यंत असा खडतर प्रवास केला.

श्रीस्वामीमहाराजांना संधिवात उपस्थित करून इतके कष्ट दिले; तरी ते आपले न ऐकता आपल्या स्वतःच्या इच्छेप्रमाणेच श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या मार्गानेच जात आहेत, असे पाहून देवांनी त्यांना एकाएकी भयंकर ताप उत्पन्न केला. देवांनी अशाप्रकारे नवीन अस्त्र उपसून यातना द्यावयास सुरुवात केली; तरी आपल्या वचनपूर्तीच्या कृतनिश्चयापासून अणुमात्रसुद्धा ढळावयाचे नाही असे

ठरवून श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या दिशेने त्यांनी प्रवास चालूच ठेवला.

श्रीस्वामीमहाराज इतके करूनही आपले ऐकत नाहीत असे पाहून देवांनी त्यांना दृष्टान्त देऊन असे सांगितले की, " तू माझे ऐकत नाहीस; तर गोदावरीच्या पलीकडे जाताना तुझ्यावर वॉरंट निघेल." देवांचे हे भीतीदायक सांगणे श्रीस्वामीमहाराजांनी अत्यंत शांत चित्ताने ऐकले व वचनपूर्तीच्या अटळ निश्चयाने ते पुढे निघाले.

श्रीस्वामीमहाराजांचे व देवांचे हे भांडण पाहिले म्हणजे श्रीसंत-तुकाराममहाराजांचे व श्रीविठ्ठलाचे जे प्रेमाचे भांडण होत होते त्याची आठवण येऊन त्यांच्या पुढील अभंगांचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. ते असे म्हणतात की–

तरी कां मागें वायां कीर्ति वाढविली। जनांत आपुली ब्रीदावळी ॥१॥
साच करितां आतां फिरसी माघारा। ठायींचे दातारा नेणवेचि ॥२॥
संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी। पुढें मात त्यांसी सांगईन ॥ ३ ॥
घेईन डांगोरा तुझिया नामाचा। नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही राहिलो मरोनि। तूं कां होसी धनी निमित्याचा ॥५॥

★ ★ ★

तुझिया विनोदें आम्हांसी मरण। सोसियेला शीण बहु फेरे ॥ १ ॥
आतां आपणचि येसी तें करीन। नाम हें धरीन तुझें कंठीं ॥ २ ॥
वियोगेंचि झालों उसंतीत वनें। संकल्प हे मनें वाहोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म सापडलें सोपें। गोवियेलों पापें पुण्यें होतों ॥ ४ ॥

★ ★ ★

येणें मार्गें गेलें। त्यांचें निःसंतान केलें ॥ १ ॥
ऐसी अवघड वाट। कोण सांगावा बोभाट ॥ २ ॥

नागविल्या थाटीं। उरों नेदीच लंगोटी ।। ३ ।।
तुका म्हणे चोर। तो हा उभा कटिकर ।। ४ ।।

★ ★ ★

हरि तूं निष्ठुर निर्गुण। नाहीं माया बहु कठिण।
नव्हे तें करिसी आन। कवणें नाहीं केलें तें ।। १ ।।
घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव। राज्य घोडे भाग्य सर्व।
पुत्र पत्नी जीव। डोंबाघरी वोपविली ।। २ ।।
नळदमयंतीचा वियोग। विघडिला त्यांचा संग।
ऐसें जाणें जग। पुराणेंही बोलती ।। ३ ।।
राजा शिबी चक्रवर्ती। कृपाळु दयाळु भूतीं।
तुळविलें अंतीं। तुळे मांस तयाचे ।। ४ ।।
कर्ण भिडता समरंगणीं। बाणीं व्यापियेला रणीं।
मागसी पाडोनी। तेथें दांत तयाचे ।। ५ ।।
बळी सर्वस्वे उदार। जेणें उभारिला कर।
करूनि काहार। तो पाताळीं घातला ।। ६ ।।
श्रियाळाच्या घरीं। धरणें मांडिले मुरारी।
मारविले करीं। त्याचें बाळ त्या हातीं ।। ७ ।।
तुज भावें जे भजती। त्यांच्या संसारा हे गति।
ठाव नाहीं रे पुढती। तुका म्हणे करिसी ते ।। ८ ।।

★ ★ ★

अशा प्रकारे वऱ्हाड प्रांतातून श्रीस्वामीमहाराज प्रवास करीत श्रीक्षेत्र नरसोबावाडीला चालले आहेत असे ( माधान ) उमरावतीचे प्रसिद्ध संत व महाराष्ट्रातील मधुराद्वैत संप्रदायाचे प्रवर्तक श्रीगुलाबरावमहाराज यांना कळले. आपली व श्रीस्वामीमहाराजांची भेट व्हावी, अशी त्यांची खूप दिवसांची इच्छा होती. त्यामुळे त्यांनी

आपल्या एका माणसाला श्रीस्वामीमहाराजांकडे पाठवून त्यांना असा निरोप पाठवला की, "आपले दर्शन घेण्याची खूप दिवसापासून इच्छा होती; तरी ती आपल्या कृपेने पूर्ण व्हावी. आपल्या दर्शन-भेटीसाठी येत आहे." श्रीगुलाबरावमहाराज हे सखीसंप्रदायातील असून ते कात्यायनीच्या उपासनेच्या वेळी स्त्रीवेष घेत असल्यामुळे व पुरुषाने स्त्रीवेष घेणे हे शास्त्रसंमत नसल्यामुळे असे नरदर्शन घेणे श्रीस्वामीमहाराजांना पसंत नव्हते. त्यामुळे त्यांनी श्रीगुलाबराव-महाराजांना असा निरोप पाठविला की, "तुमचे आमचे अंतरंगात प्रेम आहेच. याकरिता प्रत्यक्ष भेटण्याची आवश्यकता नाही."

वरील सर्व कथाभागासंबंधी मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबरावमहाराज विरचित सूक्तिरत्नावलीतील "सप्तम यष्टी" या ग्रंथातील पत्रसंपदा १०, पृष्ठ ८९ वर त्यांनी श्री. रा. रा. वासुदेवराव मुळे यांना पाठविलेल्या पत्रात जो मजकूर आला आहे, तो वरील कथेला पुष्टी देणारा असल्यामुळे व श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगुलाबराव-महाराज स्त्रीवेष घेत असल्यामुळे जो निरोप त्यांना भेटीसंबंधी पाठविला होता तो किती योग्य होता, याचा दर्शकच असल्यामुळे, सर्वांसाठी येथे उद्धृत करीत आहे. ते असे म्हणतात की, "(१४) वासुदेवानंदसरस्वतींची व माझी गाठ पडली नाही. त्यांचा जो माझेवर आरोप आहे तो शास्त्रसंमत असल्यामुळे, त्या आरोपाला मी खरोखरच पात्र आहे. ते जेव्हा पवनीस होते, तेव्हा त्यांना कोणी सांगितले की, श्रीगुलाबरावमहाराज आपल्या दर्शनाला येणार आहेत. तर ते म्हणाले की, "माझ्या दर्शनास न आलेला बरा; कारण कुणबी असून तो वेद म्हणतो व त्यांचा स्त्रीवेष आहे. त्यामुळे मी तोंड पाहू शकत नाही." हे त्यांचे म्हणणे मला एकाने चांद्यात सांगितले; परंतु ते ऐकीव असल्यामुळें त्यावर विश्वास

ठेवता येत नाही, पण जरी त्यांनी म्हटले असले; तरी त्यांचे म्हणणे सत्य होते त्यात संशय नाही; कारण शिवलीलामृतात देखील "पुरुषासी स्त्रीवेष देता। पाहणार जाती अधःपाता। वेष घेणार तत्त्वतां। जन्मोजन्मीं स्त्री होय॥" असे म्हटले आहे. पण त्याला माझा मात्र काही इलाज नाही. मला स्त्रीवेष घेण्याचे जे गांजा-प्रमाणे व्यसन लागले आहे ते कोणीतरी महात्म्याने सोडविल्या-शिवाय आता सुटत नाही व कोणाही महात्म्यांनी माझे हे व्यसन सोडविण्याची खटपट करू नये, अशी मी त्यांना सविनय प्रार्थना करतो. दुसरे जे माझ्यावर त्यांचे आरोप आहेत त्याविषयी शास्त्र-मानाने मी खरोखरच दोषी आहे. काही गोष्टी माझ्या आंधळे-पणामुळेही घडतात हे आपणाला माहीत आहेच. सरस्वतीमहा-महाराजांची व माझी अगदीच गाठ पडली नाही. हीच त्यांनी म्हटलेली गोष्ट सद्वैजयंतीत त्यांचे नाव गुंफण्यापूर्वी जर मी ऐकिली असती तर कदाचित् शूद्रस्वभावामुळे मला त्या गोष्टीचे वाईटही वाटले असते. परंतु एकवेळ माळेत गुंफून गळयात घातल्यावर, एवढया अमोल रत्नाला समोल करण्याची मला इच्छा उत्पन्न होत नाही व किंचित् कुटिलता असलीच तर ती ह्या महामणिप्रभावाने दूर होवो. सद्वैजयंतीत गुंफल्यामुळे ते आता माझे ईश्वर आहेत. म्हणून माझ्यामधील दोष निवृत्त करून गुण देण्याला ते सर्वथा समर्थ आहेत. श्रीवासुदेवानंदमहाराज की जय॥ श्रीमत्सद्‌गुरुज्ञानेश्वर-महाराजार्पणमस्तु॥ आपला गुलाबराव."

उपरोक्त ग्रंथातच सर्वश्री मुळे, हरदास, भाल्लेराव व खापरे यांना लिहिलेल्या पत्रातील अर्थात् पत्रसंपदा ११ पृष्ठ ९० वरील मजकूरही उपरोक्त कथेवर व दोन महापुरुषांच्या अंतरंग संबंधावर प्रकाश टाकणारा असल्यामुळे सर्व वाचकांना तो मननीय वाटेल असा

विश्वास वाटतो. त्या पत्रात ते असे म्हणतात की, " (२) दुसरी एक गोष्ट मनोरंजनाकरिता लिहितो. इकडे नर्मदातीरी स्वामी वासुदेवानंद सरस्वती हे, चिखलद्याला असून हल्ली तेथे संहितेचा स्वाहाकारही सुरू आहे. बळवंतराव शुक्रासवाले हे आपल्या मुलीचे वेडेपण दाखविण्याकरिता, तेथे गेले होते. त्यांना एक यंत्र, औषध व दत्त उपासना ह्या तीन गोष्टी सांगितल्या. त्यांच्याबरोबर माझा अति परिचित मित्रही गेला होता. त्याचे नाव दिनकर. आजच तो येथे आला आहे. त्यांनी असे सांगितले आहे की, " गुलाबरावमध्ये इतकी विद्या प्रगट होण्याचे कारण काय ? असे मी दोन तीन वेळा स्वामींना विचारले, तेव्हां ते एकवेळ म्हणाले, " कोण म्हणतो ? कोठे आहे विद्या ? तुम्हाला वाटते झाले." ही गोष्ट कशीही असो. पण याविषयी माझे मत असे आहे की, माझ्या मित्राने जरी ही गोष्ट सांगितली, तरी ते महात्मे असल्यामुळे असे म्हटलेच नसेल. मित्रा-पेक्षा, महात्म्यावर विश्वास ठेवणे मला भाग आहे. दुसरे, माझी व सद्‌गुरुस्वामींची प्रत्यक्ष भेटही झाली नाही. बरे ही वैयक्तिक गोष्ट. असो. पण एखाद्या कोणाला मला विद्वान् ठरविण्याचे केवढे कठीण आहे ? कारण, संस्कृत भाषेत जर मी पंडितांशी बोलू लागलो तर हे शूद्र असून " नोच्चरेत् संस्कृतां गिराम् " या निषेधाचे उल्लंघन करतो " सर्वे व्यवसिनो मूर्खाः यः क्रियावान्सपण्डितः । " अशा रीतीने मला मूर्ख ठरविणार. बरे, निव्वळ मराठीत बोललो तर ह्यांनी भाषांतरे पुष्कळ श्रवण केली आहेत अशा समजुतीमुळे, मला विद्वान् ठरविणे कठीण. तर्काचे अवलंबन करून बोललो तर रा. खापरे यांनी म्हटल्याप्रमाणे, " पुनर्विवाहित बायको जशी तर्काने आपले करणे मंडण करिते, तसे नीच मनुष्य दुसऱ्याचे बुद्धीला मोह घालीत असतो. " या रीतीने मी मूर्ख ठरणार. श्रद्धेचा अवलंब करून बोललो

तर तुझी मंगळसूत्रावर श्रद्धा का ? आम्ही म्हणतो त्यावर का नाही ? असे म्हणून कोणी मला मूर्ख ठरविणार. जुन्या मताप्रमाणे बोललो तर पूर्वी हे मत सांगूनच ठेवले आहे, हा काय विशेष सांगतो ? अशा-रीतीने मूर्ख ठरणार. बरे, नवीन एखादे मत सांगितले, तर हजारो आचार्यांचा सूर्यप्रकाश कोठें व तुझी नवीन दिवटी कोठें ? असे म्हणून मला मूर्ख ठरविणार. मंत्र, तंत्र, चमत्कारांनीही मी विद्वान् ठरणे कठीण. कारण मी शूद्र असल्यामुळे, प्रणव सिद्ध मंत्राने सामर्थ्य आले, असे कोणीही कबूल करणार नाही. केवळ उच्छिष्ट चांडाली वगैरे क्षुद्र कर्मे करूनच सामर्थ्य मिळविले, असे कोणीही म्हणणार. तेव्हा एखाद्या पंडिताने मला मूर्ख ठरविणे जेवढे सुलभ आहे, तेवढे विद्वान् ठरविणे केवढे कठीण आहे ? आणि त्यांनी माझ्याकडे यावे तरी कोणत्या तोंडाने ?

(३) माझ्या मित्राने एका विशेष विषयात स्वामीला एकांती विचारले असता, " आत्मज्ञानी पुरुष झाला की, सर्व काही त्याला आपल्या मनाप्रमाणे करून घेता येते. तुम्ही आपलीच सुधारणा करा. इतक्या लोकांची काळजी एकट्यानेच कशी होईल ? " असे स्वामी म्हणाले, ते अक्षरश: सत्य आहे. लोहगाव जळाला तेव्हा तुकारामांनी देवा ! वाचीव, म्हणून किती धावा केला ? पण त्याचा काही उपयोग झाला नाही ; असाही इतिहास आहे. हे वाक्य लिहिताना माझ्या मनात किंचित् मत्सराची झाक असली ; तरी स्वामींच्या स्मरणानेच दूर होईल, असा माझा शपथ वाहून विश्वास आहे. आता उगीच मी कोणाला फसवीत नाही व संशयात ठेवीत नाही.

(४) माझी विद्या किती आहे हे मी सर्वांस जाहीर करतो. वेदांवर पूज्य बुद्धी मात्र, गीता, महाभारत, श्रीमद्भागवत, योगवासिष्ठ, वाल्मीकीरामायण या ग्रंथाचे होईल तेवढे श्रवण व आलोचन,

ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, एकनाथी भागवत, तुकारामाची गाथा व तुलसीकृत रामायण या मराठी हिंदुस्थानी ग्रंथांचे पठण व मनन; एवढीच काय ती माझी विद्या आहे. यांच्या पलीकडे मला काही येत नाही; हे मी डिंडिम पिटून सांगतो. "कुणाबीयांचे वंशी जन्मलो जगदीशा । संस्कृत भाषा आम्हां कैची ? ॥" हे महात्म्याचे म्हणणे त्यांचे जरी निरभिमान दर्शक असले, तरी ते मला अक्षरशः लागू पडते. तेव्हा माझी विद्या किती आहे हे स्पष्ट समजून त्याप्रमाणे कोणीही माझ्याशी व्यवहार करावा. ॥ श्रीमत् सद्गुरुज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥ आपला गुलाब."

अशा प्रकारे देवांच्या तीव्र विरोधाला तोंड देत-देत श्रीसीतारामहाराज व श्रीगांडामहाराज यांच्या बरोबर प्रवास करीत करीत श्रीस्वामीमहाराज कार्तिक महिन्यात हिंगोलीस आले व गावाबाहेरील श्रीमारुतीच्या मंदिरात उतरले. हिंगोलीला श्रीस्वामीमहाराजांची बरीच भक्तमंडळी होती. शिवाय श्रीस्वामीमहाराज येथे येणार आहेत अशी बातमी सर्व लोकांना पूर्वीच समजली असल्यामुळे त्यांच्या दर्शनासाठी हिंगोलीच्या आसपासच्या गावातील बरीच मंडळी तेथे येऊन थांबली होती.

श्रीस्वामीमहाराज गावाबाहेर येऊन श्रीमारुतीच्या मंदिरात उतरले आहेत असे त्या लोकांना कळताच त्यांच्या झुंडीच्या झुंडी देवळात येऊ लागल्या. श्रीमारुती मंदिराच्या सर्व बाजूंनी लोकांची अतोनात गर्दी झाली. ते मंदिर जणूकाही माणसांच्या महासागराने वेढून गेले आहे असे विलक्षण दृश्य त्यावेळी दिसू लागले. अशा प्रकारे लोकांची गर्दी झाल्यामुळे बंदोबस्तासाठी पोलीसही आले. हिंगोली गावातील प्रमुख व्यापारी श्री. हेमराज मारवाडी हे श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त असल्यामुळे ते सर्वांच्या अगोदर

श्रीमारुतीमंदिरात येऊन उपस्थित झाले होते.

श्रीस्वामीमहाराज नुकतेच प्रवास करून आल्यामुळे ते थकलेले होते. त्यांनी अद्यापि विश्रांती घेतलीच नव्हती. खरे तर त्यांच्या देहाला विश्रांतीची सवय नव्हती; पण बऱ्याच वेळेपासून त्यांना लघुशंका लागली होती. देवळात व देवळाबाहेर बेसुमार गर्दी झाल्यामुळे देवळातून बाहेर जाण्याला मार्गच मिळेनासा झाला होता. अशा स्थितीत "आपणाला लघुशंकेला जावयाचे आहे; पण मार्ग काही मोकळा होत नाही असे दिसते," असे उद्‌गार श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःशीच जरा मोठ्याने काढले होते. आपले बोलणे ऐकून लोकांनी आपल्याला बाहेर जाण्यासाठी वाट करून द्यावी असे त्यांना वाटत होते; पण लोकांनी त्यांना स्वतःहून वाट करून दिली नाही. त्यावेळी श्री. हेमराज मारवाडी पोलिसांच्या मदतीने गर्दी मोडण्याचे प्रयत्न करू लागले. त्यांनी तोंडाने लोकांना बाजूला होण्याबद्दल अनेक प्रकारांनी सांगितले व हातांनीही त्यांना मागे सारण्याची शिकस्त केली. इतके करूनही लोक काही ऐकेनात व श्रीस्वामीमहाराजांना देहधर्मासाठी बाहेर जाण्याकरिता मार्ग काही मोकळा होईना.

एकंदर चाललेला हा सर्व प्रकार पाहून, श्रीस्वामीमहाराजांची होत असलेली कुचंबणा श्रीसीतारामहाराजांना काही पाहवेना. त्यावेळी त्यांना लोकांचा, शिपायांचा व श्री. हेमराज यांचाही राग घेऊन त्यांनी श्री. हेमराजांच्या हातातील चांदीची मूठ बसविलेली काठी ओढून घेतली आणि "तुमच्या हातून काही होणार नाही आणि शिपाई तरी काय रडणार हे दिसतेच आहे," असे म्हणून त्यांनी त्याच काठीने जोराने मार देत सर्व लोकांना मागे हटवून श्रीस्वामीमहाराजांना देवळाच्या मागे जाण्यासाठी दोन हात रुंदीचा

मार्ग मोकळा करून दिला. त्यावेळी श्रीसीताराममहाराजांनी इतक्या रागाने, त्वेषाने व जोराने लोकांना मारले की, काठीचे तुकडे होऊन खाली पडले. त्यावेळी लोकांना जोराचा मार बसला हे खरे आहे; पण तसा निष्ठुरपणा धरल्यावाचून लोकच ऐकेनात. एकंदर प्रकाराला श्रीसीतारामहाराजांचाही काही इलाज नव्हता हेच खरे !

श्रीसीतारामहाराजांनी अवलंबिलेल्या कठोरपणामुळे मार्ग मिळून श्रीस्वामीमहाराज देहधर्मातून निवृत्त होऊन हातपाय धुऊन आचमन करून देवळात पुन्हा दर्शनेच्छू लोकांना दर्शन-प्रसाद देत बसले. मात्र त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांना देहधर्मातून निवृत्त होण्यासाठी मार्ग मिळाल्याच्या सुखापेक्षा लोकांना आपणाकरिता बसलेल्या माराचे दुःखच फार झाले. जन्माला आल्या दिवसापासून प्राणिमात्राचे दुःख निवरण्याचे व त्यांना सुखी करण्याचे ज्यांचे शील असून, त्याकरिता आपला जीव देखील धोक्यात टाकण्यास नेहमी तत्पर असणारे विश्ववत्सल दयामूर्ती श्रीस्वामीमहाराज, आपणाकरिता जीवमात्राला यत्किंचित् देखील दुःख होऊ नये अशा नित्य धारणेचे म्हणजेच अहिंसक बुद्धीचे व भूतदयेचे केवळ पुतळेच होते. त्यामुळे श्रीसीतारामहाराजांनी आपल्याकरिता लोकांना मार दिला याचे त्यांना अत्यंत दुःख झाले. आपल्यावरील प्रेमाने दूर-दूरहून आलेल्या लोकांना काठीचा मार द्यावा लागला ही गोष्ट त्यांच्या जीवाला लागली.

त्या दिवशी रात्री सर्व मंडळी झोपल्यानंतर थोड्या वेळाने एकान्त झाला आहे असे पाहून दयाघन श्रीस्वामीमहाराज आपल्या जागी उठून बसले व जवळच धोतर पांघरून निजलेल्या श्रीसीता-महाराजांना हाक मारून त्यांना असे म्हणाले की, "काय रे !

झोप लागली आहे काय ?" हे ऐकताच श्रीसीतारामहाराज लगेच उठून बसले व श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "नाही, झोप लागली नाही. काही काम आहे काय ?" हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "अरे आज सकाळी माझ्या देहधर्मासाठी लोकांना फारच मार देण्यात आला, हे काही ठीक झाले नाही. विचार कर की, हे जे लोक अशा थंडीवाऱ्यात कष्ट सोशीत आपल्याकडे आले आहेत व आपल्यापाशी राहिले आहेत; त्यांच्या सर्वांच्या मनाला, अशा प्रकाराने मार दिल्यावर काय वाटले असेल ? उगीच का ते येथे आले आहेत ? आपल्यावरील प्रेमामुळेच ते येथे आलेत ना ? त्या सर्वांना दटवावयाचे असले; तरी असे मारणे चांगले नाही. यापुढे असे न व्हावे एवढेच लक्षात घे."

श्रीस्वामीमहाराजांची ही भूतदया व कारुण्य पाहून श्रीसीतारामहाराज एकदम सद्‌गदित झाले. श्रीस्वामीमहाराजांवरील प्रेमापोटी आपल्या हातून चुकीची गोष्ट घडली याची जाणीव होऊन त्यांच्याही अंतःकरणाला वेदना झाल्या व त्यांच्या नेत्रात पाणी उभे राहिले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांना हात जोडून ते असे म्हणाले की, "महाराज ! आपण सांगत आहात ते सत्यच आहे ! मला सुद्धा सकाळी लोकांना मारल्यापासून अत्यंत पश्चात्ताप होत असून त्या भोळ्या भाविक लोकांना अशा रीतीने दुःख दिले म्हणून मनाला फार खेद होत आहे; पण त्याप्रसंगी मला मुळीच भान राहिले-नाही. माझ्या हातून फारच मोठा प्रमाद घडला; तरी आपण उदार अंतःकरणाने मला क्षमा करावी."

श्रीसीतारामहाराजांनी अशा प्रकारे क्षमा मागितल्यामुळे श्रीस्वामीमहाराज एकदम स्वस्थचित्त झाले व एकदा त्यांच्याकडे क्षमापूर्ण कटाक्ष टाकून पुन्हा निद्राधीन झाले. श्रीस्वामीमहाराजांनी

आपणास क्षमा केलेली पाहून तेही संतुष्ट अंत:करणाने झोपी गेले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे गुरुशिष्यांची अंत:करणे कशी एक झाली होती याचा प्रत्यय आल्यावाचून राहात नाही. श्रीसीताराममहाराजांची श्रीसद्‌गुरुचरणांवर किती अपार निष्ठा होती याचा प्रत्यय श्रीनारायणमहाराज जालवणकर यांच्या पुढील अभंगावरून येऊन मन अगदी आनंदून जाते. ते असे म्हणतात की –

धरी सद्‌गुरुचे पाय। पुन्हां जन्म तया नोहे ॥ १ ॥
जो का सद्‌गुरुचा दास। तया परब्रह्मीं वास ॥ २ ॥
ज्याचा सद्‌गुरु सोयरा। मोक्ष राबे त्याचे घरा ॥ ३ ॥
गुज सांगे नारायण। गुरु तोची निरंजन ॥ ४ ॥

★ ★ ★

गुरु नाहीं ओळखिला। त्याचा जन्म व्यर्थ गेला ॥ १ ॥
जो कां सद्‌गुरुविन्मुख। तया जन्मोजन्मीं दुःख ॥ २ ॥
नाहीं सद्‌गुरुचा थार। त्याचा भूमीलागीं भार ॥ ३ ॥
नारायण त्रिभुवनीं। गुरु निरंजन धनी ॥ ४ ॥

★ ★ ★

नको साधनाचें श्रम। मुखीं सद्‌गुरुचें नाम ॥ १ ॥
तीर्थी धाऊनियां काय। धरी सद्‌गुरुचे पाय ॥ २ ॥
सोडी कर्म आटाआटी। घेई सद्‌गुरुची भेटी ॥ ३ ॥
नारायण चित्त विरक्त। सर्व काही गुरुदत्त ॥ ४ ॥

★ ★ ★

एक सद्‌गुरु तो सखा। जन संबंधी पारखा ॥ १ ॥
करी सद्‌गुरुचा संग। तेणे होय भवभंग ॥ २ ॥
होता सद्‌गुरुची कृपा। घरीं मोक्ष राबे फुका ॥ ३ ॥
दत्ताचिया संगे। नारायण धाला अंगे ॥ ४ ॥

अशा रीतीने हिंगोली येथील सर्व मंडळी भक्तच असल्याने व दूरदूरहून तेथे मंडळी दर्शनाला येत असल्यामुळे त्या गावी श्रीस्वामीमहाराजांचा काही दिवस मुक्काम झाला. येथे सर्वांची खाण्यापिण्याची व्यवस्था श्री. यशवंतराव वकील हे ठेवीत असत. तेथून श्रीस्वामीमहाराज आजेगावी आले. ते आपल्या गावी आले आहेत असे पाहून तेथील इनामदार श्री. कृष्णराव देशमुख हे त्यांच्या दर्शनासाठी गेले व ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! आमची सर्व इनाम गावे खालसा झाली आहेत. तरी ती सर्व इनाम गावे मोकळी होऊन आमची आम्हाला परत मिळावीत अशी आपण कृपा करावी. आपण आमच्यावर अशी कृपा केलीत तर आमचे सर्व कुटुंब आपले जन्मोजन्मी ऋणी राहील." अशा प्रकारे श्री. कृष्णराव देशमुखांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी अत्यंत नम्रपणे प्रार्थना केली. ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "चांगल्या ब्राह्मणांकडून श्रीदत्तमालामंत्राचे अनुष्ठान करवून घ्यावे म्हणजे तुमचे काम होईल." श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे श्री. कृष्णराव देखमुखांनी उत्तम अशा वैदिक ब्राह्मणांकडून श्रीदत्त-मालामंत्राचे अनुष्ठान करवून घेतले. ते पूर्ण होताच एका इंग्रज अधिकाऱ्याने त्यांची खालसा झालेली गावे मोकळी करून त्यांना परत दिली.

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम आजेगावी असतानाच श्री. कृष्ण-राव देशमुख यांचे चिरंजीव श्री. शंकरराव हे क्षयाने आजारी पडले. गावातील वैद्यांना व डॉक्टरांना त्यांची प्रकृती दाखविली असता त्या सर्वांनी "हे दुखणे असाध्य आहे," असे सांगून श्री. कृष्णराव देशमुखांच्या तोंडचे पाणी पळविले. तरीही धीर धरून श्री. कृष्णराव श्री. शंकररावांना घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्याकडे आले व त्यांनी

त्यांच्या प्रकृती संबंधीची सर्व हकीकत त्यांना सांगितली. श्रीस्वामी-महाराजांनी श्री. शंकररावांकडे एक दृष्टिक्षेप टाकून श्री. कृष्णराव यांना असे सांगितले की, "हा क्षय नसून फक्त त्याची थोडी भावना मात्र झाली आहे; तरी घाबरण्याचे काही कारण नाही. आम्ही सांगतो ती औषधे द्या म्हणजे लवकरच याची प्रकृती बरी होईल." इतके आश्वासन देऊन श्रीस्वामीमहाराजांनी शीतोपलादिचूर्ण इत्यादि काही औषधे घेण्यास सांगून धौतीही करण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे उपचार करताच श्री. शंकर-रावांची प्रकृती २–४ महिन्यातच उत्तम झाली. पुढे श्री. शंकरराव देशमुख आजेगावकर हे श्रीस्वामीमहाराजांचे एकनिष्ठ भक्त बनले.

श्रीस्वामीमहाराज आजेगावहून निघून पुढे वाटेतील अनेक गावात मुक्काम करीत रेणापूर येथे आले. या सर्व प्रवासात श्रीस्वामी-महाराज एका गावाहून दुसऱ्या गावाला जावयाला निघाले म्हणजे सोबत सात आठशे लोकांचा जमाव असे. श्रीस्वामीमहाराज ज्या गावाहून मुक्काम करून निघत तेथील पोहोचवावयाला आलेली मंडळी व पुढील मुक्कामाच्या गावातील त्यांना आपल्या गावी घेऊन जाण्यासाठी आलेली मंडळी मिळून एक जत्राच श्रीस्वामीमहाराजां-बरोबर चालत असे. प्रत्येक मुक्कामाच्या ठिकाणी ७-८ शे लोकांच्या जेवण्याखाण्याची सोय करावी लागत असे. या सर्व कामामध्ये श्रीसीतारामहाराजांचा हातखंडा होता. दर्शनाला आलेले लोक श्रीस्वामीमहाराजांपुढे पुष्कळ पैसे ठेवीत असत व नारळ वगैरे प्रसादाच्या सामानाचा तर नुसता ढीग पडत असे. या पैशाचा व वस्तूंचा उपयोग लोकांच्या खाण्यापिण्यासाठी व राहण्याच्या व्यवस्थे-साठी करण्यात येत असे. तसेच उरलेल्या पैशातून लघुरुद्र, महारुद्र वगैरे करण्यात येत असत. त्याचप्रमाणे वेळोवेळी योग्य ब्राह्मणांची

व शास्त्रीपंडितांची संभावना करण्यात येत असे. सुवासिनी स्त्रियांची खणानारळाने ओटी भरून त्यांचाही सन्मान-सत्कार करीत असत. एवढा खर्च करूनही जो पैसा शिल्लक राहात असे तो वाडीला पाठविला जात असे. श्रीस्वामीमहाराज द्रव्याला कधीही स्पर्श करीत नसल्यामुळे त्याची सर्व व्यवस्था श्रीसीतारामहाराज इत्यादि बरोबरची मंडळीच करीत असत.

श्रीस्वामीमहाराजांचा या भागात संचार चालू असताना श्रीक्षेत्र-नरसोबावाडी येथील श्री. गुंडभट खोंबरे, श्री. पंडित इत्यादि पुजारी मंडळी, गावातील काही मंडळींचा अत्यधिक त्रास होऊ लागल्या-मुळे, तेथून परागंदा होऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी इकडे आली. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर आपल्यावर आलेले सर्व संकट त्यांनी त्यांच्या चरणी निवेदन केले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक मंत्र दिला व ते त्यांना असे म्हणाले की, "आता सांगितलेल्या मंत्राचा जप अत्यंत श्रद्धापूर्वक करा. देवाच्या कृपेने सर्व संकट निवारण होईल. काळजी करू नये. परत वाडीला जाऊन देवाची सेवा करीत असावे. त्यात खंड पडू देऊ नये." इतके सांगून श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसीतारामहा-राजांकडून त्या सर्वांची योग्य संभावना करून त्या सर्वांना परत श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे पाठविले. पुढे ही मंडळी परत आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे अत्यंत निष्ठेने व श्रद्धापूर्वक मंत्रजपाचे अनुष्ठान केले. त्या मंत्रजपानुष्ठनाच्या प्रभावामुळे पुढे लौकरच विरोध करणाऱ्या व त्रास देणाऱ्या मंडळी-मध्ये परस्पर वैमनस्य व दुफळी उत्पन्न होऊन त्यांची आपापसात मारामारी झाली. त्यामुळे कोल्हापूर सरकारने हस्तक्षेप करून त्या मंडळींच्या पुढाऱ्यांना मोठ्या शिक्षा केल्या.

श्रीस्वामीमहाराज रेणापूर येथे येणार असे कळल्यावर दूरदूरच्या गावाहून हजारो भक्तमंडळी त्यांच्या दर्शनासाठी तेथे येऊन त्यांची वाट पाहात थांबली होती. ते तेथे आल्यावर सर्व लोकांनी अत्यंत उत्साहाने त्यांचे स्वागत केले. त्या वर्षीचा श्रीदत्तजयंतीचा उत्सव रेणापूर येथे अत्यंत भव्य प्रमाणात व मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला. तो सर्व भव्य सोहळा पाहून जमलेल्या लोकांच्या डोळ्यांचे पारणे फिटले.

श्रीस्वामीमहाराज रेणापूर गावाहून निघून प्रवास करीत करीत गंगामसले या गावी आले. या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर पुष्कळ मंडळी होती. सकाळी श्रीस्वामीमहाराज श्रीगोदावरी नदीवर स्नानाकरिता गेले असता त्यांनी सर्वांना ताकीद देऊन असे सांगितले की, "कोणीही स्नानासाठी आमच्याबरोबर नदीत उतरू नये." सर्वांना अशा प्रकारे सूचना देऊन श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांना बरोबर घेऊन श्रीगणपतीच्या देवळाजवळ स्नानासाठी नदीत उतरले. त्यावेळी बरोबर आलेल्या मंडळींमध्ये श्री. आबा कुलकर्णी, रेणापूरकर या नावाचे एक गृहस्थ होते. ते श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा उल्लंघून स्नानासाठी पाण्यात उतरले. ज्या ठिकाणी ते पाण्यात उतरले त्या ठिकाणी नदीमध्ये डोह होता. त्या डोहामध्ये श्री. आबा कुलकर्णी बुडाले. त्यांना काही लोकांनी बुडताना पाहिले. त्यावेळी त्या लोकांनी तात्काळ डोहात उड्या मारून त्यांना बाहेर काढले व किनाऱ्यावर आणून ठेवले.

श्रीस्वामीमहाराज लोकांची धावपळ व आरडाओरड ऐकून श्री. आबा कुलकर्णी यांना जेथे ठेवले होते तेथे आले. श्री. आबा कुलकर्णी हे गतप्राण झाले होते. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. आबांच्या अचेतन देहाकडे पाहिले व ते सर्वांना उद्देशून असे म्हणाले की, " लोक

सांगूनही ऐकत नाहीत. निष्कारण उपाधी देतात." श्रीस्वामीमहाराजांचे हे उद्‌गार ऐकताच श्रीगांडामहाराज असे म्हणाले की, "महाराजांची आज्ञा मोडल्याचे फळ यांना मिळाले." असे घडले; तरी आपल्याबरोबर आलेल्या एका भक्तावर असा प्रसंग आल्यामुळे करुणासागर व दयासागर श्रीस्वामीमहाराजांचे अंत:करण अत्यंत कोमल बनून ते द्रवित झाले. त्याक्षणी त्यांनी आपल्या कमंडलूमधील पाणी श्री. आबांच्या अंगावर शिंपडले. त्याबरोबर त्यांचा श्वासोच्छ्‌वास सुरू झाला व थोड्या वेळातच सावध होऊन ते उठून बसले. ते पाहून सर्व मंडळी अत्यंत आश्चर्यचकित झाली. त्यावेळी तेथे जमलेल्या सर्व मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांचा जयजयकार केला. एवढेच नव्हे; तर त्यांची तेथे पूजा करून स्तुतीही केली. त्यानंतर गावात आल्यावर सर्व मंडळींनी मोठी ब्राह्मण समाराधना केली. त्या दिवशी सर्वांना भोजनरूपी प्रसाद मिळून सर्वजण संतुष्ट झाले. श्री. आबा कुलकर्णी यांना श्रीस्वामीमहाराजांचे उपकार कसे फेडावेत हेच कळेना.

श्रीस्वामीमहाराज गंगामसले या गावाहून पूर्वीच्या कृतनिश्चयाप्रमाणे श्रीक्षेत्र नरसोबावाडीला निघाले. श्रीस्वामीमहाराज आपले ऐकत नाहीत असे पाहून पूर्वी सांगितल्याप्रमाणे देवांनी त्यांच्यावर वॉरंट बजावले. हे वॉरंट लौकिक अर्थाने न येता श्रीस्वामीमहाराजांना शौचाच्या वेळी रक्त पडण्यास सुरुवात होऊन देहादि दंडाच्या रूपाने आले होते. अशा प्रकारे संधिवात, ताप व रक्त पडणे या एकापेक्षा एक महाव्याधी उत्पन्न करून देव श्रीस्वामीमहाराजांची परीक्षाच पाहात होते. वचनपूर्तीसाठी भक्त आपल्या प्राणांची बाजी लावण्यास तयार झाला होता; तर वचनभंग व्हावा म्हणून देव आपल्या सामर्थ्याची पराकाष्ठा करीत होते. असे हे वचनपूर्ती व

वचनभंगाचे भीषण द्वंद्व उभे राहिले; तरी भक्ताला कशाचीही चिंता नव्हती. "मी म्हणजे देह नव्हे," या ब्रह्मविद्वरिष्ठाच्या भूमिकेवर जे अखंडपणे आरूढ झाले आहेत त्यांना देवांनी रोग उद्भूत करून जरी आपल्या निर्णयापासून माघारी फिरविण्याचा प्रयत्न केला तरी तो निष्फळ ठरला; कारण यामुळे त्यांच्या दैनंदिन क्रिया थांबल्या नाहीत किंवा त्यांच्या प्रवासातही खंड पडला नाही.

श्रीस्वामीमहाराज अशाच स्थितीत प्रवास करीत करीत बार्शीस आले. तेथे अंबरीषवरद श्रीभगवंताचे दर्शन घेऊन श्रीस्वामीमहाराज मकरसंक्रांतीला श्रीक्षेत्र पंढपूर येथे आले. तेथे संक्रांतीच्या पर्वकाळात श्रीचंद्रभागेचे स्नान करून व श्रीपांडुरंगाचे दर्शन घेऊन श्रीस्वामी-महाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या मार्गाला लागले.

श्रीस्वामीमहाराज ! आपण अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक राजा-धिराज श्रीसद्गुरुनाथ महाराज आहात ! आपण निखिल भूमंड-ळातील सर्वश्रेष्ठ असे परमहंस परिव्राजकाचार्य आहात ! आपण साक्षात् पूर्ण ब्रह्म असून आपल्या रूपाने जणू काही अमृताची मूर्तीच साकार झाली आहे ! आपण आमच्या हृदयस्थ श्रीसद्गुरुनाथ-महाराजांचे सद्गुरू आहात ! आपला अखण्ड जयजयकार असो !

श्रीस्वामीमहाराज ! ! आपण शक्तिपाताचार्य आहात ! आपण आपल्या अपरंपार अशा शक्तिपातसामर्थ्याने म्हणजेच कृपेच्या लोकोत्तर सामर्थ्याने शक्तिसंक्रमण करून आपल्याप्रमाणेच शिष्यालाही सामरस्यात्मक असे स्वसंवेद्य ब्रह्मात्मस्वरूपाचे दान करून स्वसाम्य देत असल्यामुळे आपण करुणासागर, दीनवत्सल व प्रतापसूर्य आहात ! आपण श्रीपादश्रीवल्लभश्रीमन्नृसिंहसरस्वती-श्रीदत्तात्रेयस्वरूप असून कलियुगात जन्मलेल्या आमच्यासारख्या

जडजीवांचा उद्धार करण्याकरिताच "योगिराज" या नावाने या भूतलावर अवतार धारण करून आमच्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या रूपाने आम्हाला सिद्धयोगान्तर्गत शक्तिपातयोगाची दीक्षा देऊन आमची अनादि माया, वासना, मल, विक्षेप व आवरण, घृणा, लज्जा, भय, शोक, निंदा, कुल व शील हे अष्टपाश आणि जरा, मरण, काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार व अविद्या हे अष्टबंध दूर करण्याकरिता साधनरत करून अपरंपार कृपा केलेली असल्यामुळे श्रीकल्याणस्वामीमहाराजांनी त्यांचे सद्गुरू श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांची जी प्रार्थना "सोलीव सुख" या प्रकरण ग्रंथात केली आहे तीच प्रार्थना आपल्या चरणी प्रस्तुत करून आम्हाला ब्रह्मरूप करण्याची प्रार्थना करीत आहोत.

जयजयाजी सद्गुरुवर्या । पूर्णब्रह्म प्रतापसूर्या ।
तुज नमोजी आचार्या । करुणासिंधो ॥१॥
जे भवसमुद्रीं पोळले । विषयमदें अंध जाहलें ।
चौऱ्याशींत वाहूं लागले । मार्ग सुचेना तयांसी ॥ २ ॥
ऐसें विश्व बहुत बुडालें । मी जीव म्हणोनि धांवूं लागले ।
मुळीचें स्मरण विसरलें । मी कोण ऐसें ॥ ३ ॥
तयासी मुक्त करावया पूर्ण । तूं बा उतरलासी ज्ञानघन ।
रोगिया औषधी देऊन । भवमोचन करिशी ॥ ४ ॥
ऐसे औदार्य तुझें सघन । म्हणोनि आलों मी शरण ।
दयार्णव कृपा करून । मज दातारें तारावें ॥ ५ ॥
आपण आपणातें पावे । ऐसें माझें मनीं बोलावें ।
तें दातारें गोचर करावें । रोकडें ब्रह्म ॥ ६ ॥

श्रीस्वामीमहाराज!!! अशा प्रकारे आपल्या अपार कृपाबलाने आम्ही ब्रह्मस्वरूप होऊन आपली स्तुती करावी ही इच्छा आहे. ही

इच्छा पूर्ण व्हावी म्हणून " ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें। आणि वेदांचियेही मतीं ठेलें। तें लागला बोलों ॥११.१८४॥ तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरी केला धनंजया। आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणेंचि तो ॥ १८५ ॥ " या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सांगितलेल्या न्यायाने आमची अनादि माया निरसून जावी म्हणून, ध्रुवाने " श्रीमद् भागवत महापुराणात " केलेली प्रार्थनाच, आम्ही आपल्या चरणी प्रस्तुत करून कृपाशीर्वादाची प्रार्थना करीत आहोत.

हे प्रभो ! आपण सर्व शक्तिसंपन्न आहात. आपणच माझ्या अंतःकरणात चैतन्यशक्तीने अर्थात् जागृत कुंडलिनीशक्तीच्या रूपाने प्रवेश करून माझी निद्रिस्त वाणी जागृत करता आणि हात, पाय, कान व त्वचा आदि अन्यान्य इंद्रियांना व प्राणांनाही चेतना देता. आपणच सर्वान्तर्यामी भगवान् आहात. मी आपणास नमस्कार करतो. ॥ ४.९.६ ॥

हे विश्वेश्वरा ! या चराचर सृष्टीतील सर्व भूतमात्रांच्या अंतर्यामी राहणारे असे आपण एकच आहात; परंतु आपण आपल्या अनन्त गुणमयी मायाशक्तीच्या योगाने या महतत्त्वादि संपूर्ण प्रपंचाची रचना करून त्यातील इंद्रियादि असत् गुणांमध्ये त्यांच्या अधिष्ठातृ देवतांच्या रूपाने स्थित होऊन अनेक रूपाने भासत आहात. ज्याप्रमाणे निरनिराळ्या प्रकारच्या लाकडातून प्रकट झालेला अग्नी आपल्या उपाधीच्या अनुसार भिन्नभिन्न रूपाने भासतो त्याप्रमाणेच मायोपाधीमुळे आपण या जगाच्या रूपाने भिन्नभिन्न रूपाने भासत आहात. ॥ ७ ॥

हे विश्वनाथा ! आपले सामर्थ्य खरोखरच अगाध आहे. जगदुत्पत्ती करणारा ब्रह्मदेव जेव्हा आपल्याला शरण गेला तेव्हा आपण

त्याला ज्ञानशक्ती दिलीत. त्यामुळे ज्याप्रमाणे निजून उठलेल्या मनुष्याला जवळचे सर्व पदार्थ दिसतात त्याप्रमाणे त्या ज्ञानशक्तीच्या जागृतीमुळेच ब्रह्मदेवाला हे विश्व दिसू लागले. हे दीनबन्धो ! मुक्त पुरुषसुद्धा आपल्या चरणकमलांचा आश्रय घेतात. हे दयाघना ! आपले जीवांवर अनंत उपकार आहेत. खरोखर हे उपकार स्मरणारा कोणीही कृतज्ञ पुरुष आपल्या चरणकमलांना कसा बरे विसरू शकेल ! ॥ ८ ॥

हे प्रभो ! आपण उपासकांचे इच्छित मनोरथ पूर्ण करणारे कल्पवृक्षच आहात. या जन्ममरणरूपी संसारातून प्राण्यांना मुक्त करण्याचे सामर्थ्य आपल्या जवळ आहे. असे असताना मोक्षासाठी आपली आराधना करण्याऐवजी, जे विषयसुखाच्या प्राप्तीसाठी आपली आराधना करतात, त्यांची बुद्धी आपल्या मायेच्या प्रभावाने खरोखर भ्रम पावली आहे, असेच म्हटले पाहिजे; कारण प्रेतासमान असलेल्या या देहाने उपभोगले जाणारे आणि इंद्रिय व विषय यांच्या संसर्गाने उत्पन्न होणारे विषयसुख तर प्राण्यांना नरकातसुद्धा मिळते. ॥ ९ ॥

हे जगन्नाथा ! आपल्या चरणकमलांचे ध्यान केले असता किंवा आपल्या अनन्य भक्तांची चरित्रे श्रवण केली असता जे सुख प्राप्त होते, ते सुख तुझ्या सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपी देखील प्राप्त होत नाही. मग काळाच्या तलवारीने ज्याचे तुकडे तुकडे उडावयाचे आहेत त्या स्वर्गीय विमानात बसून खाली पडणाऱ्या जीवांना ते सुख कसे बरे प्राप्त होणार ! ( स्वर्गादि सुखे काळाधीन असल्याने सुखावह नाहीत. ) ॥ १० ॥

हे अनन्त परमात्मन् ! आपण मला विशुद्ध हृदयाच्या महात्मा भक्तांचा सत्संग द्या; कारण ज्यांचा आपल्या ठिकाणी अविच्छिन्न

असा भक्तिभाव आहे त्यांच्या सत्संगात राहून मी आपल्या गुण व लीलांचे कथामृत वारंवार प्राशन करून उन्मत्त होईन आणि अत्यंत सहजपणे या अनेक प्रकारच्या दुःखांनी भरलेल्या संसारसागरच्या परतीराला जाऊन पोहोचेन. ॥ ११ ॥

हे कमलनाभ प्रभो ! ज्यांचे चित्त आपल्या चरणकमलांच्या सुगंधात लुब्ध झाले आहे अशा महानुभावांचा जे लोक सत्संग करतात त्यांना आपले हे शरीर व त्याच्या संबंधाने प्राप्त झालेले पुत्र, मित्र, स्त्री, गृह, द्रव्य इत्यादींचे मुळीच स्मरण होत नाही. ॥ १२ ॥

हे अजन्मा परमेश्वरा ! आपण अनादि आहात. पशू, पक्षी, वृक्ष, पर्वत, सर्प, देव, दैत्य, मनुष्य इत्यादींनी व्यापलेले, बऱ्यावाईट सर्व प्रकारांनी भरलेले आणि महतत्त्वादि अनेक कारणांनी रचल्या गेलेल्या आपल्या स्थूल, विश्वरूपालाच मी जाणतो; परन्तु या पलीकडे जेथे शब्दांची गती कुंठित होते म्हणजे जे शब्दांनी व्यक्त करता येत नाही ते आपले मूळ स्वरूप मला ज्ञात नाही. ॥ १३ ॥

हे परमेश्वरा ! आपण कल्पाच्या अंतकाली हे सर्व विश्व आपल्या उदरात विलीन करून घेता. त्यावेळी आपल्याला साहाय्य करणारा एकमात्र शेष तेवढा असतो. आपण आपली दृष्टी स्वस्वरूपाच्या ठिकाणी ठेवून त्या शेषशय्येवर शयन करता. त्यानंतर कल्पारंभी आपल्या जागृतिसमयी त्रैलोक्याचे उत्पत्तिस्थान असलेले सुवर्णमय कमल आपल्या नाभिरूप समुद्रातून उत्पन्न होते. पुढे त्याच्या मध्यभागी तेजस्वी असा ब्रह्मदेव प्रकट होऊन त्याच्यापासून हे विश्व पुन्हा निर्माण होते. हे परमेश्वरा ! तुम्हाला मी शरण आलो आहे. ॥ १४ ॥

हे प्रभो ! आपण आपल्या अखंड चिन्मयी शक्तीमुळे बुद्धीच्या सर्व अवस्थांचे साक्षी आहात. त्याचप्रमाणे आपण नित्यमुक्त,

शुद्धसत्त्वमय, सर्वज्ञ, परमात्मस्वरूप, निर्विकार, आदिपुरुष, षडैश्वर्य-संपन्न आणि तीन गुणांचे अधीश्वर आहात. आपण जीवांपासून सर्वथा भिन्न असून संतारांच्या दृष्टीने यज्ञाधिष्ठाता विष्णुरूपाने विराजमान आहात. ॥ १५ ॥

हे प्रभो ! आपल्यापासूनच विद्या-अविद्या इत्यादि विरुद्ध गती असलेल्या अनेक शक्ती अनुक्रमाने एकामागून एक रूपाने निरन्तर अकस्मात् प्रकट होतात. आपण जगताचे कारण, अखंड, अनादि, अनन्त, आनन्दमय आणि निर्विकार ब्रह्मस्वरूप आहात. मी आपल्याला शरण आलो आहे. ॥ १६ ॥

हे भगवन् ! आपण परमानन्दमूर्ती आहात. जे लोक आपला महिमा जाणून आपले निष्काम भावाने निरंतर भजन करतात त्यांना राज्यादि भोगांच्या प्राप्तीपेक्षा आपल्या चरणकमलांची प्राप्ती होणे हेच आपल्या भजनाचे खरे फल आहे असे वाटते. हे स्वामिन् ! ही गोष्ट खरी असली; तरी ज्याप्रमाणे गाय आपल्या नुकत्याच जन्मलेल्या वासराला दूध पाजते आणि त्याचे रक्षण करते त्याप्रमाणे आपणही भक्तांवर कृपा करण्यासाठी निरंतर कातर राहात असल्यामुळे आमच्यासारख्या सकाम जीवांचीही कामना पूर्ण करून त्यांचे संसारभयापासून रक्षण करीत राहता. आपला भक्त आपल्यापाशी काही मागत नसला तरी आपण त्याला प्रेमाने सर्व सिद्धी देता. भक्तांचे रक्षण करणे हे आपले ब्रीदच आहे. ॥ १७ ॥

श्रीस्वामीमहाराज ! ! ! आपल्या अगणित उत्तम लीलांनी व गुणांनी परिप्लुत असलेल्या आपल्या चरित्रकथामृताचे वारंवार प्राशन करून आम्ही उन्मन होऊन या अनेक प्रकारच्या दुःखांनी भरलेल्या संसारसागराच्या पैलतीराला जावे म्हणून आपण आपले परमभक्त व पूर्वाश्रमातील धाकटे बन्धू श्रीसीतारामहाराज यांनी

स्वतः म्हटल्याप्रमाणे "घेउनी ज्ञाननौका आला वासुदेव। तारिल हा भव शरणांगतां।। दास सीताराम नौकारूढ झाला। तरोनियां गेला भवसिंधू।।" या न्यायाने आम्हालाही ज्ञाननौकेत बसवून सायुज्यता मुक्ती प्राप्त करून द्यावी अशी आपल्या चरणी आपल्याच परम-भक्ताच्या शब्दांनी प्रार्थना करून आपले श्रीसद्गुरुरूपाने ध्यान व नमन करून आपल्या परमरूपात स्थिर राहण्याचा प्रयत्न करीत आहोत.

## ।। अभंग ।।

तुम्ही सर्व जन शुद्ध मन करा। भवसिंधू तरा लवलाहे ।। १ ।।
ऐसें महापर्व पुन्हा नये हातीं। विचारोनी चित्तीं मार्ग धरा ।। २ ।।
संसार सागर बहू आहे खोल। बुडोनियां जाल अज्ञोदकीं ।। ३ ।।
कामक्रोधादीक जलचरें खाती। दारा पुत्र जाती टाकोनिया ।। ४ ।।
घेउनी ज्ञाननौका आला वासुदेव। तारिल हा भव शरणांगतां ।। ५ ।।
दास सीताराम नौकारूढ झाला। तरोनियां गेला भवसिंधू ।। ६ ।।

## ।। श्रीसद्गुरुध्यान ।।

वासुदेवाय दत्ताय गुरवे ब्रह्मरूपिणे।
नमोऽस्तु देवदेवाय भवदुःखविनाशिने ।। १ ।।
वेणुदण्डं तु दक्षेण सव्येन च कमण्डलुम्।
दधानं वासुदेवाख्यं दत्तरूपं नमाम्यहम् ।। २ ।।
ध्यायामि वासुदेवाख्यं दत्तरूपं शिवान्वितम्।
कौपीनमेखलाशाटीदधानं भस्मभूषितम् ।। ३ ।।
ध्येयः सदा वासुदेवो वेदरूपः सुखात्मकः।
पादरक्षाहीन काषायाम्बरोभक्तसेवितः ।। ४ ।।

वासुदेवो दत्तरूपः प्रसन्नमुखपंकजः ।
ज्योतिर्वेत्ता वैद्यराजः सदा भक्तार्थजीवनः ।। ५ ।।

## ।। नमन ।।

नमो गुरु कृपा करा नमो गुरु गुणाकरा ।।
नमो गुरु परात्परा नमो गुरु महत्तरा ।।
नमो गुरु सनातना नमो गुरु मनोन्मना ।।
नमो गुरु घना घना नमो गुरु निरंजना ।।



# – अध्याय एकविसावा –

## ।। पद ।।

### ★ श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे वर्णन ★

मच्चित्ता चिंती साची । तूं वाडी नरसोबाची ।। ध्रु. ।।
वेणीसह कृष्णा येथें । दक्षिणगा अष्टसुतीर्थें ।।
तारक ती असती जेथें । पंचनदीसंगम तेथें ।।
कल्पद्रुम आहे जेथें । प्रासाद प्राङ्मुख तेथें ।।

चाल :–

त्यामध्यें सोज्वळ ज्योती ।। तेथें बसे ब्रह्मज्योती ।।
यत्तेजें भासति ज्योती ।। ज्योतिर्मय तो हो ज्याची ।।
दृक्पाहे पद हे साची ।। मच्चित्ता चिंती साची ।
तूं वाडी नरसोबाची ।। ध्रु. ।। १ ।।

पुरुषार्थ राहती चार। स्तंभरूपें तेथ समोर ॥
उत्तरेस विघ्नेश्वर। दक्षिणेस आसन रुचिर ॥
प्राङ्मुख ते वामनद्वार। लखलखित धातुविकार ॥

चाल :–

त्यामध्यें हरिपद आहे ॥ त्याला जो प्रेमें पाहे ॥
भवभारा नच जो वाहे। मोहें नच जगिं मति ज्याची ॥
सच्चित्ता चिंती साची ॥ तूं वाडी नरसोबाची ॥ ध्रु ॥ २ ॥
जे प्रातःकाळीं पाहती। पादुका अभिषेकीति ॥
जे महापूजा करिती। अभिषेकस्नपना करिती ॥

चाल :–

गुरुचरित्र ऐकति पठति ॥ आश्रिता भोजन देती ॥
जे वस्त्रालंकृति देती ॥ पालखी मिरविती गाती ॥
सर्वहि ते संसृति तरति ॥ भुक्ति मुक्ति दासी त्यांची ॥
सच्चित्ता चिंती साची ॥ तूं वाडी नरसोबाची ॥ ध्रु. ॥ ३ ॥
पूजारी चारि फडांचे। सहकुटुंब पाळी वाचे ॥
पाळुनी बिरुद तयाचे। बा हे योगक्षेम तयाचे ॥
करुणाकर नरहर त्याचे। गुण गाये मधुर सुवाचें ॥

चाल :–

जो औदुंबरतळवासी ॥ अन्नपूर्णा योगिनी ज्यासी ॥
सेविती जान्हवी तैसी ॥ आचरिता सेवा ज्याची ॥
गति होते ब्रह्मी त्याची ॥ सच्चित्ता चिंती साची ॥
तूं वाडी नरसोबाची ॥ ध्रु० ॥ ४ ॥

## पौष शुद्ध १३ ते वैशाख वद्य २ – शके १८३१–१८३२ इ. स. १९०९–१९१०– श्रीक्षेत्र नरसोबावाडी :–

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला यावयाला निघाले आहेत ही बातमी वाडीच्या सर्व मंडळींना अगोदरच कळली होती. त्यामुळे बरीच मंडळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून अर्जुनवाड येथे श्रीस्वामीमहाराजांना वाडीला नेण्याकरिता वाद्ये वगैरे घेऊन श्रीदत्तमंदिरात येऊन राहिली होती. पौष शुद्ध १३, शके १८३१ इ. स. १९१० रोजी श्रीस्वामीमहाराज, श्रीगांडामहाराज, श्रीसीताराममहाराज वगैरे मंडळींसह अर्जुनवाडाला आले व श्रीदत्तमंदिरात उतरले. श्रीस्वामीमहाराज अर्जुनवाडला आले आहेत असे कळताच प. प. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज श्रीगुरुभेटीसाठी अत्यंत उत्सुक झाले. ते मोठे प्रयत्नवादी असून श्रीस्वामीमहाराजांचे एकनिष्ठ भक्त होते. या गुणांच्या जोरावरच त्यांनी दंडग्रहणाचे वेळी श्रीस्वामीमहाराजांना वश केले होते. त्याप्रमाणेच यावेळीही त्यांनी त्यांना वश केले. नामभजन करून अर्जुनवाडपर्यंत त्यांनीच श्रीस्वामीमहाराजांना आणले होते असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अत्युक्ती होणार नाही.

श्रीस्वामीमहाराजांना सामोरे जाण्यासाठी प. प. श्रीदीक्षितस्वामीमहाराज एक दिंडी घेऊन अर्जुनवाड येथे जावयास निघाले. या दिंडीत श्री. वल्लभराव कुलकर्णी ऊर्फ श्री. बाबूराव शिरोळकर व श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील पुजाऱ्यांची मुले होती. ही सर्व मंडळी टाळ, मृदुंग, विणा व पताका घेऊन "॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ॥" हे भजन करीत करीत प. प. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांच्यासह अर्जुनावाडला निघाले. श्रीदीक्षितस्वामीमहाराज म्हणजे श्रीसद्गुरुविषयीच्या प्रेमाची

केवळ चालती बोलती मूर्तीच होती. एका आसनावर बसून अखंड योगसाधन केल्यामुळे त्यांच्या हातापायांच्या नाड्या निर्बळ होऊन शरीर अत्यंत नाजूक झाले होते. अशा स्थितीतच ते सहा मैल चालत निघाले. ते एक मैलभर चालून गेल्यावर त्यांच्या गुडघ्यात अशी काही कळ सुरू झाली की, त्यांना पायही उचलता येईना. त्यावेळी गुडघ्यातील कळ थांबावी म्हणून त्यांनी सडकेच्या कडेला असणाऱ्या शेंडाचा म्हणजे हुऱ्याचा पुष्कळसा चीक आपल्या गुडघ्यावर थापला. ज्याप्रमाणे तूप खाल्ल्यावर रूप येत नसते त्याप्रमाणे चीक घातल्या-बरोबर काही कळ थांबत नाही. तरी पण मनाची समजूत करून घेऊन ते न उचलता येणाऱ्या पायानेच सर्वांच्या बरोबर तसेच भराभर चालत सहा मैल गेले. गुडघा दुखतो म्हणून ते परतले नाहीत. श्रीगुरु-प्रेमाचे अपूर्व बल व दृढ भक्ती त्यांच्या ठिकाणी निरंतर वास्तव्य करून होती. त्यांच्या जोरावरच ते तसे गेले, हीच गोष्ट खरी !

अर्जुनवाडच्या श्रीदत्तमंदिरात आल्यावर श्रीनृसिंहसरस्वती-दीक्षितस्वामीमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांना मोठ्या भक्ति-प्रेमाने विधिवत् दंडवंदन केले. त्यानंतर त्यांनी श्रीस्वामीमहा-राजांच्या चरणकमलावर आपले मस्तक ठेवून त्यांची चरणकमले आपल्या प्रेमाश्रूंनी भिजविली. आपल्या प्रेमळ भक्ताकडे पाहून श्रीस्वामीमहाराज हसले व अंतर्ज्ञानाने त्यांचे शरीरकष्ट ओळखून ते त्यांना असे म्हणाले की, "इतके दूर चालत कशाला आलात ? आम्ही आजच तिकडे येणार होतो." त्यानंतर त्यांनी श्रीदीक्षित-स्वामीमहाराजांना आपल्या जवळ बसण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे भक्तवर्य त्यांच्या बाजूला बसले.

इतके झाल्यावर श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीहून दिंडीत आलेल्या इतर सर्व भक्त मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार घातले.

श्री. बाबूराव शिरोळकरांनी श्रीस्वामीमहाराजांच्या समोर उभे राहून "पूर्णानंदकंद विबुधवंद्य देखियला हो।" हे पद म्हटले

श्री. बाबूरावांनी हे पद इतक्या करुणरसाने परिप्लुत होऊन म्हटले की, ते ऐकता ऐकता तेथे जमलेल्या सर्व लोकांच्या अंतःकरणात जणूकाही प्रेमाचा सागरच उसळून आला व सर्वांच्या डोळ्यातून प्रेमाश्रुधारा वाहू लागल्या. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना "नारायण" असा आशीर्वाद देऊन अमृत पाजले व दर्शनानंदाने सर्वांना तृप्त केले. त्यानंतर सर्व भक्तांसह श्रीस्वामीमहाराज श्रीकृष्णास्नानाला गेले. तेथे त्यांनी सर्वांच्या मस्तकावर स्वहस्ताने पाणी घातले. तो सोहळा मोठा अपूर्व होता. नंतर स्वयंपाक झाल्यावर श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीधाकटेस्वामीमहाराज यांची भिक्षा झाली.

दुपारी विश्रांती झाल्यावर श्रीस्वामीमहाराज आपल्या भक्तगणांसह चौथ्या प्रहरी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येण्यास निघाले. त्यावेळी सर्वांच्या पुढे भजनाची दिंडी व मंगलवाद्ये होती. त्यानंतर भजनाचे फड व त्यामागे श्रीस्वामीमहाराज व त्यांच्या मागे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांच्या सहित सर्व भक्त भजन करीत चालले होते. अशा रीतीने सर्वजण प्रेमानंदाने भजन करीत करीत शिरोळला आले. तेथे सर्वांनी भोजनपात्राचे दर्शन घेऊन थोडी विश्रांती घेतली व दिवेलागणीच्या वेळी श्रीस्वामीमहाराज सर्व भक्तमंडळींच्यासह श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येऊन पोहोचले.

श्रीस्वामीमहाराजांच्या स्वागतासाठी श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या रस्त्यावर ठिकठिकाणी आम्रवृक्षांच्या पल्लवांची तोरणे बांधली होती. सर्व रस्ते झाडून सडासंमार्जन केले होते व ठिकठिकाणी रांगोळ्या घालून सुवासिनी स्त्रिया हातात पंचारती घेऊन श्रीस्वामी-

महाराजांना ओवाळायला सिद्ध होत्या. श्रीस्वामीमहाराज गावात आल्यावर सर्व स्त्रियांनी ओवाळून त्यांचे स्वागत केले. श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने साक्षात् श्रीदत्तप्रभूच आले आहेत या अननुभूत भावनेने श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील सर्व अबालवृद्ध नरनारींना मोठा आनंद झाला. श्रीस्वामीमहाराज श्रीपादुकांना वंदन करून श्रीब्रह्मानंदांच्या मठात आले. त्यावेळी तेथे जमलेल्या सर्व पुजारी मंडळींनी व गावातील लोकांनी श्रीस्वामीमहाराजांची आरती करून त्यांना साष्टांग नमस्कार घातले.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये आल्यावर पुन्हा एकदा आनंदाचे व उत्साहाचे दिवस सुरू झाले. जणूकाही दिवसाचे चोवीस तास श्रीब्रह्मानंदांच्या मठापर्यन्त वाडी जागीच आहे असे वाटत असे. यावेळी श्रीस्वामीमहाराजांचा येथे चार महिने मुक्काम झाला. या मुदतीत येथील दुकानदारांनी आपल्या दुकानासमोरील दिवे रात्री मालविल्याचे कोणाला आठवेना. सगळीकडे आनंद आणि उत्साह ओथंबून चालला होता. श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे भजनाचा कार्यक्रम चालूच होता. यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला नक्की केव्हा येणार हे तेथील पुजारी मंडळींना अगोदरपासूनच कळलेले असल्यामुळे त्यांनी आपापल्या यजमानांना तसे पत्राने सूचित करून ठेवले होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी दूरदूरहून पुष्कळच लोक अगोदरपासूनच श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये येऊन राहिले होते. श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर श्रीसीतारामहाराजांनी तीर्थविधी, श्राद्ध वगैरे केले व मोठ्या प्रमाणावर ब्राह्मण संतर्पण करून सुवासिनींना खण वाटून सर्वांचा आदर सत्कार केला.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येताच पूर्वीप्रमाणे

पाठपठणाचे कार्यक्रम सुरू झाले. त्यांचा दैनंदिन कार्यक्रम असा होता. ते पहाटे योगचर्यादि करून नंतर प्रातर्विधी, स्नानसंध्यादि आटोपून देवदर्शन घेत असत. मग ब्राह्मणांना उपनिषदांचा व शास्त्रांचा पाठ सांगत असत. त्यानंतर विद्यार्थ्यांना ब्रह्मकर्म शिकवीत असत. एवढा कार्यक्रम होईपर्यन्त मध्यान्ह होत असे. त्यानंतर पुन्हा मध्यान्हीचे स्नान, सध्यादि उरकून भिक्षेला जात असत. भिक्षा झाल्यावर दुपारी दर्शनाला आलेल्या लोकांच्या प्रश्नांना उत्तरे देणे, पिशाच्चबाधा आजार, आपत्ती, इत्यादींवर उपचार सांगणे व पत्रोत्तरे लिहिणे असा कार्यक्रम चालत असे. त्यानंतर प्रवचन, पुराण किंवा कीर्तन होत असे. सायंकाळी श्रीकृष्णापंचगंगा संगमावर जाऊन श्रीस्वामीमहाराज सायंस्नानसंध्यादि करून तेथील घाटावरच प्रवचन, चर्चा किंवा शिक्षात्रयी या स्वरचित ग्रंथावर भाष्य करीत असत. असा हा कार्यक्रम पालखी होईपर्यन्त चालत असे. पालखी संपल्यानंतर श्रीस्वामी-महाराज संगमावरून पुन्हा परत येऊन श्रीपादुकांचे दर्शन घेऊन श्रीब्रह्मानंदांच्या मठात माडीवर जाऊन बसत असत. तेथेही पुन्हा काहीना काही विषयावर चर्चा चालतच असे. त्यानंतर रात्री श्रीब्रह्मा-नदांच्या मठात असलेली सर्व मंडळी श्रीस्वामीमहाराजांची शेजारती करून नंतर पुढील पदे म्हणत असत.

श्रीपादश्रीवल्लभ त्वं सदैव। श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदेव ।।
भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते ।। घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। १ ।।
त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वम्। त्रातायोगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वम्
त्वं सर्वस्वं नोऽप्रभो विश्वमूर्ते।। घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।।२।।
पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं। भीतिं क्लेशं त्वं हराऽशुत्वदन्यम् ।।
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते। घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।। ३ ।।

नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता। त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता।
कुर्वात्रेयानुग्रहं पूर्णराते। घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ४ ॥
धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिम्। सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम्।
भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते। घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥ ५ ॥
श्लोकपंचकमेतद्यो लोकमंगलवर्धनम्।
प्रपठेन्नियतो भक्त्या स श्रीदत्तप्रियो भवेत् ॥ ६ ॥

* * * *

सांगावें, कवणा ठायां जावें। कवणातें स्मरावें।
कैसें काय करावें। कवण्यापरि मी रहावें।
कवण येऊनि कुरुंदवाडीं स्वामीतें मिळवावें ॥ धृ. ॥
या हारी जेवावें व्यवहारीं। बोलावें संसारीं।
घालुनि अंगिकारी। प्रतिपाळिसि जो निर्धारी।
केला ज़ो निजनिश्चय स्वामी कोठें तो अवधारी ॥ सांगावे०॥
या रानीं माझी करुणावाणी। काया कष्टी प्राणी।
ऐकुनि घेशिल कानीं। देशिल सौख्य निधानीं।
संकटिं होऊनि मूर्च्छित असतां पाजिल कवण पाणी ॥ सांगावे०॥
त्या वेळा। सत्पुरुषांचा मेळा। पाहतसें निजडोळा।
लाविसि भस्म कपाळा। सांडी भय तू बाळा।
श्रीपादश्रीवल्लभ म्हणती अभय तुज गोपाळा ॥ सांगावे० ॥

ही पदे झाल्यावर सर्व लोक आपापल्या घरी जात व त्यानंतर श्रीस्वामीमहाराजही थोडावेळ विश्रांती घेत असत. याही वेळी श्रीस्वामीमहाराज निजून झोप न घेता बहुशः समाधिलीन असत, असा पुष्कळांचा अनुभव आहे.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला इ. स. १९०६ नंतर

यावेळी ३-३॥ वर्षांनी आले होते; परंतु वर वर्णन केलेला हा सर्व कार्यक्रम अशा तऱ्हेने पुन्हा चालू झाला की, जणूकाही मध्यंतरीच्या काळात श्रीस्वामीमहाराजांची श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये अनुपस्थिती नव्हतीच !

श्रीस्वामीमहाराज आपल्या आमंत्रणाला मान देऊन श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्याचा आनंद व्यक्त करण्यासाठी तेथील सर्व वैदिक मंडळींनी संहिता स्वाहाकार करण्याचे ठरविले. श्रीसीतारामहाराजांनी सर्वांतर्फे या यज्ञासाठी श्रीस्वामीमहाराजांची अनुज्ञा घेतली व श्रीकृष्णेचा माघ महिन्यात जेथे उत्सव होतो. त्या उत्सवमंडपातच संहितेचा स्वाहाकार केला. या स्वाहाकारात मंत्राहुती देण्याकरिता श्रीक्षेत्र नरसोबावाडीची व परगावची कितीतरी वैदिक मंडळी एकत्रित आली होती. श्रीक्षेत्र नरसोबावाडीत राहणारे वेदमूर्ती श्री. दामले हे मुख्य होते. सर्वांच्या आग्रहामुळे त्यांच्या संतोषासाठी श्रीस्वामीमहाराज यज्ञाच्या वेळी केव्हा केव्हा यज्ञमंडपात येऊन बसत असत.

या संहितास्वाहाकारयज्ञाच्यावेळी मोठ्या प्रमाणावर अन्नसंतर्पण झाले. त्यावेळी दररोज नगारखान्यापासून श्रीकृष्णेच्या शेवटच्या पटांगणापर्यन्त व श्रीपादुकामंदिराच्या सभोवार देखील भोजनार्थ ब्राह्मणपंक्ती वसत असत. श्रीसीतारामहाराज संकल्प पूर्वक रोज उदक सोडून स्वतः पक्वान्न वाढण्यासाठी पंगतीतून लाडवांची दुरडी घेऊन फिरत असत.

या संहितास्वाहाकारयज्ञाचा समारंभ पंधरा दिवस चालला होता. यावेळी याज्ञिक ब्राह्मणांना भरपूर दक्षिणा, वस्त्रे, पात्रे वगैरे देऊन संतुष्ट करण्यात आले. अशा रीतीने या संहितास्वाहाकारासाठी बराच खर्च करण्यात आला. पवनीच्या चातुर्मासात

श्रीस्वामीमहाराजांच्या समोर जमा झालेल्या पैशांपैकी जी रक्कम शिल्लक राहिली होती त्या रकमेतून हा सर्व खर्च करण्यात आला.

या संहितास्वाहाकारयज्ञासाठी जे प्रवचनकार शास्त्री आले होते त्यांमध्ये गोव्यातील प्रसिद्ध शास्त्री, प्रवचनकार व कीर्तनकार श्री. वासुदेवशास्त्री धुपकर हेही होते. एके दिवशी सायंकाळी श्रीस्वामी-महाराज श्री. वासुदेवशास्त्री धुपकर यांना असे म्हणाले की, "आज आपण कीर्तन केले; तर श्रींना फार संतोष होईल." हे ऐकताच श्री. धुपकरशास्त्री श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे. आपण आज्ञा करून माझ्यावर आपली कृपादृष्टी वळविलीत हे मी माझे महद्‌भाग्य समजतो." श्री. धुपकर-शास्त्री सायंकाळी कीर्तनाला उभे राहिल्यावर त्यांनी पूर्वरंगासाठी श्रीमद् आद्य शंकराचार्यांचा पुढील श्लोक घेतला होता.

> **दृष्टान्तो नैव दृष्टस्त्रिभुवन जठरे सद्‌गुरोर्ज्ञानदातुः ॥**
> **स्पर्शश्चेत्तत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम् ॥**
> **न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्‌गुरुः स्वीयशिष्ये ॥**
> **स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वालौकिकोपि ॥**

याचा अर्थ असा आहे की, "या त्रिभुववात नुसत्या स्पर्शाने शक्तिपात अर्थात् कृपा करून ज्ञानदान करणाऱ्या श्रीसद्‌गुरुनाथांना शोभेल असा दृष्टान्तच कोठेही मिळत नाही. त्यांना जरी परिसाची उपमा दिली तरी तीही योग्य वाटत नाही; कारण जरी परीस आपल्या स्पर्शाने लोखंडाला सुवर्णत्व देत असला तरी परिसत्व देत नाही. परंतु श्रीसद्‌गुरुनाथ त्यांच्या चरणयुगुलाचा आश्रय करणाऱ्या शिष्याच्या ठिकाणी आपल्या दैवीशक्तीचे संक्रमण करून त्याची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती कुंडलिनी जागृत करून, त्याला आपल्या

सारखे करून, स्वतःचे साम्य देतात. त्यामुळे श्रीसद्गुरुनाथांना कोणतीही उपमा देता येत नाही.

या श्लोकाची उकल करताना त्यांनी कीर्तनात श्रीसंततुकाराम-महाराज यांच्या पुढील अभंगाचा उल्लेख करून त्याचे मोठे बहारदार विवेचन केले.

सद्गुरुवांचूनि सापडेना सोय। धरावे ते पायी आधी आधी ॥ १ ॥
आपणासारिखें करिती तात्काळ। नाही काळवेळ तयालागीं ॥ २ ॥
लोह परिसाची न साहे उपमा। सद्गुरुमहिमा अगाधची ॥ ३ ॥
तुका म्हणे कैसे आंधळें हे जन। गेले विसरोन खऱ्या देवा ॥ ४ ॥

हे कीर्तन ऐकून श्रीस्वामीमहाराजांना फार समाधान वाटले. श्रीसीताराममहाराजांकडून श्री. वासुदेवशास्त्री धुपकर यांना दक्षिणा व वस्त्रे देऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांचा उत्तम सन्मानसत्कार केला. श्रीस्वामीमहाराजांच्या या कृपेमुळे श्री. धुपकरशास्त्री फारच संतुष्ट झाले.

हा संहितास्वाहाकारयज्ञ श्रीकृष्णेच्या उत्सव मंडपात चालू असताना या यज्ञाच्या खर्चाकरिता आपल्या हातून काहीतरी सेवा घडावी म्हणून श्री. अंतुशास्त्री गेंडे पुजारी यांनी श्रीसीतारामहाराज यांच्यापुढे शंभर रुपये ठेवून त्यांना अशी प्रार्थना केली की, " यज्ञाच्या खर्चासाठी फुल ना फुलाची पाकळी म्हणून या रक्कमेचा स्वीकार करून माझी सेवाही या कार्यासाठी रुजू करून घ्या."

श्री. अंतुशास्त्री यांनी संहितास्वाहाकारयज्ञाच्या खर्चासाठी सेवा म्हणून शंभर रुपये दिल्याची गोष्ट श्रीसीताराममहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर तात्काळ घातली. हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " शास्त्रीबुवांकडून रुपये घेऊ नको. त्यांचे रुपये आपणाला घ्यावयाचे नाहीत. आपण येथे

पुजाऱ्यांना द्यावयाला आलो आहोत. त्यांच्यापासून घ्यावयाला आलो नाही."

श्रीस्वामीमहाराजांनी असे निक्षून सांगितल्यावर श्रीसीतारामहाराजांनी ते शंभर रुपये श्री. अंतुशास्त्री गेंडे पुजारी यांना परत केले. त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, "आपले पैसे या स्वाहाकारासाठी स्वीकारू नये अशी श्रीगुरुमहाराजांची इच्छा आहे. आपण देवाचे पुजारी असल्यामुळे आपले पैसे घेणे योग्य नाही असे त्यांनी सांगितले आहे. तरी आपण हे पैसे परत घ्या."

श्रीसीतारामहाराजांनी असे सांगताच श्री. अंतुशास्त्री यांना अत्यंत वाईट वाटले व ते त्यांना नम्रपणे असे म्हणाले की, "कसेही करून आपण माझ्या सेवेचा अंगीकार करा. मला दूर लोटू नका. आपणच श्रीस्वामीमहाराजांची समजूत घाला. आपणासच हे शक्य आहे. या बाबतीत श्रीस्वामीमहाराजांच्या समोर काही सांगणे हे माझ्या सामर्थ्याच्या पलीकडे आहे. तरी आपण माझ्यावर कृपा करून माझ्या या सेवेचा अंगीकार करा." असे म्हणून श्री. अंतुशास्त्र्यांनी श्रीसीतारामहाराजांचे पाय धरले व त्यांची अत्यंत गयावया करून तत्संबंधी पुनःपुन्हा प्रार्थना करून त्यांनी ते रुपये श्रीसीतारामहाराजांना परत दिले.

श्री. अंतुशास्त्र्यांनी केलेली प्रार्थना ऐकून श्रीसीतारामहाराजांना त्यांची अत्यंत दया आली व ते पुन्हा श्रीस्वामीमहाराजांकडे गेले व त्यांना असे म्हणाले की, "शास्त्रीबुवा हे रुपये परत घेत नाहीत. माझी ही सेवा घ्याच असे म्हणतात. त्यांनी फारच गयावया केली. तरी आपण त्यांची ही सेवा स्वीकारण्यास संमती देऊन त्यांना उपकृत करावे असे मला वाटते."

श्रीसीतारामहाराजांनी श्री. अंतुशास्त्री गेंडे यांच्याकरिता

रदबदली करण्याचा प्रयत्न केला खरा; पण श्रीस्वामीमहाराजांना पुजाऱ्यांकडून कसलीही सेवा स्वीकारावयाची नसल्यामुळे व त्यांचे हे मत कायम असल्यामुळे ते एकदम संतप्त झाले व थोडे उग्र रूप दाखवून श्रीसीतारामहाराजांना असे म्हणाले की, " मूर्खा ! पुनः-पुन्हा विचारतोस ! रदबदली कसली करतोस ! एकदा सांगितले ना की, त्यांचे रुपये घ्यावयाचे नाहीत म्हणून. अंतुशास्त्रांचे पैसे त्यांना परत करून टाक आणि पुन्हा यासंबंधी विचारू नकोस." श्रीस्वामीमहाराजांचे हे रागाचे भाषण ऐकून व त्यांचे एकंदर उग्र रूप पाहून श्रीसीतारामहाराजांचीही गाळण उडाली व आपल्यासाठी चाललेल्या रदबदलीला यश येते की नाही, हे पाहण्यासाठी त्यांच्या-बरोबर आलेले श्री. अंतुशास्त्री तर भीतीने थरथर कापू लागले. श्रीस्वामीमहाराजांना फक्त श्रीसीतारामहाराजच शांत करू शकत असत; पण आजच्या प्रसंगाने तेही घाबरून गेले होते. श्रीस्वामी-महाराजांपुढे आपले काही चालत नाही असे पाहून ते तेथून परत फिरले व श्री. अंतुशास्त्री गेंडे यांना असे म्हणाले की, " आपले हे रुपये स्वाहाकाराकरिता घेणे गुरुमहाराजांना पसंत नाही; तरी ते परत घ्या. आपण काही ते स्वीकारू शकत नाही. या कामाकरिता गुरुमहाराजांपाशी आपल्याकरिता रदबदली केली असता ते फारच संतप्त झाले. त्यांची आज्ञा मोडून आपले रुपये घेणे मला शक्य होणार नाही. तरी यापुढे या कामाकरिता आपण मला पुन्हा गळ घालू नका. " इतके सांगून श्रीसीतारामहाराजांनी ते शंभर रुपये श्री. अंतुशास्त्री गेंडे यांना परत दिले व त्यांना घरी पाठवून देऊन आपण स्वतः श्रीब्रह्मानंदांच्या मठात माडीवर जाऊन स्वस्थ बसून राहिले.

श्री. अंतुशास्त्र्यांकरिता रदबदली करून आपण विनाकारणच श्रीस्वामीमहाराजांचा रोष व राग ओढवून घेतला व त्यांच्या चित्तात

क्षोभ उत्पन्न करण्यास कारणीभूत झालो या विचाराने अत्यधिक व्यथित होऊन श्रीसीताराममहाराज श्रीब्रह्मानंदांच्या मठात जे एकदा जाऊन वसले ते पुन्हा खाली यज्ञमंडपात आलेच नाहीत. दुपारी यज्ञमंडपात सर्व पंगती वाढून तयार झाल्यावर रोजच्याप्रमाणें संकल्पोदक सोडण्याकरिता श्रीस्वामीमहाराजांसह सर्व मंडळी श्रीसीतारामहाराजांची वाट पाहात राहिली.

श्रीसीतारामहाराज नित्याप्रमाणे संकल्प सोडावयास येत नाहीत असे पाहून प्रथम काही मंडळी त्यांना बोलवावयाला गेली; परंतु ते काही यज्ञमंडपात संकल्प सोडावयास आले नाहीत. आपणास झालेल्या खेदामुळे व थोडचाशा हट्टी स्वभावामुळे ते श्रीब्रह्मानंदांच्या मठातच स्वस्थ वसून राहिले. त्यांनी कोणाच्याही बोलाविण्याकड लक्ष दिले नाही. परंतु पंगत खोळंबून राहिल्यामुळे यज्ञमंडपातील मंडळी त्यांना वरचेवर श्रीब्रह्मानंदांच्या मठात जाऊन बोलावू लागली. त्यांना बोलवावयास येणाऱ्या प्रत्येक माणसाला ते "आपण तिकडे येत नाही," असे उत्तर देऊन परत पाठवीत असत.

अशा रीतीने बराच वेळ गेल्यावर उशीर होत असलेला पाहून श्रीस्वामीमहाराज सर्व शास्त्रीमंडळींना उद्देशून असे म्हणाले की, "सीतारामाला बोलावा." हे ऐकताच सर्व शास्त्रीमंडळी श्रीब्रह्मानंदाच्या मठात माडीवर जाऊन त्यांना जसे म्हणाले की, "खाली यज्ञमंडपात जेवणाची पंगत खोळंवली आहे. तुम्हाला संकल्पोदक सोडण्यासाठी श्रीगुरुमहाराज लवकर बोलावीत आहेत. तरी आपण तात्काळ खाली येऊन संकल्पोदक सोडा म्हणजे जेवावयास आलेल्या लोकांचा खोळंवा होणार नाही."

अशा प्रकारे सर्व शास्त्रीमंडळींनी जाऊन श्रीसीतारामहाराजांना श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा सांगितली; तरी त्यांनी आपला हट्ट

सोडला नाही. उलट ते त्या सर्वांना असे म्हणाले की, "आपण काही संकल्पोदक सोडावयास खाली येणार नाही. आम्हाला काही त्याची गरज नाही. आपण आपले येथून निघून जातो असे महाराजांना सांगा."

हे ऐकताच श्रीसीतारामहाराजांना बोलवावयाला आलेली शास्त्रीमंडळी यज्ञमंडपात परत आली व त्यांनी त्यांचे म्हणणे जसेच्या तसे श्रीस्वामीमहाराजांना सांगितले. ते ऐकताच श्रीसीतारामहा-राजांच्या रुसण्याचे कारण श्रीस्वामीमहाराजांच्या लक्षात आले. त्यामुळे ते मंदस्मित करून श्री. अंतुशास्त्री गेंडयांना असे म्हणाले की, "शास्त्रीबुवा! तुमच्यामुळे तो रुसला आहे. तुम्हीच जाऊन त्याची समजूत करा व त्याला घेऊन या."

श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच श्री. अंतुशास्त्री तात्काळ श्रीब्रह्मानंदांच्या माडीवर गेले व श्रीसीतारामहाराजांना असे म्हणाले की, "आपण खाली यज्ञमंडपात चला. सर्व मंडळी जेवा-वयाची थांबली असून पंगत खोळंबली आहे. तुम्ही खाली आल्यावाचून महाराज कोणाला उदक सोडू देत नाहीत व आपणही भिक्षा घेत नाहीत. माझ्यामुळे हे संकट सर्वांवर आले आहे. तेव्हा आपण सर्वांवर दया करा आणि मला सर्वांच्या शापातून सोडवा."

अशा प्रकारे अत्यंत रडकुंडीला येऊन श्री. अंतुशास्त्र्यांनी श्रीसीता-रामहाराजांची प्रार्थना केली; तरी त्यांच्या चित्तात काही बदल झाला नाही. उलट श्री. शास्त्रीबुवांना ते असे म्हणाले की, "माझी तिकडे येण्याची मुळीच इच्छा नाही. तुम्ही उचलूनच नेलेत तर येऊ." श्रीसीतारामहाराजांनी असे सांगताच श्री. अंतुशास्त्री गेंडे व श्री. शंभूराव वाईकर असे दोघे मिळून त्यांना उचलू लागताच ते हसले व त्यांना लगेच असे म्हणाले की, "मीच येतो चला." असे

म्हणून श्रीसीताराममहाराज त्या दोघांसह चालतच यज्ञमंडपात गेले व उदक सोडून सर्वांना वाढू लागले. श्रीसीतारामहाराज आलेले पाहून श्रीस्वामीमहाराजांनाही अत्यंत आनंद झाला व तेही सर्वांबरोबर भिक्षेला बसले.

या संहितास्वाहाकारयज्ञानंतर श्री. वामन दत्तात्रेय पुजारी, अग्निहोत्री यांच्याकरवी श्रीसीताराममहाराजांनी आपल्या खर्चानेच चातुर्मास याग देखील करविला व त्यांच्या अग्नीपुढे दक्षिणारूपाने त्यांना काही देणगीदेखील अत्यंत प्रेमाने दिली. श्रीक्षेत्रनरसोबावाडी येथे चैत्रमासात घाटावर येऊन रांगोळ्या घालून पूजा व देवांची सेवा करण्याचा त्यावेळी शे-पाऊणशे तरी कुमारिका होत्या. त्या सव कुमारिकादेवींना एके दिवशी श्रीसीताराममहाराजांनी भोजन घालून त्यांना कुंकू, खण, नारळ व दक्षिणा दिली. श्रीसीताराममहाराजांनी अत्यंत श्रद्धेने केलेले हे देवीपूजनच होते यात काहीच शंका नाही.

श्रीसीताराममहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ अत्यंत प्रेमाने व हट्टाने वागत असत. श्रीस्वामीमहाराजांचा वाडीत मुक्काम असताना आपल्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या मुखाने स्वानुभवयुक्त वाणीने आपण श्रीमद् भगवद्गीतेचा अर्थ श्रवण करावा अशी तीव्र इच्छा त्यांच्या मनात उत्पन्न होऊन त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी विनंती केली की, "आपणाकडून गीतेचा अर्थ ऐकावा अशी इच्छा आहे; तरी माझी ही प्रार्थना मान्य करून आपण मला व सर्वांना उपकृत करावे." श्रीसीताराममहाराजांनी जरी अशी विनंती केली; तरी श्रीमद्भगवद्गीतेचा भावार्थ कोणातरी एखाद्या विद्वान् वाडीकर शास्त्रीबुवांकडून तो सांगवा असा विचार मनात करून श्रीस्वामीमहाराज मौन राहिले.

आपण विचारलेल्या प्रश्नाला ज्या अर्थी श्रीस्वामीमहाराज काही

एक उत्तर न देता स्वस्थ राहिले त्याअर्थी त्यांना मनातून स्वत: गीतार्थ सांगावयाचा नसून तो कोणातरी शास्त्रीपंडिताकडून सांगावयाचा आहे, हे श्रीसीतारामहाराजांनी लगेच ताडले. हे सर्व लक्षात घेऊन श्रीसीतारामहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील सर्व शास्त्री-मंडळींना अशी गुप्त सूचना दिली की, "श्रीगुरुमहाराज तुम्हाला गीतार्थ सांगा असे म्हणाले; तर त्यांना तुम्हीच गीतार्थ सांगा असे म्हणा. आपण सांगतो असे म्हणू नका."

श्रीस्वामीमहाराजांनी दुसऱ्या दिवशी शास्त्रीमंडळी जमल्यानंतर त्यांना गीतार्थ सांगण्याची आज्ञा केली. त्यावेळी श्री. आण्णाशास्त्री दीक्षित इत्यादि सर्व शास्त्रीमंडळींनी पूर्वी ठरल्याप्रमाणे "महाराज! आपणच गीतार्थ सांगितला तर आम्हा सर्वांना अपूर्व लाभ होईल," असे म्हणून श्रीस्वामीमहाराजांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी वाडीकर शास्त्रीमंडळींचा नकार लक्षात घेऊन परस्थ श्री. साधलेशास्त्री यांना श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "शास्त्रीबुवा! तुम्हीच आजपासून गीतार्थ सांगा." श्रीस्वामीमहाराजांची-ही आज्ञा ऐकताच ती शिरोधार्य मानून त्यांनी लगेच "होय" म्हणून सर्वांचे सायं संध्यावंदन झाल्याबरोबर संगमावर गीतार्थ सांगण्यास सुरुवात केली.

अशा प्रकारे श्री. साधलेशास्त्री यांनी गीतार्थ सांगावयाला सुरुवात केल्यावर आपली इच्छा निष्फळ झालेली पाहून श्रीसीता-रामहाराजांचे मन फार विरस झाले. त्यामुळे ते कधीही संगमा-वरील घाटावर श्री. साधलेशास्त्री यांच्या गीतार्थ श्रवणाला गेले नाहीत. श्रीसीतारामहाराज गीतार्थ श्रवणाला येत नाहीत हे लक्षात आल्यावर एके दिवशी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, "तुम्ही गीतार्थ श्रवणाला का येत नाही?"

हा प्रश्न ऐकताच ते त्यांना असे म्हणाले की, "मला संपूर्ण गीता पाठ येते. पाहिजे तर तुमच्या पुढे म्हणून दाखवितो." हे उत्तर ऐकताच एकंदर सर्व परिस्थिती लक्षात घेऊन श्रीदीक्षितस्वामी-महाराज त्यांच्या स्वभावानुसार स्वस्थ बसले.

श्री. साधलेशास्त्री गीतार्थ सांगू लागताच श्रीसीतारामहाराजां-प्रमाणेच श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या इतरही शास्त्री पंडित मंडळींना व अन्य लोकांना देखील श्रीगुरुपद्मींच्या चिन्मकरंदस्वादाला आपण मुकलो याची तीव्रतेने जाणीव होऊन मोठा विषाद वाटला. असे घडले तरी सर्व लोकांना श्री. साधलेशास्त्र्यांनी सांगितलेला गीतार्थ अत्यन्त शान्ततेने श्रवण करण्याशिवाय दुसरा पर्याय उरला नाही. कालौघात गीतार्थ सांगून पुरा झाल्यावर श्री. साधलेशास्त्र्यांना दक्षिणा देऊन त्यांची योग्य ती संभावना करावी असे मनात येऊन श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसीतारामहाराजांना असे सांगितले की, "साधलेशास्त्री यांनी गीतार्थ सांगून फारच मोठी सेवा केली आहे. त्याकरिता त्यांना काहीतरी द्यावे असे आपणाला वाटते. तरी तू त्यांची योग्य ती उत्तम संभावना कर." हे ऐकताच श्री. साधले-शास्त्र्यांना किमान शंभर रुपये तरी दक्षिणा द्यावी अशी श्रीस्वामी-महाराजांची इच्छा असल्याचे श्रीसीतारामहाराजांच्या तात्काळ लक्षात आले; परंतु श्रीस्वामीमहाराजांसारख्या श्रीसद्गुरू सर्वज्ञां-पासून ज्ञानलाभाची महान् संधी श्री. साधलेशास्त्र्यांमुळेच चुकली हे शल्य मनात टोचत असल्यामुळे व आपण सर्व शास्त्रीपंडितांना श्रीस्वामीमहाराजांनीच गीतार्थ सांगावा म्हणून आग्रह धरण्यास व स्वतः गीतार्थ सांगण्याचे टाळावे, असे सूचित करून ठेवले असता-नाही आपल्या विद्वत्तेची प्रौढी मिरविणाऱ्या माणसाला "तुम्ही द्या

म्हणत असला; तरी मी काहीच देणार नाही," असे मनातल्या मनात उत्तर देत ते उघडपणे श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की "आपण जरी शास्त्रीबुवांची योग्य ती संभावना कर असे म्हणत असला; तरी मी नुसते चार आणे त्यांच्यापुढे ठेवून पाया पडणार आहे. यापेक्षा अधिक काही देणार नाही."

श्रीसीतारामहाराजांनी असे उत्तर देताच श्रीस्वामीमहाराज मनात असे म्हणाले की, "आपण गीतार्थ न सांगता शास्त्रीबुवांच्या-कडून तो सांगितल्यामुळे हा रुसला आहे. आता काही केले तरी हा आपले ऐकणार नाही व कितीही सांगितले तरी याची समजूत पटणार नाही, हे निश्चित आहे. याकरिता गांडाबुवालाच हे काम सांगितले पाहिजे," असा सर्व विचार करून श्रीस्वामीमहाराज तेथून स्वतः उठले व पलीकडील खोलीत असलेल्या श्रीगांडामहा-राजांकडे गेले. त्यावेळी ते आपल्या खोलीत योगाभ्यास करीत होते. श्रीस्वामीमहाराज स्वतः खोलीत आलेले पाहताच ते तात्काळ उठून उभे राहिल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "साधलेशास्त्र्यांनी गीतार्थ सांगितला म्हणून त्यांची उत्तम संभावना करावी असा विचार मनात येऊन सीतारामाला सांगितले; परंतु तो काहीसुद्धा ऐकत नाही. तेव्हा तुझ्याजवळ शास्त्रीबुवांना देण्यासाठी काही रुपये आहेत काय ? जर तुझ्याजवळ पैसे असतील तर ते त्यांना दक्षिणा म्हणून देऊन त्यांची संभावना कर." श्रीस्वामी-महाराजांनी असे सांगताच श्रीगांडामहाराजांनी तात्काळ सकाळी धनादेशाने आलेले शंभर रुपये दक्षिणा म्हणून श्री. साधलेशास्त्र्यांना देऊन श्रीस्वामीमहाराजांची इच्छा पूर्ण केली. या सर्व हकीकतीवरून श्रीस्वामीमहाराजांपाशी श्रीसीतारामहाराजांचा प्रेमयुक्त हट्ट चालत असल्याचे दिसून येते. आश्चर्याची गोष्ट अशी की, श्रीस्वामी-

महाराजांनीही तो अखेरपर्यंन्त चालवून घेतला, हे विशेष होय. गुरु-शिष्यांचे एकमेकांवर विलक्षण प्रेम होते हेच यावरून दिसून येते.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांचे स्वरूप घेऊन अवतरलेल्या श्रीदत्तात्रेयांच्या तृतीय "योगिराज" नावाच्या देवांच्या अवताराचा व श्रीसीतारामहाराजांच्या स्वरूपाने अवतरलेल्या भक्त-शिष्यांचा जो अस्थूल पातळीवर सामरस्यात्मक व म्हणूनच रहस्यात्मक असा जो अपूर्व तत्त्वज्ञानात्मक संवाद घडला असेल त्याची प्रचीती श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांच्या "एकवीस समासी" या प्रकरण ग्रंथातील "गुरुशिष्यसंवाद" हे प्रकरण वाचले म्हणजे आल्याशिवाय राहात नाही. त्यातील पुढील काही भाग या दृष्टीने मनन करण्यासारखा आहे. तेथे ते असे म्हणतात की—

॥ गुरुशिष्यसंवाद ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

रामासि इतुकें मागावें। जे आपण रामचि व्हावें।
कां रामासि दास करावें। आपण ऐसें॥ १६.१ ॥
तूं ऐसा कां मीच असोन। त्याहून नलगे आम्हांसि आन।
तुझ्या ठायीं दासपण। आणीन तरी मी होय ॥ २ ॥
तुवां स्वामी होऊनि बैसावे। आणि आम्हांस भोंवती भोंवावें।
रागेजोनी बाहतां न यावे। हें काय बरें ॥ ३ ॥
तूं राज्य सांडूनियां जालासी उदास। तरी आम्हीही तुझेचि दास।
त्वां काय बोलिजेल बापास। तैसें आम्हीही तुज करूं ॥ ४ ॥
तुवां पाषाण तारिले। तरी आम्हीही जडजीव उद्धरिले।
तुवां देव मुक्त केले। बंधनापासूनी ॥ ५ ॥
तरी आम्हीही भाविकांसी। सोडवूंनियां मोक्षपदासी।
पाववीलें तयांसी। मागुता जन्म नाहीं ॥ ६ ॥

तुवां जरामरण केलें दुरी। ते मुळींच नाहीं आमुचें घरीं।
तूं राजा अकरा सहस्त्रवरी। तरी आम्हांसि संख्या नाहीं ॥७॥
तुवां पुरी नेली वैकुंठा। आम्ही वैकुंठीच्या बारा वाटा।
करूनि मांडिला चोहटा। तया वैकुंठाचा ॥ ८ ॥
ऐसें बोलती रामदास। निधडे सर्वस्वें उदास।
वैभव वाटे जयांस। कसपट जैसें ॥ ९ ॥
ऐसें बोलणें ऐकिलें। रामें मंदहास्य केलें।
धांवोनियां हृदयीं धरिलें। आपुलियां निजदासा ॥ १० ॥
ऐसा भक्ताचा वेळाइत। दासाभोंवतां भोंवत।
एक क्षणीं न विसंबत। भावार्थ देखोनि भुलला ॥ ११ ॥
राम दासांमध्यें उभा। तेणें दासांसि आली शोभा।
राम स्वरूपाची प्रभा। कोंदाटली सबाह्य ॥ १२ ॥
रामें आपणासारिखें केलें। दास दासपणेंसि मुकले।
रामासि मिळोनि एकचि जाले। एकपणाही वेगळे ॥ १३ ॥
स्वामीसेवकपणें आनंदले। हर्षें करूनि उचंबळले।
परस्परें गिळोनि ठेले। लोभ आला म्हणोनी ॥ १४ ॥
ऐसे देवभक्तांचें साजणें। जीव घेणें जीव देणें।
पुन्हां मागुतें येणें जाणें। न घडे कदा ॥ १५ ॥
नवविधा भक्ति याचचि कारणें। जे आपण स्वयें रामचि होणें।
स्वयेंचि रामपणें ठाकणें। स्वानुभवें करूनि ॥ १६ ॥
नवांमध्यें मुख्य नायिका। तेथें एकचि पदवी राया रंका।
ते जरी घडे तरी आशंका–। मात्रें तुटोनि जाती ॥ १७ ॥
तेथें सोवळें होऊनियां जाती। देहबुद्धि वोवाळुनियां टाकिती।
भेदरहित एकांतीं। रामाचें रूपडें पाहे ॥ १८ ॥

तेथें जे जे पवाडलें । ते ते अवघे रामचि जाहले ।
आपुलीं शरीरें पाहों गेले । तों तें पालटोनि गेलीं ॥ १९ ॥
पालट जाला देवां भक्तांसी । पालट झाला पालटासी ।
पालट जाला अनुभवासी । भेदाभेदा पालटे ॥ २० ॥
नवां खणांचिये ऊपरी । राम तयाच्या मस्तकावरी ।
आठ खणें वोलांडिल्याउपरी । नव खण चढे ॥ २१ ॥
जो आठां सोडूनि नवमासि गेला । आणि नवममस्तकीं चढला ।
तयासीच आत्माराम भेटला । परते भोंवते भोवतीं ॥ २२॥
म्हणोनि शिष्या अभेद भजनें । तुवां करावें आत्मनिवेदनें ।
भिन्नत्व अर्पूनि एकपणें । अभिन्न होऊनि असावें ॥ २३ ॥

श्रीस्वामीमहाराज मागील खेपेस म्हणजे शके १८२६ अर्थात् इ. स. १९०४ मध्ये श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे आले होते. त्यावेळी त्यांनी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज यांना दंड देऊन चतुर्थाश्रमाचा अर्थात् संन्यास धर्म शिकविला होता. त्याचवेळी त्यांनी त्यांना उपनिषदे, पंचीकरण, वार्तिके वगैरे शिकवून ध्यानसमाधीचा अभ्यासही सांगितला होता. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या या पट्टशिष्याची श्रीक्षेत्र नरसोबावाडीत स्थापना करून त्यांना उत्सवमूर्तींची नित्य पूजा हीच आपली सेवा आहे असे सांगितले व ते पुढील संचारार्थ निघून गेले इत्यादि सर्व हकीकत खण्ड २ रा पृ. ३३५ ते ३३९ पर्यंत आली आहे.

त्यानंतर श्रीस्वामीमहाराज शके १८२८ अर्थात् १९०६ मध्ये पुन्हा श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-स्वामीमहाराजांनी त्यांच्याकडून पादुका मागून घेतल्या होत्या. यासंबंधीची सर्व हकीकत खण्ड ३ रा पृ. १९७ ते २०५ वर आलेलीच आहे. श्रीदीक्षितस्वामीमहाराज आपल्याला मिळालेल्या श्रीगुरु-

पादुकांची त्रिकाळपूजा व आरती करीत असत. पुजारी लोक तर त्यांना धाकटेमहाराजच म्हणत असत व श्रीथोरल्यास्वामीमहाराजांप्रमाणेच त्यांचा मानमरातब ठेवीत असत. त्यांना पूजेला गंध, तुळशी, फुले व दिव्याला तेल, तूप वगैरे देत असत. श्रीनारायणस्वामींच्या पूजेतील बाण देवळात होता. तो सुद्धा पुजाऱ्यांनी " स्वामींचे देव स्वामींपाशीच बरे, " असे म्हणून श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांजवळच दिला. त्या बाणाची पूजा ते श्रीगुरुपादुकांबरोबरच करीत असत व श्रीनारायणस्वामींची नित्य वाचनाची श्रीगुरुचरित्राची पोथी ते नियमाने रोज वाचीत असत.

श्रीथोरलेस्वामीमहाराज हे स्वतः मुक्तमंडलचक्रवर्तीच होते. तथापि लोकसंग्रहारार्थ आणि स्वतःची आवड म्हणून त्यांनी वेदान्त, गुरू व देव यांची सेवा आमरण केली. त्यांनी आपल्याप्रमाणेच आपले पट्टशिष्य श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज यांना देखील तयार केले. त्यांनीही आपल्या श्रीसद्गुरूंची व वेदान्तशास्त्राची सेवा आमरणान्त उत्तमरीतीने केली. स्वतःच्या ज्ञानदार्ढ्यासाठी व कृतघ्नपणाचा दोष लागू नये म्हणून ज्ञानोत्तरसुद्धा त्यांनी वेदान्त, गुरू व देव यांची जी भक्ती केली ती लोकसंग्रहाच्या देखील उपयोगाची झाली. गुरुभक्तिवाचून ज्ञान हे निष्फळ ठरत असल्यामुळे मुख्यत्वेकरून ते गुरुभक्तीच करीत असत. काही ज्ञानी लोकांना सगुण पूजा किंवा भक्ती रुचत नाही. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हे तसे नव्हते. ते प्रेमळ मनाचे व मृदुस्वभावी असे ज्ञानी महापुरुष होते. सगुण भजन हा त्यांचा आवडीचा विषय होता. त्यांनी श्रीगुरुमहाराजांपासून मोठ्या आवडीने ज्या श्रीगुरुपादुका मागून घेतल्या होत्या त्याची ते अत्यंत प्रेमाने व भक्तीने त्रिकाळ पूजा यथास्थित करीत असत.

श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांचा रोजचा कार्यक्रम असा असे. सकाळी प्रातःस्नान व संध्या करून श्रीदत्तप्रभूंच्या मनोहर पादुकांवर ते रोज नियमाने जलाभिषेक करून येत असत. नंतर ते श्रीस्वामीमहाराजांच्या चरणखडावांच्या पूजेला प्रारंभ करीत असत. ते सद्गुरुचरणपादुकांना अत्यंत सावकाश पंचामृतस्नान घालून अभिषेक करीत असत. नंतर छाटीने त्या पादुका पुसून पाटावर मांडून ठेवून त्यांना अत्तर व गंध लावीत असत. मग तुळशी, बेल व सुवासिक फुले वाहून त्यांवर वस्त्रोपवस्त्रांची छाटी अशी घालीत असत की, सुपूजित पादुकांचे आपणास अष्टौप्रहर दर्शन घडावे. अशा रीतीने सुमारे अर्ध्या-पाव पादुका वस्त्रात व बाकी सर्व पादुकांचा भाग ते उघडाच ठेवीत असत. नंतर उदबत्त्या लावून तुपाचे नीरांजन एकारतीला ओवाळीत असत. पुढे फळफळावळ किंवा दूध व त्या त्या ऋतूतील मेवा ताम्हनात भरून त्याचा नैवेद्य श्रीसद्गुरुनाथ-महाराजांना अर्पण करीत. नैवेद्यानंतर ताम्हनात घृत नीरांजने पेटवून ठेवून ताम्हन हाती धरून ते उभ्याने आरती ओवाळीत असत. त्यावेळी ते श्रीगुरुकृत व स्वकृत आरत्या व स्तोत्रे देखील पुष्कळ म्हणत असत. श्रीगुरुकृत स्तोत्रे म्हणण्याची त्यांना फार आवड होती. आरत्या, स्तोत्रे व मंत्रपुष्पांजली झाल्यावर ते श्रीगुरुचण-पादुकांना अत्यंत प्रीतीने साष्टांग प्रणिपात घालून प्रदक्षिणा करीत असत व श्रीगुरुपादुकांचे तीर्थ मोठ्या प्रेमाने ग्रहण करीत असत.

याप्रमाणे श्रीगुरुपादुकांची पूजा झाल्यावर ते श्रीनारायणस्वामी-महाराजांच्या मंदिरात जाऊन तेथे श्रीस्वारीची गंधपुष्पादिकांनी पूजा करीत असत. ही पूजा झाल्यावर ते आपल्या खोलीचे दार बंद करून समाधी लावून बसत असत. त्यानंतर अकरा वाजण्याच्या सुमारास दार उघडून ते पुन्हा श्रीगुरुपादुकांची पूजा करीत. ही

पूजा झाल्यावर श्रीस्वारीला प्रथम वंदन करून नंतर श्रीरामचंद्र-योगी, श्रीनारायणस्वामी, श्रीकाशीकरस्वामी, श्रीगोपाळस्वामी, श्रीविठोबा, श्रीमौनीस्वामी व श्रीब्रह्मानंदस्वामी या सर्व स्वामींना आणि श्रीकृष्णा, श्रीजान्हवी, श्रीगणपती, श्रीअन्नपूर्णा इत्यादि सर्व देवतांना रोज जाऊन त्यांच्यापुढे हातात दंड धरून वंदन करून येत. त्यानंतर नियमित तीन घरची भिक्षा आणीत. परत आल्यावर ती भिक्षा श्रीकृष्णेच्या जलाने प्रोक्षण करून मग श्रीपादुका मंदिरात झोळी ठेवून श्रीपादश्रीवल्लभश्रीमन्नृसिंहसरस्वती श्रीदत्तात्रेय भगवंतांना त्यातील अंशतः नैवेद्य अर्पण करून; मग ती भिक्षेची झोळी श्रीगुरुपादुकांपुढे ठेवून त्यांना संपूर्ण महानैवेद्य समर्पण करीत व लगेच श्रीगुरुचरित्र व उपनिषद्भाष्य वाचीत बसत. नित्यनेमाचे वाचन झाल्यावर ते दोन वाजता भिक्षा संपवीत असत. कोणी उष्टे काढणारा नसल्यास आपण स्वतः उष्टे काढून शेण लावीत व गोग्रास गाईला देऊन झोळी धुऊन स्नान करून येत. अशा रीतीने श्रीदीक्षित-स्वामीमहाराजांचा दिवसाचा पूर्वार्ध याप्रमाणे व्यतीत होई.

श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज सायंकाळी विद्यार्थ्यांना श्रीस्वामीमहाराजांनी रचलेला "कुमारशिक्षा" या नावाचा धर्म-ग्रंथ सांगत असत. तो सांगून झाल्यावर ते सायंसंध्येला उठत असत. सायंसंध्या झाल्यावर ते श्रीगुरुपादुकांची सायंकालीन पूजा करीत असत. तिन्ही काळी पूजा करताना ते घृतनीरांजने विशेषत्वाने लावीत असत व आरत्या स्तोत्रे वगैरे अत्यंत प्रेमाने म्हणून श्रीगुरु-महाराजांना ओळवीत असत. यावेळपर्यन्त श्रीस्वारीची पालखी बहुतेक पुरी होत येई. तिसऱ्या प्रदक्षिणेच्या वेळी पूजासाहित्य घेऊन ते श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या मंदिरात जात असत. तेथे ते उत्सवमूर्तींच्या बसण्याची जागा झाडून स्वच्छ करीत व पालखीतील

मूर्तीचा पोषाख उतरून होताच उत्सवमूर्ती सिंहासनावर गाभाऱ्यात नेऊन विराजमान करीत. श्रीस्वामीमहाराजांनी आज्ञा केल्याप्रमाणे ते उत्सवमूर्तीला मोठ्या भक्तिभावाने व नानाविध वस्त्रालंकारांनी सजवीत असत.

शयनारतीपूजा झाल्यावर श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज कृष्णातीरविहारी श्रीदत्तप्रभूंना नमस्कार घालीत व मंदिराला पाच प्रदक्षिणा घालून येत. त्यानन्तर सन्निध असलेल्या भक्तांना काही वेदान्तग्रंथ समजावून सांगत व पावशेर दूध प्राशन करून स्वरूपविश्रांतीला जात असत. असा श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांचा दिनक्रम होता.

श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हे मोठे ब्रह्मज्ञानी महापुरुष असून ते श्रीदत्तप्रभूंची अभेद उपासना देखील करीत असत. या उपासनेमुळे त्यांना श्रीदत्तस्वरूपता मिळाली होती. ती अहंग्रहोपासना ते गुर्वाज्ञेनेच करीत असत. श्रीस्वामीमहाराजांचे त्यांना तसे आज्ञापत्रच आले होते. ते पत्र असे—

**“ श्रीमत्परमहंस नृसिंहसरस्वती यांस नारायण. सदा येतां जातां सर्वकाळ जे देहयत्री व्यापार होतात, त्या सर्वांचा साक्षी जो भगवान् दत्त, तदतिरिक्त मी नाहीं असें साक्ष्यनुसंधान ठेवावें. ”**

या पत्रात सर्वसाक्षी श्रीदत्तभगवान् तोच मी असे अनुसंधान म्हणजे ध्यान करण्याचा उपदेश आहे. त्याला अनुसरून जे सदासर्वदा अभेद ध्यान करीत होते, त्यांच्यावर लोकांची श्रीदत्तभावना बसणे साहजिकच होय. श्रीदीक्षितस्वामीमहाराज निर्गुण व सगुण अशा दोन्हीही भगवत्स्वरूपाशी ऐक्य पावले होते. त्यांचा अधिकार त्यांच्या गुरूप्रमाणे फार थोर होता. सर्व भूतमात्रांना ते अभ यदान देत असत.

कोणाची देखील हिंसा करीत नसत. कायावाचामनाने ते सर्वांचा संतोषच राखीत असत. त्यांच्या दर्शनानेसुद्धा जनतेला मोठे सुख होई. हातात दंडकमंडलू, कटी कौपीन, अंगावर छाटी व ललाटी भस्म लावलेली श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांची गौर-वर्णाची हसतमुखी रम्य मूर्ती प्रत्येकालाच सदासर्वकाळ दर्शनीय अशीच वाटत असे. ते सर्व सद्गुणांनी अलंकृत असून कोणताच दोष त्यांच्या ठिकाणी नव्हता. शिष्टांची सर्व लक्षणे त्यांच्या अंगी होती. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, निंदा, असूया इत्यादि सर्व विकार त्यांनी पूर्वाश्रमातच घालवून दिले होते. श्रद्धा, भक्ती, वैराग्य, शांती, दान्ती, करुणा इत्यादि सद्वृत्ती त्यांच्या अंतःकरणात घर करून राहिल्या असल्यामुळे या सर्व वृत्तींचे अपूर्व तेज त्यांच्या मुखमंडलावर झळकत असे. आहार, विहार, निद्रा वगैरे त्यांच्या सर्वच गोष्टी अगदी परिमित असत. श्रीस्वामीमहाराजांनी सांगि-तल्याप्रमाणे ते स्वतःसाठी ज्ञानसमाधीचा अभ्यास व लोकसंग्रहार्थ ज्ञानोत्तर भक्ती करीत असत. ही भक्ती समाधिविघ्ने दूर करणारी असून ती ज्ञानाच्या सात भूमिका साधून देणारी आहे असे ते निजा-चरणाने सर्वांना सुचवीत असत. अशा प्रकारे निजाचरण करून सर्वांना सुख देणारे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज गुर्वा-ज्ञेचे पालन करीत श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये शोभत राहिल्यामुळे त्या महापुण्यकारक क्षेत्राला ते एक महाभूषणच होऊन राहिले होते.

श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाप्रमाणे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-स्वामीमहाराजांनी कमालीच्या निष्ठेने, धैर्याने, दीर्घकाळ, निरंतर व श्रद्धाभक्तिपूर्वक अभ्यास करून स्थितप्रज्ञ जीवन्मुक्ताची ब्रह्म-विद्वरिष्ठ ही स्थिती प्राप्त करून घेतली होती. ब्रह्मविद्वरिष्ठ ही महासंज्ञा प्राप्त करताना जी सहा महाव्रते धारण करावी लागतात ती

सहाही महाव्रते मोठ्या साक्षेपाने त्यांनी धारण केली होती. त्यातले पहिले व्रत "अजिव्हत्व" हे असून प्राणरक्षणार्थ खात असलेल्या अन्नाला चांगले किंवा वाईट न म्हणणे आणि हित, मित, व सत्य बोलणे, हे त्याचे लक्षण आहे. दुसरे व्रत "षंढकत्व" हे असून स्त्री जन्माला आल्यावर, ती सोळा वर्षांची झाल्यावर किंवा ती म्हातारी झाल्यावर केव्हाही या तिन्ही अवस्थात दिसली असता मनात विकार उत्पन्न न होणे, हे त्याचे लक्षण आहे. तिसरे व्रत "पंगुत्व" हे असून एक योजनाचे आतच जाणे-येणे ठेवणे आणि स्नान, शौच व भिक्षेशिवाय आपला मठ न सोडणे, हे त्याचे लक्षण आहे. चौथे व्रत "अंधत्व" हे असून चालताना किंवा बसले असताना सोळा हातापेक्षा आपल्या दृष्टीला जाऊ न देणे, हे त्याचे लक्षण आहे. पाचवे व्रत "बधिरत्व" हे असून चांगल्या किंवा वाईट लोकांचे भाषण ऐकत असून देखील त्याचा कोणताच परिणाम मनावर होऊ न देणे, हे त्याचे लक्षण आहे. सहावे व्रत "मुग्धत्व" हे असून विषय सन्निध असले तरी देखील त्यांची इच्छा न धरणे आणि भोगसामर्थ्य असले तरी निद्रित पुरुषाप्रमाणे त्यांचे स्मरणसुद्धा न करणे ही त्याची लक्षणे आहेत.

श्रीस्वामीमहाराजांच्या अपार कृपेमुळे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-स्वामीमहाराजांनी ही सहा महाव्रते धारण करून सर्व संन्यासी मंडळीपुढे व इतरही सर्व साधकांपुढे स्थितप्रज्ञ जीवनमुक्त ब्रह्मविद्व-रिष्ठाचा जो महान् आदर्श उपस्थित केला, तो अपूर्व आहे यात काहीच शंका नाही. ज्या साधकांना ब्रह्मपदी नाचावयाचे आहे त्यांना ह्या सहा व्रतांच्या रूपाने असणारे लोखंडाचे चणे खाण्याशिवाय गत्यंतर नाही हे नितांत सत्य आहे. "चणे खावे लोखंडाचे। तुका ब्रह्मपदीं नाचे ॥" या श्रीसंततुकाराममहाराजांच्या उक्तीप्रमाणे

श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांनी उपरोक्त लोखंडाचे चणे खाल्यामुळेच त्यांना जीवनमुक्ती प्राप्त झाली.

श्रीस्वामीमहाराज यावेळी म्हणजे शके १८३१ अर्थात् इ. स. १९०९ मध्ये पवनीहून निघाल्यावर देवांबरोबर तीव्र झगडा करून तिसऱ्यांदा जणूकाही आपल्यासाठीच आपल्या विनंतीला मान देऊन श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले आहेत याची वारंवार जाणीव होऊन श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांच्या आनंदाला व हर्षाला पारावार उरत नव्हता. श्रीगुरुप्रेमाने भरलेले ते सागरच होते. "ज्यांच्या कृपेने जीवन्मुक्तिपदाचा अद्भुत लाभ आपणास झाला, त्यांचा मी कसा उतराई होऊ ?," असे त्यांना वाटत असे. ज्यांनी आपल्या गुरुभक्तीच्या वळावर ज्ञानाच्या सप्त भूमिका ओलांडल्या ते श्रीगुरुभक्ताग्रणी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज आपणा स्वतःला मारुतीरायाप्रमाणे मानीत असत. "देहबुद्धीने मी श्रीगुरुरायाचा दास आहे, जीवबुद्धीने मी श्रीगुरुरायाचा अंश आहे व आतमबुद्धीने मी श्रीसद्गुरुवासुदेवच आहे," अशी त्यांची श्रीस्वामीमहाराजांच्या विषयी सेव्यसेवक बुद्धी होती. त्यांच्या ठिकाणी ज्ञानाचा गर्व नव्हता. व्यवहाराने ते आपणास श्रीस्वामीमहाराजांचा दास समजत असत. मी श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबरीचा आहे, असा भाव त्यांना कधीही स्पर्श करीत नसे. श्रीस्वामीमहाराजांचे श्रीगांडामहाराज, श्रीगोविंदमहाराज पंडित वगैरे कितीतरी श्रेष्ठ शिष्य यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये जमले होते. या सर्वांमध्ये श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हेच आश्रमाने, भक्तीने व ज्ञानाने सर्वांत श्रेष्ठ होते. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना स्वीयसाम्यच दिले होते. श्री. कागलकरांनी श्रीस्वामीमहाराजांचे जे चरित्र लिहिले आहे त्यात त्यांनी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांबद्दल असे म्हटले आहे

की, " श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज गुरुनिष्ठा, गुरुप्रेम व गुरुबोध या बाबतीत श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांचे कल्याणच होत, यात तिळमात्र शंका नाही. " श्रीनृसिंहसरस्वती-दीक्षितस्वामीमहाराजांना देही असून देहधर्माला न शिवणे, कर्मी प्रवृत्त असून असंग असणे व कोणत्याही परिस्थितीत आपण निर्विकार आनंदमय राहणे या गोष्टी श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने सहज साध्य झाल्या होत्या. त्यांची योग्यता जाणणारा पुरुष या भूतलावर अगदी विरळाच होता; नाही म्हटले तरी चालेल. त्यांचे श्रीसद्‌गुरुनाथ श्रीस्वामीमहाराजच त्यांना ओळखीत होते, हेच खरे !

श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज यांची योग्यता किती मोठी होती हे पुढील प्रसंगावरून लक्षात येईल. एकदा श्री. आप्पा-साहेब भिर्डीकर हे पवनीच्या किंवा चिखलद्याच्या चातुर्मासात श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी गेले होते. त्यांनी श्रीस्वामीमहा-राजांचे दर्शन घेतल्यावर, ते श्रीक्षेत्र वाडीचे एकनिष्ठ वारकरी आहेत, हे लक्षात घेऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, " काय हो आप्पा ! वाडीहून दत्तदर्शन घेऊन आलात काय ? " श्री. आप्पासाहेब म्हणाले, " होय. " त्याचे हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना पुन्हा असे विचारले की, " दत्तदर्शन कोठे घेतलेत ? " त्यावेळी श्री. आप्पासाहेब असे म्हणाले की, " महाराज ! नेहमीप्रमाणे औदुंबराखालील श्रीमंदिरात जाऊन श्रीदत्तदर्शन घेतले. " हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " आपण यापुढे वाडीला गेलात की ब्रह्मानंदांच्या माडी-वरील खोलीत जाऊन दत्तदर्शन घेत जा. दत्तप्रभू तेथे राहतात. "

श्रीस्वामीमहाराजांचे हे वाक्य ऐकताच श्री. आप्पासाहेब मनांत समजले की, श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हेच दत्तप्रभू

असून यापुढे वाडीला गेल्यावर त्यांचे दर्शन घेऊन त्यांची सेवा करण्यासंबंधी श्रीस्वामीमहाराजांनी आपणास बोध केला आहे. हे सर्व लक्षात घेऊन श्री. आप्पासाहेब भिर्डीकर श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "महाराज! यापुढे वाडीला गेलो की, आपल्या आज्ञे-प्रमाणे ब्रह्मानंदांच्या माडीवरील खोलीतच श्रीदत्तप्रभूंचे दर्शन घेत जाईन." पुढे ज्या ज्या वेळी श्री. आप्पासाहेब श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येत असत त्या त्या वेळी ते श्रीब्रह्मानंदांच्या मठातील माडीवर जाऊन श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांचे अत्यंत भक्तीने व प्रेमाने दर्शन घेत असत. कालौघात श्री. आप्पासाहेबांचे त्यांच्यावर इतके प्रेम बसले की, श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हेच श्रीस्वामीमहाराज व श्रीदत्तप्रभू आहेत अशी त्यांची भावना झाली. पुढे इ. स. १९१४ नंतर श्रीस्वामीमहाराजांच्या पुण्यतिथीच्या खर्चा-साठी श्री. आप्पासाहेब भिर्डीकर श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामी-महाराजांना दरसाल शंभर रुपये देऊ लागले व जेव्हा ते पुढे अमरा-पुरात राहावयास गेले तेव्हा ती रक्कम श्रीक्षेत्र नरसोबावाडीत न देता तिकडेच त्यांच्यापाशी देऊ लागले. श्री. आप्पासाहेब भिर्डीकर यांची श्रीस्वामीमहाराजांच्या वचनावर अशी एकांतिक निष्ठा होती.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर नेहमी-प्रमाणे श्रीब्रह्मानंदांच्या मठात माडीवर राहिले. श्रीस्वामीमहा-राजांच्या या सर्व चार महिन्यांच्या मुक्कामात श्रीनृसिंहसरस्वती-दीक्षितस्वामीमहाराजांनी त्यांची सेवा करून जो श्रीगुरुसेवेचा आदर्श उपस्थित केला तो अपूर्व व अनुकरणीय आहे यात तिलःप्राय शंका नाही. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज रोज प्रातःस्नानाच्या वेळी श्रीकृष्णेवर सोवळ्याने श्रीगुरुनाथांना दंड, छाटी, कौपीन, भस्म, कटिसूत्र वगैरे स्वतः नेऊन देत असत. श्रीस्वामीमहाराज

मठात आल्यावर ते त्यांना आसन मांडून व त्यांच्यापुढे संध्येची काष्ठपात्रें ठेवून त्यांच्या दंडाला परशुमुद्रा बांधून देत. त्यानंतर ते त्यांच्यापुढे श्रीदत्तप्रभूंच्या अंगाऱ्याचा डबा ठेवीत असत. श्रीस्वामीमहाराज त्या डब्यातीलच अंगारा भक्तमंडळींना त्यांच्या मनोरथ-पूर्तीकरिता व रोगनिवारणार्थ देत असत. ज्यावेळी भाष्याचा पाठ सुरू होण्याची वेळ येत असे त्यावेळी ते श्रीस्वामीमहाराजांना उपनिषद्ग्रंथ नेऊन देत असत. तो समोर घेऊनच श्रीस्वामीमहाराज भाष्य सांगत असत. सायंकाळी श्रीस्वामीमहाराज ज्यावेळी संध्ये-साठी संगमावर जाण्यासाठी निघत असत त्यावेळी त्यांचा दंड आपण घेऊन ते त्यांच्याबरोबर जात असत.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या परमप्रिय शिष्या-कडून काही दिवस सेवा घेतल्यावर एक दिवस ते त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही जी स्वारीची पूजा, शेजारती व आपले स्वधर्मानुष्ठान करता तीच आमची सेवा होय. तिनेच आमचा संतोष होतो." असे म्हणून यापुढे अधिक सेवा करू नये असेच त्यांनी त्यांना सूचित केले. आपल्या शिष्याच्या संतोषार्थ श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या-कडून चार दिवस जरी सेवा घेतली तरी अशी सेवा करून घेणे त्यांना मान्य नव्हते. पुढे संगमावर सायंसंध्येला जाताना आपला दंड ते त्यांना घेऊ देत असत; कारण "कृतीने श्रीगुरुभक्ती केल्याशिवाय कोणाचेही समाधान होत नाही, तसेच आपल्या शिष्याचे तरी कसे होणार ?" असा विचार त्यांनी केला.

श्रीस्वामीमहाराजांचे श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजां-वर अतिशय प्रेम असल्यामुळे ते त्यांना आपल्याबरोबर भिक्षेला नेत असत व भिक्षान्न सेवन करताना ते आल्याशिवाय भिक्षा ग्रहण करीत नसत. त्यांची संध्या पूर्ण झाल्याशिवाय श्रीस्वामीमहाराज

ग्रंथ निरुपणास सुरुवात करीत नसत. ते आल्यावरच प्रवचन सुरू करीत असत. यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी सकाळी "काठकोपनिषदाचे भाष्य" व "सूत्रवृत्ती" यांच्या अर्थाचे कथन केवळ श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांसाठी सुरू केले होते. गुरुमुखाने भाष्यार्थ श्रवण करण्याची त्यांची आवड अशा रीतीने श्रीस्वामीमहाज पूर्ण करीत होते. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या गळ्यातील प्रेममणीच शोभत असत. त्यांना ते आपल्या शेजारी बसवून घेऊन त्यांच्या हातात भाष्याचे एक पुस्तक देऊन नंतर शांती म्हणून भाष्य सांगत असत.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीला सकाळी चालणाऱ्या या भाष्यपाठाच्या वेळी इतर शास्त्री शंका विचारून प्रश्नोत्तरे करीत असत; पण श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज नुसते गुरुमुखातून निघणारे बोधामृत पीत असत. त्यांची समाधी श्रवणकाली लागू लागली; तर ती ते दूर सारण्याचा प्रयत्न करीत. श्रीगुरुवचन लाभापुढे त्यांना समाधीही तुच्छ वाटे. श्रीस्वामीमहाराज व श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हे दोघेही गुरुशिष्य एकमेकाकडे कधी टक लावून पाहात नसत व एकमेकांबरोबर फारसे बोलतही नसत. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज म्हणजे गुरुमर्यादेची केवळ मूर्तीच होते. दोघेही गुरुशिष्य सर्व लोकांना नेहमीच सतेज व सुंदर दिसणारे आणि दर्शनाने व भाषणाने मनाला आल्हाद देणारे असे असून साक्षात् श्रीदत्तमूर्तीच भासत असत. अशा प्रकारे परस्परांवर प्रेम करणारे, ब्रह्मानंदाचे पूर्ण सागर, समाधिसुखाचे डोल देणारे, शांत, दान्त व परमहंसवर्य असे हे महान् गुरुशिष्य सर्वांना वंदनीय व सेवनीय झाले होते.

श्रीस्वामीमहाराज व श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज या नावाने व बाह्यत: शरीररूपाने भिन्न दिसणाऱ्या या श्रीगुरुशिष्यांची अलौकिक अशी अंतरंग लीला चाललेली होती, याचा प्रत्यय एकदा श्रीस्वामीमहाराजांच्या उद्गारावरूनच लोकांना आला. श्रीस्वामी-महाराज प्रवासात असताना एकदा गलगली येथे आले होते. त्यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीची श्री. आण्णादीक्षित वगैरे पुरुष व श्री. हवळे पुजाऱ्यांची श्रीमती अंबू व तुळशी इत्यादि स्त्रिया अशी काही मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनार्थ आली होती. या सर्वांनी त्यांचे दर्शन घेतल्यावर त्यांना असे विचारले की, "महाराज ! आम्हाला आपले दर्शन झाले; पण श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामी-महाराजांना दर्शन देण्यासाठी आपण वाडीला कधी येणार ?" त्या लोकांचा हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना हसून असे म्हणाले की, "नृसिंहसरस्वतीस्वामींना आमचे दर्शन रोज त्यांच्या खोलीत होत असते. पाहिजे तर त्यांनाच जाऊन विचारा म्हणजे तुमची खात्री होईल." श्रीस्वामीमहाराजांनी दिलेले हे उत्तर ऐकताच गुरुशिष्यांची अंतरंग लीला किती अद्भुत, अलौलिक व लोकोत्तर असेल याचा प्रत्यय येऊन सर्वजण अगदी स्तब्ध, दिङ्मूढ आणि आश्चर्यचकित झाले.

त्यावेळी श्रीमती अंबूताई व श्रीमती तुळशीताई यांनी श्रीस्वामी-महाराजांना काही बोध करावा म्हणून प्रार्थना केली. ही प्रार्थना ऐकून त्यांनी त्यांना अत्यंत प्रेमाने बोधपर असा एक अभंग रचून दिला. श्रीस्वामीमहाराजांनी स्त्रियांकरिता रचलेला हा अभंग स्त्रीचरित्ररूपानेच बनला आहे. तो असा आहे.

## ।। अभंग ।।

भवसिंधुमाजीं । पडलें मी आतां । काढी वर ताता । हातां धरूनी ।।१।।
धरूनियां कर । तूंचि कृपा कर । काढीं मज वर । दरहरा ।। २ ।।
हरावया कष्ट । मुलीचे गुरु बाप । मग आपोआप । धावें त्वरें ।।३।।
त्वरें धावोनीयां । आली गुरुमाय । मुलीचा अपाय । हरावया ।।४।।
कां ग बोरळसी । काय झाले तुज । त्वां उगीच आज । गांजवीलें ।।५।।
झाडावर नर । चढुनीयां खालीं । पाहूनी आपली । पडछाया ।। ६ ।।
पडलों प्रवाहीं । बुडतों मी आतां । धांवा हो वरता । काढा म्हणे ।।७।।
तेणेंपरी तुझें । असें हें वचन । व्यर्थ तूं भुलून । बोभाटसी ।। ८ ।।
बुद्धिसिंधुमाजीं । निजप्रतिबिंब । पाहुनीयां क्षोभ । पावलीस ।। ९ ।।
मी ही उपजली । एवढी वाढली । बळकट झाली । प्रौढ आतां ।।१०।।
आतां मी भागली । आतां वृद्ध झाली । आतां मी रोडली । झाली दीना
माझा परिवार । हा, हें माझें घर । पडलें अंतर । जिवलग्याचें ।।१२।।
सर्व लटिकें हें । भासतसे मोहें । आतां चित्ती घे हें । माझें वाक्य ।।१३।।
पूर्वी अहंकार । निजरूपावर । कल्पिला तो घोर । दर दावी ।।१४।।
आपुले तादात्म्य । या अहंकाराशीं । त्यामुळें देहाशीं । यावत् कर्म ।१५।
जीवाशीं तादाम्य । सहज असे हें । जन्मोजन्मीं राहे । नोहे नष्ट ।। १६।।
साक्षी आत्मयाशीं । तादात्म्य भ्रमानें । नासें तेंचि ज्ञानें । गुरुकृपें ।१७।
झाडावर मी हा । न पडलों जळीं । जाणे तयेवेळीं । भ्रम सोडी ।।१८।।
तेवीं गुरुवाक्या । परिसूनी "साक्षी । मी" असे निरीक्षी । अंतरदृष्टी
असें तूं आपणा । आपण जाणून । भ्रम निरसून । होई मुक्त ।।२०।।
वासुदेव म्हणे । माझा हा विमल । मनिं धरि बोल । फोल नोहे ।।२१।।

श्रीमती अंबूताई व श्रीमती तुळशीताई यांच्यासाठी करून दिलेला हा अभंग सर्वांनीच हृदयी धारण करण्याला योग्य आहे यात काहीच शंका नाही.

श्री. बाबूराव शिरोळकर हे रोज पहाटे देवांची काकड आरती करीत असत. ती श्रीस्वामीमहाराजांना अत्यंत आवडत असल्यामुळे ते मोठ्या प्रेमाने ती ऐकून घेत असत. श्री. गणेशशास्त्री शिरोलीकर हे फारच उत्तम कीर्तन करीत असत. एके दिवशी त्यांच्यावर प्रसन्न होऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आपली छाटी प्रसाद म्हणून दिली व ते त्यांना असे म्हणाले की, “ गणेशशास्त्री ! आमची ही छाटी आपण मस्तकाला बांधून कीर्तन करावे. ” श्रीस्वामीमहाराजांनी आपणहून आपल्यावर कृपा करून आपल्याला छाटी प्रसाद म्हणून दिली हे पाहून श्री. गणेशशास्त्रींच्या आनंदाला पारावार राहिला नाही. त्या दिवशी श्री. गणेशशास्त्री हे श्रीस्वामीमहाराजांनी दिलेली छाटी डोक्याला बांधून जेव्हा कीर्तनाला उभे राहिले त्यावेळी नानाविध राग, शब्द, पदे, शास्त्रे इत्यादि सर्व जणूकाही आपल्यापुढे हात जोडून उभे आहेत असा विलक्षण प्रत्यय त्यांना आला. श्री. गणेशशास्त्र्यांचे त्या दिवशीचे कीर्तन इतके रंगले की, त्यामुळे श्रीस्वामीमहाराज अत्यंत संतुष्ट झाले. ही सर्व श्रीस्वामीमहाराजांच्या छाटीचीच किमया आहे याची श्री. गणेशशास्त्र्यांना पूर्ण जाणीव झाली. त्या दिवसापासून श्री. गणेशशास्त्र्यांनी कोठेही कीर्तन केले; तरी त्यांच्या कीर्तनाला रंग येऊ लागला.

श्री. गणेशशास्त्र्यांना मनातून कशाची तरी अज्ञात भीती सतत वाटत असे. ही भीती जणूकाही आपला सतत पाठलाग करीत आहे व आपणास एक क्षणभर देखील चैन पडू देत नाही म्हणून त्यांनी खूप उपाय केले होते; पण त्यांना गुण आला नाही. शेवटी श्रीस्वामीमहाराजच आपल्याला आपल्या मनातील भीती नाहीशी होण्याचा उपाय सांगतील याची खात्री वाटून त्यांनी त्यांना उपाय विचारला असताना श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना नित्य म्हणण्यासाठी एक

अभंग तयार करून देऊन ते त्यांना असे म्हणाले की, " आपण हा अभंग नित्य म्हणालात म्हणजे आपल्या मनातील भीती कायमची दूर होऊन आपले अंत:करण निर्भय बनेल. " तो अभंग असा आहे—

## ॥ अभंग ॥

भयाचें जें भय। भक्तां दे अभय। ते हे दत्तात्रेय। पाय वंद्य ॥१॥
भासे जें द्वितीय। तेंचि दावी भय। म्हणून हे पाय। ध्यावे चित्तीं ॥२॥
मुळी नसे द्वय। तेथें कैसें भय। बाळा जेवीं द्वय। भासे छाया ॥ ३ ॥
पाहुनी साऊली। बाळक आपुली। भीतसें ही बोली। हो मायिक ॥४॥
अंतर्दृष्टीने हें। गुरुपद ध्यातां। भयाची न वार्ता। काळत्रयी ॥ ५ ॥
वासुदेव म्हणे। स्वाभिन्न हें पद। ध्यातां भय खेद। भेद कैंचा ॥६॥

ज्या साधक भक्तांच्या अंत:करणात भीती असेल त्यांना आपल्या मनातील भीती दूर करण्यासाठी उपरोक्त पदाच्या रूपाने एक अमोघ साधन मिळाले आहे यात काहीच शंका नाही. या साधनाचा उपयोग करून श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्यांना निर्भयता प्राप्त व्हावी म्हणून त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

श्री. आनंदराव या नावाचे बडोद्याचे एक नोंदणी अधिकारी अत्यंत धार्मिक वृत्तीचे असून मोठे दत्तभक्त होते. एकदा त्यांना देवांनी दृष्टान्त देऊन असे सांगितले की, " गांडाबुवांच्यासह नाशिकची यात्रा कर. " अशा रीतीने देवांनी दृष्टान्त देऊनही त्यावेळी रजा न मिळाल्यामुळे देवांच्या आज्ञेप्रमाणे श्री. आनंदराव नाशिकची यात्रा करू शकले नाहीत. श्री. आनंदरावांनी आपले ऐकले नाही, हे पाहून देवांनी त्यांना शिक्षा करण्याचे ठरविले. त्यामुळे प्रथम त्यांची पत्नी मरण पावली व नंतर त्यांची नोकरी गेली. शेवटी त्यांना संग्रहणीचा विकार होऊन त्यांना रोज दोन दोन

शेर कफ पडू लागला. अशा रीतीने श्री. आनंदराव यांची अगदी आसन्नमरण स्थिती झाली. डॉक्टर वैद्यांनी तर त्यांचे आयुष्य फार थोडे उरले आहे असा निर्णय दिला.

अशा स्थितीत श्री. आनंदरावांनी एके दिवशी रात्री देवांची करुणा भाकली व आज्ञाभंगाच्या चुकीबद्दल क्षमा करावी म्हणून अत्यंत दीनतेने प्रार्थना केली. या प्रार्थनेमुळे द्रवून जाऊन देवांनी त्यांना दृष्टान्त देऊन असे सांगितले की, " सध्या नरसोबावाडीला वासुदेवानन्दसरस्वती हे गांडाबुवांसह आलेले आहेत. त्या ठिकाणी जाऊन त्यांचे दर्शन घे व ते जो उपाय सांगतील तो कर म्हणजे तुझी सर्व व्याधी दूर होऊन परिस्थिती पूर्ववत् उत्तम होईल. "

श्री. आनंदराव यांनी यावेळी देवांनी दृष्टान्ताच्या द्वारा दिलेली आज्ञा शिरोधार्य मानली व पूर्वीप्रमाणे आज्ञाभंगाचे पातक घडू नये म्हणून ते तात्काळ श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले. तेथे त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे व श्रीगांडामहाराजांचे दर्शन घेऊन श्रीस्वामी-महाराजांना आपली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकताच श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, " श्रीदत्त पादुकांवर महारुद्राभिषेक करा म्हणजे आपल्याला बरे वाटेल व आपली सर्व परिस्थिती सुधारेल. " इतके सांगून श्रीगांडामहाराजांना बोलावून ते असे म्हणाले की, " यांना तू औषध दे म्हणजे यांची प्रकृती सुधारेल व ते बरे होतील. "

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. आनंदरावांनी देवांची क्षमापूर्वक प्रार्थना करून महारुद्राभिषेक केला. त्याचप्रमाणे श्रीगांडाबुवांनी त्यांना सांगितल्याप्रमाणे त्यांनी चित्रकाचे मूळ रोज ताकात उगाळून ते भातात घालून खाल्ले. याप्रमाणे श्री. आनंदराव यांनी श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे उपासना व औषध

अशा द्विविध उपयांचे अवलंबन करताच त्यांची सर्व रोगातून मुक्तता झाली व त्यांना पुन्हा पूर्वीची नोकरीही परत लागली. शेवटी श्रीस्वामीमहाराजांची परवानगी घेऊन ते बडोद्याला परत येऊन आपल्या कामावर रुजू झाले.

कोकणात सावन्तवाडीजवळ आरोस नावाचे एक रमणीय गाव आहे. तेथे नारळी-पोफळीची मोठी बागबागायत आहे. अशाच एका बागायतीबद्दलचा दावा सावंतवाडीच्या कोर्टात इ. स. १८६० च्या सुमारास चालला होता. श्री. सखारामभट तुळपुळे व श्री. गणेशभट तुळपुळे या दोघा भावांमधील हा भाऊबंदकीचा दावा असून श्री. गणेशभटजींनी कोर्टापुढे खोटा पुरावा सादर करून श्री. सखारामभटजींची जमीन, शेतीवाडी व बागबागायत इत्यादि सर्वच गिळंकृत केले. आपले सर्वस्व गेल्याच्या धक्याने श्री. सखारामभट आजारी पडले व मृत्युपंथाला लागले. मृत्यूसमयी "माझ्या बागायतीतील एका नारळाचे पाणी तरी माझ्या तोंडात घाल," असा निरोप श्री. सखारामभटजींनी श्री. गणेशभटजींना पाठविला; परंतु या निरोपाने त्यांचे मन द्रवले नाही. श्री. गणेशभटजींनी खोटेनाटे करून कोर्टातून ही सर्व मालमत्ता मिळविली असल्यामुळे त्याबद्दलची त्यांची अभिलाषा इतकी तीव्र होती की, "अर्धे राज्य काय; पण सुईच्या अग्रावर राहील एवढी माती सुद्धा देणार नाही," अशा आविर्भावात व विचारात त्यांनी श्री. सखारामभटजींना असा निरोप पाठविला की, "एका नारळाचे पाणीच काय; पण त्यातील एक थेंबसुद्धा तुला मिळणार नाही हे लक्षात ठेव."

श्री. सखारामभटजींची बागाईत जमीन हरण केली गेल्यामुळे व त्यांची शेवटचीही इच्छा अपूर्ण राहिल्यामुळे ते पिशाच्च झाले. त्या योनीत गेल्यावर त्यांनी श्री. गणेशभटजींना छळावयास सुरुवात

केली. त्या पिशाच्चाने प्रथम श्री. गणेशभटजींच्या मंडळींना व नंतर त्यांच्या मुलाला मारले. शेवटी पिशाच्चाने छळल्यामुळे श्री. गणेशभटजींचाही अंत झाला. परंतु पिशाच्चाने त्या घराला छळण्याचे थांबविले नाही. श्री. गणेशभटजींच्या नंतर श्री. सखारामभटजींच्या पिशाच्चाने त्यांचा नातू श्री. नृसिंहभटजी यास छळण्यास सुरुवात केली. त्या छळाने श्री. नृसिंहभटजींचा मृत्यू झाल्यावर ते पिशाच्च पुढे श्री. नृसिंहभटजींचा मुलगा श्री. गणपतीभटजी यांना त्रास देऊ लागले.

आपल्या घराण्याच्या मागे लागलेली ही पिशाच्चाची पीडा कायमची दूर व्हावी व आपलीही त्याच्या त्रासातून सुटका व्हावी म्हणून श्री.गणपतीभट श्रीस्वामीमहाराज पवनीला असताना त्यांच्या दर्शनाला गेले होते. तेथे त्यांनी आपली सर्व कहाणी श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घालून त्यांच्या चरणी अशी प्रार्थना केली की, "महाराज! आपण माझ्यावर कृपा करून माझी या पिशाच्च बाधेपासून सुटका करा व माझ्या घराण्याच्या मागे लागलेली ही पीडा दूर करून मला भयमुक्त करा. आपण कृपा केली; तरच हे शक्य आहे. अन्यथा या भूतलावर दुसरा कोणीही ही दुर्घट पीडा दूर करील असे मला वाटत नाही." श्री. गणपतभटजींची ही प्रार्थना ऐकल्यावर अंत:करणात कणव उत्पन्न होऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना पिशाच्चपीडापरिहारक असे एक अनुष्ठान श्रीक्षेत्र नरसोबावाडीस जाऊन करण्यास सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांनी आज्ञा दिल्याप्रमाणे श्री. गणपतीभटजी पवनीहून निघून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले व तेथे त्यांनी श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेले अनुष्ठान संकल्पपूर्वक सुरू केले. श्री.गणपतीभटजींनी अनुष्ठान सुरू केल्याबरोबर पिशाच्चाने त्यांच्या

अंगावर सूज उत्पन्न केली. यामुळे त्यांना काहीच अनुष्ठान करता येईना. अशा रीतीने व्याधीने पीडित झाल्यामुळे श्री. गणपतीभटजींनी अनुष्ठान सोडून दिले व ते स्वस्थ बसून राहिले.

श्रीस्वामीमहाराज पवनीचा चातुर्मास संपल्यानंतर ज्यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले त्यावेळी श्री. गणपतीभटजींनी त्यांचे दर्शन घेऊन त्यांना असे सांगितले की, "महाराज ! पिशाच्चाने माझ्या अंगावर सूज उत्पन्न केल्यामुळे आपण सांगितलेले अनुष्ठान काही मी येथे करू शकलो नाही. माझ्या अंगावरील सूज जावी म्हणून श्रीगांडामहाराजांनी औषध दिले होते. त्यामुळे एक दिवस आराम वाटला; पण दुसऱ्या दिवशी सूज दुप्पट झाली. खरे म्हणजे माझ्या मागील पीडा दूर होण्याऐवजी ती वाढतच चालली आहे. तरी आपण मला या त्रासातून मुक्त करावे अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे."

अशा रीतीने श्री. गणपतीभटजींनी प्रार्थना केल्यावर श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "आता आमचा मुक्काम येथे आहे. तरी आपण तीन लक्ष गायत्री जप व ४९ श्रीगुरुचरित्राचे सप्ताह करा. म्हणजे आपली व्याधीतून व पीडेतूनही मुक्तता होईल."

श्रीस्वामीमहाराज श्री. गणपतीभटजींना इतके सांगतात न सांगतात तोच ते पिशाच्च त्यांच्या अंगात प्रवेश करून श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणाले की, "महाराज ! तुम्ही याची बाजू घेऊन पक्षपात करू नका. याच्या आजाने माझी जमीन, शेतीवाडी, बागायत इत्यादि सर्व गिळंकृत केले आहे. त्यामुळे मी याला ठार मारणार आहे." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्या पिशाच्चाला असे म्हणाले की, "याला ठार मारून तुला काय मिळणार आहे ?

त्या ऐवजी याने जर अनुष्ठान केले तर तुझी या नीच योनीतून सुटका होऊन तुझा पुढील मार्ग मोकळा होईल व हाही मोकळा होऊन दोघांचेही कल्याण होईल. पाच ब्राह्मण घेऊन तो अनुष्ठान करील. अन्यथा आम्ही आमच्या भक्ताचे रक्षण केल्याशिवाय राहणार नाही." श्रीस्वामीमहाराजांचे हे म्हणणे ऐकल्यावर आपण आपल्या नीच अशा पिशाच्च योनीतून सुटणेच योग्य आहे असा विचार करून ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "ब्राह्मण जपसंख्या पूर्ण करीत नाहीत. सप्ताह करताना काही काही पाने वाचावयाची मध्येच सोडून देतात. तरी आपण सांगितलेले अनुष्ठान यानेच केले पाहिजे. ते ब्राह्मणांकडून करवून घेऊ नये. याने गायत्रीचा पाऊण लाख जप व श्रीगुरुचरित्राची ४९ पारायणे केली म्हणजे पुरे; कारण याने एवढे केले तरी माझी या योनीतून सुटका होईल." इतके सांगून तो श्रीस्वामीमहाराजांना पुन्हा असे म्हणाला की, "महाराज! आपण सांगितल्याप्रमाणे हा अनुष्ठान करील अशी माझी खात्री आहे; तरी आपण मला तीर्थ द्या म्हणजे मी याचा देह सोडून जातो. याने अनुष्ठान पूर्ण केले व तत्प्रीत्यर्थं ब्राह्मण समाराधना केली की, मला या योनीतून मुक्ती मिळेल." त्या पिशाच्चाने सांगितल्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी त्याला तीर्थ दिल्यावर ते श्री. गणपतीभटजींचे शरीर सोडून निघून गेले.

त्यानंतर श्रीस्वामीमहाराज श्री. गणपतीभटजींना असे म्हणाले की, "पिशाच्चाने जरी तुम्हाला गायत्रीचा पाऊण लाख जप करावयास सांगितला असला; तरी "कलौ चतुर्गुणं प्रोक्तं" या शास्त्रवचनाप्रमाणे आपण तीन लक्ष गायत्री जपसंख्या व ४९ श्रीगुरुचरित्र सप्ताह करा म्हणजे आपली सर्व व्याधी दूर होऊन

व आपली या पिशाच्चपीडेतून मुक्तता होऊन आपल्या सर्व घराण्याच्या मागचा त्रास कायमचा दूर होईल."

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे पुढे श्री. गणपतीभटजींनी अनुष्ठान पूर्ण केले व पिशाच्चाच्या इच्छेप्रमाणे ब्राह्मणसमाराधनाही केली. त्यामुळे ते व त्यांचे सर्व घराणे पिशाच्चपीडेतून मुक्त झाले व श्री. सखारामभटजीही पिशाच्च योनीतून मुक्त झाले.

सातारा जिल्ह्यातील कोरेगावचे श्री. बोकील म्हणून एक गृहस्थ तासगावच्या मुन्सफ न्यायालयामध्ये कारकून होते. श्री. बोकील व त्यांची सौ. धर्मपत्नी हे दोघेही श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त होते. आपल्याला चांगला भगवद्भक्त मुलगा व्हावा म्हणून ते दोघे नेहमी देवाची प्रार्थना करीत व श्रीस्वामीमहाराजांची मनःपूर्वक सेवा करीत असत. अशा रीतीने सेवा व प्रार्थना करता करता काही दिवस गेल्यावर त्यांना एक कन्या झाली. त्या मुलीचे नाव त्यांनी गोदावरी असे ठेवले. सर्वजण व आईवडील सुद्धा तिला गोदू या नावानेच हाक मारीत असत.

या मुलीचे दुर्दैव असे की, या मुलीला जननेंद्रियच नव्हते. असे असले; तरी देवाजवळ व श्रीस्वामीमहाराजांजवळ आपण मुलगा मागितला असता त्यांनी आपणास अशी मुलगी दिली म्हणून ते यत्किंचितही असंतुष्ट व नाराज झाले नाहीत. श्रीस्वामीमहाराजांनी जो व जसा प्रसाद तिला तसाच त्यांनी तो गोड मानून घेतला.

कालौघात गोदावरी मोठी झाली. तिच्या आईवडिलांनी तिचे हे व्यंग वरपक्षाला न सांगताच त्या काळच्या प्रथेला अनुसरून तिचे लग्न आठव्या-नवव्या वर्षीच लावून दिले. पुढे गोदावरीला समज आल्यावर आपण स्त्री नसून पुरुष आहोत असे तिला वाटू लागले. आपल्या अंतर्मनाला वाटणारी व जाणवणारी गोष्ट तिने प्रथम

सासरच्या मंडळींना सांगितली; परंतु तिच्या बोलण्याकडे कोणीच लक्ष दिले नाही. उलट सर्वांनी तिची उपेक्षाच केली. आपल्या बोलण्याकडे सासरची माणसे लक्ष देत नाहीत असे पाहून तिने आपली ही भावना आपल्या आईवडिलांना पत्र लिहून कळविली; पण त्यांनीही तिच्याकडे लक्ष दिले नाही. आपल्याला जाणवणाऱ्या अंतर्भावनेची कोणीही दखल घेत नाही असे लक्षात आल्यावर ती स्वत:च मिरजेला येऊन तेथील दवाखान्यात दाखल झाली. तेथे तिने आपली सर्व हकीकत डॉक्टरांच्या कानावर घातली. डॉक्टरांनीही तिची तपासणी करून तिच्यावर शस्त्रक्रिया केली. या शस्त्रक्रियेनंतर ती मुलगी नसून मुलगाच आहे असे सिद्ध झाले.

आपले पुरुषात रूपान्तर झाल्यावर गोदावरी आपल्या आईवडिलांकडे परत आली. तिने आपली सर्व हकीकत आपल्या आईवडिलांना सांगितल्यावर देवांच्या व श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने आपणास मुलगी झाली नसून मुलगाच झाला आहे, याची त्या उभयतांना जाणीव होऊन त्यांना परमानंद झाला. दुसऱ्याच दिवशी वकील पतिपत्नी आपल्या मुलाला घेऊन श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आली. त्यांनी एकंदर घडलेली सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांना सांगितली व शेवटी ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज! आपल्या कृपेने आम्हाला मुलगा मिळाला, आम्ही अगदी धन्य झालो. आता या मुलावर आपण कृपादृष्टी ठेवून त्याचे सर्व आयुष्य सुखी करावे अशी आपल्या चरणी प्रार्थना आहे." श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलाची एकंदर सर्व हकीकत व त्याच्या आईवडिलांनी केलेली प्रार्थना ऐकून श्रीक्षेत्र नरसोबावाडीतच त्या मुलाचे मुंजीपर्यन्तचे मागील राहिलेले सर्व संस्कार करून मुंजही केली. त्यावेळी त्या मुलाचे वय १५ वर्षांचे होते. कालौघात हा मुलगा

मोठा झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्याचे लग्न झाले व त्याचा सर्व संसार उत्तम झाला. एवढेच नव्हे; तर श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाबलाने त्याच्या ठिकाणी अपूर्व व लोकोत्तर भगवद्-भक्ती उत्पन्न होऊन त्याचे जीवन धन्य व कृतार्थ झाले.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचा वाडीतील काल चालला असता शके १८३१ हे कालचक्रात विलीन झाले. शके १८३२ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदेला म्हणजे गुढी पाडव्याला श्रीपादुकांसमोर बसून नूतन वर्षाच्या पंचांगाचे वाचन झाले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज तेथे उपस्थित होते. त्यांनी सर्वरोगशमनार्थ कडुलिंबाच्या पानामध्ये मिरी, हिंग, मीठ, जिरे व ओवा वाटून त्याचा प्रसाद सर्वांना दिला.

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे असताना एके दिवशी श्रीअक्कलकोटस्वामीमहाराजांचे एक शिष्य श्री. दत्तुशास्त्री साधले, बावडेकर हे त्यांच्या दर्शनासाठी आले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! मला या ठिकाणी सोमयाग करावयाचा असून तो झाल्यावर माझी संन्यास घेण्याची इच्छा आहे. या दोन्ही गोष्टी आपल्या अधिपत्याखाली व्हाव्यात अशी इच्छा आहे." श्री. दत्तुशास्त्री यांचे हे म्हणणे ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "या तीर्थामध्ये श्रीदत्तप्रभू संन्यासी वेषाने राहात असल्यामुळे येथे पशुयाग करणे योग्य होणार नाही. मागे असाच रामभाऊ कवीश्वर यांनी देवांच्या इच्छेविरुद्ध या क्षेत्रात सोमयाग केल्यामुळे त्याचे फार वाईट फळ त्यांना भोगावे लागले होते. ही गोष्ट सर्वश्रुत असून ती आपल्या कानावर असेलच. शिवाय आपण अक्कलकोट-स्वामीमहाराजांचे परमभक्त असून ते तर साक्षात् दत्तावतारच आहेत ! आपण अक्कलकोटला जाऊन त्यांची या यागासाठी पर-

वानगी घेऊन या. जर त्यांनी आपल्याला या क्षेत्रात सोमयाग करण्यास परवानगी दिली तर मग आपण अवश्य येथे याग करण्यास हरकत नाही." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगून आपणास आपल्या इच्छेप्रमाणे येथे सोमयाग करण्यास नकार दिला हे पाहून श्री. दत्तुशास्त्री साधले हे फार नाराज झाले.

उपरोक्त कथा वाचली म्हणजे "अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ साधनपाद २.३० ॥" व "जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम् ॥ ३१ ॥" ही पातंजल योगसूत्रात महर्षी पतंजलींनी सांगितलेली दोन सूत्रेच पुढे ठेवून श्रीस्वामीमहाराजांनी श्री. साधलेशास्त्र्यांना उपदेश केला होता हे स्पष्ट आहे. या सूत्राचा अर्थ असा आहे की, अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हे यम असून जात, देश, काळ आणि वेळ या सर्व बंधनांनी रहित असलेले व संपूर्णतया लागू असणारे म्हणजे उपरोक्त कोणत्याही गोष्टींमुळे खंड पडू न देता सर्व अवस्थांमध्ये या यमांचे पालन करणे हे महाव्रत आहे. यज्ञातील हिंसा ही श्रीस्वामीमहाराजांना मान्य नसल्यामुळे व जीवनात अहिंसेची परमसिद्धी व्हावी अशी त्यांची संकल्पना असल्यामुळेच त्यांनी सोमयागाला मोडता घातला होता.

वास्तविक पाहता अहिंसेची सिद्धी करून तसा परमादर्श समाजात उपस्थित करण्यासाठीच श्रीस्वामीमहाराजांचा अवतार या भूतलावर झाला होता हेच खरे आहे. ज्याला अध्यात्माच्या अंतिम अशा सामरस्यात्मक अवस्थेपर्यंत पोहोचावयाचे आहे त्याने उपरोक्त पातंजलयोग सूत्रावरील व्यासभाष्याचा या दृष्टीने अभ्यास केला; तर त्याला अहिंसेच्या परमसिद्धीचे रहस्य व त्या दृष्टीने श्रीस्वामीमहाराजांच्या अवताराचे रहस्य काय आहे हे लक्षात येईल. अहिंसेची व्याख्या करून ती सर्व यमांमध्ये सर्वश्रेष्ठ कशी आहे हे सांगताना महर्षी

व्यास आपल्या भाष्यात असे म्हणतात की, "तत्राऽहिंसा सर्वथा सर्वदा सर्वभूतानामनभिद्रोहः। उत्तरे च यमनियमास्तन्मूलास्तत्सिद्धिपरतयैव तत्प्रतिपादनाय प्रतिपाद्यन्ते, तदवदातरूपकरणायैवोपादीयन्ते। तथा चोक्तम् "स खल्वयं ब्राह्मणो यथा यथा व्रतानि बहूनि समादित्सते तथा तथा प्रमादकृतेभ्यो हिंसानिदानेभ्यो निवर्त्तमानस्तामेवावदातरूपामहिंसां करोति।" याचा अर्थ असा आहे की, "काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर या षड्विकारांच्या आधीन होऊन शरीराने, वाणीने किंवा मनाने अगर आचार, विचार किंवा उच्चारानेही भूतमात्रांपैकी कोणाचाही घात, हानी किंवा नुकसान न करणे अथवा क्लेश देण्यास स्पष्ट किंवा अस्पष्टपणे परवानगी किंवा अनुमती न देणे याला अहिंसा असे म्हणतात. या अहिंसेनंतर सांगितलेले इतर सत्यादि यम व शौचादि नियम हे सर्व अहिंसेकरिताच आहेत म्हणजे तिच्या सिद्धीकरिता सर्व शास्त्रात त्यांचे प्रतिपादन केले आहे. (सत्यादिकांनी अहिंसा सिद्ध होते हे सांगण्याकरिताच सत्यादिकांचे प्रतिपादन केले आहे.) तसेच त्या अहिंसेचे रूप निर्मल करण्याकरिताच योगी सत्यादिकांचे अनुष्ठान करतात. तसेच आगमातही असेच सांगितले आहे की, "खरोखर हा ब्राह्मण साधक-योगी जशी जशी अनेक व्रते ग्रहण करून त्यांचे पालन करण्याची इच्छा करतो तसा तसा तो अवसावधपणे घडणाऱ्या हिंसेच्या कारणांपासून निवृत्त होऊन त्या अहिंसेलाच अत्यंत निर्मल करतो."

अहिंसेची परमसिद्धी करणे हेच श्रीस्वामीमहाराजांच्या अवतारकार्याचे प्रयोजन होते, हे वरील विवेचनावरून उत्तमरीतीने स्पष्ट होते. इतकेच नव्हे; तर पुढील प्रमाणे पाहिली म्हणजे त्यांना जी अहिंसा समाजात प्रतिष्ठित करावयाची होती, त्याचे माहात्म्य

किती मोठे आहे, याचा प्रत्यय आपल्याला उत्तमरीतीने आल्याशिवाय राहात नाही.

अहिंसा परमो धर्मः ॥ इतिस्मृतिः ॥
यथा नागपदेऽन्यानि पदानि पदगामिनाम् ॥
सर्वाण्येवापिधीयन्ते पदजातानि कौंजरे ॥
एवं सर्वमहिंसायां धर्मार्थमपि धीयते ॥ मोक्षधर्मः ॥
प्राणिनामवधस्तात सर्वज्यायान् मतो मम ।
अनृतां वा वदेद्वाचं न तु हिंस्यात् कथंचन ॥
महाभारत—कर्णपर्व ॥ अ. ॥ ६९.२३ ॥
प्रभवार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम् ।
यत्स्यादहिंसासंयुक्तं स धर्म इति निश्चयः ॥
अहिंसार्थाय हिंस्राणां धर्मप्रवचनं कृतम् ॥ ५७ ॥

याचा अर्थ असा आहे की, " अहिंसा हाच परमश्रेष्ठ धर्म आहे. ज्याप्रमाणे हत्तीच्या पावलात सर्व प्राणिमात्रांच्या पावलांचा समावेश होतो त्याप्रमाणे एकमात्र अहिंसेमध्ये सर्व धर्मांचा समावेश होतो. कोणत्याही प्राण्याचा वध न करणे हेच सर्वश्रेष्ठ आहे, असे माझे ( श्रीकृष्णांचे निश्चित ) मत आहे. एकवेळ खोटे बोलले तरी तरी चालेल; परंतु हिंसा कधीही करता कामा नये. सर्व प्राण्यांच्या रक्षणाकरिताच धर्माचे प्रवचन केलेले आहे. ( भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला असे सांगतात की,) तू हे निश्चितपणे लक्षात घे की, जो धर्म अहिंसेने युक्त आहे तोच खरा धर्म आहे. सर्व हिंसक लोकांनी अहिंसक बनावे म्हणून तर धर्माने अहिंसेचे प्रवचन केले आहे.

या अहिंसेची साध्यरूपाने परम सिद्धी व्हावी म्हणूनच श्रीमद्-भगवद्गीतेत श्रीगोपालकृष्णनाथांनी " अहिंसा म्हणजे ज्ञान होय ॥ १३.७ ॥ ; अहिंसा ही दैवी संपत्ती आहे ॥ १६.२ ॥ " व

"अहिंसा हे शारीरिक तप होय ॥ १७.१४ ॥" असे सांगून अहिंसेचा साधनसंपत्तीच्या दृष्टीने उल्लेख केला आहे. यांचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

"कायावाचामनाने जगाला सुख व्हावे यांच एकमेव हेतूने जे वर्तन करणे तेच अहिंसेचे खरे स्वरूप व लक्षण होय. अहिंसेची सिद्धी व्हावी म्हणून भूतमात्राप्रमाणे गवतालाही जीव आहे असे समजून साधकभक्त त्यास हिसका देऊन तोडीत नाही किंवा तुडवीतही नाही. तो कोणाचीही मोडतोड करणे टाकून देतो किंवा वर्मी लागेल असे कोणासही बोलत नाही. ज्या साधकाच्या चित्तात अहिंसावृत्ती असून जी त्याच्या शरीरात पूर्णपणे बाणली आहे ती त्याच्या आचरणावरून समजून येते. ज्याप्रमाणे सोने कसोटीस लावले म्हणजे त्या सोन्याचा कस ती ठरविते त्याप्रमाणे ज्ञानामनाची खरोखर भेट झाली म्हणजे मनात ज्ञान अभिव्यक्त झाले तर लागलीच अहिंसेचा ठसा मनावर उमटतो अर्थात् मूर्तिमंत अहिंसा साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होते. अर्जुना तो ठसा कसा उमटतो ते ऐक.

ज्याप्रमाणे बगळा पाण्याच्या लाटा उल्लंघन न करता किंवा लहरी पायाने न फोडता व न मोडता आणि पाण्याचा स्थिरपणाही मोडू न देता वेगाने, हळूच व जपून आपल्या माशाच्या आमिषावर किंवा खाद्यावर नजर ठेवून पाण्यात पाऊल घालतो किंवा कमळाच्या आतील केसर चुरगळेल व दुखावेल या शंकेने अगर भीतीने भ्रमर जसे कमळावर हळूच जपून पाय ठेवतात त्याप्रमाणे परमाणूंमध्ये सुद्धा अतिसूक्ष्म लहान लहान जीव भरलेले आहेत असे जाणून व ते मरू नयेत म्हणून मनात करुणा उत्पन्न होऊन त्यात आपली पाऊले लपवून ती जमिनीवर बेताने तो ठेवून चालतो. अशा रीतीने अहिंसेची सिद्धी करणारा साधकभक्त ज्या वाटेने जातो तो

सर्व रस्ताच आपल्या कृपादृष्टीने भरून टाकतो. ज्या दिशेने तो चालतो किंवा ज्या दिशेकडे त्याची दृष्टी जाते ती दिशाच तो स्नेह-भावाने परिपूर्ण करतो आणि कोण्याही प्राण्यास उपद्रव होऊ नये म्हणून जीवातळी आपला जीव आंथरतो अर्थात् आपल्या जीवापेक्षा प्राणीमात्राच्या जीवाला जपतो. अर्जुना ! अशा रीतीने ज्या साधक-भक्ताचे जपून वागणे, पाहणे व चालणे असते त्याच्या अहिंसेचे माप शब्दांनी वर्णन करून अचूक सांगता येत नाही. असे त्याचे अनन्य साधारण महत्त्व आहे.

ज्यावेळी मोहाच्या योगाने मांजरी पिल्लाला आपल्या तोंडात धरते त्यावेळी ज्याप्रमाणे तिच्या दातांची टोके त्या पिल्लांना लागत नाहीत किंवा ज्याप्रमाणे ममताळू आईची आपल्या तान्ह्या मुलाची वाट पाहण्याकडे दृष्टी लागलेली असते तेव्हा त्या दृष्टीत प्रेमपूर्ण नाजुकपणा असतो अथवा कमळाच्या पानाने हळूहळू वारा घेऊ लागले असता ज्याप्रमाणे त्यापासून निघालेला वारा सुखकर असल्या-मुळे डोळ्यांच्या बुबुळास समाधान होते त्याप्रमाणे ज्यावेळी तित-क्याच मऊपणाने साधकभक्त जमिनीवर हळूच पाय टेकून चालतो त्यावेळी ज्या जीवांना त्याचे पाय सहज लागतात त्यांना त्रास न होता उलट जपून पावले टाकल्यामुळे सुखच होते. अर्जुना ! याप्रमाणे साधकभक्त हा हळूच चालत असताना जमिनीवर किडा किंवा मुंगी जरी त्याच्या दृष्टीस पडली तरी तो हळूच मागे फिरतो. जर आपण पाय जोराने आपटीत चाललो तर स्वामींच्या म्हणजे जीवा-त्म्याच्या निद्रेचा भंग होईल व त्यांच्या प्रकृतीच्या सहज स्वस्थपणास धक्का बसेल व विक्षेप होईल अशी दया मनात उत्पन्न होऊन तो कोणत्याही प्राण्यांचे उल्लंघन न करता माघारी फिरतो. जीवाला

त्रास होईल किंवा त्याचा नाश होईल म्हणून तो साधकभक्त गवता-वरही पाय देऊन तें तुडवून जात नाहीं; मग एखादा प्राणी दृष्टीस पडल्यावर त्याला न जुमानता त्यास तुडवून तो वाट चालेल ही गोष्ट त्याच्या हातून कशी घडेल ! ज्याप्रमाणे मुंगीला मेरू पर्वत ओलांडून जाता येत नाही अथवा चिलटाला समुद्र तरून जाता येत नाही त्याप्रमाणें प्राण्यांची भेट झाली असता साधकभक्ताकडून त्याचे उल्लंघन करवत नाही. अशी ज्याची कृपारूपी फळांनी फळास आलेली चालण्याची रीत असतें त्याच्या वाणीतही मूर्तिमंत दया जगलेली आहे असे तुझ्या दृष्टीस पडेल.

हा साधकभक्त जो श्वासोच्छ्वास स्वतः करतो तोही शेजारच्या मनुष्यास त्रास होणार नाही अशा बेताने हळू व नाजूकपणे करतो. त्याचे मुख पाहिले असता ते केवळ प्रेमाचे माहेरघरच असून दात तर जणू काही माधुर्याला अंकुरच फुटले आहेत असे दिसतात. तो बोलत असताना त्याच्या मुखातून अक्षरे बाहेर पडण्याच्या अगोदर त्या अक्षरांपुढे व मुखावर स्नेहभाव पाझरत असल्याचे दृष्टीस पडते व त्याच्या चित्तात अगोदर दया प्रकट किंवा उत्पन्न होऊन नंतर कृपेने भरलेले शब्द मुखातून बाहेर पडतात. खरे तर अगोदर त्याचे होता होईपर्यंत कोणाशी बोलणेच नसते. त्यातूनही तो काही बोलावयाचे असे म्हणेल म्हणजे कदाचित् त्याने बोलण्याचे मनात आणले; तर आपले बोलणे कोणास लागेल की काय ? अशी त्यास भीती वाटत असते. हा साधकभक्त बोलताना आपल्या मुखातून कमी जास्त शब्द निघणार नाहीत, ते कोणाच्या वर्मी लागणार नाहीत, त्या शब्दांपासून कोणाच्याही मनात शंका उत्पन्न होणार नाही, एखाद्याचीही प्रचलित ठरलेली किंवा चालू गोष्ट अगर बेत बिघडून अथवा मोडून ती मोडणार नाही, आपल्या बोलण्याने

कोणाला भीती वाटणार नाही व कोणीही दचकून जागे होणार नाही किंवा उडून जाणार नाही आणि आपल्या बोलण्याचा कोणीही तिरस्कार करणार नाही याची हा साधकभक्त काळजी घेतो. तो आपल्या बोलण्याने कोणाला पीडा होऊ नये व कोणीही भिवया चढवून आपल्याकडे पाहू नये असा हेतू अखंडपणें मनात बाळगून न बोलता उभा राहतो. अशा स्थितीत "आपण बोलावे," असे म्हणून कदाचित् कोणी प्रार्थना केली आणि ती विनंती मान्य करून तो प्रेमाने जर बोलू लागला तर त्याचे बोलणे ऐकून जणूकाही आपले प्रेमळ आईवडीलच आपल्याशी प्रेमाने बोलत आहेत असे वाटण्याइतके त्याचे बोलणे आनंददायक असते. किंवा त्या साधक-भक्ताचे बोलणे म्हणजे नादब्रह्म अर्थात् अमूर्त अशी गोष्ट समूर्त होऊन पुढे उभी राहिली आहे की काय असे वाटते. अथवा त्याचे बोलणे ऐकल्यावर स्वच्छ व पवित्र असे गंगोदकच जणूकाही उसळले आहे किंवा पतिव्रता स्त्रीला जणूकाही वृद्धपणा प्राप्त झाला आहे असे वाटते. त्याचे बोलणे खरे, अत्यंत मऊ व थोडे असले तरी विलक्षण रसाळ असल्यामुळे त्याच्या मुखातून निघणारे सर्व शब्द म्हणजे जणूकाही अमृताचे कल्लोळ अर्थात् लाटाच आहेत असे वाटते. या साधकभक्ताने खोटी स्तुती, उपरोधिपणा, वाद-विवादीपणा, दुसऱ्यास संताप किंवा त्रास उत्पन्न होणारे बोलणे, चेष्टा—कुचेष्टा युक्त बोलणे, छळवाद करणारे वंचनकारक आणि दुसऱ्याच्या वर्मी झोंबणारे शब्द बोलणे, अडवणुकीचे बोलणे, अति वेगाचे, कपटाचे, खोट्या आशेचे, कुशंका काढणारे व ठकबाजी करून फसविणारे बोलणे इत्यादि बोलण्यातील दोष पूर्णपणे टाकलेले असतात.

त्याचप्रमाणे या साधकभक्ताची दृष्टी स्थिर असते. त्याच्या

भिवया मोकळ्या असतात म्हणजे रागाने भिवया चढविल्या नसल्या-मुळे त्याच्या कपाळावर आठ्या दृष्टीस पडत नाहीत; कारण प्रत्येक प्राण्यात जी परब्रह्म वस्तू भरलेली आहे तिला कदाचित् दृष्टी खुपेल व त्रास होईल म्हणून जो बहुतकरून कोणाकडेही पाहातच नाही. असे असले; तरी एखाद्या वेळी आपल्या कृपेच्या बळाने जर डोळे उघडून त्या साधकभक्ताने कोणाकडे दृष्टी टाकली तर ज्याप्रमाणे चंद्रबिंबातून निघणाऱ्या अमृताच्या धारा जरी कोणाच्या दृष्टीस पडत नाहीत; तरीपण चकोरपक्षांना त्या सतत कळतात व त्यामुळे त्यांना आनंद होऊन ते पुष्ट होतात त्याप्रमाणे ज्या प्राण्याकडे त्याने आपल्या दृष्टीने पाहिले त्याला त्यापासून समाधान होते. त्याच्या अवलोकनाची पद्धती किती प्रेमयुक्त आहे हे कासवीलाही माहीत नाही. (कासवीच्या केवळ कृपादृष्टीनेंच तिची पिल्ले वाढतात असे तिच्या दृष्टीत प्रेम व पोसण्याचें सामर्थ्य आहे.) अधिक काय सांगावे! तो साधकभक्त भूतमात्रांकडे अशा प्रेमळ दृष्टीने सतत पाहतो.

हे अर्जुना! त्या साधकभक्ताच्या हाताचे गुण पाहू गेले असता ते त्याचे हातही दृष्टिप्रमाणेच मृदू आहेत असे तुला दिसेल. ज्याप्रमणे ब्रह्मनिष्ठांचे मनोरथ कृतार्थतेने पूर्ण झालेले असतात त्याप्रमाणे त्याच्या हातांना काही एक करण्याची इच्छा अगर कर्तव्यबुद्धी नसल्यामुळे ते निर्व्यापार असतात. एखादा मनुष्य जन्मांध असून त्यातच त्याने ज्याप्रमाणे पाहण्याची क्रिया सोडावी किंवा आधीच काष्ठरहित अग्नी आणि त्यातून तो जसा विझावा अथवा मुळच्याच मुक्या मनुष्याने जसे मौनव्रत धारण करावे त्याप्रमाणे ज्याच्या हातांना काही एक करावयाचे असे उरलेले नसते व असे हात काही एक कर्तव्य नसलेल्या साधकभक्त पुरुषाच्या ठिकाणी स्वस्थ रहाण्यास आलेले असतात. वाऱ्याला धक्का लागेल किंवा आकाशाला

नख रुपेल अशा बुद्धीने हा साधकभक्त हात हालवीतच नाही. तेथें अंगावर बसलेली माशी वगैरे उडवावी किंवा डोळ्यात शिरणारी घुंगुरटी एकीकडे करावी अथवा पशुपक्षांना आपल्या रागीट डोळ्यांनी भीती वाटेल असा आविर्भाव दाखवावा या गोष्टी त्याच्याकडून कशा घडणार ? हे किरीटी ! त्याला हातात दंड व काठी घेणेही जर आवडत नाही तर मग त्याने हातात शस्त्र घेण्याची गोष्ट कशाला पाहिजे ? हातात लीलेने कमळ घेऊन फिरविल्यास अथवा फुलांचा हार झेलल्यास तो गोफणीतील दगडाप्रमाणे एखाद्या जीवास लागून त्याला इजा होईल, अशा धारणेने हेही व्यापार हा साधकभक्त हाताने करीत नाही. अंगावरील लवेच्या रांगा हालतील व एखाद्या जीवास इजा होईल म्हणून तो ती नखे बोटांवर गुंडाळचा होईपर्यंत वाढवितो. तो कर्तव्यरहित असल्यामुळे कोणतीही गोष्ट अगोदर त्यास हाताने करावयाचीच नसते; परंतु हाताने काही करण्याचा प्रसंग त्याच्यावर आल्यानंतर हात जोडून नमस्कार करण्याशिवाय दुसरा कोणताही अभ्यास त्याच्या हाताला ठाऊक नसतो. किंवा हाताने व्यापार केला तर दुसऱ्यास हात उचलून " भिऊ नकोस " असे अभय वचन देणे किंवा एखाद्या कोणी पीडित मनुष्याची पीडा कमी व्हावी म्हणून त्याच्या अंगावरून हळूच हात फिरविणे ह्या गोष्टीही तो साधकभक्त मोठ्या संकटाने करतो. तथापि पीडित मनुष्याची चिंता तो हस्तस्पर्शाने दूर करतो; मात्र त्याच्या या हस्तस्पर्श करण्याने जो कृपेचा पाझर फुटतो तसा ओलावा चंद्रकिरणांनाही माहीत नसतो. त्याचा हस्तस्पर्श इतका मृदू व सुखकर असतो की, त्या दृष्टीने पाहिले तर मलय पर्वतावरून येणाऱ्या वाऱ्याचा स्पर्शही कठिण भासेल. अशाच हस्तस्पर्शाने त्याचे पशूंनाही कुरवाळणें असते. जरी त्याचे हात नेहमी रिकामे व मोकळे असले

तरीपण चंदनाच्या झाडाचा कोणताही भाग ज्याप्रमाणे थंडगार व सुगंधमय असतो व त्याला फळे न येताही तो निष्फळ आहे असे कोणाला म्हणता येत नाही त्याप्रमाणे या साधकभक्ताचे हात नेहमी शीतल व सफल असतात. सारांश, ज्याप्रमाणे सज्जन मनुष्याचे शील व स्वभाव ही जशी पवित्र असतात त्याप्रमाणे त्याच्या हाताचे आचरण पवित्र असते.

सारांश, ज्याप्रमाणे पिकलेल्या फळाचा सुवास आपोआप उत्साहपूर्वक चहूंकडे घमघमत बाहेर निघून पसरतो त्याप्रमाणे खरोखर मनात खरी अहिंसा चांगली वळकट कायम झाली म्हणजे इंद्रियांच्या व्यापारामध्ये अहिंसाच दृष्टीस पडते. त्यामुळे सर्व इंद्रिये ही मनातील अहिंसा हीच आपली संपत्ती असे पूर्णपणे मानून अहिंसेचीच देवघेव व अहिंसेचाच व्यापार करीत असतात किंवा ज्याप्रमाणे समुद्राला पूर्ण भरती आली म्हणजे समुद्रच आपल्या पाण्याने खाड्या पूर्ण भरतो त्याप्रमाणे मनात अहिंसेचे भरते आले म्हणजे ते मनच या इंद्रियांना आपल्या अहिंसात्मक जलसंपत्तीने पूर्णपणे भरून टाकते."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अहिंसेच्या महासिद्धीचे जे रूप वर प्रकट केले आहे ते सर्व अमूर्त असून ते युगायुगातून क्वचित्‌च अवतरित होणाऱ्या श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर, अलौकिक व दिव्य अशा महापुरुषाच्या रूपाने समूर्त झाले होते हेच खरे आहे. साधकभक्तांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रातील अहिंसेच्या या गुणाचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केलेल्या उपरोक्त भावार्थाच्या आधाराने विचार केला; तर त्याच्या अंतरंगात प्रवेश करता येऊन ही महासिद्धी हेच आपले अंतिम ध्येय आहे याची जाणीव होऊन त्या दृष्टीने साधकभक्तांनी प्रयत्नशील व्हावे व त्यांना या महासिद्धीची प्राप्ती व्हावी म्हणून श्रीगुरुचरणी प्रार्थना आहे.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी सोमयाग करण्यास नकार दिल्यानंतर श्री. दत्तुशास्त्री साधले हे काही दिवस श्रीक्षेत्र नरसोबावाडीलाच राहिले. श्रीस्वामीमहाराज सर्व लोकांना अंगारा देतात व विशेषतः आजारी लोकांना अंगारा देऊन तो लावण्यास सांगतात हे श्री. साधलेशास्त्री यांना पसंत पडले नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या सारखे एक लोकोत्तर थोर पुरुष अंगारे-धुपारे करतात हे काही योग्य नाही अशी त्यांची पक्की धारणा झाल्यामुळे एके दिवशी ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " महाराज ! आपल्या दर्शनाला येणारे लोक निश्चितच वेडे आहेत ! सारखे एकामागून एक येतात आणि आपल्या जवळील राख मागून घेतात. या राखेने काय होणार आहे ! त्याने थोडेच रोग निवारण होतील ? " त्यांचे हे बोलणे ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना अत्यंत शांतपणे एवढेच म्हणाले की, " आपण अक्कलकोटस्वामीमहाराजांचे शिष्य आहात ! आपल्या सारख्यांनी तरी अंगाऱ्याविषयी असे उद्‌गार काढणे बरोबर नाही. येथे हा देवाचा अंगारा म्हणून तो आम्ही सर्व लोकांना देतो. त्याच्यामुळे लोकांना गुण येत असल्यामुळेच तर ते मागायला येतात ना ? हा श्रद्धाभक्तीचा भाग आहे. "

श्रीस्वामीमहाराजांनी इतके सांगितल्यावर श्री. दत्तुशास्त्री साधले आपल्या बिऱ्हाडी परत गेले व श्रीस्वामीमहाराजही आपल्या कामात मग्न झाले. त्याच दिवशी रात्री श्री. साधलेशास्त्र्यांच्या पोटात एकाएकी भयंकर शूळ उत्पन्न झाला. या पोटशुळामुळे त्यांच्या वेदना उत्तरोत्तर वाढत जाऊन शेवटी ते अक्षरशः गडबडा लोळू लागले. त्यांची ही स्थिती पाहून ते ज्या पुजाऱ्यांच्याकडे उतरले होते त्यांनी त्यांना काही औषध दिले; पण त्याचा गुण

आला नाही. शेवटी त्या पुजाऱ्यांनी श्री. साधलेशास्त्र्यांना श्रीस्वामी-महाराजांकडे नेले व एकंदर सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली. एकंदर सर्व प्रकार लक्षात आल्याबरोबर श्रीस्वामीमहाराज श्री. साधलेशास्त्री यांना असे म्हणाले की, "देवाच्या अंगाऱ्याची आपण राख म्हणून चेष्टा केली त्याचेच हे फळ आहे. आता देवाची क्षमा मागून आपण देतो तो देवाचा अंगारा पोटात घ्या म्हणजे आपला पोटशूळ थांबेल व आपल्याला बरे वाटेल." असे म्हणून श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना अंगारा दिला. तो घेऊन श्री. साधलेशास्त्री घरी आले व त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना सांगितल्याप्रमाणे अंतः-करणपूर्वक देवांची क्षमा मागून अंगारा पोटात घेताच त्यांची पोट-दुखी थांबली.

अशा प्रकारे पश्चात्ताप करण्याची श्री. साधलेशास्त्री यांची ही दुसरी वेळ होती. पूर्वी ते अक्कलकोटला श्रीस्वामीसमर्थ अक्कलकोट-करमहाराज यांच्या सेवेत होते. तेथे एकदा शृंगेरीकडील एक शास्त्री येऊन राहिले होते. श्री. साधलेशास्त्र्यांच्या सारखा एक पंडित मनुष्य एका दिगंबर साधूची सेवा करतो हे काही त्या शृंगेरीच्या शास्त्रीबुवांना आवडले नाही. त्यामुळे ते शास्त्रीबुवा श्री. साधले-शास्त्री यांना एक दिवस असे म्हणाले की, "तुम्ही या वेड्याजवळ कशाला राहता ? यामुळे तुम्हाला कसलाही लाभ होणार नाही. जर तुम्ही शृंगेरीला आलात तर तुम्हाला सर्व शास्त्रे शिकवून चांगले पारंगत करू."

अशा प्रकारे सर्वशास्त्रपारंगत होण्याच्या मोहाला बळी पडून श्री. साधलेशास्त्र्यांनी शृंगेरीस जाण्याचा विचार निश्चित केला. त्याच दिवशी रात्री ते आपल्या खोलीत दरवाजाला कडी लावून झोपले असता श्रीस्वामीसमर्थ अक्कलकोटकरमहाराज त्यांच्या

खोली समोर आले व त्यांनी बाहेरून दरवाजाला स्पर्श करताच आतून लावलेली कडी आपोआप गळून पडली. त्या आवाजाने श्री. साधलेशास्त्री जागे झाले. ज्यावेळी त्यांनी समोर पाहिले त्यावेळी त्यांना आपल्यासमोर श्रीस्वामीसमर्थमहाराज उभे आहेत हे दिसले; परंतु त्यावेळी त्यांची मूर्ती इतकी तेजःपुंज व दिव्य दिसत होती की, त्यामुळे त्यांचे तेज सहन न होऊन त्यांना त्यांच्याकडे पाहताच येईना. श्री. साधलेशास्त्री मान खाली करून श्रीस्वामीसमर्थमहाराजांपुढे उभे राहिले.

त्यावेळी श्री. साधलेशास्त्री यांना श्रीस्वामीसमर्थमहाराजांनी एखाद्या पंडिताप्रमाणे अस्खलितपणे संस्कृत भाषेत असे विचारले की, "संस्कृत शिकावयाला केव्हा जाणार? या शास्त्रीपंडितांनी षड्रिपू जिंकून कामादि विकार जिंकले आहेत काय? त्यांच्या वासना शमल्या आहेत काय? हे सर्व शास्त्री वरवर आपण मोठे शांत, दान्त आहोत, नम्र आहोत, निर्लोभी आहोत व मान खाली घालून बसून आपण मोठे निरंहकारी आहोत असे दाखवीत असतात; परंतु ते पक्के ढोंगी, लुच्चे, लबाड, कामी व दुसऱ्यांना फसविणारे असून आपल्या बुद्धीच्या जोरावर स्वार्थासाठी इतरांचा नाश करण्यासही मागेपुढे पाहात नाहीत हे लक्षात ठेव." अशा प्रकारे सर्व शास्त्री-पंडितांचे खरे स्वरूप सांगून श्रीस्वामीसमर्थमहाराज तेथून एकाएकी गुप्त झाले. श्रीस्वामीसमर्थमहाराज खोलीतून निघून गेल्यावर श्री. साधलेशास्त्री एकंदर सर्व प्रकाराने व त्यांच्या उपदेशाने अगदी दिङ्मूढ झाले. श्रीस्वामीसमर्थमहाराजांच्या म्हणण्याचा जेव्हा त्यांनी विचार केला तेव्हा त्यांना आपली चूक कळून आली व खूप पश्चात्ताप झाला. दुसऱ्या दिवशी सकाळी श्री. साधलेशास्त्री

श्रीस्वामीसमर्थमहाराजांकडे गेले व त्यांनी त्यांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागितली.

कालौघात श्री. साधलेशास्त्री हे श्रीस्वामीसमर्थमहाराजांच्या सेवेतून मुक्त होऊन आपल्या गावी गेले. ते अक्कलकोटहून निघून घरी गेले; तरी श्रीस्वामीसमर्थमहाराजांना आपल्या भक्ताचे स्मरण होते. त्यांनी समाधिस्थ होण्यापूर्वी आपल्या जवळची खेळणी त्यांना आशीर्वादभेट म्हणून पाठवून दिली. श्रीस्वामीसमर्थमहाराजांचा तो खेळण्याचा प्रसाद श्री. साधलेशास्त्री यांनी आपल्या देव्हाऱ्यात ठेवला होता. पुढे शेवटपर्यन्त ते त्या खेळण्यांची मोठ्या भक्तिभावाने पूजा करीत असत.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीला पुजाऱ्यांचे चार फड असून त्या फडातील पुजारी आपले वर्ष आले की, आळीपाळीने वर्षभर पूजा करीत असतात. त्या वर्षी श्री. श्रीपादभटजी हवळे यांच्या फडाकडे पूजा होती. श्री. श्रीपादभटजी मोठे सात्त्विक व पापभिरू होते. श्रीस्वामी-महाराजांवर त्यांची एकांतिक निष्ठा होती आणि श्रीस्वामीमहा-राजांचीही त्यांच्यावर अपार कृपा होती. एके दिवशी दुपारी श्री. श्रीपादभटजी हवळे हे नेहमीप्रमाणे श्रीपादुकांची महापूजा करीत होते. त्या दिवशी श्रीस्वामीमहाराजही मोठ्या प्रेमाने महापूजा पाहण्यासाठी मंदिरात येऊन बसले होते.

श्रीपादुकांची पूजा करता करता श्री. श्रीपादभटजींना एकाएकी जोरदार शिंक आली; परंतु पूजा करताना शिंक येणे ही गोष्ट बरी नव्हे हे जाणून त्यांनी ती दाबली. पुन्हा लगेच त्यांना दुसरी शिंक आली व तीही दाबण्याची त्यांनी शिकस्त केली; परंतु त्याचा उपयोग झाला नाही व त्यांना जोरदार शिंक आली. त्या शिंके पाठोपाठ त्यांना एकामागून एक शिंका येऊ लागल्या. श्री. श्रीपादभटजींना

सर्दी झाली होती. त्यांचे अंगही मोडून व शिरशिरून आले होते. श्री. हवळयांच्या फडामध्ये मुळातच पुजारी मंडळी फारशी नसल्यामुळे श्री. श्रीपादभटजींनाच श्रीपादुकांची पूजा बहुतांशी तिन्ही त्रिकाळ करावी लागत असे. त्यामुळे त्यांना श्रीकृष्णानदीत तिन्ही वेळा थंड पाण्याने स्नान करावे लागत असे. या सततच्या स्नानामुळे त्यांना सर्दीचा त्रास होऊ लागला होता; पण त्याला काही इलाज नव्हता.

त्या दिवशी श्रीस्वामीमहाराज नेहमीप्रमाणे एकाग्र चित्ताने महापूजा पाहात बसले होते. त्यावेळी श्री. श्रीपादभटजींना सर्दीमुळे येणाऱ्या शिंकांचा होणारा त्रास त्यांच्या नजरेला आला आणि त्यांच्याही एकाग्रतेचा भंग झाला. अशा प्रकारे देवांची पूजा करताना थंड पाण्याच्या वारंवार स्नानामुळे पुजाऱ्याला व्यत्यय यावा व एकाग्रतेने पूजा पाहणाऱ्या भक्ताच्या एकाग्रतेचा भंग व्हावा हे काही बरे नव्हे, असे श्रीस्वामीमहाराजांना तीव्रतेने जाणवले. थोड्या वेळाने पूजा आटोपल्यावर श्री. श्रीपादभटजी बाहेर आले. त्यांनी बाहेर आल्यावर प्रथम देवाला व नंतर श्रीस्वामीमहाराजांनाही नमस्कार केला. भक्ताची काळजी देवालाच असते. देवाने पूजा चालू असताना श्रीस्वामीमहाराजांना काय सांगितले कोण जाणे? ; पण श्री. श्रीपादभटजींनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करताच ते त्यांना असे म्हणाले की, "श्रीपादभट ! यापुढे पूजेला जाण्यापूर्वी कृष्णेचे पाणी येथे घाटावरच तापवून गरम पाण्याने स्नान करीत जा. मात्र ही सवलत फक्त तुम्हालाच आहे; इतर कोणालाही नाही. त्याचप्रमाणे दुसरी गोष्ट म्हणजे तुम्ही दररोज श्रीगुरुचरित्राचा एक अध्याय वाचल्याशिवाय अन्न ग्रहण करावयाचे नाही. तसेच तुमच्या घरात मुलेबाळे कोणी आजारी पडल्यास त्यांना देवाचे तीर्थ व अंगाराच फक्त द्यावयाचा. औषध द्यावयाचे नाही." श्रीस्वामीमहाराजांनी

अत्यंत प्रेमाने व आपलेपणाने स्वतःहून आपल्याला केलेल्या आज्ञा ऐकून व स्नानासाठी विशेष सवलत दिलेली पाहून त्यांच्यामधील भक्ताला पराकाष्ठेचे सुख झाले व त्यांनी कालौघात श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञा शिरोधार्य मानून त्यांचे यावज्जीव पालन केले.

साताऱ्याकडील एक मराठे गृहस्थ बरेच दिवस पोटशूळाने हैराण झाले होते. त्यांनी अनेक वैद्यांची औषधे घेतली व अनेक तऱ्हेचे उपचार केले; परंतु त्यांना कशानेही गुण येईना. त्यावेळी त्या गृहस्थांना कोणीतरी असे सांगितले की, "सध्या श्रीक्षेत्र नरसोबावाडीला श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज या नावाच्या थोर दत्तावतारी महापुरुषाचा काही काळ मुक्काम असून जर आपण त्यांचे दर्शन घेतले तर आपला पोटशूळ दूर होऊन आपल्याला बरे वाटेल."

हे सर्व ऐकताच त्या मराठे गृहस्थांना श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेण्याची अंतःकरणातून प्रेरणा होऊन तीव्र इच्छा झाली. त्याप्रमाणे ते गृहस्थ लगेच श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले. तेथे आल्यावर ज्यावेळी त्या गृहस्थांनी प्रथम श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यांचे दर्शन घेतले त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांची प्रेममय व करुणाघन मूर्ती पाहून त्यांच्या श्रीचरणांवर नतमस्तक व्हावे अशी तीव्र इच्छा विलक्षण संवेगाने त्या गृहस्थांच्या हृदयात जागृत झाली.

अशा प्रकारे त्या गृहस्थांना इच्छा झाली; तरी त्यांच्या इच्छेची पूर्ती कशी होणार? हाच खरा प्रश्न होता; कारण श्रीस्वामीमहाराज अखंडपणे सोवळ्यात राहात असत व ते कोणाचाही स्पर्श करून घेत नसत. हे पाहिले म्हणजे या ठिकाणी एका गोष्टीचे असे सतत स्मरण होते की, ज्या ज्या भक्तांनी, सेवकांनी किंवा जिज्ञासूंनी श्रीस्वामीमहाराजांची करुणाघन व प्रेममय मूर्ती पाहिली त्या त्या

सर्वांना त्यांच्या चरणकमलावर मस्तक ठेवून आपले जीवन धन्य व कृतार्थ करावे अशी तीव्र इच्छा झाल्याचे त्यांनी स्पष्टपणे मान्य केल्याचे लक्षात येते. सर्व लोकांना असे का वाटत होते ? याचे उत्तर श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात सांगावयाचे झाले तर असे म्हणता येईल की, "तैसे परमाणु पां गुंतले। जाणूनि ज़ीव सानुले। तेथ कारुण्यामाजीं पाउलें। लपवूनि चाले ॥ १३.२४९ ॥ ते वाट कृपेची करितु। ते दिशाचि स्नेहभरितु॥ जीवातळीं आंथरितु॥ आपुला जीवु ॥ २५० ॥ पुढां स्नेह पाझरे। माघां चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं ॥ २६३ ॥ तैसें साच आणि मवाळ। मितले आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे ॥ २७० ॥" श्रीस्वामीमहाराजांचे याप्रमाणे चालणे, बोलणे व वागणे असल्यामुळेच उपरोक्तप्रकारे लोकांना त्यांच्या चरणदर्शनाची इच्छा होत असणार याविषयी मनात तिळमात्र संशय राहात नाही.

त्या मराठे गृहस्थांना जरी वरीलप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलांवर मस्तक ठेवून नमस्कार करण्याची इच्छा झाली; तरी ती तात्काळ पूर्ण होणे शक्य नसल्यामुळे त्यांनी दुरूनच त्यांना नमस्कार करून त्यांचे दर्शन घेतले. त्यावेळी ते गृहस्थ आपली असह्य अशी पोटशूळाची व्यथा श्रीस्वामीमहाराजांना सांगून त्यावर काही उपाय विचारण्याचेही विसरून गेले. श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणांवर मस्तक ठेवावे व कृतार्थ व्हावे हा एकच ध्यास त्यांना लागला. त्या गृहस्थांच्या विलक्षण ध्यासाने त्यांचे पोटशूळाचे असह्य दुःख गिळंकृत करून टाकले.

त्या मराठे गृहस्थांची तीव्र तळमळ श्रीस्वामीमहाराजांच्या हृदयापर्यंत जाऊन पोहोचली. आपल्या भक्तांचे मनोरथ कोणत्या ना कोणत्या तरी रीतीने पूर्ण करावयाचे हे श्रीस्वामीमहाराजांचे

ब्रीदच होते. त्या दिवशी रात्री त्या गृहस्थांना झोप लागली नाही. रात्रभर ते गृहस्थ तळमळत होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी ते गृहस्थ प्रातर्विधीसाठी बाहेर पडले व संगमाच्या वाटेने काही अंतर चालून गेले. इतक्यात समोर श्रीस्वामी-महाराजांची मूर्ती पाहून त्यांच्या आनंदाला सीमा राहिली नाही. त्यावेळी त्या गृहस्थांनी श्रीस्वामीमहाराजांना रस्त्यातच लोटांगण घातले. तेवढ्यात श्रीस्वामीमहाराज थोडे पुढे होऊन त्यांच्या जवळ जाऊन त्यांना असे म्हणाले की, " येथे रस्त्यावर फारच काटे पसर-लेले आहेत. माझ्या पायात एक काटा शिरला आहे असे वाटते. पाहा बरे तुम्हाला तो काढता येतो का ? " असे म्हणून श्रीस्वामी-महाराजांनी आपला उजवा पाय पुढे केला.

श्रीस्वामीमहाराजांचे अकस्मात् दर्शन होऊन त्यांच्या चरण-कमलांना आपल्या हाताने स्पर्श करावयास मिळणार हे लक्षात येताच त्या गृहस्थांना ब्रह्मांड ठेंगणे झाल्याचा परमानंद होऊन ते विलक्षण सुखावले. श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्या गृह-स्थांनी भक्तीच्या परमावेगाने रोमांचित होऊन त्यांचा उजवा चरण कमल आपल्या हातात घेऊन आपल्या मस्तकावर धारण केला. त्यावेळी साहजिकच आधार म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी आपला उजवा हात त्या गृहस्थांच्या खांद्यावर ठेवला. श्रीस्वामीमहा-राजांच्या चरण व हस्तस्पर्शाने त्या गृहस्थांच्या अंगावर रोमांच उभे राहून ते कंपित झाले. त्यांच्या सर्वांगाला घाम येऊन नेत्रात अश्रू तरळू लागले. एका विलक्षण आनंदाने त्यांचे मन भरून गेले.

त्या विलक्षण अशा धुंद अवस्थेत त्या गृहस्थांनी श्रीस्वामीमहा-राजांच्या चरणकमलांची धूळ आपल्या कपाळाला लावली व त्यानंतर अगदी हळुवार हाताने त्याने श्रीस्वामीमहाराजांच्या पायातील काटा

काढला. श्रीस्वामीमहाराज भक्तकामकल्पद्रुम असल्यामुळे त्यांच्या पायात रुतलेला काटा हा त्या गृहस्थांकडूनच निघावयाचा होता; कारण ईश्वराच्या अलौकिक लीलाशक्तीमुळे व कर्तुं अकर्तुं अशा अपरंपार सामर्थ्यामुळे त्या परमभक्तासाठीच तो पायात रुतला होता. श्रीस्वामीमहाराजांच्या पायातील काटा काढल्यानंतर त्या भक्तांनी आपले मस्तक त्यांच्या चरणकमलांवर ठेवून त्यांना जणूकाही अश्रूंनी अभिषेक केला. काही वेळाने ते भानावर आल्यावर त्यांनी भीतभीतच दृष्टी वर करून श्रीस्वामीमहाराजांकडे पाहिले व ते उठून उभे राहिले.

यावेळीही ते गृहस्थ आपल्या पोटशूळाच्या व्यथेबद्दल श्रीस्वामी-महाराजांना सांगून त्यावर काही उपाय व औषध मागण्यास पूर्ण-पणे विसरून गेले असले; तरी त्यांची व्यथा न सांगताही श्रीस्वामी-महाराजांना अंतर्दृष्टीने आधीच कळली होती व ती त्यांच्या लक्षा-तही होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज त्या गृहस्थांकडे सुहास्य-मुद्रेने पाहात असे म्हणाले की, "आज दहीभात खा व उद्या मंदिरात या." इतके बोलून श्रीस्वामीमहाराज अत्यंत त्वरित गतीने स्नानासाठी संगमावर निघून गेले.

श्रीस्वामीमहाराज स्नानाला गेल्यावर ते गृहस्थ कितीतरी वेळ त्या ठिकाणी स्तब्ध उभे होते. आपल्याला अचानक झालेल्या लाभाने व इच्छापूर्तीच्या समाधानाने त्यांचे मन भरून गेले होते. अशा प्रकारे आपल्याला श्रीस्वामीमहाराजांच्या चरणावर मस्तक ठेवावयास मिळाल्याने त्या गृहस्थांना आता आपले जीवन धन्य व कृतार्थ झाले आहे असे वाटत होते. या स्थितीतून ते जेव्हा थोडे बाहेर येऊन देहभानावर आले तेव्हा त्यांना श्रीस्वामीमहाराजांनी आपणास आज दहीभात खाण्याची आज्ञा केल्याची आठवण होऊन त्यांच्या

अंगावर काटा उभा राहिला. जर का आपण दहीभात खाल्ला तर आपल्या पोटशूळाची व्यथा तीव्र होऊन आपली प्राणांतिक अवस्था होईल व आपल्याला जीव नकोसा होऊन जाईल या कल्पनेनेच ते अत्यंत घाबरून गेले. अशा मनाच्या भीतियुक्त स्थितीतच त्या गृहस्थांनी दहीभात खाल्ला; पण त्यांना यत्किंचितही त्रास झाला नाही श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने आपली पोटशूळाची व्यथाही दूर झाल्याचे पाहून तर त्यांचा आनंद गगनात मावेना.

दुसऱ्या दिवशी सकाळी स्नान करून ते गृहस्थ श्रीपादुकामंदिराकडे जावयाला निघाले. श्रीस्वामीमहाराज श्रीनारायणस्वामींच्या कट्ट्यावर बसले होते. तेथे येणारे लोक ओळीने श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेत होते. दर्शनाला आलेल्या लोकांना ते नारायण म्हणून आशीर्वाद देत होते. कोणी व्याधिग्रस्त पीडित मनुष्य आल्यास त्याच्या व्याधीवर उपचार सांगून त्याला ते अंगारा देत होते. या गृहस्थांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केल्यावर "आता कसे काय वाटते? काल दहीभात खाल्ला ना?" असे प्रश्न विचारले. हे प्रश्न ऐकताच त्या गृहस्थांच्या अंगावर रोमांच उभे राहून त्यांच्या नेत्रातून अश्रू वाहू लागले. खरे तर त्यांच्या नेत्रातून वाहणाऱ्या अश्रूंनीच श्रीस्वामीमहाराजांच्या प्रश्नाचे उत्तर दिले होते; कारण त्यांच्या मुखातून आनंदातिरेकाने शब्दच फुटत नव्हता. त्यामुळे ते नुसते मानेनेच "हो" असे म्हणाले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना अंगारा दिला व ते त्यांना असे म्हणाले की, "याचे सेवन करा म्हणजे प्रकृती बरी होईल. आता काळजी करण्याचे कारण नाही. श्रीदत्त सर्व आनंदी आनंद करील." श्रीस्वामीमहाराजांनी दिलेला तो अंगारा मस्तकावर धारण करून ते गृहस्थ आपल्या गावी निघून गेले.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या या मुक्कामातच एक व्याधिग्रस्त बाई कोल्हापूरहून आल्या होत्या. त्या अमांशाने पीडित असून त्यांना वैद्याचे औषध चालू होते; पण काही केले तरी त्यांना गुण येत नव्हता. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर त्यांनी आपली हकीकत त्यांच्या कानावर घातली. त्यांची सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही सध्या जे औषध घेता आहात तेच चालू ठेवा; मात्र त्या औषधात हा अंगारा थोडा थोडा घालून मग ते घेत चला." असे म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना अंगारा दिला. तो अंगारा घेऊन त्या बाई कोल्हापूरला परत गेल्या. आपल्या घरी आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे त्या बाईंनी औषधातून त्यांच्या हस्तस्पर्शाने पवित्र झालेला व महौषधी-रूपाने मिळालेला तो अंगारा घालून घेताच त्या व्याधिमुक्त झाल्या. त्यानंतर त्या पुन्हा श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्या व त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन त्यांना आपण व्याधिमुक्त झाल्याचे सांगितले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "अशीच देवावर भक्ती ठेवा म्हणजे देवाच्या कृपेने इहपर कल्याण होईल." श्रीस्वामीमहाराजांचा हा उपदेश त्यांनी अंतःकरणात दृढ धारण केला व त्या दिवशी त्यांनी देवाची महापूजा करून त्या आपल्या घरी परत गेल्या.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर त्यांच्या दर्शनासाठी दररोज दूरदूर गावाहून अनेक लोक येत असत. या सर्वांची भोजनाची सोय व्हावी म्हणून श्रीसीताराममहाराजांनी श्रीब्रह्मानंदांच्या मठातील महादेवाच्या मंदिरात धान्याची कोठी ठेवली होती व मठातच स्वयंपाक करून वाडीतील व शिरोळातील

आपल्या मंडळींतर्फे भोजनाच्या पंक्ती वाढण्याची सोय केली होती. श्रीस्वामीमहाराज माधुकरी–भिक्षा घेऊन आल्यावर भोजनाला बसले म्हणजे मठातच त्यांच्या शेजारी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-स्वामीमहाराज बसत. त्यांच्या समोर श्रीगांडामहाराज, अन्य पुजारी, परिष्ट, सेवेकरी आणि परगावचे ब्राह्मण बसत. शिवाय ब्राह्मणांच्या पंक्ती श्रीस्वामीमहाराजांच्या सभोवार बसत. यावेळी सर्वांना आग्रह करीत करीत श्रीस्वामीमहाराजांची भिक्षा चालत असे. मध्ये मध्ये श्लोक म्हटले जात. असा हा थाट श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये होते तोपर्यंत श्रीसीतारामहाराजांनी चालू ठेवला होता. श्रीसीतारामहाराज रात्री दहा वाजेपर्यन्त गावातील लोकांना बोलावून आणून त्यांना अत्यंत प्रेमाने भोजन घालून नंतरच स्वतः अल्पाहार घेत असत. श्रीस्वामीमहाराज, श्रीनृसिंहसरस्वती-दीक्षितस्वामीमहाराज व श्रीसीतारामहाराज या तिघांनीही तिखट मीठ खाणे सोडले होते व ते सर्वजण अगदी अल्पाहारी होते.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये यावेळी मुक्काम असताना श्रीस्वामी-महाराज सकाळी ९ ते ११ यावेळात श्रीनारायणस्वामींच्या धर्म-शाळेत सोवळ्याने ब्राह्मण व शास्त्रीमंडळींना वेदान्तभाष्योपदेश करीत असत. यावेळी श्रीस्वामीमहाराज कोणाला भेटत नसत व मध्ये कोणाशीही बोलत नसत. त्यावेळी श्रीसीतारामहाराज सर्वांच्या दुपारच्या भोजनाची व्यवस्था पाहण्यात गढलेले असत आणि कोणी दर्शनार्थी आल्यास त्याला आग्रहाने भोजनप्रसादास थांबवून घेऊन "दुपारी तीन वाजल्यानंतर दर्शन होईल." असे सांगत असत.

एके दिवशी कोल्हापूर दरबारचे कोणी एक मानकरी श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाला सकाळी ९–१०च्या सुमारास आले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीनारायणस्वामींच्या धर्मशाळेत वेदान्त भाष्य

सांगत होते. त्याकरिता धर्मशाळेचे दरवाजे बंद केले होते. त्यामुळे त्या सरकारी मानकरी पुरुषाने श्रीसीतारामममहाराज यांना असे विचारले की, "गुरुमहाराजांचे दर्शन मला केव्हा होईल!" त्यावेळी श्रीसीतारामममहाराज त्याला असे म्हणाले की, "गुरुमहाराजांचे दर्शन आपल्याला दुपारी तीन वाजल्यानंतर होईल. त्यावेळी ते मोकळे होऊन सर्व लोकांना भेटत असतात. तरी तोपर्यंत आपण थांबा. दुपारी येथेच भोजनप्रसाद घ्या म्हणजे आपली काही अडचण होणार नाही."

श्रीसीतारामहाराजांनी त्या मानकरी गृहस्थांना असे सांगितले; तरी आपण आत्ता आल्याबरोबर आपणास श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन न होता ते दुपारी तीन वाजता होणार हे ऐकून त्या गृहस्थांना त्यांच्या गर्विष्ठ स्वभावाप्रमाणे राग आला व ते क्रोधाने श्रीसीता-राममहाराजांना असे म्हणाले की, "आम्ही काय घड्याळे बाळगली आहेत काय? गुरुमहाराजांच्या दर्शनाला घड्याळ लावून यावयाचे असते काय?"

त्या गृहस्थांचे हे अरेरावीचे उत्तर ऐकून श्रीसीतारामममहा-राजांच्या मनाला विषाद वाटला व ते एकदम अत्यंत निर्भीडपणे त्या मानकरी गृहस्थांना असे म्हणाले की, "कसेही करून येथे गुरुमहा-राजांच्या दर्शनाला या असे म्हणून तुम्हाला कोणी चिठ्ठी पाठविली होती काय?" श्रीसीतारामममहाराजांनी निःस्पृहपणे दिलेले हे उत्तर ऐकून त्या गृहस्थांच्या अंगाचा अगदी तिळपापड झाला. अशा-प्रकारे उत्तर दिल्याबद्दल श्रीसीतारामममहाराजांना चांगला धडा शिकविला पाहिजे असा रागाने विचार करून ते गृहस्थ चावडीवर नगारखान्यात गेले व तेथून परत येताना श्रीसीतारामममहाराजांना गिरफदार करण्यासाठी काही पोलीस घेऊन आले. श्रीब्रह्मानंदांच्या

मठापाशी आल्यावर त्या गृहस्थांनी श्रीसीतारामहाराजांकडे बोट करून पोलिसांना असे सांगितले की, "यांना फारच मस्ती आली आहे. हे वाटेल तशी उलटसुलट उत्तरें देऊन रागानें काहीही बोलतात. यांच्या मुसक्या बांधा व यांना चावडीवर घेऊन चला म्हणजे यांची मस्ती जिरेल."

त्या गृहस्थांचे हे सर्व भाषण ऐकून श्रीसीतारामहाराज क्रोधयुक्त मुद्रा करून त्यांना एवढेच म्हणाले की, "तुला चमत्कार पाहावयाचा आहे काय? तो पाहिला म्हणजें मस्ती कोणाला आली आहे व ती कोणाची जिरणार हे तुला आपोआप कळेल." श्रीसीतारामहाराजांची ती क्रोधयुक्त मुद्रा व तें सामर्थ्ययुक्त भाषण ऐकून ते शिपाई अगदी गडबडून गेले; कारण त्यांना श्रीसीतारामहाराजांच्या सामर्थ्याची पुरेपूर जाणीव होती. त्यामुळें तें बोलतील तेच होईल व काहीतरी अनर्थ आपल्यावर कोसळेल अशी भीती उत्पन्न होऊन त्यांच्यापैकी एकजण सुद्धा त्यांच्याजवळ जाण्याला धजावला नाही. उलट त्या सर्व शिपायांनी श्रीसीतारामहाराजांना दुरून मोठ्या आदरानें नमस्कारच केला.

आपण बरोबर आणलेले शिपाई काही सांगितल्याप्रमाणें आपलें काम करणार नाहीत हे लक्षात आल्यावर ते सरकारी मानकरी गृहस्थ "कोल्हापुराहून दुसरे शिपाई घेऊन येऊन चांगला हिसका दाखवितो," असे रागारागानें बोलत तात्काळ कोल्हापूरला निघून गेले.

तें गृहस्थ कोल्हापूरला परत गेल्यावर त्यांना श्रीसीतारामहाराजांचा काय चमत्कार दिसला असेल तो त्यांचा त्यांना माहीत; पण दोन दिवसांनी ते गृहस्थ श्रीक्षेत्र नरसोबावाडीला परत आले व त्यांनी श्रीसीतारामहाराजांपाशी येऊन आपल्या कृतापराधांची साष्टांग दंडवतपूर्वक नमस्कार घालून माफी मागितली. हे पाहताच

सर्व लोकांना तो मोठाच चमत्कार वाटला.

श्रीसीताराममहाराजांनी प्रथम जरी त्या गृहस्थांच्या अभिमान-नाशासाठी थोडा राग दाखविला होता; तरी नंतर ते शरण आल्यावर व निरभिमान होताक्षणीच त्यांनी त्यांना प्रेमपूर्वक आशीर्वाद दिला व श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घडवून त्यांच्याकडून त्यांना प्रसाद देऊन त्यांचे इहपर अखंड कल्याण केले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या परम-भक्ताची व त्यांच्या एकनिष्ठ सेवकाची वृत्ती त्यांच्या श्रीसद्गुरु-नाथ महाराजांच्या सारखीच झाली होती हे श्रीसंततुकाराममहा-राजांचा पुढील अभंग वाचला म्हणजे यथार्थपणे लक्षात येते. ते आपल्या अभंगात असे म्हणतात की--

**मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास। कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥**
**मेले जित असों निजेलिया जागे। जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥२॥**
**भले तरि देऊं गांडीची लंगोटी। नाठाळाचे काठी देऊं माथां ॥३॥**
**मायबापाहूनि बहू मायवंत। करूं घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥**
**अमृत तें काय गोड आम्हांपुढें। विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥**
**तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड। ज्यांचे पुरें कोड त्याचेपरि ॥६॥**

श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम आहे असे कळल्यावर त्यांच्या पूर्वाश्रमातील सर्व परिचित मंडळी त्यांचे दर्शन घेण्यासाठी तेथे आली होती. त्यांत जसे श्री. आजरेकरबुवाही आले होते तसेच श्री. अमळनेरकरबुवाही आपल्या सर्व अनुयायांसह दर्शनासाठी आले होते. तेथे त्या सर्व लोकांनी श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेने एक रात्र उत्तम भजन केले. त्या दिवशी सर्व लोकच काय पण श्रीस्वामीमहाराजही भजनात अगदी रंगून गेले. श्रीस्वामीमहा-राजांनी श्रीसीतारामहाराजांना आपल्या या पूर्वपरिचित मंडळींची

सर्व व्यवस्था उत्तम ठेवावयास सांगून त्यांचा उत्तम मान राखला व त्यांना प्रसाद म्हणून नारळही दिला.

एके दिवशी श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वाश्रमातील भाचे श्री. केशवभट सरवटे हे त्यांच्या दर्शनासाठी आले. त्यावेळी ते श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणाले की, "महाराज! आमच्या घराण्यातील संततीला कोणीतरी पिशाच्चादि त्रास देत असल्यामुळे सतत पीडा व त्रास होऊन अडचणी येतात; तरी आपण यावर काहीतरी उपाय सांगून आमची सर्वांची सुटका करा."

श्री. केशवभटजींनी अशी प्रार्थना करताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुझे चुलतेच पिशाच्च होऊन तुम्हा सर्वांना पीडा देत आहेत; तरी तुझ्या चुलत्यांना गती मिळण्याकरिता त्रिपिंडी श्राद्ध कर. श्राद्ध केले म्हणजे ते पिशाच्च योनीतून मुक्त होतील व तुम्हा सर्वांच्या मागील त्रास दूर होईल." श्रीस्वामी-महाराजांनी त्रास होण्याचे कारण सांगताच श्री. केशवभटजी त्यांना असे म्हणाले की, "महाराज! ते तर दत्तक गेले होते. त्यांचे आमचे काही संबंधही राहिले नव्हते; मग देणे घेणे लागण्याचा प्रश्नच येत नाही."

श्री. केशवभटजींनी असे सांगताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुझ्या काकांचे दत्तकविधान यथाशास्त्र न झाल्यामुळे त्यांचा व तुझ्या घराण्याचा संबंध तसाच राहिला आहे. तरी आता मघाशी सांगितल्याप्रमाणे त्रिपिंडी श्राद्ध कर म्हणजे सर्व त्रासातून मुक्तता होईल. जर तुझ्याकडे पैसे असतील तर ताबड-तोब त्रिपिंडी श्राद्ध करून घेण योग्य होईल." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच श्री. केशवभटजी श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल की, "महाराज! सध्या अस्त असल्यामुळे आपण त्रिपिंडी श्राद्ध

आता करीत नाही. पुढे सवडीने केव्हातरी करीन." त्यांचे हे म्हणणे ऐकताच, "तो काहीतरी कारण सांगून त्रिपिंडी श्राद्ध करण्याची टाळाटाळ करीत आहे," असे लक्षात येताच श्रीस्वामीमहाराज त्यांना एकदम रागाने असे म्हणाले की, "जर त्रिपिंडी करावयाची नसेल तर येथून चालता हो."

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज रागावले तरी श्री. केशवभटजींनी आपल्या मुलाचे जन्मटिपण दाखवून त्यांना असे विचारले की, "महाराज ! माझ्या मुलाची जन्मपत्रिका आपण पाहून त्याचे सर्व आयुष्य कसे जाईल ते सांगावे." श्री. केशवभटजींनी केलेली ही विनंती ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "कसला खर्डा घेऊन आला आहेस ? जा म्हणून सांगितले तरी जात नाहीस का ?" हे ऐकताच श्री. केशवभटजी नुसते स्वस्थ बसून राहिले. त्यावेळी तेथे जवळच श्रीसीतारामहाराजही बसले होते. श्रीस्वामीमहाराजांची आपल्या भाच्याबद्दलची ती उपेक्षावृत्ती व रागाचा आविर्भाव पाहून ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "त्याला काय ते नीट समजावून सांगावे म्हणजे त्याचे समाधान होईल."

श्रीसीतारामहाराजांनी असे सांगताच श्रीस्वामीमहाराज अधिकच चिडून त्यांना असे म्हणाले की, "येथे कोणाची वकिली नको आहे. यांच्या भल्यासाठी त्रिपिंडी श्राद्ध कर म्हणून सांगितल्यावर ते निमूटपणाने करावयाचे सोडून हा ती गोष्ट टाळण्यासाठी काहीतरी कारणे सांगतो, त्यामुळे हा येथून निघून गेलेला बरा ! "

अशा रीतीने श्री. केशवभटजी व श्रीसीतारामहाराज हे दोघेही जरी श्रीस्वामीमहाराजांच्या रागाच्या माऱ्यात सापडले तरी पाण्याच्या पृष्ठभागावर तरंग आल्यावर तो जसा एका क्षणात

नष्ट होतो तसा निमिषार्धातच श्रीस्वामीमहाराजांचा राग संपुष्टात येऊन त्यांनी श्री. केशवभटजींनी पुढे ठेवलेले टिपण हातात घेतले व त्याकडे पाहात ते त्यांना असे म्हणाले की, " या पत्रिकेत मुलाचे लग्न चुकले आहे. तुझ्या मुलाचे डोळे मोठे आहेत ना ? " श्री. केशवभटजींनी " हो " म्हटल्यावर श्रीस्वामीमहाराज पुढे असे म्हणाले की, " या मुलाचे धन लग्न आहे. मुलगा चांगला आहे. त्याचे सर्व आयुष्य चांगले जाईल. " इतके सांगून श्रीस्वामीमहाराजांनी श्री. केशवभटजींच्या मुलाच्या पत्रिकेत काही सुधारणा केल्या व ती परत देऊन त्यांना घरी परत जाण्यास सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. केशवभटजी आपल्या गावी परत आले; पण कोणती ना कोणती तरी अडचण येत गेल्यामुळे पुढे तीन चार वर्षे ते श्राद्ध करू शकले नाहीत. त्यानंतर शके १७३५ अर्थात् इ. स. १९१३ मध्ये श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र गरुडेश्वरी असताना श्री. केशवभटजींची आई त्यांच्या दर्शनासाठी तेथे गेली होती. त्यावेळी तिच्या एका हाताला सूज आली होती. तिची एकंदर हकीकत ऐकल्यावर व तिच्या हाताची सूज पाहिल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी तिला कोणत्याही परिस्थितीत चतुर्दशीला मुलाकडून त्रिपिंडी श्राद्ध लवकरात लवकर करवून घेण्यास सांगितले व श्राद्धासाठी लागणारे पैसेही दिले. श्रीक्षेत्र गरुडेश्वराहून ती परत आल्यावर तिने आपल्या मुलाकडून त्रिपिंडी श्राद्ध करवून घेतले. त्यामुळे तिच्या हाताची सूज गेली, घरातील सर्व पीडा दूर झाली व श्री. केशवभटजींची मुलेही जगू लागली.

दापोली तालुक्यातील पळगावयचे श्री. धोंडोपंत कोपरकर बडोद्याला सरकारी नोकरीमध्ये होते. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती

त्यांच्या कानावर गेली होती. ही कीर्ती ऐकल्यापासून श्री. धोंडोपंत यांच्या अंत:करणात श्रीस्वामीमहाराजांविषयी अपार आदर उपस्थित झाला होता. या आदरापोटीच त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचा फोटो महत्प्रयासाने मिळवून त्यांची आपल्या घरात स्थापना केली होती.

श्रीस्वामीमहाराजांच्या फोटोची दररोज पूजा करता करता श्री. धोंडोपंतांच्या मनात त्यांच्याबद्दल इतकी भक्ती व प्रेमादर उपस्थित झाला की, श्रीस्वामीमहाराजांचे केव्हा एकदा आपल्याला दर्शन होईल व केव्हा एकदा आपण त्यांच्याकडून अनुग्रह घेऊ अशी विलक्षण आतुरतेची भावावस्था त्यांच्या ठिकाणी उत्पन्न झाली. ज्यावेळी श्री. धोंडोपंतांनी या अवस्थेची परमावधी गाठली त्यावेळीच त्यांना असे कळले की, सध्या श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये आहे. त्यावेळी श्री. धोंडोपंत ताबडतोब बडोद्याहून निघून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले.

श्री. धोंडोपंत कोपरकर श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे प्रथम दर्शन घेतले. त्यावेळी त्यांचे अष्टसात्त्विकभाव जागृत झाले. त्यांचे शरीर स्तंभित झाले व त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या. अशा स्थितीत श्री. धोंडोपंत हे बराच वेळ श्रीस्वामीमहाराजांपुढे हात जोडून उभे होते. त्यांच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. शेवटी श्रीस्वामीमहाराजांनी जेव्हा त्यांच्याकडे कृपार्द्र दृष्टीने पाहिले तेव्हा ते देहभानावर आले. त्यावेळी ते श्रीस्वामीमहाराजांना अत्यंत कातर व दीन स्वरात कसेबसे असे म्हणाले की, " महाराज ! या दीनाला पदरात घ्या आणि मोक्षाचा मार्ग दाखवा. "

श्री. धोंडोपंतांसारखा आपला परमभक्त आपल्या दर्शनासाठी येत आहे, याची जाणीव श्रीस्वामीमहाराजांना केव्हाच झाली होती. अशा स्थितीत त्यांचे अंतरंग जाणावयाला श्रीस्वामीमहाराजांना वेळ थोडाच लागणार होता ? अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे श्री. धोंडोपंतांनी प्रार्थना करताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांची प्रार्थना मान्य करून त्यांना दुसऱ्याच दिवशी श्रीब्रह्मानंदाच्या मठात यावयाला सांगितले. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या प्रार्थनेचा स्वीकार केला हे पाहून श्री. धोंडोपंतांना परमानंद झाला.

श्री. धोंडोपंत दुसऱ्या दिवशी पहाटेच स्नानसंध्यादि नित्यकर्मे आटोपून श्रीब्रह्मानंदांच्या मठात येऊन उपस्थित झाले. श्रीस्वामी-महाराजांनी आपले नित्यकर्म उरकल्यावर त्यांना मंत्रोपदेश दिला व त्याच दिवशी संध्याकाळी त्या मंत्राचे विधानही सांगितले. त्याच दिवशी सुरतेचे श्री. परशुराम कुबेर रामभट यांनाही श्रीस्वामीमहा-राजांनी मंत्रोपदेश दिला. हे इंजिनिअर होते. कालौघात ते श्रीक्षेत्र गरुडेश्वरच्या श्रीदत्तमंदिराचे एक ट्रस्टी म्हणून निवडले गेले.

श्रीक्षेत्र माणगावचे श्री. आत्मारामभट कोनकर यांनी श्रीस्वामी-महाराज पूर्वाश्रमात असताना त्यांच्यापाशी थोडेसे शास्त्राध्ययन व वेदाध्ययन केले होते. या अध्ययनामुळे या उभयतांत गुरुशिष्याचे प्राकृत व व्यावहारिक नाते उत्पन्न झाले असले; तरी श्रीस्वामी-महाराजांच्या आध्यात्मिक अधिकाराची पूर्णपणे जाणीव असल्या-मुळे त्यांच्याबद्दल श्री. आत्मारामभटांच्या अंतःकरणात अप्राकृत भक्तीचा सागर नेहमीच उसळत राहून त्यांच्याबद्दलच्या प्रेमाच्या लाटा येत असत; पण श्रीस्वामीमहाराज भारतभर संचार करीत असल्यामुळे त्यांच्या दर्शनाची तीव्र इच्छा असूनही त्यांना श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाचा कधीही योग आला नाही.

यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम आहे असे कळल्यावर त्यांनी तात्काळ श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाण्याचे ठरविले. तिकडे जाताना त्यांनी आपल्या पत्नीलाही बरोबर घेतले; कारण त्यांच्या पत्नीची प्रकृती नेहमीच ठीक राहात नसे व तिला अद्यापपर्यंत संततीही झाली नव्हती. आपल्या पत्नीला श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांवर घालून तिची प्रकृती सुधारण्यासाठी व संततीप्राप्तीसाठी त्यांना काहीतरी उपाय विचारावा असा हेतू मनात बाळगूनच ते आले होते.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर श्री. आत्मारामभट आपल्या पत्नीला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेले. श्री. आत्मारामभट यांनी श्रीस्वामीमहाराजांना आपल्या मनातील हेतू सांगण्यापूर्वीच ते कशाकरिता येथे आले आहेत हे त्यांनी ओळखले होते. त्यांच्या पत्नीला पाहताच तिला पिशाच्चबाधा असल्यामुळे ती सतत आजारी राहून तिला संतती होत नाही हे जाणून त्यांनी भूर्जपत्रावर एक यंत्र लिहून देऊन ते तिच्या गळचात बांधण्यास सांगितले व पोटात घेण्यासाठी भस्मही दिले. इतके झाल्यावर ते श्री. आत्मारामभट यांच्याकडे वळून त्यांना असे म्हणाले की, "आता काही काळजी करण्याचे कारण नाही. हिची पिशाच्चबाधा दूर होऊन प्रकृती उत्तम होईल. हिच्यापासून तुला पुत्रसंततीही लाभेल व तुम्हा दोघांचे सर्व आयुष्यही सुखाचे जाईल."

श्रीस्वामीमहाराजांना आपण काही एक न सांगता त्यांनी अत्यंत आपुलकीने, मोठ्या प्रेमाने व विलक्षण आत्मीयतेने आपल्या मनातील हेतू पूर्ण केला हे पाहून श्री. आत्मारामभटांच्या डोळ्यात अश्रू तरळू लागले. त्याच वेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, "तुझ्या घरासमोर एक औदुंबर आहे. त्या वृक्षाची

तू सेवा करतोस का ? " हा प्रश्न ऐकताच श्री. आत्मारामभट श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "सकाळी स्नानसंध्यादि झाल्यावर मी रोज त्या औदुंबराला पाणी घालून गंधफूल वाहतो." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तू करतो तेवढी सेवा पुरे आहे. अधिक काही करण्याचे कारण नाही." इतके सांगून श्रीस्वामीमहाराजांनी श्री. आत्मारामभटांना घरी जावयाला परवानगी दिली. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने श्री. आत्माराम-भटांच्या पत्नीची पिशाच्चबाधा गेली. कालौघात ती पुत्रवती झाली व त्यांना झालेल्या कर्जातून ते मुक्त होऊन त्यांची भरभराट झाली.

ही सर्व कथा वाचली म्हणजे हे लक्षात येते की, श्रीस्वामीमहा-राजांनी श्री. आत्मारामभटांसारखे जे जे आर्त लोक त्यांच्याकडे आले त्यांचे अध्यात्म सिद्ध होण्यासाठी प्रथम त्यांचे ऐहिकच सुधारले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "जयांचें ऐहिक धड नाहीं। तयांचें परत्र पुससी काई ॥ ४.१५४॥ ज्ञानेश्वरी ॥" असे म्हणून "ज्यांना ऐहिक सुखही नीट धड मिळत नाही; मग त्यांच्या पारलौकिक सुखाची गोष्ट कशाला विचारतोस ? " असा जो प्रश्न अर्जुनाला विचारला आहे, त्यातच श्रीस्वामीमहाराजांच्या उपरोक्त दृष्टीचे रहस्य भरलेले आहे. श्रीस्वामीमहाराज त्यांच्याकडे येणाऱ्या आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी भक्तसाधकांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे कर्म, भक्ती, उपासना व ज्ञान सांगत असत. इतकेच नव्हे; तर ऐहिक सुखासाठी ते मंत्र, तंत्र, अंगारा इत्यादि साधनांचाही उपयोग करीत असत. या दृष्टीने पाहिले म्हणजे आजकाल नुसता कोरडा वेदान्त सांगणारे लोक श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धान्तरूपाने सांगितलेले महान् तत्त्व व विचार पूर्णपणे विसरलेले आहेत, याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. ज्याला जे पाहिजे ते व सोसेल ते देऊन त्याला हळूहळू

अध्यात्माकडे वळवावे हीच सकल संतांची शिकवणूक असून तिचा प्रकर्षत्वात्मक विलास श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी दिसून येतो यात काहीच शंका नाही; कारण त्यांना सर्व समाजाला बरोबर घेऊन जावयाचे होते. ज्यांना अशा प्रकारे सर्व समाजाला उन्नतीच्या पथावर न्यावयाचे असते त्यांना समाजातील सर्व स्तरातील सर्व प्रकारच्या लोकांची व्यवस्था विभिन्न साधन पद्धतींचा अवलंब करून करावी लागते. या दृष्टीने श्रीसंततुकाराममहाराजांचे पुढील दोन अभंग मनन करण्यासारखे आहेत.

नसतां अधिकार। उपदेशासी बलात्कार।
तरि ते केले हो चार। माकडा आणि गारोडी ॥ १ ॥
धनधान्य राज्य बोल। वृथा रंजवणें फोल।
नाहीं तेथें ओल। बीज वेंची मूर्ख तो ॥ २ ॥
नये बांधों गांठीं। पदरा आणी ऐसी तुटी।
असोन कसोटी। शिष्टाचार अनुभव ॥ ३ ॥
उपदेशी तुका। मेघवृष्टीनें आइका।
संकल्पासी धोका। सहज तें उत्तम ॥ ४ ॥

★ ★ ★

अधिकार तैसा करूं उपदेश।
साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥ १ ॥
मुंगीवरी भार गजाचें पालाण।
घालितां ते कोण कार्यसिद्धी ॥ २ ॥
तुका म्हणे फांसे वाघुरा कुऱ्हाडी।
प्रसंगीं ते काढी पारधी तो ॥ ३ ॥

★ ★ ★

**अर्थ :–** ब्रह्मज्ञान सांगण्याचा व ऐकण्याचा अधिकार नसताना उपदेशाचा बलात्कार केला; तर गारुड्याने माकडाला नाचविल्या-सारख्या चेष्टा होतील. ॥१॥ ज्याप्रमाणे जमिनीत ओलावा नसताना जो बी पेरतो त्याला मूर्ख म्हणतात; कारण ते व्यर्थ ठरते त्याप्रमाणे लोकहो ! तुम्ही धन–धान्य संपादन करा, सत्ता मिळवा व ऐश्वर्य भोगा असा मायिक पदार्थासंबंधी उपदेश केला, तर तो लोकांना बरा वाटेल; पण हा उपदेश परिणामी व्यर्थ आहे आणि अधिकार नसताना ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला; तरीही परिणामी व्यर्थच आहे. ॥ २ ॥ मनुष्याने कोणता लाभ संपादन करावा, याविषयी श्रुतिस्मृतींचे अर्थ जाणणारे व त्याप्रमाणे स्वतः आचरण करून जगाला आचरावयाला लावणारे जे संत आहेत त्यांचा आचार व अनुभव ही मुख्य कसोटी असताना ज्याच्यात परिणामी तोटा आहे असे पापरूपी धन पदरात बांधू नये. ॥३॥ श्रीतुकाराममहाराज असे म्हणतात की, मी तुम्हाला अभंगद्वारा मेघवृष्टीने उपदेश करीत आहे, तो ऐका. "मी गुरू आहे व माझा अमुक एक शिष्य आहे," या अभिमानात किंवा संकल्पात फार धोका आहे, अनहित आहे. याकरिता सहज, निर-भिमान व निरपेक्ष बुद्धीने जे मला चांगले सांगता येईल व जे कोणी माझे ऐकतील तेच उत्तम आहे. ॥ ४ ॥

"पंढरीला जा," "हरिनाम घ्या," हा उपदेश मेघवृष्टि-न्यायाने आम्ही सर्वांना करीत असलो; तरी धर्म, वैराग्य, ज्ञान, योग, इत्यादि सर्व उच्च गोष्टींचा उपदेश मात्र ज्याचा जसा अधिकार असेल त्याला तोच, तसा व त्या प्रमाणातच करू; कारण ज्याला जे ओझे सहन होणे शक्य आहे, तेच त्याच्या डोक्यावर देणे योग्य होईल. ॥१॥ हत्तीवर लादावयाचे अंबारीचे ओझे मुंगीवर घातले; तर त्यापासून कोणते कार्य साधणार आहे ? ॥ २ ॥ श्रीतुकाराम-

महाराज असे म्हणतात की, ज्याप्रमाणे पारध्याजवळ फासे, जाळे व कुऱ्हाडी इत्यादि शिकारीची साधने पुष्कळ असतात; पण ज्यावेळी जसा प्रसंग पडेल तसा त्याचा उपयोग तो करीत असतो त्याप्रमाणे संतही ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे उपदेश करीत असतात. ।।३।।

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला असताना पेडणे येथील एक गृहस्थ त्यांच्या दर्शनासाठी मुद्दाम तेथे आले होते. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाल्यावर ते त्यांना असे म्हणाले की, "आमच्या परसात वानरांचा नेहमीच फार त्रास होतो. ते नेहमीच परसातील भाजी व फळफळावळ यांची नासाडी करीत असतात; तरी तो त्रास दूर होण्यासाठी कृपा करून काही-तरी उपाय सांगावा." त्या गृहस्थांनी केलेली ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक यंत्र करून दिले व ते परसात ठेवण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे पेड-ण्याला गेल्यावर त्या गृहस्थांनी ते यंत्र परसात ठेवल्यावर त्या गृहस्थांच्या परसातील वानरांचा त्रास नाहीसा होऊन ते त्या त्रासा-तून मोकळे झाले.

एके दिवशी एक वैष्णव सांप्रदायी ब्राह्मण श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीला आले. आपल्यापैकी कोणी वैष्णव ब्राह्मण उपाध्याय म्हणून मिळाल्यास येथे श्राद्ध करावे असा त्यांचा विचार होता; पण वाडीमध्ये तसा उपाध्याय न मिळाल्यामुळे त्यांनी श्राद्ध केले नाही. त्यांच्या मनातील शैव व वैष्णव हा द्वैतभाव देवांना रुचला नाही. एके दिवशी रात्री त्यांना विंचू चावून त्यांची प्राणांतिक अवस्था झाली. आता आपण काही जगत नाही असे पाहून व श्रीस्वामी-महाराज विंचवाच्या विषयावर औषध देतात, असे ऐकल्यावर ते त्यांच्याकडे औषधासाठी गेले.

ज्यावेळी त्या वैष्णव ब्राह्मण गृहस्थांनी आपल्याला होणारा विंचवाच्या विषाचा त्रास दूर व्हावा म्हणून श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना केली त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आपल्यातील द्वैतभावामुळे देवाचा आपल्यावर कोप झाला आहे· त्यामुळे आपल्याला विंचू चावला. आता आपण "शिव-शिव" असे नामोच्चारण करा व येथे कोणीही वैष्णव उपाध्याय मिळणे शक्य नसल्यामुळे येथील शैव उपाध्यायांकडूनच तीर्थश्राद्ध करा. असे आपण केले म्हणजे देवाचा कोप शांत होईल व आपली पीडाही निघून जाईल." पुढे लगेच त्या गृहस्थांनी "शिव-शिव" या श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेल्या नामोच्चारणास सुरुवात केली व त्यांनी सांगितल्याप्रमाणे तीर्थश्राद्धही केले. त्यामुळे त्यांचे विंचवाचे विष उतरून ते गृहस्थ वेदनामुक्त झाले.

कोल्हापूर प्रांतातील वठार या गावातील श्री. नरहरी दिवाण या नावाचा एक पंधरा वर्षाचा मुलगा एके दिवशी श्रीक्षेत्र नरसोबा-वाडी येथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आला. श्रीस्वामीमहा-राजांचे दर्शन झाल्यावर त्याला कमालीचे समाधान झाले. श्रीस्वामी-महाराजांसारख्या लोकोत्तर, दिव्य व पुण्य पुरुषाच्या सहवासात जर आपण राहिलो तर आपले कल्याण होईल या विचाराने तो मुलगा तेथेच राहिला. यावेळी रोज श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेणे, त्यांना साष्टांग नमस्कार घालणे व जास्तीत जास्त वेळ त्यांच्या सहवासात घालविणे एवढाच मनाने निश्चय करून श्री. नरहरी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला राहिला होता.

श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात राहण्याचा श्री. नरहरीने जो दृढ निश्चय केला होता त्यामागे त्याची जी दृष्टी होती ती किती श्रेष्ठ व उदात्त होती याचे स्पष्ट दिग्दर्शन आपल्याला श्रीसंततुकाराममहा-

राजांच्या पुढील अभंगांवरून झाल्याशिवाय राहात नाही. संतांचा नुसता सहवासच किती अमोलिक व लोकोत्तर असतो याचे वर्णन करताना ते असे म्हणतात की–

अंगें अनुभव झाला मज । संतरजचरणांचा ॥ १ ॥
सुखी झालों या सेवेनें । दुःख नेणें यावरी ॥ २ ॥
निर्माल्याचें तुळसी दळ । विष्णुजळ चरणींचें ॥ ३ ॥
तुका म्हणे भाव सार । करुनी फार मिश्रित ॥ ४ ॥

★ ★ ★

अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥
काय उरलें तया पण । मागील तें नाम गुण ॥ २ ॥
लोह लागे परिसा अंगीं । तोही भूषण झाला जगीं ॥ ३ ॥
सरिता ओहळा ओघा । गंगें मिळोनि झाल्या गंगा ॥ ४ ॥
चंदनाच्या वासें । तरु चंदन झाले स्पर्शें ॥ ५ ॥
तुका जवळा संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

★ ★ ★

संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ १ ॥
बहु दुधड जरी झाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ ३ ॥

★ ★ ★

संतांचिया पायीं हा माझा विश्वास । सर्वभावें दास झालों त्यांचा ॥ १ ॥
तेचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ॥ २ ॥
भागलिया मज वाहतील कडे । त्यांचियानें जोडे सर्व सुख ॥ ३ ॥
तुका म्हणे शेष घेईन आवडी । वचन न मोडी बोलिलें तें ॥ ४ ॥

★ ★ ★

श्रीसंततुकाराममहाराजांनी उपरोक्त अभंगात जो संतांच्या सहवासाचा आणि सेवेचा महिमा प्रकट केला आहे त्याची जाणीव श्री. नरहरीच्या ठिकाणी अगदी लहानपणीच उद्‌भूत झाली होती. त्यामुळेच तो दृढ निश्चयाने श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात राहिला. तेथे त्याच्या ठिकाणी मुळातच असलेला वैराग्याचा अंकुर वाढीस लागून तो अधिक तीव्रतेने परमार्थाकडे वळला. वास्तविक पाहता हे काही आपोआप घडले नव्हते; कारण श्री. नरहरीच्या आईकडून श्रीसंत एकनाथमहाराज हे आठवे पुरुष होते. त्यामुळे त्यांच्या वंशाचे बीज त्याच्या ठिकाणी संस्कारासहित संक्रांत झाले होते, असे म्हटले तर ते योग्यच ठरेल; कारण या बीजाचाच पुढे वटवृक्ष होऊन श्री. नरहरी हे अष्टचाचे श्रीदत्तमहाराज या नावाने प्रसिद्ध पावले.

कालौघात श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र नरसोबावाडीचा मुक्काम संपल्यावर ते पुढील संचारासाठी निघून गेले. त्यामुळे श्री. नरहरीचा सहवास संपुष्टात आला. श्रीस्वामीमहाराज आता येथे नाहीत असे पाहून श्री.नरहरी श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून निघून श्रीक्षेत्र गाणगापूर येथे गेला. तेथे काही वर्षे राहून त्याने सेवा केल्यावर त्याच्या भाग्याने त्याला स्वप्नात भगवान् श्रीदत्तात्रेयांचे दर्शन झाले.

अशा प्रकारे भगवान् श्रीदत्तात्रेयांचे स्वप्नात दर्शन झाले; तरी श्री. नरहरींची तळमळ शांत झाली नाही. "सद्‌गुरुवांचूनि सापडेना सोय। धरावे ते पाय आधी आधी ।।" या श्रीसंततुकाराममहाराजांनी सांगितलेल्या न्यायाने आपणास श्रीसद्‌गुरूंची प्राप्ती झाल्याशिवाय अध्यात्माची अंतिम ध्येयसिद्धी प्राप्त होणार नाही, याची त्यांना पक्की खात्री पटली. अशा मनःस्थितीत असतानाच पंढरपूर येथे राहणाऱ्या श्रीहरिहरमहाराजांची कीर्ती त्यांच्या कानावर

आली. त्यांचे नाव व कीर्ती ऐकताच जणूकाही एखादी हरवलेली गोष्ट सापडल्यावर ज्याप्रमाणे एखाद्याला आनंद होतो त्याप्रमाणे त्यांना परमानंद होऊन ते तात्काळ पंढरपूरला गेले.

श्रीहरिहरमहाराज हे संन्यासी असून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे गुरू प. प. श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांच्याकडून संन्यास ग्रहण केलेला होता व आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या श्रीगुरुमहाराजांनी त्यांचेही नाव "वासुदेवानंदसरस्वती" असेच ठेवले होते.

श्री. नरहरी पंढरपूर येथे आल्यावर त्यांनी श्रीहरिहरमहाराजांचे दर्शन घेतले व त्यांच्या चरणी अशी प्रार्थना केली की, "आपली कीर्ती ऐकून मी आपल्या चरणाश्रयाला आलो आहे. तरी आपण मला अनुग्रह देऊन माझे जीवन कृतार्थ करावे." श्री. नरहरींच्या प्रार्थनेप्रमाणे श्रीहरिहरमहाराजांनी त्यांना मंत्रदीक्षा देऊन त्यांच्यावर अनुग्रह केला. पुढे श्री. नरहरींनी श्रीहरिहरमहाराजांकडे योगाभ्यास शिकण्याची इच्छा व्यक्त केली. श्री. नरहरींची योगाभ्यासाची आवड पाहून श्रीहरिहरमहाराजांनी त्यांना योगाभ्यास शिकण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांकडे पाठवून दिले.

श्रीहरिहरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. नरहरी श्रीस्वामीमहाराजांकडे आले व त्यांनी आपली एकंदर सर्व हकीकत सांगून आपले श्रीसद्गुरुनाथ श्रीहरिहरमहाराज यांनी आपणाकडे योगाभ्यास शिकण्यासाठी पाठविले आहे असे सांगितले. श्रीहरिहरमहाराजांच्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी श्री. नरहरींना योगाभ्यास शिकवून सर्व योगांगांची व तदंगभूत नियमांची माहिती करून देऊन त्यांना श्रीक्षेत्र पैठण येथे जाऊन सर्व नियम पाळून योगाभ्यास करण्यास सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. नरहरी श्रीक्षेत्र पैठण येथे योगाभ्यास करण्यासाठी गेले. तेथे राहून स्नान-संध्यादि नित्यकर्मे आटोपून ते सर्व यमनियमादिकांचे अत्यंत काटेकोरपणे पालन करून योगाभ्यास करू लागले. एके दिवशी श्रीक्षेत्र पैठण येथील एका अग्नीहोत्रीबुवांनी त्यांना पाहिले व या तेजस्वी तरुण माणसाला संस्कृत शिकवून चांगले विद्वान् करावे असे त्यांना वाटू लागले. त्याप्रमाणे त्या अग्निहोत्रीबुवांनी श्री. नरहरींना संस्कृत शिकण्याचा फार आग्रह केल्यावर ते त्यांना असे म्हणाले की, "आपण येथे योगाभ्यास करण्यासाठी आलो असून संस्कृत शिकू लागल्यावर माझा अभ्यास खंडित होऊन त्यात अडथळे उत्पन्न होतील; तरी मला आपण संस्कृत शिकण्याचा आग्रह करू नका." इतके सांगूनही त्या श्री. अग्निहोत्रीबुवांनी अत्यंत आग्रह केल्यामुळे शेवटी श्री. नरहरींनी त्यांचे म्हणणे मान्य केले व त्यांच्याकडे ते संस्कृत शिकू लागले.

अशा रीतीने काही दिवस गेल्यानंतर श्री. नरहरी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी पुन्हा गेले. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. नरहरींना असे विचारले की, "पैठणला जाऊन योगाभ्यास केला का ? काही अडथळे आले का ? योगाभ्यासात कोणकोणते अनुभव आले ? " अशा प्रकारे उभयतात बराच वेळ प्रश्नोत्तरे चालली असताना श्री. नरहरींनी श्रीक्षेत्र पैठण येथे आपण संस्कृत शिकत होतो असे सांगितले. श्री. नरहरींनी असे सांगताच श्रीस्वामीमहाराज त्यांना जरा रागानेच असे म्हणाले की, "तुला पैठणला योगाभ्यास करण्यास पाठविले होते का संस्कृत शिकण्यास ? संस्कृत शिकण्यास तुला कोणी सांगितले ? संस्कृत शिकल्याने ब्रह्मज्ञान होईल का ? या सगळ्या तथाकथित विद्यावाचस्पतींचे व शास्त्री पंडितांचे काम-

क्रोधादि षड्रिपू गेले आहेत का? "तुका म्हणे नाहीं निरसला देहें। तंव हे अवघे संसारिक॥" हे संत तुकाराममहाराजांचे वचन तुला माहीत नाही काय? यापुढे संस्कृतची सर्व पुस्तके बांधून ठेवून दे व सांगितलेला योगाभ्यास करून मोक्षलाभ करून घे. याशिवाय या जन्मात दुसरा कोणताही मोठा लाभ नाही."

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी केलेला उपदेश श्री. नरहरींच्या मनावर खोलवर बिंबला. त्यांनी त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे संस्कृत शिकणे व त्याचा अभ्यास करणे सोडून देऊन एकमात्र योगाभ्यासच केला. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे वागून पुढे तीव्रतेने अभ्यास केल्यामुळे त्यांच्या कृपेने समाधी सिद्ध होऊन श्री. नरहरी मोक्षप्राप्तीचे अधिकारी झाले.

श्री. नरहरींनी कालौघात सर्व भारतभर फिरून पायीच तीर्थयात्रा केल्या. श्रीस्वामीमहाराजांनी रचलेल्या श्रीदत्तपुराण व श्रीदत्तमाहात्म्य या ग्रंथावर ते प्रवचने करीत असत. श्री. नरहरी दिवाण हेच पुढे अष्टयाचे श्रीदत्तमहाराज म्हणून प्रसिद्धीस आले. त्यांची समाधी सांगलीपासून जवळ असलेल्या अष्टे या गावी असून तेथील समाधीच्या गायमुखाला कान लावला असता आतून अखंड रुद्राचे आवर्तन चालल्याचे कोणालाही एकू येते. त्यांच्या समाधीचा हा अद्भुत चमत्कार आजसुद्धा अनुभविता येतो. हे पाहून मन चकित झाल्याशिवाय राहात नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या संपर्काने, सेवेने, अनुग्रहाने, कृपेने व आशीर्वादाने ज्या व्यक्ती महात् झाल्या व ज्यांनी लोकसंग्रह करून लोकोद्धार केला अशा ८–१० महात्म्यांपैकी अष्टयाचे श्रीदत्तमहाराज हे आहेत. वर लिहिलेल्या त्याच्या चरित्राचा अभ्यास केला म्हणजे प्रथमतः जी एक गोष्ट प्रामुख्याने लक्षात येते ती अशी

आहे की, योगसिद्ध होण्याचे भाग्य लाभणाऱ्या महात्म्याचे वर्णन करताना श्रीमद्गीतेत श्रीगोपालकृष्णनाथांनी असे म्हटले आहे की—

प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ।। ६.४१ ।।
अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ।। ४२ ।।
तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ।। ४३ ।।
पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।। ४४ ।।
प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।।
अनेक जन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।। ४५ ।।

याचा अर्थ असा आहे की, "योगभ्रष्ट पुरुष पुण्याचरण करणाऱ्या श्रेष्ठांच्या लोकास जाऊन त्यालोकी हजारो वर्षे राहून शुद्ध आचरण करणाऱ्या श्रीमंतांच्या घरी जन्म घेतो. ।। ४१ ।। किंवा तो योगभ्रष्ट बुद्धिमान् दरिद्री योग्यांच्याच कुळात जन्म घेतो; परंतु या प्रकारचा दरिद्री योग्यांच्या कुलात होणारा जो जन्म आहे तो या संसारात निःसंशय अत्यंत दुर्लभ किंवा दुर्मिळ आहे. ।। ४२ ।। तेथे त्या दरिद्री योग्यांच्या कुलात त्या योगभ्रष्टाला त्याने पूर्व जन्मात ज्या देहाने साधन केलेले असते तत्संबंधीचे बुद्धिसंस्कार अर्थात् समत्वबुद्धीचे संस्कार अनायासाने प्राप्त होतात आणि हे कुरुनंदना ! पूर्व जन्मातील अभ्यासाच्या संस्काराने किंवा प्रभावाने तो साधक योगसिद्धीसाठी अर्थात् भगवत्प्राप्तीसाठी अधिकच प्रयत्न करतो. ।।४३।। तो योगभ्रष्ट साधक विषयांच्या स्वाधीन असला तरी देखील त्याने पूर्वजन्मी केलेल्या अभ्यासानेच तो निःसंदेह भगवंताकडे ओढला जातो आणि

समत्वबुद्धिरूप योगाचा जिज्ञासू देखील सर्व साधनांना व तदंगभूत फलांना उल्लंघून पलीकडे जातो. ॥ ४४ ॥ अशा प्रकारे अनेक जन्मांपासून अंतःकरणाची शुद्धी करून संसिद्ध झालेला आणि अतिशय प्रयत्नपूर्वक अभ्यास करणारा विद्वान् योगी सर्व पापांपासून उत्तम प्रकारे शुद्ध होऊन त्या साधनाच्या प्रभावाने परमगतीप्रत जातो अर्थात् त्याला मोक्षप्राप्ती किंवा भगवत्प्राप्ती होते. ॥ ४५ ॥

याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की, ज्या लोकांची जी स्थिती प्राप्त करावयास शंभर यज्ञ करणाऱ्या इंद्रालाही सायास पडतात, ती या मोक्षेच्छू पुरुषाला अनायासे प्राप्त होते. मग तेथील निष्फळ न होणारे व अप्रतिम असे भोग भोगता भोगता त्याच्या मनाला कंटाळा येतो ! म्हणूनच स्वर्गात ते दिव्य भोग भोगीत असता हे भगवंता ! हे भोगाचे विघ्न आमच्यावर का कोसळले ? असा प्रश्न विचारून तो निरंतर पश्चात्ताप करीत असतो. नंतर तो पुन्हा मृत्युलोकी जन्म पावतो. तेथे सर्व धर्मांचे माहेरघर असलेल्या अशा कुळात त्याचा जन्म होतो. या ठिकाणी ज्याप्रमाणे भाताचे शेत कापल्यावर तेथे पडलेल्या भातगोटचांचे शेत जोराने फोफावते त्याचप्रमाणे त्याच्या ऐश्वर्याची वृद्धी होते. (योगभ्रष्टाचा जन्म ज्या कुळात होतो) ते कुल नीतिमार्गाने चालणारे, सत्य आणि पवित्र भाषण करणारे आणि पाहावयाचे ते शास्त्रदृष्टीने पाहणारे व वागणारे असते. या कुळात वेद हा नित्य जागृत दैवत म्हणून असतो. स्वधर्माचे आचरण करणे हा या कुळाचा व्यवसाय असून सारासार विचार हाच या कुळाचा सल्लामसलत देणारा मंत्री असतो. या कुळात चिंता ही ईश्वराचीच एकनिष्ठ पत्नी असते म्हणजे या कुळातील सर्व व्यक्तींना ईश्वराचे अखंड चिंतन कसे होईल याचीच एकमात्र चिंता असून ईश्वररूप

आदि ऋद्धी हीच गृहदेवता असते. असे ज्या कुळाने पुण्य जोडले आहे व ईश्वरभक्तीमुळे प्राप्त होणाऱ्या सर्व सुखाचा व्यापार जेथे समृद्ध झाला आहे अशा कुळात तो योगभ्रष्ट सुखाने जन्म घेतो.

त्याचप्रमाणे हा योगभ्रष्ट पुरुष ज्या कुळात जन्म घेतो ते योगी-कुळ ज्ञानरूप अग्नीमध्ये हवन करणारे, परब्रह्मानुभूतिसंपन्न, वेद-संपन्न व परब्रह्मसुखरूप गावचे वतनदार असते. या कुळातील योगी लोक एकमेवाद्वितीय अशा ब्रह्माच्या सिद्धान्ताच्या सिंहासनावर बसून त्रिभुवनाचे राज्य करतात. ते संतोषरूपी वनात मधुरध्वनी करणारे कोकिळच असतात आणि विचारवृक्षाच्या मुळाशी बसून ब्रह्मरूप नित्य फळाचे सेवन करतात. अशा योग्यांच्या कुळात त्या योगभ्रष्ट पुरुषास जन्म मिळतो.

तेथे जन्म घेतल्यानंतर लहान वयातच त्याच्या ठिकाणी आत्म-ज्ञानाची पहाट होते. ज्याप्रमाणे सूर्य उगविण्याच्या अगोदर चहूकडे अरुणोदयाची प्रभा फाकते त्याप्रमाणे योग्य अवस्थेची वाट न पाहाता व प्रौढ वयरूपी गावाला न येता सर्वज्ञता अर्थात् ज्ञान हे त्याला बाळपणीच वरते. पूर्वजन्मी सिद्ध झालेल्या बुद्धीच्या साहाय्याने सर्व विद्यांना त्याचे मनच प्रसवते व त्याच्या मुखातून सर्व शास्त्रे स्वयमेव निघू लागतात. अशा उत्तम कुळात जन्म प्राप्त होण्या-करिता स्वर्गवासी देव देखील मनात हेतू धरून नेहमी जपहोमादि करीत असतात. पार्था ! देवांनी स्तुतिपाठक होऊन मृत्युलोकातील ज्या ज्ञानसंपन्न योगी कुळाचे वर्णन करावे अशा त्या उत्तम कुळात तो योगभ्रष्ट पुरुष जन्म पावतो.

अशा प्रकारे जन्माला आलेल्या योगभ्रष्ट पुरुषाचा मागील जन्मात सद्बुद्धीच्या उत्कर्षात आयुष्याचा ज्यावेळी शेवट झाला होता त्या वेळचीच सद्बुद्धी त्याला पुन्हा नित्य नव्याने प्राप्त होते. त्यावेळी

ज्याप्रमाणे आधीच दैववान्, त्यात पायाळू आणि वर डोळ्यात दिव्यांजन घातलेला पुरुष भूमीतील धन जसे सहज पाहतो त्याप्रमाणे श्रीगुरुमुखातून कळणारे व ज्यात बुद्धीचा प्रवेश होणे कठिण आहे अशा अभिप्रायाच्या ठिकाणी त्याची बुद्धी परिश्रमावाचून प्रवेश करते. अशा योगभ्रष्ट पुरुषाची बलवान् इंद्रिये ही आपण होऊन मनाच्या आधीन होतात, मन प्राणवायूत ऐक्य पावते व तो प्राणवायू चिदाकाशात मिळत असतो. अशा योगभ्रष्टाच्या बाबतीत या सर्व गोष्टी सहजच घडून येऊन योगाभ्यास त्याला आपोआपच प्राप्त होतो आणि समाधीही त्याच्या मनाचे घर विचारीत येते. त्याच्या बाबतीत हे सर्व सहजच कसे काय होते हे काही समजत नाही. असा हा योगभ्रष्ट पुरुष म्हणजे जगाला आरंभ करणारी जी रंभा म्हणजे पार्वती तिचा गौरव करणारा योगपीठाचा शंकरच की काय किंवा वैराग्यरूप सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच प्रकट झाला आहे की काय असे वाटते ! त्याचप्रमाणे साधकदशेत हा योगभ्रष्ट इतका धैर्ययुक्त झालेला असतो की, तो केवळ संतोषाचा पुतळाच बनविल्यासारखा किंवा सिद्धीच्या भांडारातून काढल्यासारखा दिसतो.

असा हा योगभ्रष्ट साधक कोट्यवधी शतवर्षांनी हजारो जन्मांचे प्रतिबंध ओलांडून आत्मसिद्धीच्या किनाऱ्यावर पोहोचलेला असतो. त्यामुळे सर्व साधने त्याच्या मागे आपोआपच येतात आणि मग सहजच तो विचाराच्या राज्यावर बसतो. त्यानंतर फलप्राप्तीच्या वेळी विचार करण्यामध्ये प्रबल असा विवेकही मागे राहतो आणि विचाराच्या आवाक्यात न येणारे असे जे ब्रह्म आहे ते तो स्वतःच होतो. त्या स्थितीत मनरूपी मेघ लयास पावतात, प्राणवायूचे चंचलत्व संपते, आकाश आपण आपल्याच ठिकाणी लीन होते व ॐकारही

लय पावतो. अशा रीतीने त्याला अवर्णनीय सुख प्राप्त होते. त्यामुळे या अवस्थेविषयीचे त्याचे बोलणे अगोदरच बंद होते. मग सगळ्या गतींना गती देणाऱ्या निराकार ब्रह्मस्थितीचे हा योगभ्रष्ट साधक साक्षात् स्वरूपच होऊन राहतो. त्याने मागील अनेक जन्मातील विक्षेपांचा प्रतिबंध हा पाण्यावरील केरकचरा काढून दूर करावा, त्याचप्रमाणे दूर केलेला असतो. त्यामुळे त्याची लग्नघटका त्याचा जन्म होताक्षणीच बुडते आणि तद्रूपतेशी शुभलग्न होऊन म्हणजे जीवशिवैक्य होऊन तो ब्रह्मस्वरूपाशी एकरूप होतो. अशा प्रकारे विक्षेपांची विघ्ने नाहीशी झाल्यावर ज्यापासून विश्वाची उत्पत्ती होते व ज्या ठिकाणी ते पुन्हा लयास जाते ते ब्रह्मस्वरूप तो या विद्यमान देहात असतानाच होतो."

श्री. वासुदेवराव मराठे या नावाचे एक गृहस्थ श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आहेत असे कळल्यावर त्यांच्या दर्शनासाठी व सत्संगासाठी तेथे येऊन राहिले होते. या बाबतीत श्री. वासुदेवराव यांचा हेतू पूर्णपणे कामनिक होता; कारण श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासाने व कृपेने आपण रोगमुक्त व्हावे हीच त्यांची एकमात्र अपेक्षा होती. मात्र त्यांची ही अपेक्षा अद्यापपर्यंत पूर्ण झाली नव्हती; कारण तंजावरच्या चातुर्मासापासून ते आपला रोग पूर्णपणे बरा व्हावा म्हणून मधून मधून श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात राहिले होते.

श्री. मराठे यांना गलत् कुष्ठरोग होऊन त्यांचे सर्व अंग सडले होते. हा रोग बरा व्हावा म्हणून श्री. मराठे यांनी मुंबईसारख्या शहरात जाऊन मोठमोठ्या धन्वंतऱ्यांकडून रोगावर बरेच इलाज केले; पण रोग काही केल्या कमी होईना. उलट हळूहळू त्यांच्या संपूर्ण शरीराचा तो रोग ग्रास करू लागला होता. हळूहळू त्यांची

हातापायांची बोटेही झडून गळून गेली होती. अशा वेळी श्रीस्वामी-महाराजांची कीर्ती त्यांच्या कानावर आली. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाप्रसादाने असाध्य गोष्टी साध्य होतात, मृताला संजीवनी प्राप्त होते व असाध्य रोगही बरे होतात अशी त्यांची कीर्ती ऐकून त्यांच्या कृपेने आपला रोगही बरा होईल अशी त्यांना खात्री वाटू लागली. त्यामुळे त्यांना श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची तळमळ लागली होती.

श्री. मराठे यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा लाभ कसा व कोठे घडेल म्हणून अनेक लोकांकडे चौकशी केली; परंतु त्यावेळी त्यांचा मुक्काम नेमका कोठे आहे हे कोणीच सांगू शकले नाही. श्रीस्वामीमहाराजांचा संचार आसेतुहिमाचल चाललेला असल्यामुळे त्यांच्या मुक्कामाचे निश्चित ठिकाण सांगणे कोणालाच शक्य नव्हते. असे असले; तरी श्रीस्वामीमहाराजांचे आपणास लवकरात लवकर दर्शन कोठे व कसे होईल असा एकच ध्यास त्यांच्या मनाला लागून राहिला होता. शेवटी त्यांची इच्छा सफल झाली व त्यांना तंजावर येथे श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाले.

श्री. मराठे यांना तंजावर येथे श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाले; तरी श्रीस्वामीमहाराजांभोवती अखंड गर्दी असल्यामुळे त्यांना दर-रोज त्यांचे लांबूनच दर्शन घ्यावे लागे. मात्र श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेमुळे आपला रोग बरा होईल किंवा कसे याविषयी त्यांना नेहमी शंका वाटत असे. श्री. मराठे मनाच्या या दोलायमान अवस्थेत असतानाच एकदा पुढीलप्रमाणे घडलेला चमत्कार त्यांच्या दृष्टीस पडला.

एके दिवशी सकाळपासून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी लोकांची फारच गर्दी होऊ लागली होती. श्री. मराठे लांब उभे

राहून श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेण्याचा प्रयत्न करीत होते; पण गर्दीतून त्यांना त्यांचे नीटसे दर्शन घडत नव्हते. थोड्या वेळाने श्रीस्वामीमहाराज स्नानासाठी श्रीकावेरी नदीवर जाण्यास निघाले. त्यावेळीं त्यांच्या सोबत बरीच मंडळी होती. त्यामुळे त्या सर्व मंडळींच्या मागून श्री. मराठेही चालू लागले. सर्वजण नदीवर पोहोचल्यावर रस्ता अगदी निर्मनुष्य झाल्याचे पाहून एका बाईने आपले मेलेले मूल फडक्यात गुंडाळून ते श्रीस्वामीमहाराजांच्या वाटेवर ठेवून दिले व ती आडोशाला जाऊन उभी राहिली.

थोड्याच वेळाने स्नानसंध्या आटोपून जेव्हा श्रीस्वामीमहाराज पुन्हा संध्यामंडपाकडे येण्यास निघाले तेव्हा त्यांच्यापुढे श्रीगांडा-महाराज व इतरही बरीच मंडळी चालली होती. ही सर्व मंडळी पुढे चालत जाऊन रस्त्यावर घाण, केरकचरा किंवा विटाळ होईल अशी कोणतीही वस्तू नाही ना याकडे कटाक्षाने लक्ष देत असत. पुढे चालता चालता त्या बाईंनी कपड्यात गुंडाळून ठेवलेले गाठोडे या मंडळींच्या दृष्टीस पडले. त्यांनी ते गाठोडे जेव्हा उलगडले तेव्हा त्यात एक मेलेले मूल आहे असे त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आले.

ते मेलेले मूल पाहताच श्रीगांडामहाराज श्रीस्वामीमहाराजां-जवळ जाऊन त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! कोणीतरी बाई आपले मेलेले मूल येथे कपड्यात गुंडाळून ठेवून निघून गेलेली दिसते." श्रीगांडामहाराजांनी असे सांगताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "मेलेले मूल येथे कोण आणून टाकील ? त्याला भूक लागल्यावरही वेळीच त्या बाईने त्याला पाजले नसेल व ते रडत असल्यामुळे घरातील कोणीतरी मुलाने त्याला येथे आणून ठेवले असेल. बायका अगदीच निष्काळजी असतात. कामाच्या गर्दीमुळे त्यांना आपल्या मुलांकडेही लक्ष द्यावयास वेळ मिळत नाही.

ते मूल काही मेलेले नाही. त्याच्या अंगाला हे भस्म चोळा म्हणजे ते सावध होईल.

"श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगितल्यावर बरोबरच्या लोकांपैकी एक दोघांनी त्यांच्याकडून भस्म घेऊन ते त्या मुलाच्या अंगाला चोळले. हळूहळू त्या मुलाच्या थंड पडलेल्या शरीरात ऊब येऊन थोडयाच वेळात ते सावध होऊन रडू लागले. आपला मेलेला मुलगा जिवंत होऊन रडू लागल्याचे पाहताच त्या भाग्यवान् मुलाची इतक्या वेळ आडोशाला उभी राहिलेली आई पुढे आली व तिने त्या लोकांच्या हातून आपल्या मुलाला घेतले.

"त्यावेळी त्या मुलाच्या आईच्या डोळ्यांतून अश्रू पाझरत होते. त्या अवस्थेत भारावलेल्या अंतःकरणाने प्रथम श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला व ती त्यांना मोठ्या नम्रतेने असे म्हणाली की, "महाराज ! मला क्षमा करा. माझी पूर्वीची दोन मुले गेल्यामुळे व हाही मुलगा मृत झाल्यामुळे शेवटी आपल्या चरणस्पर्शाने हा तरी जिवंत व्हावा म्हणून त्याला आपल्या चरणकमलावर आणून घातले. आपल्याला अशा प्रकारे या कामाकरिता त्रास दिला याबद्दल आपण मला क्षमा करा. पण मी जे ऐकले होते ते खरे आहे. केवळ आपल्या कृपेनेच माझा मुलगा जिवंत होऊन मला परत मिळाला. काळसुद्धा आपल्याला भितो. आपण मोठे दयाळू व कृपावंत आहात. आपण माझा मुलगा जिवंत करून माझ्यावर जी कृपा केलीत त्याबद्दल मी आपली जन्मोजन्मी ऋणी राहीन. आपला महिमा अपरंपार आहे हेच खरे !

"त्या बाईचे हे सर्व बोलणे ऐकून सर्व लोक आश्चर्यचकित झाले. श्री. वासुदेवराव मराठे हा सर्व प्रकार दुरून मोठ्या उत्सुकतेने पाहात होते. त्या एकाचे अद्भुत, अद्वितीय, लोकोत्तर व अतर्क्य

अशा प्रसंगामुळे त्यांची अशी पक्की खात्री पटली की, या भूतलावर आपल्याला आपल्या या दुर्धर रोगातून फक्त श्रीस्वामीमहाराजच सोडवू शकतील व आपला उद्धार करू शकतील; कारण अशा प्रकारे काळावरही मात करण्याचे अलौकिक असे अकर्तुम् सामर्थ्य या त्रिखंडात इतर कोणाजवळही असणे शक्य नाही.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांचे अद्भुत सामर्थ्य श्री. मराठे यांच्या लक्षात येऊनही तंजावरच्या या मुक्कामात त्यांनी स्वतः-संबंधी श्रीस्वामीमहाराजांना काही विचारले नाही व त्यांची एकंदर दुःस्थिती पाहून त्यांनीही त्यांना काही सांगितले नाही. मात्र श्री. मराठे यांनी या चातुर्मासाच्या काळात श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात राहून आपल्या पूर्वजन्मीच्या पापक्षालनाचा प्रयत्न केला यात काहीच शंका नाही. संतसत्पुरुषांच्या सहवासाने, सत्संगाने, दर्शनाने व सेवेने मनुष्याच्याच्या पापाने क्षालन होते असे शास्त्र-कारांनी आवर्जून सांगितले आहे.

श्रीस्वामीमहाराजांचा तंजावर येथील चार्तुमासाचा मुक्काम संपल्यावर ते पुढील संचारार्थ निघून गेल्यामुळे श्री. वासुदेवराव मराठे त्यांच्या सहवासाला अंतरले. पुढे दोन तीन वर्षे त्यांना श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाले नाही. मात्र यावेळी श्रीस्वामी-महाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे आले आहेत असे कळल्यावर त्यांनी पुन्हा श्रीस्वामीमहाराजांच्या सहवाससेवेचा लाभ घ्यावा, त्यांच्या कृपादृष्टीसाठी प्रयत्न करावा, त्यांच्या चरणकृपेने आपला गलत्कुष्ठासारखा असाध्य असा रोग बरा होण्यासाठी प्रार्थना करावी व आपला उद्धार करून घ्यावा असे ठरवून ते तेथे येऊन राहिले.

श्री. वासुदेवराव मराठे हे रोज श्रीस्वामीमहाराज संगमावर

स्नानसंध्येसाठी निघाले की, रस्त्यात उभे राहून लांबूनच त्यांना नमस्कार करीत व काही एक न बोलता स्तब्ध उभे राहात असत. अशा रीतीने श्री. वासुदेवराव यांची नमस्कार सेवा घडल्यावर एके दिवशी प्रसन्न होऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, “ काय इच्छा आहे ? ” श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून हा प्रश्न ऐकताच श्री. वासुदेवराव मराठे यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले, त्यांच्या डोळयातून अश्रू पाझरू लागले व त्यांचा कंठ रुद्ध झाला. त्यांच्या मुखातून शब्दोच्चारच होईनासा झाला. त्यामुळे प्रथम आपल्या शरीराकडे अंगुली निर्देश करून त्यांनी मौनानेच रोग निवारणार्थ प्रार्थना केली व मग पुढे थोडा भावनावेग कमी झाल्यावर ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, “ महाराज ! माझा हा दुःसाध्य रोग आपल्या कृपादृष्टीने बरा करून आपण माझा उद्धार करावा, एवढीच आपल्या चरणी प्रार्थना आहे. आपण माझा अव्हेर करू नका. आपण मनात आणले तर माझे हे काम क्षणार्धात होईल. या त्रिभुवनात आपल्याशिवाय हे काम कोणीही करण्यास समर्थ नाही. ”

अशा प्रकारे श्री. मराठे यांनी अत्यंत कळवळून प्रार्थना केल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, “ कृष्णापंचगंगासंगम अत्यंत पवित्र आहे. त्या संगमातील रेती अंगाला चोळून रोज स्नान करीत जा म्हणजे बरे वाटेल. ” इतके सांगून श्रीस्वामीमहाराज निघून गेले. पुढे श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. वासुदेवराव मराठे यांनी श्रीकृष्णापंचगंगासंगमातील रेती लावून स्नान करण्याचा उपक्रम सुरू केला. हळूहळू त्यांचे सर्वांग बरे होऊ लागले. हा दैवी उपचार त्यांनी सहा महिने केला.

अशा प्रकारे हातापायांची झडलेली बोटे सोडून श्री. वासुदेवराव

यांची प्रकृती पूर्णपणे सुधारल्यावर श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम जेथे होता तेथे ते त्यांच्या दर्शनासाठी गेले. त्यावेळी श्री. वासुदेवराव हे काही बोलण्यापूर्वीच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्याकडे आपल्या दिव्य अशा करुणामय अमृतदृष्टीने जो कृपाकटाक्ष टाकला त्यामुळे एका क्षणात त्यांची हातापायांची झडलेली बोटे पूर्ववत् होऊन सर्व शरीर अव्यंग झाले.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने श्री. वासुदेवराव यांची प्रकृती उत्तम झाल्यावर व शरीर सर्वथा अव्यंग झाल्यावर त्यांनी आपली प्रकृती डॉक्टरांना दाखविली. अशा प्रकारे श्री. वासुदेवराव बरे झाल्याचे पाहून सर्व डॉक्टर लोकांनी आश्चर्यचकित होऊन तोंडात बोटे घातली. जी गोष्ट केवळ कल्पनेतच शक्य आहे ती श्रीस्वामीमहाराजांसारख्या एका महात्म्याच्या कृपेने प्रत्यक्ष घडलेली पाहून सर्वचजण दिङ्मूढ झाले.

श्री. वासुदेवराव मराठे पुढे आपल्या स्वतःबद्दलची ही सर्व हकीकत लोकांना सांगून श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने आपण कसे बरे झालो हे सांगून त्यांची कीर्ती गात असत. ज्यावेळी श्री. वासुदेवराव लोकांना हे सर्व सांगत असत त्यावेळी श्रीस्वामीमहाराज विनोदाने लोकांना असे म्हणत असत की, "आपण याला बरे केलेले नसताना हा लबाड बोलतो. याला हाकलून द्या."

श्री. वासुदेवराव मराठे यांची जी हकीकत वर आली आहे ती सर्व हकीकत थोड्याफार फरकाने श्री. दिगंबरपंत क. सरमोकादम यांनी ऑगस्ट १९७५ मध्ये आम्हाला पत्ररूपाने कळविली होती. श्री. वासुदेवराव मराठे यांच्या वरील हकीकतीमध्ये व श्री. सरमोकदम यांच्या हकीकतीमध्ये फरक असल्याने त्यांनी कळविलेली हकीकत त्यांच्या शब्दातच पुढे देत आहोत.

" इ. स. १९३२ सालात घडलेली ही हकीकत आहे. माझे मावसबन्धू व श्री. माधवरावमहाराज (विदर्भातील पाटणबोरी गावचे संत व श्रीस्वामीमहाराजांचे भक्त) यांचे जवळचे चुलत बंधू व त्यांचे अनुग्रहीत श्री. नानाजी सरमोकादम यवतमाळ-वऱ्हाड येथे नोकरीनिमित्त वास्तव्यास असताना त्यांच्या घरी श्री. मराठे नावाचे गृहस्थ ज्येष्ठ वद्य अमावस्येच्या दिवशी अचानक आले. ते शरीर प्रकृतीने चांगले, गोरे व तेजःपुंज असून त्यांचे वयोमान अदमासे पंचेचाळीस वर्षांचे होते. त्यावेळी त्यांनी श्री. नानाजींना असा प्रश्न केला की, " उदईक आषाढ शुद्ध प्रतिपादा असून श्रीवासुदेवानंद-सरस्वतीस्वामीमहाराजांची पुण्यतिथी आहे. आपण ती करीत असता काय ? " त्यावेळी श्री. नानाजींनी त्यांना " होय " म्हणून सांगितले. श्री. नानाजींकडे श्रीस्वामीमहाराजांची पुण्यतिथी दरवर्षी घरगुती पद्धतीने परमश्रद्धेने होते असते. श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराजांचा खडतर कर्मयोग व सोवळे-ओवळे यांचे नियम कटाक्षाने पाळणारे आधुनिक कर्मयोगी म्हणून श्री. नानाजी यांची या भागात ख्याती आहे.

श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांना आंबे फार आवडत असत असे श्री. मराठे यांनी श्री. नानाजींना सांगताच त्यांनी त्या दिवशीच्या प्रसादासाठी आंब्यांची योजना मोठ्या तत्परतेने केली. श्री. मराठे यांनी आपल्याला श्रीस्वामीमहाराजांचे लाभलेले दुर्मिळ सान्निध्य व कृपा याचा अल्पसा परिचय यावेळी करून दिला. श्री. मराठे यांना गलत्कुष्ठ असल्याने ते पीडित होते. सर्व औषधोपचारादि उपाय संपले; परंतु आरोग्य नाही. निराश व निर्वाणीच्या मनस्थितीत असताना त्यांना श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांच्या कीर्तीची माहिती दैववशात् मिळाली. श्रीस्वामीमहा-

राजांच्या दर्शनासाठी त्यांचे मन उतावळे झाले व एकसारखी तळमळ वाढली. त्यांना श्रीस्वामीमहाराजांच्या मुक्कामाच्या ठिकाणाची माहिती समजण्याचा अवकाश, ते त्वरेने तेथे जात असत. मात्र तेथे गेल्यावर श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम हलला आहे असे त्यांना कळले की, त्यांच्या पदरी अत्यंत निराशा यावयाची. अशा स्थितीत अनेक ठिकाणी त्यांना हाच अनुभव आला; परंतु ते निरुत्साही झाले नाहीत. त्यांनी आपला प्रयत्न चालूच ठेवला.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्री. मराठे यांचा प्रयत्न चालू असताना दैववशात् श्रीनर्मदातीरी एका ग्रामात महान् भाग्याने श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा त्यांना लाभ झाला. भक्तिभावाने ओथंबून दुरूनच त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना वंदन केले. श्रीस्वामीमहाराजांनी "कसे काय?" असे म्हणून श्री. मराठे यांना येण्याचा भाव विचारला असताना त्यांनी स्वतःच्या अंगावरून नुसता हात फिरवून आपण गलत्कुष्ठाने पीडित असून आता ते असह्य असल्याचे काही एक वाचेने न बोलता दाखवून दिले. ते पाहून दयाळू माउली परपीडेने हेलावून गेली. त्यांनी श्री. मराठे यांना जवळून वाहणाऱ्या श्रीनर्मदा नदीत दुसऱ्या दिवशी स्नान करून येण्यास आज्ञा केली.

श्रीस्वामीमहाराजांनी आज्ञा केल्याप्रमाणे महाव्याधीने पीडलेले श्री. मराठे दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे उठून श्रीनर्मदेचे स्नान करून त्यांच्या दर्शनासाठी आले; परंतु ते श्रीस्वामीमहाराजांच्या खोलीसमोर येऊन उभे राहिल्यावर त्यांना त्यांच्या खोलीचे दार बंद असल्याचे दिसले. त्यामुळे दार उघडण्याची वाट पाहात ते खोली समोरील ओटचावर एक तासभर बसून राहिले. शेवटी इतका वेळ वाट पाहिल्यानंतरही दार उघडत नसल्यामुळे व अंग अगदी

बुळबुळून आल्यामुळे श्री. मराठे पुन्हा श्रीनर्मदेच्या स्नानास जाऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले. परंतु यावेळेस देखील श्रीस्वामीमहाराजांच्या खोलीचे दार बंदच होते. त्यामुळे एक तास झाल्यावर ते फिरून तिसऱ्यांदा स्नानाला गेले. त्यावेळी पहाटेची सहाची वेळ असावी. श्री. वासुदेवराव मराठे हे श्रीनर्मदेचे स्नान करून ज्यावेळी बाहेर आले त्यावेळी आपल्या शरीराची बदलेली स्थिती लक्षात येताच त्यांच्या शरीरातून एक सुखकारक अशी विजेची लहर दौडत गेल्याची विलक्षण अनुभूती त्यांना आली व त्यांचे मन आनंदाने भरून गेले. श्री. वासुदेवराव यांचे सर्व गलत्कुष्ठ श्रीनर्मदानदीच्या पात्रात गळून पडले होते व ते रोगमुक्त होऊन त्यांची कांती सतेज झाली होती.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी श्री. वासुदेवराव मराठे यांच्यावर महान् अनुग्रह व कृपा केली. ज्याप्रमाणे श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी "कुष्ठी ब्राह्मण केला साधू निजदेही," या रीतीने आपल्या अलौकिक सामर्थ्याने एका कुष्ठी ब्राह्मणाला दिव्य अंगकांती देऊन बरे केल्याचे "श्रीगुरुचरित्रात" वर्णन केले आहे त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांनीही आपल्या दिव्य व लोकोत्तर सामर्थ्याने श्री. वासुदेवराव मराठे यांचे कुष्ठ हरण केले. हे दोन्ही समान प्रसंग पाहिले म्हणजे श्रीपादश्रीवल्लभ व श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज या दोन श्रीदत्तावतारानंतर झालेला व पुराणांतही वर्णन केलेला योगिराज नावाचा प्रसिद्ध अवतार श्रीदत्तात्रेयांनी "परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज" या नावाने धारण केला होता, याची प्रचीती येऊन आपल्याला त्यांनी प्रवाहित केलेल्या भाग्यकारक परंपरेत सुस्नात होण्याचे भाग्य लाभल्याचे पाहून मन आनंदाने भरून जाते.

अशा प्रकारे श्री. वासुदेवराव मराठे यांच्या जीविताचे सोने झाले. श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांच्या चरणावर त्यांची नितांत श्रद्धा बसली. "याच देही याच डोळा। पाहीन मुक्तीचा सोहळा॥" अशी त्यांना प्रत्यक्ष अनुभूती आली. "वासुदेवा दत्ता थोर तुझ्या लीला। वर्णाव्या त्या मला शक्ती नाही॥" अशी त्यांची अवस्था झाली. ज्या दिवशी ही घटना घडली त्या परमभाग्याच्या दिवसाचे वर्णन करताना श्री. वासुदेवराव मराठे यांचे अंतःकरण सद्गदीत होऊन त्यांचे हृदय भरून येत असे व डोळ्यातून अश्रू पाझरत असत."

श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये दरवर्षी रथसप्तमीपासून दहा दिवस श्रीकृष्णामाईच्या उत्सवास प्रारंभ होत असतो. या दिवसांमध्ये येथे मोठा सोहळा होत असतो. यावेळी शके १८३२ अर्थात् इ. स. १९१० च्या उत्सवाच्या वेळी प्रत्यक्ष श्रीस्वामीमहाराजच उत्सवाला उपस्थित असल्यामुळे समस्त वाडीकर पुजारी मंडळींना यंदा दुप्पट उत्साह आला होता.

या उत्सवाच्या निमित्ताने श्रीस्वामीमहाराजांनी श्रीकृष्णालहरीवर प्रवचन करण्यास पहिल्या दिवसापासून सुरुवात केली. त्या दिवशी सकाळी गावातून श्रीकृष्णावेणीची लाकडी रंगीत मूर्ती वाजत गाजत देवाकडे आली. मूर्ती वेशीतून आत आल्याचे कळताच तिच्या दर्शनासाठी श्रीस्वामीमहाराज पाठ सांगता सांगताच उठून बाहेर आले.

श्रीकृष्णावेणीची ती मूर्ती पहिल्याबरोबर श्रीस्वामीमहाराजांच्या सर्वांगाला कंप सुटला व त्यांच्या डोळ्यातून प्रेमाश्रू वाहू लागले. अशा स्थितीतच मूर्तीचे दर्शन घेऊन ते आपल्या जागेवर येऊन बसले व त्यांनी श्रीकृष्णालहरीचा पहिला श्लोक सांगण्यासाठी हातात

पुस्तक घेतले; परंतु भक्तीच्या आवेगाने त्यांच्या हातून पुस्तक गळून पडले व एकसारखे हुंदक्यावर हुंदके येऊ लागल्यामुळे त्यांच्या मुखातून शब्दोच्चारही होईनासा झाला. श्रीस्वामीमहाराजांनी पुनः-पुन्हा आपल्या भक्तीचा संवेग आवरून धरून श्लोक सांगण्याचा प्रयत्न केला; पण त्या दिवशी श्रीकृष्णावेणीच्या भक्तीच्या त्या महान् आविष्काराला ते आवर घालू न शकल्यामुळे श्रीकृष्णा-लहरीचा पहिला श्लोक पूर्ण होऊ शकला नाही.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीवर श्रीस्वामीमहाराजांचे फार प्रेम होते. श्रीक्षेत्र पवनीला असताना येथील पुजाऱ्यांना दिलेल्या वचनाची पूर्ती व्हावी म्हणून त्यांनी देवांची आज्ञाही मोडली होती आणि त्यासाठी जबर शारीरिक शिक्षाही भोगली होती. याचे कारण निश्चितच असे असेल की, येथे श्रीदत्तात्रेयांच्या मनोहर पादुका आहेत. येथेच श्रीकृष्णावेणीचा संगम झाला असून हे संगमस्थान तीर्थराज प्रयाग इतकेच श्रेष्ठ आहे आणि श्रीरामचंद्रयोगी, श्रीनारायणस्वामी, श्रीमौनीस्वामी, श्रीगोविंदस्वामी, श्रीकाशीकरस्वामी, श्रीगोपाळ-स्वामी, श्रीब्रह्मानंदस्वामी यांच्यासारख्या सर्व यतिवर्यांनी आपल्या पदधूलीने हे ठिकाण पवित्र केले आहे. अशा तऱ्हेचा हा वेगळाच त्रिवेणी संगम येथे झाल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना हे ठिकाण अतिशय प्रिय होते.

एके दिवशी श्रीस्वामीमहाराज सायंकाळी श्रीब्रह्मानंदांच्या मठात माडीवर बसले होते. समोर बरीच मंडळी बसली होती. कोणत्या-तरी शास्त्रीय विषयावर चर्चा चालली होती. त्यावेळीच सायंपूजेच्या वेळचा धूप पडला आणि घंटानाद सुरू झाला. त्या आवाजाबरोबर श्रीस्वामीमहाराजांच्या हृदयामध्ये प्रेमभक्तीची अशी काही लाट उत्पन्न झाली की, एकाएकी त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू

लागल्या व मुखातून शब्दोच्चार होणेच अशक्य झाले आणि चाल-लेली चर्चा बंद पडली. श्रीस्वामीमहाराजांची ही विलक्षण प्रेममय अवस्था पाहून सर्वजण अगदी आश्चर्यचकित व दिङ्मूढ झाले. अशा रीतीने या अवस्थेत काहीकाळ गेल्यानंतर श्रीस्वामीमहाराज वृत्ती-वर आल्यावर तेथे उपस्थित असलेल्या लोकांनी त्यांना एकाएकी "आपल्याला असे का झाले ?" याचे कारण विचारले. तेव्हा श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "प्रभूचे भक्तवात्सल्य आठवून आपली वारंवार अशी स्थिती होते." "पायी लागती खडे विठोबा धावत येरे बा पुढे पुढे," अशी संतांनी वर्णन केलेली अवस्था आपल्या भक्तांवर येऊ नये म्हणून देवांनी सर्वांना सुलभतेने दर्शन घेता यावे म्हणून या वाडीक्षेत्रामध्ये वास्तव्य केले आहे. गिरनार, माहूर इत्यादि अवघड व दुर्गम जागी भक्तांना येण्यास त्रास पडेल असा विचार करून त्यांना त्रास होऊ नये म्हणून भक्तवत्सल परमात्मा या उघड्या मैदानावर व त्रिभुवनैक पवित्र संगमावर येऊन बसला आहे."

श्रीस्वामीमहाराजांनी स्वत:संबंधी केलेले हे विवेचन पाहिले म्हणजे श्रीमद् भागवतात महर्षी श्रीवेदव्यासांनी भरताच्या ठिकाणी उत्पन्न झालेल्या ज्या परमोत्कट भक्तीचे वर्णन केले आहे व देवर्षी श्रीनारदांनी प्रल्हादाला जो भक्तीचा उपदेश केला त्याचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. महर्षी श्रीवेदव्यास या परमोत्कट श्रेष्ठ भक्तीचे वर्णन करताना असे म्हणतात की—

**तयेत्थमविरतपुरुषपरिचर्यया भगवति प्रवर्धमानानुरागभरद्रुत-हृदयशैथिल्यः प्रहर्षवेगेनात्मन्युद्भिद्यमानरोमपुलककुलक औत्कंठ्य-प्रवृत्तप्रणयबाष्पनिरुद्धावलोकनयन एवं निजरमणारुणचरणारविन्दा-नुध्यानपरिचितभक्तियोगेन परिप्लुतपरमाल्हादगंभीरहृदयन्हृदाव-**

गाढधिषणस्तामपि क्रियमाणां भगवत्सपर्यां न सस्मार ॥ ५.७.१२ ॥
निशम्य कर्माणि गुणानतुल्यान् वीर्याणि लीलातनुभिः कृतानि ।
यदातिहर्षोत्पुलकाश्रुगद्गदं प्रोत्कंठ उद्गायति रौति नृत्यति ॥
॥ ७.७.३४ ॥
यदा ग्रहग्रस्त इव क्वचिद्धसत्याक्रन्दते ध्यायति वन्दते जनम् ।
मुहुः श्वसन्वक्ति हरे जगत्पते नारायणेत्यात्ममतिर्गतत्रपः ॥ ३५ ॥
तदा पुमान्मुक्तसमस्तबन्धनस्तद्भावभावानुकृताशयाकृतिः ।
निर्दग्धबीजानुशयो महीयसा भक्तिप्रयोगेण समेत्यधोक्षजम् ॥ ३६ ॥

याचा अर्थ असा आहे की, " भरत ज्यावेळी नियमपूर्वक भगवन्ताची पूजा-अर्चा अर्थात् साधन करू लागला त्यावेळी त्याच्या भगवती चिच्छक्ती कुंडलिनीच्या प्रेमाचा वेग वाढतच गेला. यामुळे त्याचे हृदय द्रवीभूत होऊन शांत झाले आनंदाच्या प्रबल वेगामुळे शरीरावर रोमांच उभे राहिले व आत्यंतिक उत्कंठेमुळे त्याच्या नेत्रातून अश्रू वाहू लागल्यामुळे त्याच्या दृष्टीला काही दिसेनासे झाले. शेवटी ज्यावेळी भरताने आपल्या प्रियतमाच्या तांबूस चरणारविन्दांचे अर्थात् तत्स्वरूप महामाया अनादिनिद्रिस्त आत्मशक्तीचे ध्यान केले त्यावेळी भक्तीचा आविर्भाव होऊन परमानन्दाने परिप्लुत झालेल्या हृदयरूप गंभीर सरोवरात त्याची बुद्धी बुडून गेल्यामुळे त्याला नियमपूर्वक होणाऱ्या पूजेचे स्मरण राहिले नाही अर्थात् त्याचे साधन साध्यात परिणत किंवा विलीन झाल्यामुळे तो समाधीत निमग्न झाला. ॥ ५.७.१२ ॥

जेव्हा भगवद्भक्त भगवंताच्या लीलाशरीराने केलेल्या अद्भुत पराक्रमाचे, अनुपम गुणांचे व चरित्राचे श्रवण करतो तेव्हा आनंदाच्या उद्रेकाने त्याच्या शरीरातील कणन् कण जागृत होतो. डोळ्यातून पाझरणाऱ्या अश्रुधारांमुळे त्याचा कंठ रुद्ध होतो व संकोच

सोडून तो जोरजोराने गाऊ, ओरडू व नाचू लागतो. या अवस्थेने भाराक्रांत होऊन तो एखाद्या वेडयाप्रमाणे हसतो; तर कधी अत्यंत करुणपणाने रडू लागतो. तो कधी कधी ध्यान करतो; तर कधी कधी भगवद्भावाने सर्व लोकांना नमस्कार करतो. ज्यावेळी भगवद्भक्त भगवन्ताशी तन्मय होतो अर्थात् त्याची जागृत शक्ती आपले संकुचित जीवस्वरूप सोडून विशाल शिवस्वरूप धारण करते त्यावेळी तो हरे! जगत्पते!! नारायण!!! इत्यादि त्याच्या नानाविध नामांनी त्याला आळवू लागतो. अशा प्रकाराचा भक्तियोग जेव्हा भगवद्भक्ताच्या शरीरात आविर्भूत होतो तेव्हा त्याच्या महान् प्रभावाने त्याची सर्व बंधने तुटून जातात व भगवद्भक्ताची भावना वाढता वाढता त्याचा सर्व स्वसंकोच दूर होऊन स्वभाव प्रकट होत होत त्याचे हृदय पूर्णपणे भगवन्मय होऊन जाते."

उपरोक्त वर्णनाचा मागोवा घेतला म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या अंतरस्थितीची थोडीशी कल्पना आपल्याला आल्याशिवाय राहाणार नाही. श्रीस्वामीमहाराजांसारखे अनन्यभक्त व श्रीदत्तात्रेयांसारखे स्मर्तृगामी भगवन्त यांच्या लोकोत्तर भक्तिलीलेच्या अंतरंगात प्रवेश करून त्यांच्या या लीलेचे रहस्य प्राप्त करावयाचे असेल तर श्रीएकनाथीभागवतातील पुढील भागाचे वारंवार मनन करणेच आवश्यक आहे. तेथे ते असे म्हणतात की—

**मोक्षालागीं ज्ञान साधन। धर्मालागीं स्वधर्माचरण।**
**स्वामित्वालागीं दंडधारण। अर्थोद्यम जाण जीविकावृत्ती।२९.५९६।**
**इहामुत्र कामभोग। तदर्थ करिती योगयाग।**
**चहूं पुरुषार्थीं हा चांग। साधनप्रयोग अभक्तां॥ ५९७॥**
**ऐसें शोधितां साधन। सहसा सिद्धि न पवे जाण।**
**अनेक विकळता दूषण। मार्जी छळी विघ्न देवांचें॥ ५९८॥**

तैसें मद्‌भक्तांसी नव्हे जाण। माझें करितां अनन्य भजन।
चारी पुरुषार्थ येती शरण। पायां सुरगण लागती ॥ ५९९ ॥
उद्धवा जे मज अनन्यशरण। त्यांचा धर्म अर्थ मी आपण।
त्यांचा काम तोही मीचि जाण। मोक्ष संपूर्ण मी त्यांचा ॥ ६०० ॥
अभक्तां भोगक्षयें पुनरावृत्ती। भक्तासी भोग भोगितां नित्यमुक्ती।
एवढी माझ्या भक्तीची ख्याती। जाण निश्चितीं उद्धवा ॥६०१॥
ऐशी ऐकतां देवाची मात। उद्धव प्रेमें वोसंडला अद्‌भुत।
तेणें प्रेमें लोधला कृष्णनाथ। हर्षें बोलत तेधवां ॥ ६०२ ॥
उद्धवा तुझे चारी पुरुषार्थ। तो मी प्रत्यक्ष श्रीभगवंत।
ऐसें बोलोनि हर्षयुक्त। हृदयाआंत आलिंगी ॥ ६०३ ॥
हर्षें देतां आलिंगन। कृष्ण विसरला कृष्णपण।
उद्धव स्वानंदनिमग्न। उद्धवपण विसरला ॥ ६०४ ॥
कैसें अभिनव आलिंगन। दोघांचें गेलें दोघेपण।
पूर्ण चैतन्य परिपूर्ण। स्वानंदघन स्वयें झाले ॥ ६०५ ॥
तेथ विरोनि गेला हेतू। वेदेंसहित बुडाली मातू।
एकवटला देवीं भक्तू। एकीं एकांतु एकत्वें ॥ ६०६ ॥
तेथ मावळले धर्माधर्म क्रियेसहित उडालें कर्म।
भ्रम आणि निर्भ्रम। दोहींचें नाम असेना ॥ ६०७ ॥
भेद घेऊनि गेला अभेदा। बोध घेऊनि गेला निजबोधा।
आनंद लाजला आनंदा। ऐशिया निजपदा उद्धव पावे ॥ ६०८ ॥
मी जाहलों परब्रह्म। हाही मुख्यत्वें जेथ भ्रम।
कृष्णालिंगनाचा हा धर्म। जाहला निरुपम निजवस्तू ॥ ६०९ ॥

३०

यावरी कृष्ण सर्वज्ञ । सोडोनियां आलिंगन ।
ऐक्यबोधें उद्धवासी जाण । निजभक्तपण प्रबोधी ॥ ६१० ॥

★ ★ ★

अनन्यभक्तीपरतें सुख । आन नाहींच विशेख ।
सर्व सारांचें सार देख । मद्भक्ति चोख सुरवरां ॥ ६४२ ॥
भक्तियोगाचा योगमार्ग । समूळ सप्रेम शुद्ध सांग ।
स्वमुखें बोलिला श्रीरंग । तें उद्धवें चांग अवधारिलें ॥ ६४३ ॥
ऐकतां भक्तीचें निरूपण । उद्धवाचें द्रवलें मन ।
नयनीं अश्रु आले पूर्ण । स्वानंदजीवन लोटलें ॥ ६४४ ॥
शरीर जाहलें रोमांचित । चित्त जाहलें हर्षयुक्त ।
तेणें कंठीं बाष्प दाटत । स्वेदकण येत सर्वांगीं ॥ ६४५ ॥
प्राण पांगुळला जेथींचा तेथ । शरीर मंदमंद कांपत ।
नयन पुंजाळले निश्चित । अर्धोन्मीलित ते जाहलें ॥ ६४६ ॥
औत्सुक्याचे अतिप्रीतीं । स्वानंदीं समरसे चित्तवृत्ती ।
उद्धवदेहाची विरतां स्थिती । प्रारब्धें निश्चितीं तें राखिलें ॥ ६४७ ॥

★ ★ ★

श्रीक्षेत्र पंढरपूर येथील एक निपुत्रिक दांपत्य श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे येऊन देवाची सेवा करीत राहिले होते; परंतु बरेच दिवस झाले तरी त्यांची इच्छा पूर्ण झाली नाही. अशा स्थितीत श्रीस्वामीमहाराज येथे आले आहेत असे कळल्यावर ते दोघेजण त्यांच्या दर्शनासाठी गेले. त्यावेळी त्या बाई श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "महाराज ! आम्हाला मुलगा व्हावा अशी इच्छा आहे; परंतु अद्यापपर्यंत आमची ही इच्छा काही पूर्ण झाली नाही. यासाठी आम्ही उभयतांनी पांडरंगाची खूप सेवा केली, अनेक

अनुष्ठाने केली आणि संतानगोपालमंत्राचा जपही तीन वेळा केला; पण माझी कूस काही पावन झाली नाही. निपुत्रिकांना सद्गती नाही असे म्हणतात. त्यामुळे येथे देवाच्या सेवेसाठी येऊन राहिलो आहोत. तरी आपण कृपा करून काहीतरी उपाय सांगून आमची इच्छा पूर्ण करावी अशी आपल्या चरणापाशी अनन्यभावाने प्रार्थना आहे." त्या बाईंचे सर्व म्हणणे ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी तिला संतानगोपालमंत्राचा जप पुन्हा करण्यास सांगितले. श्रीस्वामी-महाराजांनी हा जप करावयास सांगितल्यावर त्या बाई काही बोलल्या नाहीत; परंतु त्यांच्या मनात असे विचार आले की, "आत्तापर्यंत आपण तीन वेळा संतानगोपालमंत्राचा जप केला; परंतु त्याचा काहीच उपयोग झाला नाही. तेव्हा आता तरी या मंत्राचा जप करून काय उपयोग होणार आहे?" असे विचार त्या बाईंच्या मनात आले व मनात इच्छा नसतानाही श्रीस्वामीमहाराजांची केवळ आज्ञा म्हणून तिने त्या मंत्राचा जप केला. तिने जप केल्यानंतर दुसऱ्याच वर्षी त्या बाईंना मुलगा झाला.

ही सर्व कथा वाचली म्हणजे हे लक्षात येते की, कोणतीही उपासना अनुष्ठान किंवा विधि-विधान असले; तरी त्याच्या मागे जेव्हा महा-पुरुषांचा संकल्प, आशीर्वाद व शक्ती उभी राहते तेव्हाच ती उपासना सिद्धीस जाते. महापुरुषांच्या संकल्पात अशीच विलक्षण जादू असते; कारण ते ईश्वराभिन्न झालेले असल्यामुळे ते जे म्हणतील ते होत असल्याने एखाद्या भक्ताला मुलगाच काय; पण त्रैलोक्याचे राज्यही देतात यात शंका नाही. यामुळेच अशा संतांच्या व महापुरुषांच्या सत्संगाचा आणि त्यांच्या संकल्पाचा महिमा वर्णन करताना श्रीसमर्थ-रामदासस्वामीमहाराजांनी आपल्या मनाच्या श्लोकात असे म्हटले आहे की –

विचारूनि बोले विवंचूनि चाले।
तयाचेनि संतप्त तेही निवाले।
बरें शोधिल्याविण बोलों नको हो।
जनीं बोलणें शुद्ध नेमस्त राहो ।। १३२ ।।
हरीभक्त वीरक्त विज्ञानराशी।
जेणें मानसीं स्थापिलें निश्चयाशी।
तया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे।
तया भाषणें नष्ट संदेह मोडे ।। १३३ ।।
नसे गर्व अंगीं सदा वीतरागी।
क्षमा शांति भोगी दया दक्ष योगी।
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा।
अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा ।। १३४ ।।
धरी रे मना संगती सज्जनाची।
जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची।
बळें भाव हा वृत्ति सन्मार्ग लागे।
महाक्रूर काळ तो विक्राळ भंगे ।। १३५ ।।

सत्संगाचा महिमा हा असा अपूर्वच आहे यात शंकाच नाही. यामुळेच वरील कथेतील बाईंनी तीन वेळा संतानगोपालमंत्राचा जप करूनही त्यांना मुलगा झाला नाही; मात्र श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्यावर इच्छा नसतानाही त्या मंत्राच्या जपानेच त्यांना मुलगा झाला. अग्नीला इच्छा नसतानाही स्पर्श केल्यावर ज्याप्रमाणे भाजल्याशिवाय राहात नाही त्याप्रमाणे सत्संगाचाही परिणाम झाल्याशिवाय राहात नाही हे सांगताना महर्षी श्रीव्यासांनी श्रीमद्-भागवतात असे म्हटले आहे की—

(भगवान् श्रीगोपालकृष्णनाथ असे म्हणतात की—) हे प्रिय

उद्धवा ! जगातील सर्व ऐहिक विषयांवरील आसक्ती दूर करण्यास सत्संगासारखे अर्थात् साधुसमागमासारखे दुसरे साधन नाही. साधकाने साधुसमागम केला असता त्यास जसा मी वश होतो तसा आसन, प्राणायामादि अष्टांग योग, तत्त्वविचार, अहिंसादिक धर्म, वेदाभ्यास, कृच्छ्रचांद्रायणादि तप, संन्यास, अग्निहोत्रादि इष्ट, वापीकूपादि पूर्त, उपवासादिक व्रते, देवतार्चन, जपजाप्य, तीर्थयात्रा, यमनियम इत्यादिकांच्या योगाने होत नाही. केवळ सत्संगाने दैत्य, राक्षस, मृग, पक्षी, गंधर्व, अप्सरा, नाग, सिद्ध, चारण, गुह्यक, विद्याधर तसे मनुष्यांमध्ये वैश्य, शूद्र, स्त्रिया व अंत्यज हे सर्व राजस व तामस प्रकृतीचे असूनही निरनिराळ्या युगात मला येऊन मिळाले आहेत. वृत्रासुर, प्रल्हाद, वृषपर्वा, बली, बाणासुर, मयासुर, बिभीषण, सुग्रीव, हनुमान, जांबुवंत, गजेन्द्र, जटायू, तुलाधर, वैश्य, धर्मव्याध, कुब्जा, गोकुळातील गोपी, ऋषितत्न्या इत्यादि आणि इतर लोकही या सत्संगाच्या साधनानेच मला प्राप्त करू शकले आहेत. त्या लोकांनी वेदांचे अध्ययन केले नव्हते आणि विधिपूर्वक महापुरुषांची उपासनाही केली नव्हती. त्याचप्रमाणे त्यांनी व्रतवैकल्ये आचरली नव्हती किंवा तपश्चर्याही केली नव्हती. ते तर केवळ सत्समागमाच्या प्रभावानेच मला येऊन मिळाले.

उद्धवा ! वृत्रासुरादि कित्येकांना दुसऱ्या साधनांचा संभव तरी होता; गोपी, गायी, यमलार्जुन आदि वृक्ष, व्रजातील हरणे आदि पशू, कालिया नाग इत्यादि सर्व अनधिकारी प्राणी साध्य-साधन सम्बन्धात सर्वथैव मूढबुद्धीचेच होते. इतकेच नव्हे; तर इतरही अनेक मूढ जीव असे आहेत की, ते केवळ माझ्यावर प्रेम करून व माझा सहवास करून माझ्याशी समरस होऊन गेल्यामुळे कृतार्थ झाले आहेत. मोठमोठे प्रयत्नशील साधक योग, सांख्य, दान, व्रत,

तपस्या, यज्ञ, श्रुतींची व्याख्या, स्वाध्याय आणि संन्यास इत्यादि साधनांच्या द्वारा मला प्राप्त करू शकत नाहीत; परंतु सत्संगाच्या द्वारा मात्र मी अत्यंत सुलभतेने प्राप्त होतो.

उद्धवा ! गोपींचे माझ्यावर जे काही विलक्षण प्रेम होते, त्याचे मला वर्णनही करता येत नाही. अक्रूराने ज्यावेळी बलरामाला व मला गोकुळातून मथुरेस नेले त्यावेळी गोपींना जसे दुःख झाले, तसे आजवर दुसऱ्या कोणासही झाले नसेल. त्यांचे चित्त माझ्या ठिकाणी इतके अनुरक्त झाले होते की, माझ्या वियोगामुळे त्यांना माझ्याव्यतिरिक्त कोणताही अन्य विषय आवडेनासा झाला होता. तुला माहीतच आहे की, मीच त्यांचा एकमात्र प्रियतम आहे. त्यामुळे मी वृंदावनात असताना माझ्या समागमात रासक्रीडा करताना ज्या रात्री त्यांना क्षणार्धप्रमाणे वाटत असत त्या रात्री माझ्या वियोगाने त्यांना कल्पासारख्या भासल्या. ज्याप्रमाणे मोठे मोठे ऋषिमुनी समाधी स्थितीत राहिल्यावर आणि गंगा इत्यादि विशाल नद्या समुद्रात मिळाल्यावर त्यांचे स्वतःचे नामरूप अवशिष्ट राहात नाही त्याप्रमाणे माझ्या विरहाने त्यांची चित्तवृत्ती इतकी उदासीन झाली की, त्यांना स्वतःचा देह, पतिपुत्रादिक आप्त, ऐहिक कृत्ये व पारलौकिक साधने यांचे भानही राहिले नाही आणि आपण कोण आहोत व काय करीत आहोत इत्यादि कोणत्याही भावना अवशिष्ट राहिल्या नाहीत.

उद्धवा ! त्या गोपींमधील बहुतेक गोपी माझे वास्तविक स्वरूप जाणत नव्हत्या. इतकेच नव्हे; तर मी भगवान् आहे हे न जाणता त्यांनी केवळ मला आपला प्रियकर समजून जारभावानेच माझ्याशी सहवास केला. अशा साधनहीन सहस्रावधी गोपींनी केवळ सत्संगाच्या प्रभावानेच परब्रह्मपदाची प्राप्ती करून घेऊन त्या परमा-

त्म्याशी एकरूप होऊन गेल्या. याकरिता हे उद्धवा ! श्रुतिस्मृति-प्रणीत विधिनिषेध, प्रवृत्तिनिवृत्तिपर कर्मे, धर्माधर्म, ऐकावयाचे व ऐकलेले विषय अर्थात् आजवर मिळालेले व पुढे मिळवावयाचे शास्त्रज्ञान ही सर्व सोडून देऊन सर्वत्र माझी भावना करून सर्वान्तरसाक्षी परमात्म्याला म्हणजे मला एकालाच तू सर्वथा शरण ये म्हणजे तुला कसलीही भीती न राहता तू निर्भय होशील. ( एकादश स्कंद ११ अध्याय १२ वा )

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यापासून ते एकामागून एक विद्यार्थ्याला पुराण सांगावयास सांगत असत व स्वत: ते ऐकावयास बसत असत. अशा प्रकारे पुराणाचे जणूकाही अखंड चक्रच चालू असे. जसे पुराणाचे तसेच कीर्तनाचेही अखंड चक्र चालू असे. विद्यार्थ्यांनी पुराण, कीर्तन करून समाजजागृती करावी हाच श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने चालू असलेल्या विद्यापीठाचा एकमात्र हेतू होता. याशिवाय इतरही कार्यक्रम सतत चालू असत. श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या उत्सवात श्रीस्वामीमहाराज स्वत: श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या चरित्रावर पुराण सांगत असत. श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे " विरंग जाऊं नेदी क्षण, " अशा प्रकारचे जीवन कसे घालवावे याचा जणूकाही या कार्यक्रमांच्या रूपाने श्रीस्वामीमहाराज सर्वांना वस्तुपाठच देत होते यात तिल:प्राय शंका नाही.

पुराण, कीर्तन, प्रवचन व नाना प्रश्नांची उत्तरे यामध्ये श्रीस्वामीमहाराजांचा दिवसातील जवळ जवळ सर्वच वेळ जात असे. याची परिसीमा म्हणजे श्रीस्वामीमहाराज भिक्षेला बसले म्हणजे पाचपन्नास मंडळी त्यांच्या आवती भोवती बसून राहात असत. हे पाहिले म्हणजे " जो उत्तम गुणें शोभला । तोचि पुरुष महा भला । कित्येक

लोक तयाला । शोधित फिरती ।। १२.१०.२९ ।। असे जे श्रीसमर्थ-रामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" म्हटले आहे त्याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही.

श्रीस्वामीमहाराजांनी वर वर्णिलेला जो उपक्रम श्रीक्षेत्र नरसोबाडीला केल्याचे दिसून येते त्याच्यामागे समाजकल्याणाचा, प्रबोधनाचा व लोकोद्धाराचा किती विशाल व भव्य दृष्टिकोन होता याची कल्पना श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी लिहिलेल्या दासबोधातील "उत्तम पुरुष निरुपण" नावाचा समास वाचला म्हणजे आल्याशिवाय राहणार नाही. श्रीस्वामीमहाराज हे "धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।। १८.६.२० ।।" असे ईश्वरी अवताराचे महापुरुष असल्यामुळे उपरोक्त समासात त्यांचेच तात्त्विक चरित्र वर्णन केले आहे असे तो समास वाचताना सारखे वाटते. त्या समासात ते असे म्हणतात की—

आपण यथेष्ट जेवणें । उरलें ते अन्न वाटणें ।
परंतु वायां दवडणें । हा धर्म नव्हे ।। १२.१०.१ ।।
तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तेंचि ज्ञान जनास सांगावें ।
तरतेनें बुडों न द्यावें । बुडतयासी ।। २ ।।
उत्तम गुण स्वयें घ्यावे । ते बहुतांस सांगावे ।
वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ।। ३ ।।
स्नान संध्या देवतार्चन । एकाग्र करावें जपध्यान ।
हरिकथा निरूपण । केलें पाहिजे ।। ४ ।।
शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ।
उणें पडों न द्यावें । कोणी एकाचें ।। ५ ।।
अडलें जाकसलें जाणावें । यथाशक्ति कामास यावें ।
मृदुवचनें बोलत जावें । कोणी एकासीं ।। ६ ।।

दुसऱ्याचें दुःखें दुःखी व्हावें। परसंतोषें सुखी व्हावें।
प्राणिमात्रास मेळवून घ्यावें। बरव्या शब्दें ॥ ७ ॥
बहुतांचे अन्याय क्षमावे। बहुतांचे कार्यभाग करावे।
आपल्यापरीस व्हावे। परावे जन ॥ ८ ॥
दुसऱ्यांचें अंतर जाणावें। तदनुसारचि वर्तावें।
लोकांस परीक्षीत जावें। नाना प्रकारें ॥ ९ ॥
नेमकेंचि बोलावें। तत्काळचि प्रतिवचन द्यावें।
कदापि रागास न यावें। क्षमारूपें ॥ १० ॥
आळस अवघाच दवडावा। यत्न उदंडचि करावा।
शब्दमत्सर न करावा। कोणी एकाचा ॥ ११ ॥
उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा। शब्द निवडून बोलावा।
सावधपणें करीत जावा। संसार आपुला ॥ १२ ॥
मरणाचें स्मरण असावें। हरिभक्तीस सादर व्हावें।
मरोन कीर्तीस उरवावें। येणें प्रकारें ॥ १३ ॥
नेमकेपणें वर्तों लागला। तो बहुतांस कळों आला।
सर्व आर्जवी तयाला। काय उणें ॥ १४ ॥
ऐसा उत्तम गुणीं विशेष। तयास म्हणावें पुरुष।
जयाच्या भजनें जगदीश। तृप्त होय ॥ १५ ॥
उदंड धिक्कारून बोलती। तरी चळों नेदावी शांती।
दुर्जनास मिळोन जाती। धन्य ते साधू ॥ १६ ॥
उत्तम गुणी शृंगारला। ज्ञानवैराग्यें शोभला।
तोचि एक जाणावा भला। भूमंडळीं ॥ १७ ॥
स्वयें आपण कष्टावें। बहुतांचें सोशीत जावें।
झिजोन कीर्तीस उरवावें। नाना प्रकारें ॥ १८ ॥

कीर्ति पाहों जाता सुख नाहीं। सुख पाहतां कीर्ति नाहीं।
विचारेंविण कोठेंचि नाहीं। समाधान ॥ १९ ॥
जो उत्तम गुणें शोभला। तोचि पुरुष महाभला।
कित्येक लोक तयाला। शोधीत फिरती ॥ २९ ॥
क्रियेविण शब्दज्ञान। तेंचि श्वानाचें वमन।
भले तेथें अवलोकन। कदापि न करिती ॥ ३० ॥
मनापासून भक्ति करणें। उत्तम गुण अगत्य धरणें।
तया महापुरुषाकारणें। धुंडित येती ॥ ३१ ॥
ऐसा जी महानुभाव। तेणें करावा समुदाव।
भक्तियोगें देवाधिदेव। आपुला करावा ॥ ३२ ॥
आपण अवचितें मरोन जावें। मग भजन कोणें करावें।
याकारणें भजनास लावावे। बहुत लोक ॥ ३३ ॥
आमची प्रतिज्ञा ऐसी। कांहीं न मागावें शिष्यासी।
आपणामागें जगदीशासी। भजत जावें ॥ ३४ ॥
याकारणें समुदाव। झाला पाहिजे महोत्साव।
हातोपातीं देवाधिदेव। वोळेसा करावा ॥ ३५ ॥
जेणें बहुतांस घडे भक्ती। ते हे रोकडी प्रबोधशक्ती।
बहुतांचें मनोगत हातीं। घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥

  

बेळगावाचे श्री. पुठ्ठोपंत कालकुंद्रीकर हे श्रीस्वामीमहाराजांचे निस्सीम भक्त व एकनिष्ठ सेवक होते. श्रीस्वामीमहाराज वाडीला आले आहेत असे कळल्यावर त्यांचे दर्शन घेऊन त्यांच्या देवदुर्लभ संगतीमध्ये शक्य होईल तितके दिवस राहावयाचे असा निश्चय करून ते श्रीक्षेत्र नरसोबावाडीला निघाले. यावेळी श्रीक्षेत्र नरसोबा-

वाडीला जाताना आपल्या बहिणीलाही श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी बरोबर घेऊन जावयाचे असे त्यांनी ठरविले.

श्री. पुठ्ठोपंत कालकुंद्रीकरांची बहीण श्री. मुचंडीकर कुलकर्णी यांच्याकडे दिली होती. "आमच्या बहिणीला श्रीक्षेत्र नरसोबावाडीला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला घेऊन जाऊ का?" असे म्हणून श्री. पुठ्ठोपंत यांनी तिच्या सासऱ्यांना जेव्हा विचारले तेव्हा ते त्यांना असे म्हणाले की, "आमचा कुलदेव येडूरचा विरूपाक्षेश्वर आहे. तेथे जाऊन दर्शन घेणार असल्यास, मग आमच्या सुनेला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला वाडीला जाण्यास हरकत नाही."

आपल्या बहिणीच्या सासऱ्यांच्या मनात श्रीस्वामीमहाराजांच्या बद्दल प्रेम नसले; तरी त्यांनी आडवळणाने का होईना पण परवानगी दिली, हे पाहून श्री. पुठ्ठोपंताना समाधान वाटले व ते आपल्या बहिणीला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले. श्रीस्वामीमहाराजांपुढे नारळ ठेवून दोघांनी नमस्कार केला तेव्हा त्यांनी श्री. पुठ्ठोपंतांना नारळ-प्रसाद दिला; पण त्यांच्या बहिणीला मात्र दिला नाही. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज बहिणीला व तिच्या सासऱ्यांना उद्देशून श्री. पुठ्ठोपंतांना असे म्हणाले की, "त्यांचा कुलदेव विरूपाक्ष आहे त्याचा प्रसाद घ्या. दत्त काही त्यांचा कुलस्वामी नाही."

श्रीस्वामीमहाराज आपल्या सासऱ्यांचेच शब्द आपल्याला बोलून दाखवीत आहेत हे पाहून श्री. कालकुंद्रीकरांच्या बहिणीला फारच आश्चर्य वाटले; पण श्री. कालकुंद्रीकरांना मात्र काहीच आश्चर्य वाटले नाही; कारण त्यांना श्रीस्वामीमहाराजांची सर्वज्ञता माहीत होती. आपण इतक्या आग्रहाने आपल्या बहिणीला येथपर्यंत श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी घेऊन आलो; पण तिच्या सास-

त्यांच्या उद्‌गारांमुळे ते आज काही तिला प्रसाद देणार नाहीत असे पाहून श्री. पुठ्ठोपंतांनी आपल्या बहिणीसाठी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी अशी प्रार्थना केली की, "महाराज ! आमच्या बहिणीचे सासरे काहीही म्हणाले व त्यांची काहीही मते असली, तरी माझी अशी इच्छा आहे की, आपण तिला आपल्या हातचा प्रसाद देऊन कृतार्थ करा. आपल्या हातचा प्रसाद मिळाला म्हणजे तिचे आयुष्य धन्य होईल."

आपल्या भक्ताची ही प्रार्थना ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराजांचे अंत:करण द्रवले. श्रीस्वामीमहाराज फार कोमल होते. ते करुणेचे सागरच होते. "सर्वेऽपि सुखिन: सन्तु सर्वे सन्तु निरायम:। सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दु:खभाग्भवेत्॥ अशीच त्यांची विशाल धारणा होती. सर्व लोक सुखी असावेत, कोणालाही पीडा नसावी, सर्वांना मंगलतेचीच प्राप्ती व्हावी व कोणीही दु:खित असू नये या हेतूची पूर्ती व्हावी म्हणूनच श्रीस्वामीमहाराजांचा अवतार झाला होता. या दिव्य धारणेची सिद्धी व्हावी व आपल्या भक्ताची इच्छा पूर्ण व्हावी म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी श्री. पुठ्ठोपंत कालकुंद्रीकरांच्या बहिणीला नारळप्रसाद दिला व तिला आशीर्वादही दिला. श्री. पुठ्ठोपंतांची बहीण ज्यावेळी आपल्या सासरी परत गेली व तिने श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे घडलेली सर्व हकीकत आपल्या सासऱ्यांच्या कानी घातली तेव्हा श्रीविरूपाक्षेश्वर, श्रीपादश्रीवल्लभ, श्रीमन्नृसिंहसरस्वती, श्रीदत्तात्रेय व श्रीस्वामीमहाराज हे सर्व अभिन्न आहेत याची जाणीव होऊन त्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी आठ रूपे धारण करून आपल्याला दिवाळीच्या वेळी बोलविणाऱ्या सातही शिष्यांच्या घरी जाऊन व श्रीक्षेत्र गाणगा-

पुरातही राहून आपल्या अवतारी कार्याची ज्याप्रमाणे प्रचीती आणून दिली त्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी श्री. पुठ्ठोपंतांच्या बहिणीला त्यांच्या सासऱ्यांचे बोल ऐकवून आपल्या सर्वसाक्षित्वाची व सर्वांवर कृपानुग्रह करून त्यांच्या उद्धारार्थ झालेल्या आपल्या अवतारकार्याची प्रचीती आणून दिली. प्रायः सर्वच अवतारी पुरुषांनी या प्रकारे सामान्य मूढ जनांना जागृत करण्यासाठी लौकिक चमत्कृतींचा अवलंब केलेला दिसतो हे नितांत सत्य आहे. मात्र अशा प्रकारे चमत्कार करून कोणताही लौकिकार्थ संपादन करण्याचा त्यांचा हेतू नसून लोकांनी आत्मविस्मृत न होता आत्मजागृत व्हावे हाच हेतू असतो. या आत्मजागृतीसाठीच श्रीसरस्वतीगंगाधरांनी श्रीमन्नृसिंहसरस्वती-स्वामीमहाराजांच्या चरणकमलांचा आश्रय घ्यावा म्हणून परोपरीने विनवून उपदेश केला आहे त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलांचा आश्रय हा उपयुक्त असल्यामुळे तोच उपदेश येथे प्रस्तुत करीत आहे.

श्रीगुरुमहिमा झाला जगतीं । सिद्ध सांगे नामधारकाप्रती ।
भूमंडळीं झाली ख्याती । श्रीनृसिंहसरस्वतीची ।। ४७.३६ ।।

म्हणे सरस्वतीगंगाधरू । जवळी असतां कल्पतरू ।
न ओळखिती अंधबधिरू । वायां कष्टती दैवयोगें ।। ३७ ।।

भजा भजा हो श्रीगुरूसी । जें जें काम्य तुमचें मानसीं ।
सिद्ध होईल त्वरितेंसी । आम्हा प्रचीती आली असे ।। ३८ ।।

अमृत मिळतां पानासीं । क्षार कडू आवडे मूर्खासी ।
ज्ञानवंत भक्तजनांसी । नामामृत गुरूचें ।। ३९ ।।

श्रीगुरुसेवा करा हो करा । मारीतसें मी डांगोरा ।
सांगती शास्त्र अपारा । गुरू तोचि त्रैमूर्ति ।। ४० ।।

गुरुवेगळी गती नाहीं । जे निंदती नरदेहीं ।
वेदशास्त्रें बोलती पाही । सूकरयोनींत जन्मती ॥ ४१ ॥
तुम्ही म्हणाल मज ऐसें । आपुले इच्छें लिहिलें कैसें ।
वेदशास्त्रीं सांगितलें ऐसें । असेल तरी अंगिकारा ॥ ४२ ॥
संसारसागर धुरंधर । उतरावया पैलपार ।
गुरुविणें निर्धार । तारक कोण त्रिजगीं ॥ ४३ ॥
निर्जळ संसार अरण्यांत । पोई घातली असे अमृत ।
सेवा सेवा तुम्हीं समस्त । अमरत्व तुम्हां होईल ॥ ४४ ॥

★ ★ ★

श्रीस्वामीमहाराजांचा यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला मुक्काम असताना सावंतवाडीचे कायद्याचे सल्लागार श्री. दत्तोबा चिटणीस त्यांच्या दर्शनासाठी आले. श्रीस्वामीमहाराजांना अर्पण करण्यासाठी येताना त्यांनी एक कमंडलू, खडावांचा जोड व इतरही काही उपयुक्त वस्तू आणल्या होत्या. त्या सर्व वस्तू ज्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना अर्पण करून त्यांना साष्टांग नमस्कार घातला त्यावेळी त्या वस्तू पाहून ते त्यांना असे म्हणाले की, "आमच्याकडे एक कमंडलू असून तो अगदी उत्तम स्थितीत आहे आणि खडावा तर आम्ही कधी वापरत नाही. आपण इतरही काही वस्तू आणलेल्या दिसतात; परंतु आपण संन्यासी असल्यामुळे व संन्याशाने वस्तूंचा संग्रह करणे हे शास्त्रनिषिद्ध असल्यामुळे आपण कोणत्याही वस्तूंचा संग्रह करीत नाही. तरी आपण आणलेल्या कोणत्याही वस्तूंची आम्हाला आवश्यकता नसल्यामुळे आपण त्या परत घेऊन जाव्यात व कोणातरी सुयोग्य व्यक्तीस द्याव्यात."

श्रीस्वामीमहाराजांचे हे सर्व बोलणे ऐकून श्री. चिटणीसांना फार वाईट वाटले; परंतु श्रीस्वामीमहाराज म्हणतात ते योग्य आहे हे

मनोमन पटल्यामुळे त्यांनी त्या वस्तू परत घेतल्या. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांशी इतर काही गोष्टींवर बोलणे झाल्यावर श्री. चिटणीस श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "महाराज ! सावंतवाडी जवळील तळवडे गावच्या श्री. नाख्ये यांच्या घरची श्रीदत्तमूर्ती नुकतीच चोरीला गेली. आता ती दत्तमूर्ती कोठे व कधी सापडेल ?"

श्री. चिटणीसांनी अशा प्रकारे प्रश्न विचारल्यावर श्रीस्वामी-महाराज बराच वेळ काही बोलले नाहीत. अशा रीतीने श्रीस्वामी-महाराज स्वस्थ बसलेले व आपण विचारलेल्या प्रश्नांना ते काहीही उत्तर देत नाहीत असे पाहून श्री. चिटणीसांनी पुनःपुन्हा तो विषय काढला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "माणसाने देवाशी स्पर्धा करू नये. नाख्यांना फार गर्व झाला आहे. त्यांना वाटते की, नरसोबाच्या वाडीचे महत्त्व ते एवढे काय आहे? येथेही आम्ही दत्ताची भक्ती करीत आहोत. त्यामुळे तेथील स्थानालाही वाडीचा महिमा प्राप्त होईल. त्यांच्या गर्वाचे देवांनीच हरण केले. देव त्यांना कंटाळून गेले आहेत. आता मूर्ती परत मिळणार नाही."

श्रीस्वामीमहाराजांनी चिटणीसांना एवढे सांगितल्यावर ते काही क्षण स्तब्ध राहिले व पुन्हा त्यांना उद्देशून असे म्हणाले की "सांगोलीच्या कृष्णा जडये यांची गोष्ट तर सर्वांनाच ठाऊक आहे जडयांनी आपल्या गावी दत्ताचे देऊळ बांधून त्यातील श्रीदत्तमूर्तीला वाडीला बांधतात तशी विडयांच्या पानांची पूजा बांधावयास सुरुवात केली. अशा प्रकारे पूजा बांधून आपले देवस्थान वाडी येथील व माणगाव येथील श्रीदत्तमंदिरांपेक्षा विख्यात करावयाचे असा त्यांचा अंतस्थ हेतू होता. त्यामुळे खरे तर त्यांची ही स्पर्धा वाडीच्या व

माणगावच्या दत्तमंदिराशी होती. त्यांच्या येथे देवाची पूजा भक्तीने होत नव्हती. स्पर्धेपोटी होत होती. अशा प्रकारे पूजा करून स्पर्धा करू नये असे त्यांना सांगितले; पण त्यांनी ऐकले नाही. त्याचा परिणाम काय झाला ? त्यांच्यावर चोरीचा आरोप येऊन ते पकडले गेले. शेवटी श्री. जडये यांची आई माणगावला देवांकडे गेली व तिने पदर पसरून आपल्या मुलाची चोरीच्या आरोपातून सुटका व्हावी म्हणून प्रार्थना केली. त्यावेळी श्री. रामभाऊ सबनीस मामलेदार होते. तिने त्यांना सांगून आपल्या मुलाची या आरोपातून मुक्तता केली." श्रीस्वामीमहाराजांनी श्री. चिटणीसांना एवढे सांगून तो सर्व विषय तेथेच थांबविला. श्री. नाख्यांच्या घरातील श्रीदत्तमूर्ती चोरीला गेल्यापासून त्यांच्या वैभवाला उतरती कळा लागली व शेवटी तेथे काहीपुद्धा राहिले नाही.

श्रीक्षेत्र नरसोबावाडी हे एक महान् असे श्रीदत्तक्षेत्र आहे. श्रीस्वामीमहाराज हे महान् श्रीदत्तावतार असून त्यांचे वाडीवर व तेथील पुजाऱ्यांवर फार प्रेम होते. खरे तर श्रीस्वामीमहाराजांचे श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील पुजाऱ्यांवर इतके आदरयुक्त प्रेम होते की, तेथील पुजाऱ्यांना ते देवांइतकाच मान देत असत व आजही त्यांचे सांप्रदायिक लोक पुजाऱ्यांबद्दल अशाच आदराने वागताना आढळतात. इतके सगळे जरी असले; तरी श्रीक्षेत्र नरसोबावाडीकर पुजाऱ्यांनी श्रीस्वामीमहाराजांना कधी ओळखलेच नाही असे खेदाने म्हणावे लागेल. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. गांडाबुवांना अनुग्रह दिल्यानंतर ते मधूनमधून काही दिवस श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर असत. श्री. गांडाबुवा हे गुजराथी अनाविल ब्राह्मण होते. ते श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर भिक्षेला वसत असत. एक गुजराथी ब्राह्मण श्रीस्वामीमहाराजांशी एवढी जवळीक करतो व

तो त्यांच्या बरोबर भिक्षेच्या वेळी जेवण करतो ही गोष्ट श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजाऱ्यांना पसंत नव्हती.

श्रीस्वामीमहाराज इ. स. १९०७ मध्ये श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले होते. त्यावेळी श्री. गांडाबुवांचे वागणे न रुचल्यामुळे सर्व पुजारी मंडळी श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाली होती की, " महाराज ! आपण गांडाबुवांसारख्या गुजराथी ब्राह्मणाबरोबर भिक्षेला बसता हे काही योग्य नाही. तरी यापुढे आपण प्रायश्चित्त घेतल्याशिवाय देवाला शिवू नये. "

श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील पुजारी मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना प्रायश्चित्त घेण्यास सांगून एक प्रकारे श्री. गांडाबुवांच्या बरोबर भिक्षा करण्यास बंदी केली व अशा प्रकारे भिक्षा करणे हे शास्त्रबाह्य आहे हे सूचित केले. पुजाऱ्यांनी जरी असे सूचित केले; तरी श्रीस्वामीमहाराज हे काही हलक्या कानाचे, परप्रत्ययनेय बुद्धीने वागणारे व अशास्त्रीय वर्तन करणारे नव्हते. याही पेक्षा महत्त्वाची गोष्ट अशी की, ज्याचा आपण एकदा भक्त म्हणून, शिष्य म्हणून व आपला म्हणून स्वीकार केला, त्याला आकाश कोसळून पडले तरी दूर लोटावयाचे नाही हा त्यांचा कृतनिश्चय होता. त्यामुळे पुजाऱ्यांनी प्रायश्चित्त घेण्यास सांगितल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " आपल्या सर्वांच्या सांगण्याप्रमाणे प्रायश्चित्त घेण्याचे काहीच कारण नाही. मात्र आपणा सर्वांचे समाधान व्हावे म्हणून यापुढे आपण देवालाच शिवत नाही म्हणजे झाले. "

ज्या दिवशी वरील सर्व प्रसंग घडला त्या दिवसापासून श्रीस्वामीमहाराजांनी देवाला स्पर्श करून नमस्कार केला नाही.

त्यांनी पुजाऱ्यांना सांगितल्याप्रमाणे देवाला शिवणे सोडले. त्यानंतर यावेळी इ. स. १९१० मध्ये श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबा-वाडी येथे आल्यावर ते देवांना दुरूनच वंदन करून जात असत. पुढे या मुक्कामातच कन्यागत आल्यामुळे उत्सवप्रसंगी पुजाऱ्यांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी प्रार्थना केली की, "महाराज ! आमच्या महद्‌भाग्याने कन्यागतासारख्या महोत्सवात आपण येथे उपस्थित आहात. तरी आपण देवांची महापूजा करावी अशी आमची सर्वांची प्रार्थना आहे."

श्रीक्षेत्र नरसोबावाडीत पुजाऱ्यांनी देवांची महापूजा करण्या-बद्दल प्रार्थना करताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुमच्याच सांगण्यावरून एकदा देवाला शिवण्याचे सोडले आहे. आता आपण पुन्हा देवांना शिवणार नाही." इतके सांगून श्रीस्वामी-महाराज स्वस्थ राहिले. वास्तविक पाहता येथे आल्यापासून श्रीस्वामीमहाराज देवांना स्पर्श करून नमस्कार न करता लांबूनच नमस्कार करतात हे सर्व पुजाऱ्यांना माहीत होते; परंतु आपण सांगितल्यावर श्रीस्वामीमहाराज मागील सर्व विसरून पूजा कर-ण्यास होकार देतील असे त्यांना वाटले होते.

आपल्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामीमहारांनी देवांच्या पूजेला नकार दिल्याने अपेक्षाभंग झालेल्या पुजाऱ्यांपैकी एक पुजारी त्यांना त्यावेळी असे म्हणाले की, "महाराज ! आपण देवास शिवत नसल्यामुळे व देवाची पूजा करीत नसल्यामुळे लोकांच्या मनात असा संशय येऊ लागला आहे की, या ठिकाणी देवाचे वास्तव्य आहे की नाही ? अशा प्रकारचा संशय व शंका बाहेरगावची भक्त मंडळीच घेतात असे नाही; तर आमच्या घरची बायकामंडळीसुद्धा असेच म्हणू लागली आहेत. त्यामुळे कन्यागतामध्ये होणारे आमचे

उत्पन्न बुडते व आम्हा सर्व पुजाऱ्यांचे आपल्या या वागण्यामुळे फार नुकसान होत आहे."

श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजाऱ्यांनी ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांना त्यांच्यामुळे आपले नुकसान होत असल्याचे सांगितले त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, "आपण येथे राहिल्याने तुमचे नुकसान होत असेल; तर आम्ही येथून निघून जावे म्हणून देवावर संतत धार धरा. देवांची आज्ञा झाल्याशिवाय आपण येथून जाणार नाही." श्रीस्वामीमहाराजांनी इतक्या स्पष्ट शब्दात जेव्हा सर्व पुजाऱ्यांना सांगितले तेव्हा ते सर्वच जण गप्प बसले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसद्गुरुसच्छिष्य यांच्या अपूर्व एकतेचे दर्शन होऊन श्रीसरस्वतीगंगाधरांनी श्रीगुरुचरित्र ग्रंथात कथन केल्याप्रमाणे "श्रीगुरुरूपी नारायणा। विश्वंभरा दीनोद्धारणा। आपण आपुल्या दावूनि खुणा। गुरुशिष्यरूपें क्रीडसी ॥ ५३.१०४॥" या सिद्धान्ताची आणि श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी यासंबंधी ग्रंथराज दासबोधात सांगितलेल्या "सद्गुरुविण सच्छिष्य। तो वायां जाय निःशेष। कां सच्छिष्येंविण विशेष। सद्गुरु शिणे ॥ ५.३.२.॥" या न्यायाची प्रचीती येऊन मन आनंदाने भरून जाते. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या सद्भक्तरूपी सच्छिष्याकरिता स्थूलात्मक रीतीने देवाला स्पर्शपूर्वक नमस्कार करण्याची प्रथाही सोडून देण्यास मागे पुढे पाहिले नाही. ज्यावेळी श्रीसद्गुरू शिष्यात स्वतःला व सच्छिष्य श्रीसद्गुरूत स्वतःला हरवून जातात तेव्हाच असे अद्भुत चित्र उमटलेले दृष्टीस पडते. या दृष्टीने पाहिले म्हणजे श्रीगांडामहाराज हे श्रीसंत एकनाथमहाराजांनी कथन केल्याप्रमाणे "सेवका आधीन स्वामी होय ॥ ए. भा ३.३४६ ॥" या कोटीतील उच्चतम दर्जाचे अमायिक सच्छिष्य होते हे स्पष्ट होते. अशा अमायिक सच्छिष्यांचे

वर्णन करताना श्रीसंत एकनाथमहाराजांनी श्रीएकनाथी भागवतात असे म्हटले आहे की –

आतां जे कां अमायिक। शोधितसत्त्वाचें सात्त्विक।
मुख्य परमार्थी साधक। जे अवंचक सर्वस्वें ।। ३.३३० ।।
जे गुरुचरणाचे अंकिले। जे गुरुवाक्या जीवें विकले।
सद्गुरूलागीं वहिले। सर्वस्व आपुलें वोवाळिती ।। ३६१ ।।
जो सद्गुरूच्या बोलावरी। जीविताची कुरवंडी करी।
जो गुरुआज्ञेबाहेरी। तिळभरी हो न शके ।। ३३२ ।।
सद्गुरूतें मनुष्यबुद्धी। पाहोंचि नेणे जो त्रिशुद्धी।
सेवेलागीं निरवधी। हर्षानंदीं तत्पर ।। ३३३ ।।
निजभावार्थें सादर। सेवेलागीं अतितत्पर।
शरीर आठही प्रहर। अणुमात्र वंचीना ।। ३३४ ।।
उंच अथवा नीच काम। म्हणों नेणे मनोधर्म।
गौण करोनि नित्यकर्म। मानी उत्तमोत्तम गुरुसेवा ।। ३३५ ।।
सेवेलागीं निष्कपट। नित्य निजभावें चोखट।
जंव जंव सेवा पडे सदट। तंव तंव उद्भट उल्हासु ।। ३३६ ।।
सच्छिष्य असच्छिष्य समुदावो। सद्गुरूसी सारिखेंचि पहा हो।
ज्याचें हृदयीं जैसा भावो। तैसा पहा हो फळभोग ।। ३३७ ।।
'भावेषु विद्यते देवो'। हा उपदेशी मुख्य निर्वाहो।
आपुला आपणयां भावो। फळभोग पहा हो भोगवी ।। ३३८ ।।
चुकवावया मृत्यूचा ठावो। जाणिवे आणतां निजभावो।
हिरण्यकशिपु नाडला पहा हो। संधी साधोनि देवों निर्दळी त्यासी।
तेथेंचि प्रल्हादाचा भावो। मज रक्षिता देवाधिदेवो।
त्यासी साक्षेपें मारितां रावो। मरणचि वावो भावार्थें केलें ।।३४०।।

परमार्थीं जे जाणपण। ते जाणावी नागवण।
यालागीं सद्भावें जो संपूर्ण। तो जन्मरणछेदकू ॥ ३४१ ॥
मी शिष्यपरीक्षकु ज्ञाता। हे सद्गुरूसी नाहीं अहंता।
तेथें जैसी त्याची भावार्थता। तैशा तैशा अर्था तो पावे ॥ ३४२ ॥
हें असो सच्छिष्याचा सद्भावो। राया अभिनव कैसा पहा हो।
गुरु ब्रह्म ऐक्यभावो। निजनिर्वाहो निष्टंक ॥ ३४३ ॥
माझ्या इंद्रियवृत्ती चाळिता। सद्गुरु 'निजात्मा' मजआंतौता।
बाह्य सेवेलागीं सर्वथा। 'ब्रह्ममूर्ती' तत्त्वतां सद्गुरु मानी ॥ ३४४ ॥
सद्गुरुचरणीं आपण। चित्त-वित्त-जीवितेंसीं पूर्ण।
करूनि घाली आत्मार्पण। सर्वस्वें संपूर्ण सर्वभावें ॥ ३४५ ॥
तेथें संतुष्टला स्वामी पूर्ण। तोही सर्वस्वेंसीं भुलोन।
आवडी निजांगे आपण। सेवका आधीन स्वामी होय ॥ ३४६ ॥
आत्मार्पण करितां बळी। द्वारीं द्वारपाळ जाहला वनमाळी।
ऐसी भजनभावाची नवाळी। सेवकाजवळीं स्वामी तिष्ठे ॥ ३४७ ॥
एवढी ये अगाध प्रीती। उत्तम भक्त स्वयें पावती।
भाळ्याभोळ्यां हेचि स्थिती। कैशा रीतीं आतुडे ॥ ३४८ ॥

अशा रीतीने सेवकाच्या प्रेमामुळे त्याच्या आधीन होणारे श्रीसद्गुरू हे " शिष्य साचार अनुभव लाहे। तेणें सद्गुरु सुखाचा मेरु होये ॥ जेवीं तानयाचे धणी माये। सुखावली राहे स्वानंदें ॥ ए. भा २९.४९१ ॥ अशा पराकोटीच्या अवस्थेचे असल्यामुळे तेही किती महान् असतात हे सांगताना श्रीएकनाथमहाराज एकनाथी भागवतात असे म्हणतात की–

तरी जो कायावाचामनें। अतिकृपाळू दीनाकारणें।
तोडी शिष्याचीं भवबंधनें। उठवी ठाणें अहंकाराचें ॥ ३.२९७ ॥

जो शब्दज्ञानें पारंगतु । ब्रह्मानन्दें सदा डुल्लतु ।
शिष्यप्रबोधनीं समर्थु । यथोचितु निजभावें ॥ २९८ ॥
ज्याचा जैसा जैसा भावो । तैसा तैसा करी अनुभवो ।
तरी गुरुत्वाचा अहंभावो । अणुमात्र पहा हो धरीना ॥२९९॥
शिष्यापासूनि सेवा घेणें । हें स्वप्नींही न स्मरे मनें ।
शिष्याची सेवा स्वयें करणें । पूज्यत्वें पाहणें निजशिष्यां ॥ ३०० ॥
शिष्य देखावा पुत्रासमान । हें स्मृतिवाक्य असें प्रमाण ।
दृष्टीं देखों नेणें गौण । शिष्या देखे पूर्ण ब्रह्मत्वें ॥ ३०१ ॥
शिष्य सेवा करी निजभावार्थें । परी तो सेवक न म्हणे त्यातें ।
ज्यासी भगवद्रूप सर्व भूतें । शिष्य वेगळा तेथें सेवकत्वें नुरे ॥३०२॥
ऐसा मी एक महायोगी । हें ही न मिरवी तो जगीं ।
गुरुत्वाचा ताठा अंगीं । सर्वथा शिगीं लागों नेदी ॥ ३०३ ॥
आपल्या योगक्षेमाचें सांकडें । स्वप्नींही न घाली शिष्याकडे ।
शिष्यसंकट अति गाढें । निवारी रोकडे निजांगें जो ॥३०४॥
मी एक अकर्ता निजांगयोगी । म्हणौनि विषयांतें न भोगी ।
अथवा विषयो निःशेष त्यागी । हाही आग्रहो अंगीं असेना ॥३०५॥
तो विषय भोगी ना स्वयें त्यागी । तो अदृष्टाच्या निजविभागीं ।
लावूनियां देहाच्या अंगीं । परब्रह्मयोगीं विचरत ॥ ३०६ ॥

★ ★ ★

श्रीस्वामीमहाराज यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले त्यावेळीच कन्यागताचा उत्सव आला. यावर्षी श्रीकृष्णामाईचे पाणी अगदीच कमी झाले होते. त्यातच यात्रेकरू मोठ्या प्रमाणात आल्यामुळे आणि कन्यागतानिमित्त अनेकांनी पिंडदान करून पाण्यात पिंड वगैरे टाकल्यामुळे नदीचे पाणी खराब होऊन नासून गेले. त्यामुळे महामारीचा उपद्रव सुरू होऊन एक दोन माणसांचा मृत्यूही झाला.

त्यामुळे श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील पुजारी मंडळींना अशी भीती वाटू लागली की, ऐन कन्यागत यात्रेच्या मोसमात रोग फैलावला तर पुष्कळ लोक मृत्युमुखी पडतील व यात्रेकरिता लोकही कमी येऊन आपले उत्पन्न बुडेल. त्यामुळे ते सर्वजण श्रीस्वामीमहाराजांकडे गेले व त्यांना प्रार्थना करताना असे म्हणाले की, " महाराज ! सध्या कन्यागताचा उत्सव चालू आहे. अशा वेळी जर महामारी सुरू झाली तर लोकही मृत्युमुखी पडतील व आमचेही अपरंपार नुकसान होईल. तरी आपण कृपा करून ही महामारी थांबण्याचा काहीतरी उपाय सांगावा अशी आपल्या चरणी आम्हा सर्व बालगोपालांची नम्र प्रार्थना आहे. "

श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील सर्व पुजारी मंडळींनी अशी प्रार्थना केल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " श्रीदत्तपादुकांवर महारुद्राभिषेक करा म्हणजे महामारी थांबेल. कोणी मृत्यू पावणार नाही व उत्सव उत्तरीतीने पार पडेल. " श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच काही लोकांनी त्यांना जिज्ञासेने असे विचारले की, " महाराज ! महामारीचा आणि अभिषेकाचा काय संबंध आहे ? अभिषेक केल्याने महामारी कशी जाईल ? " पुजारी मंडळींनी असे विचारताच श्रीस्वामीमहाराजांनी या शंकेला दिलेले उत्तर अत्यंत मार्मिक व शास्त्रीय स्वरूपाचे आहे. ते असे म्हणाले की, " सृष्टी, स्थिती आणि लय ही तीनही परमेश्वराचीच कार्ये असून ती ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या द्वारा होत असतात. सृष्टीचा समतोल राखण्याच्या दृष्टीने लयाचे कार्य करण्यासाठी मृत्युरूप परमेश्वर आपले संहाराचे कार्य करतो. उत्पात, महामारी, साथीचे रोग, अपघात, युद्धे या त्याच्या संहारक शक्ती आहेत या मृत्युरूप परमेश्वरास अभिषेकाने शांत केले म्हणजे त्या शक्तीही शांत होतात. "

श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगितल्यावर सर्व पुजारी मंडळींनी देवाला महारुद्राभिषेक केला. त्यामुळे महामारी शांत होऊन सर्व लोकांची एका भीषण संकटातून सुटका झाली.

श्री. तात्याशास्त्री नगरकर हे श्री. गोंदवलेकर महाराजांच्या पंथातील असून ते मोठे तपस्वी व कवी होते. ते जरी अशा प्रकारे अन्य सांप्रदायिक उपासक असले तरी त्यांच्या मनात श्रीस्वामी-महाराजांविषयी अपरंपार भक्ती व प्रेम असल्यामुळे ते त्यांना अत्यंत मानीत असत. असे असले; तरी श्रीस्वामीमहाराजांसारख्या महान्, अलौकिक व लोकोत्तर अशा अवतारी संन्याशी महापुरुषाने ज्योतिष, औषधे, मंत्र, तंत्र, यंत्र वगैरे लोकांना सांगून लोकांच्या प्रपंचातील स्थूलात्मक अडीअडचणी सोडविण्यात आपला काळ घालवावा हे काही त्यांना आवडत नसे. त्यांच्या सारख्यांनी असा लोकसंग्रह करावा हे अयोग्य आहे असे विचार त्यांच्या मनामध्ये वारंवार येत असत.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्याचे कळल्यावर श्री. तात्याशास्त्र्यांनी त्यांच्या दर्शनाला जाऊन आपल्या शंकेचे निरसन करून घ्यावयाचे असे ठरविले. मात्र प्रत्यक्षात श्री. तात्या-शास्त्रींनी श्रीस्वामीमहाराजांचे जेव्हा दर्शन घेतले तेव्हा त्यांच्या मनातील सर्व प्रश्न आपोआप विरघळून गेले व सर्व किंतू नष्ट झाले. त्यावेळी श्री. तात्याशास्त्री चार-पाच दिवस श्रीक्षत्र नरसोबावाडीला राहिले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या दिवसभरच्या सर्व कार्यक्रमाचे मोठ्या चिकित्सक बुद्धीने निरीक्षण केले. त्यावेळी त्यांच्या असे लक्षात आले की, श्रीस्वामीमहाराज हजारो लोकांची सांसारिक दुःखे दूर करून त्यांना परमार्थाच्या मार्गाला लावून अध्यात्माची सिद्धी करून देतात हीच गोष्ट सर्वथैव योग्य आहे. श्रीस्वामीमहाराजांचा

हा विशाल दृष्टिकोन जेव्हा श्री. तात्याशास्त्रींच्या मनाला पटला तेव्हा त्यांच्याबद्दल वाटणारा त्यांचा आदर शतगुणित झाला.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी दासबोधात म्हटल्याप्रमाणे "पूर्वजांच्या पुण्यकोटी। संग्रहीं असिल्या गांठीं। तरीच ऐसियाची भेटी। होय जनांसी ॥१४.७.१७॥" या न्यायाने श्री. तात्याशास्त्री नगरकर यांना श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन होऊन त्यांच्या सर्व शंकांची निवृत्ती झाली. अशा विश्वोत्तीर्ण व विश्वात्मक देवपुरुषाची महती वर्णन करताना श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी असे म्हटलें आहे की –

काया वाचा जीवें प्राणें। कष्टे भगवंताकारणें।
मनें घेतलें धरणें। भजनमार्गीं ॥ १४.७.८. ॥

ऐसा भगवंताचा भक्त। विशेष अंतरीं विरक्त।
संसार सोडूनि जाला मुक्त। देवाकारणें ॥ ९ ॥

अंतरापासूनि वैराग्य। तेंचि जाणावे महद्भाग्य।
लोलंगते एवढें अभाग्य। आणीक नाहीं ॥ १० ॥

राजे राज्य सांडून गेले। भगवंताकारणें हिंडले।
कीर्तिरूपें पावन जाले। भूमंडळीं ॥ ११ ॥

ऐसा जो कां योगेश्वर। अंतरीं प्रत्ययाचा विचार।
उकलूं जाणें अंतर। प्राणिमात्रांचें ॥ १२ ॥

ऐसी वृत्ति उदासीन। त्याहीवरी विशेष आत्मज्ञान।
दर्शनमात्रें समाधान। पावती लोक ॥ १३ ॥

बहुतांसीं करी उपाय। तो जनाच्या वांटचा न ये।
अखंड जयाचें हृदय। भगवद्रूप ॥ १४ ॥

जनास दिसे हा दुश्चित। परी तो आहे सावचित्त।
अखंड जयाचें चित्त। परमेश्वरीं ॥ १५ ॥
उपासनामूर्तिध्यानीं। अथवा आत्मानुसंधानीं।
नाहीं तरी श्रवणमननीं। निरंतर ॥ १६ ॥
पूर्वजांच्या पुण्यकोटी। संग्रह असल्या गांठीं।
तरीच ऐसियाची भेटी। होय जनांसी ॥ १७ ॥

★ ★ ★

अशा महापुण्यवान् भगवत्पुरुषाचे कार्य स्थूल-सूक्ष्म-परार्थात्मक दृष्टीने कसे अपूर्व असते याचा जो प्रत्यय श्री. तात्याशास्त्री नगरकरांना आला त्याचा तसाच प्रत्ययकारी उपदेश श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी सकलजनांना करताना दासबोधात असे म्हटले की—

आधीं प्रपंच करावा नेटका। मग घ्यावें परमार्थविवेका।
येथें आळस करूं नका। विवेकी हो ॥ १२.१.१ ॥
प्रपंच सांडून परमार्थ कराल। तेणें तुम्ही कष्टी व्हाल।
प्रपंच परमार्थ चालवाल। तरी तुम्ही विवेकी ॥ २ ॥
प्रपंच सांडून परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला।
मग तया करंट्याला। परमार्थ कैंचा ॥ ३ ॥
परमार्थ सांडून प्रपंच करिसी। तरीं तूं यमयातना भोगिसी।
अंतीं परम कष्टी होसी। यमयातना भोगितां ॥ ४ ॥
साहेब कामास नाहीं गेला। गृहींच सुरवाडोन बैसला।
तरी साहेब कुटिल तयाला। पाहती लोक ॥ ५ ॥
तेव्हां महत्त्वचि गेलें। दुर्जनाचें हांसें झालें।
दुःख उदंड भोगिलें। आपुल्या जीवें ॥ ६ ॥

तैसेंचि होणार अंतीं। म्हणोन भजावें भगवंतीं।
परमार्थाचि प्रचीती। रोकडी घ्यावी ॥ ७ ॥
संसारीं असतां मुक्त। तोचि जाणावा संयुक्त।
अखंड पाहे युक्तायुक्त। विचारणा हे ॥ ८ ॥
प्रपंचीं जो सावधान। तोचि परमार्थ करील जाण।
प्रपंचीं जो अप्रमाण। तो परमार्थीं खोटा ॥ ९ ॥
म्हणोनी सावधानपणें। प्रपंच परमार्थ साधणें।
ऐसे न करितां भोगणें। नाना दुःखें ॥ १० ॥

★ ★ ★

जमखिंडीचे श्री. नरहरभट जोगळेकर हे एक उत्तम वैदिक ब्राह्मण असून घनपाठी म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. यावेळी ते मुद्दाम श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले होते. तेथे येण्याचा त्यांचा दुहेरी उद्देश होता. त्यांना स्वतःला घनासबंधी जी काही शंका होती ती श्रीस्वामीमहाराजांना विचारून आपला संशय दूर करावयाचा होता व त्यांना यज्ञकुंडांसंबंधी माहिती विचारून त्यांची परीक्षा पाहावयाची होती.

श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाल्यावर जेव्हा श्री. जोगळेकर यांनी घनासंबंधीची शंका त्यांना विचारली तेव्हा श्रीस्वामीमहाराजांनी त्या संबंधींचे प्रमाण म्हणून दाखवून त्यांचा संशय दूर केला. आपला संशय दूर झाल्यावर आता श्रीस्वामीमहाराजांची परीक्षा पाहावी या हेतूने त्यांनी यज्ञकुंडांसंबंधी काही प्रश्न त्यांना विचारले. आपल्या-प्रमाणे यज्ञकुंडांसंबंधीची सांगोपांग माहिती असणारा वैदिक ब्राह्मण भारतवर्षात कोणी नाही, असा अभिमान त्यांना असल्यामुळे श्रीस्वामीमहाराज आपल्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकणार नाहीत असे त्यांना खात्रीपूर्वक वाटत होते.

श्री. जोगळेकरांनी प्रश्न विचारताक्षणीच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना ग्रंथातील श्लोकच प्रमाणादाखल म्हणून दाखवून त्यांच्या प्रश्नांची साधार व समाधानकारक उत्तरे दिली. श्रीस्वामीमहाराजांचे हे अलौकिक बुद्धिसामर्थ्य पाहून श्री. जोगळेकर अगदी आश्चर्यचकित झाले व त्यांचा सर्व अभिमान तात्काळ नाहीसा झाला.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील श्री. हरिदास शिरोळकर यांच्या छातीमध्ये दुखत असे. त्यांनी पुष्कळ वैद्यकी इलाज केले; पण त्यांना काही गुण पडेना. काहीतरी बाहेरची बाधा असावी असे वाटल्यामुळे ते श्रीस्वामीमहाराजांकडे गेले. त्यांना पाहताक्षणीच श्रीस्वामीमहाराजांनी रोगाचे निदान केले व ते त्यांना असे म्हणाले की, " तुम्हाला कसलीही बाहेरची बाधा झाली नसून तुम्ही धौती केली की, तुमचा रोग बरा होईल. " श्रीस्वामीमहाराजांनी इतके सांगून श्री. शिरोळकर यांना धौती कशी करावयाची तेही दाखविले. पुढे श्रीस्वामीमहाराजांनी शिकविल्याप्रमाणे धौती केल्यावर श्री. शिरोळकरांच्या छातीमधील दुखणे बंद झाले.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील श्री. थत्ते यांचे कुटुंब श्रीस्वामीमहाराजांचे भक्त होते. एकदा सौ. थत्तेबाईंना त्यांच्या मैत्रिणीने आपल्या घरी शिरोळला मुंजीसाठी बोलविले. त्यांनी ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानी घालून मुंजीला जाण्यासाठी त्यांची परवानगी मागितली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " मुंजीच्या अक्षता टाकून परत या. " हे ऐकताच सौ. थत्ते या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, " ठीक आहे ! आपल्या इच्छेप्रमाणे अक्षता टाकून परत येईन. " इतके सांगून त्या शिरोळला मुंजीसाठी गेल्या. मुंज होताच ज्यावेळी त्या लगेच घरी परत जावयाला निघाल्या त्यावेळी त्यांच्या मैत्रिणीने जेवणाचा आग्रह

केला. आपल्या मैत्रिणीच्या मुलाच्या मुंजीचे जेवण टाकून आणि तिचा आग्रह मोडून जाणे सौ. थत्तेबाईंना योग्य वाटेना. यामुळे त्यांना श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेचे व आपण त्यांना दिलेल्या वचनाचे विस्मरण पडले. सौ. थत्तेबाई जेवण्यास थांबल्यावर हळूहळू त्यांच्या अंगाचा दाह होऊ लागला व शेवटी त्यांचा जीव अगदी कासावीस झाला. आपणास असे का होत आहे याचा जेव्हा त्या विचार करू लागल्या, त्यावेळी त्यांना श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दांची आठवण झाली. ज्याक्षणी सौ. थत्तेबाईंना श्रीस्वामीमहा-राजांच्या शब्दांची आठवण झाली त्याक्षणी त्या तशाच श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जावयाला निघाल्या. तेथे आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व एकंदर सर्व हकीकत सांगून त्यांच्याकडून तीर्थ अंगारा मागून घेतला. श्रीस्वामीमहाराजांच्या हातचा अंगारा कपाळाला लावताच व तीर्थ पोटात जाताच त्यांच्या शरीराचा दाह शांत होऊन त्यांना एकदम बरे वाटले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे "आतां असो सद्गुरूवीण। पोटस्थ शिकवील कोण। समदृष्टि जयाची पूर्ण। ऐसा तो विरळा ।।३.४३।। असे म्हणून श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी एकवीस समासी या ग्रंथात जे सूचित केले आहे त्याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. अनुभूती व साक्षात् प्रचीती देऊन आपल्या शिष्याला शिक-विण्याचे व त्याने स्वतः दिलेल्या वचनाचे पालन व्हावे म्हणून त्याला रात्रंदिवस सांभाळण्याचे काम श्रीसद्गुरू करीत असतात हेच खरे !

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे असताना त्यांचे पूर्वाश्रमातील स्नेही श्री. अणावकर हे मुद्दाम त्यांच्या दर्शनासाठी आले होते. पूर्वाश्रमात त्यांचा व श्रीस्वामी-महाराजांचा उत्तम परिचय होता. त्या उभयतांचे काही वेळ बोलणे

झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, " पूर्वी तुमच्या अंगात समंध येत असे तो हल्ली येतो का ? " हे ऐकताच श्री. अणावकर त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! तो समंध हल्ली येत नाही. "

श्री. अणावकरांशी इतके बोलणे झाल्यावर पाठाची वेळ झाल्यामुळे उभयतांचे बोलणे थांबून पंचदशीचा पाठ सुरू झाला. श्री. अणावकरही पाठ ऐकण्यास बसले होते. इतक्यात अकस्मात् तो जुना समंध श्री. अणावकरांच्या अंगात आला व श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाला की, " महाराज ! आपण पुष्कळ दिवसांनी माझी आठवण केल्यामुळे व आपले माझ्याबद्दल चांगले मत असल्यामुळे आज मी आपल्या दर्शनाला आलो. महाराज ! सकाळपासून या अणावकराने आपणास पुष्कळच खोटचा-नाटचा गोष्टी सांगितल्या. मी याचे कल्याण केले आहे; पण त्याचा काही उपयोग झाला नाही. सध्या मी शंकराच्या पिशाच्चगणावरील मोठा अधिकारी आहे. मात्र माझे प्रारब्ध अजून संपलेले नसल्यामुळे या योनीतून माझी मुक्तता झाली नाही. बरे तर आता जातो. भगवान् श्रीदत्तात्रेयांची स्वारी इकडे येत आहे. ते येथे येण्यापूर्वीच येथून गेले पाहिजे. " इतके बोलून श्री. अणावकरांच्या अंगात येणारा समंध निघून गेला.

श्रीस्वामीमहाराज नेहमीप्रमाणे एके दिवशी सकाळी स्नानासाठी संगमावर गेले होते. त्यावेळी सोबत बरीच मंडळी होती. त्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी स्नानासाठी पाण्यात बुडी मारल्यावर ते बराच वेळ झाला तरी वर येईनात. त्यामुळे बरोबरची मंडळी घाबरून गेली. एवढ्यात श्रीस्वामीमहाराज पाण्यातून बाहेर आले. काठावर त्यांनी सर्वांना आपल्या हातातील कोरडा अंगारा दिला. तेथे जमलेल्या सर्व भक्त मंडळींनी तो अंगाऱ्याचा प्रसाद मोठ्या

भक्तिभावाने ग्रहण केला व अत्यंत नम्रतेने व आश्चर्याने त्यांना असे विचारले की, " महाराज ! आपण तर आत्ताच स्नान करून पाण्यातून बाहेर आला असताना हा अंगारा कोरडा कसा व तो कोठून आला ? " लोकांनी मोठ्या श्रद्धाभक्तीने विचारलेल्या या प्रश्नाला उत्तर देताना ते असे म्हणाले की, " आज पर्वकाल असल्यामुळे काशी रामेश्वरच्या यात्रेला गेलो होतो. दोन्ही ठिकाणी जाऊन परत येण्यास इतका वेळ लागला. हा अंगारा दोन्ही ठिकाणचा आहे. " श्रीस्वामीमहाराजांचे हे उत्तर ऐकल्यावर सर्वजण अगदी दिङ्मूढ झाले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी ज्या दृष्टीने आपली कुळवल्ली श्री. हनुमंत याच्या वेगाची स्तुती करून प्रार्थना केली आहे त्याचे स्मरण होते व त्यांच्याच शब्दात श्रीहनुमंतस्वरूप श्रीस्वामीमहाराजांची स्तुती करून त्यांनी " अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावे ॥ ८ ॥ " या न्यायाने अखंड कृपेचा वर्षाव करून आपले कल्याण करावें म्हणून प्रार्थना करावी असे वाटते. ते प्रार्थना करताना असे म्हणतात की –

कपि विर उठला तो वेग अद्भूत केला।
त्रिभुवनजनलोकीं कीर्तिचा घोष केला ॥
रघुपति उपकारें दाटलें थोर भारें।
परम धिर उदारें रक्षिलें सौख्यकारें ॥ १ ॥

सबळ दळ मिळालें युद्ध ऊदंड झालें।
कपिकटक निमालें पाहतां येश गेलें।
परदळ शरघातें कोटिच्या कोटि प्रेतें।
अभिनव रणपातें दुःख बीभीषणातें ॥ २ ॥

कपिरिसघनदाटी जाहली थोर आटी ।
म्हणउनि जगजेठी धांवणें चार कोटी ।।
मृतिविरहित ठेले मोकळे सिद्ध झाले ।
सकळ जन निवाले धन्य सामर्थ्य चाले ।। ३ ।।

बहु प्रिय रघुनाथा मुख्य तूं प्राणनाथा ।
उठविं मज अनाथा दूर सांडूनि वेथा ।।
झडकरिं भिमराया तूं करी दृढ काया ।
रघुविरभजना या लागवेगेंचि जाया ।। ४ ।।

तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे ।
म्हणउनि मन माझें रे तुझी वाट पाहे ।।
मज तुज निरविलें पाहिजें आठवीलें ।
सकळिक निजदासांलागिं सांभाळवीलें ।। ५ ।।

उचित हित करावें उद्धरावें धरावें ।
अनहित न करावें त्वां जनीं येश घ्यावें ।।
अघटित घडवावे सेवकां सोडवावें ।।
हरिभजन घडावें दुःख ते बीघडावें ।। ६ ।।

प्रभुवर विरराया जाहली दृढ काया ।
परदळ निवटाया दैत्यकूळें कुटाया ।।
गिरिवर उतटाया रम्यवेषें नटाया ।
तुजचि अलगठाया ठेविलें मुख्य ठाया ।। ७ ।।

बहुत सबळ सांठा मागतों अल्प वाटा ।
न करित हित्त कांटा थोर होईल ताठा ।।
कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें ।
अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें ।। ८ ।।

जळधर करुणेचा अंतरामाजि राहें।
तरि तुज करुणा हे कां नये सांग पां हे।
कठिण हृदय झालें काय कारुण्य गेलें।
न पवसि मज कां रे म्यां तुझें काय केलें ॥ ९ ॥
वडिलपण करावें सेवका सांवरावें।
अनहित न करावें तूर्त हातीं धरावें।
निपटचि हटवादें प्रार्थिला शब्दभेदें।
कपि घन करुणेचा बोळला रामवेधें ॥ १० ॥
बहुतचि करुणा या लोटली देवराया।
सहजचि कपिकेतें जाहली दृढ काया।
परम सुख विलासे सर्वदासानुदासें।
पवनतनुज तोषें वंदिलें सावकाशें ॥ ११ ॥

★ ★ ★

श्रीथोरलेस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये असले की, तेथील पुजाऱ्यांना चांगली प्राप्ती होत असे; कारण त्यांच्या दर्शनासाठी दूरदूरहून भक्तमंडळी येत असत. जरी पर्वणी नसली तरी सुद्धा श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम असेपर्यंत दररोज श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये यात्राच भरत असे. खरे तर श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे आले हीच मोठी पर्वणी होती. अशा स्थितीत कन्यागताची पर्वणी आली. त्यामुळे सर्व पुजाऱ्यांना भरपूर प्राप्ती झाली; पण श्री. श्रीपाद मोरो पुजारी यांना मात्र विशेष प्राप्ती झाली नाही. श्रीस्वामीमहाराजांचे सर्व पुजारी मंडळींकडे लक्ष असे. त्यामुळे एके दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. श्रीपाद मोरो यांना असे विचारले की, " काय श्रीपादभटजी ! कन्यागत पर्व कसे काय

चालले आहे ? " श्री. श्रीपाद मोरोंचा स्वभाव थोडा थट्टेखोर असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी हा प्रश्न विचारताच ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! सर्व गाव पेटलेला आहे; पण आमच्या घरावर एक ठिणगीसुद्धा आलेली नाही. आपली कृपा झाली की, निदान ठिणगी तरी येईल." त्यांचे हे विनोदी उत्तर ऐकून श्रीस्वामीमहाराजांना हसू आले. सर्व गावात कन्यागतपर्वाची धामधूम चालली असताना व यजमानांच्या आगमनाने सर्वांच्या प्राप्तीत अपार वाढ झाली असताना आपणास मात्र कणभर देखील काही मिळाले नाही हे श्री. श्रीपादभटजींनी मोठ्या खुबीने व विनोदाने सांगून शिवाय तत्प्रीत्यर्थ करुणापूर्वक प्रार्थना केल्याचे पाहून श्रीस्वामीमहाराज परम संतुष्ट झाले.

त्याच दिवशी योगायोगाने श्री. वासुदेवराव ठाकूर वगैरे धनिक भक्तमंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आली होती. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना श्री. श्रीपाद मोरो पुजारी यांच्या घरी उतरावयाला सांगितले. श्री. ठाकूर यांना नारायण नागबळी वगैरे विधी करावयाचे होते. त्याप्रमाणे त्यांनी सर्व विधी केल्यामुळे श्री. श्रीपादभटजींना हजारबाराशेची प्राप्ती झाली. त्यानंतर एक दिवस सर्व मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर बोलत बसली असताना तेथे श्री. श्रीपादभटजी त्यांच्या दर्शनासाठी आले. त्यांना पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, "काय श्रीपादभट ! घरावर ठिणगी पडली की नाही ? " हा प्रश्न ऐकताच श्री. श्रीपादभटजी त्यांना असे म्हणाले की, "होय महाराज ! आपल्या कृपेने एक ठिणगी आमच्या घरावर पडली हे खरे आहे." हे ऐकून सर्व मंडळी हसू लागली.

श्रीस्वामीमहाराजांची एखाद्या माणसावर कृपा झाल्यावर

त्याच्या आयुष्याचे कल्याण होत असे व त्याची वृत्ती परमार्थाकडे वळत असे. श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे असताना श्री. गोविंदभटजी जोशी यांच्या आठ वर्षाच्या मुलाला पिसाळलेला कुत्रा चावला. त्यावेळी ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घालण्यासाठी त्या मुलाची आई तात्काळ त्यांच्याकडे गेली व ती त्यांची प्रार्थना करताना असे म्हणाले की, "महाराज ! माझ्या मुलाला पिसाळलेला कुत्रा चावला आहे. पिसळलेला कुत्रा चावलेला माणूस बरा होत नाही असे म्हणतात; तरी आपण कृपा करून त्याला काहीतरी औषध द्यावे म्हणजे तो या असाध्य रोगातून बरा होईल." त्या बाईंनी अत्यंत दीनवाणीपणे व करुणेने केलेली ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराज त्या बाईंना असे म्हणाले की, "ज्या जागी मुलाला कुत्रा चावला आहे त्या जागी चुना भरून त्यावर पैशाचे नाणे बांधा. त्यानंतर मुलाला पावशेर गोडेतेल पाजा व काळ्या धोत्र्याची मुळी पाण्यात उगाळून दररोज चमचाभर याप्रमाणे एकवीस दिवस द्या म्हणजे मुलाला बरे वाटेल."

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे त्या बाईंनी आपल्या मुलावर उपचार केल्यावर तो मुलगा कुत्र्याच्या विषबाधेतून मुक्त झाला. पुढे त्या मुलाची मुंज झाल्यावर त्याचा विद्याभ्यास चांगला व्हावा म्हणून त्याच्या आईने श्रीस्वामीमहाराजांना पत्र पाठवून त्यांचे आशीर्वाद मागितले. त्या पत्राला उत्तर देताना श्रीस्वामी-महाराजांनी आशीर्वाद तर दिलेच; पण त्याबरोबरच पुढील सरस्वती मंत्र लिहून कळविला व त्या मंत्राचा रोज १०८ वेळा जप करण्यास सांगितले.

नमस्ते शारदेदेवि सरस्वति मतिप्रदे ।
वस त्वं मम जिव्हाग्रे सर्वविद्याप्रदा भव ॥

श्रीस्वामीमहाराजांनी कळविल्याप्रमाणे त्या मुलाने जप केल्यामुळे त्याला उत्तरोत्तर यश मिळत गेले. त्याची बुद्धीही धार्मिक गोष्टींकडे वळून पुढे त्याने नामस्मरण व जप करण्यास सुरुवात केली. कालौघात त्याने एक गायत्री पुरश्चरणही केले.

एके दिवशी साठी उलटलेले एक सामवेदी ब्राह्मण श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! आपणाला सामवेद म्हणून दाखवावा अशी माझी तीव्र इच्छा आहे; तरी आपण मला तशी परवानगी द्यावी व सामवेद श्रवण करावा. " त्यांची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्या सामवेदी वैदिकांना असे म्हणाले की, " आपली इच्छा समजून संतोष झाला; मात्र आपण येथे सामवेदाचे गायन न करता खाली देवांजवळ जाऊन म्हणा. " श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे सांगितले; तरी " मला आपल्यासमोर सामवेद म्हणावयाचाच आहे, " असा आग्रह धरून ते श्रीस्वामीमहाराजांसमोर हट्टाने बसून राहिले. खरे तर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा शिरसावंद्य मानून त्यांनी सांगितल्याप्रमाणे देवांपाशी जाऊन सामवेदाचे गायन करावयास पाहिजे होते; परंतु श्रीस्वामीमहाराजांना सामवेदाची काहीच माहिती नसणार असे गृहीत धरून त्यांच्यापुढे आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करता येईल, या कल्पनेने ते आपला हट्ट सोडण्यास तयार होईनात. शेवटी श्रीस्वामीमहाराजांच्या अनुज्ञेशिवायच आपण सामवेद म्हणण्यास सुरुवात करावयाची असे ठरवून ते म्हणण्यास प्रारंभ करणार इतक्यात त्यांच्या असे लक्षात आले की, आपल्याला एकही मंत्र स्मरत नाही. एकाएकी आपणास सर्व विस्मृती होऊन आपले सर्व ज्ञान नाहीसे झालेले पाहून ते सामवेदी ब्राह्मण अतिशय घाबरून

गेले. भीतीमुळे त्यांच्या सर्वांगाला घाम सुटला. आपली चूक त्यांच्या लक्षात आली. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यांची क्षमा मागितली. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना साममंत्र म्हणून दाखविले. ते ऐकून श्रीस्वामीमहाराज हे सर्वज्ञ असल्याबद्दल त्या वैदिकांची खात्री झाली व ते निरभिमानी झाले.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे सामवेदी वैदिकांनी श्रीस्वामीमहाराजांची जी क्षमा मागितली तिचा भावार्थ श्रीसंततुकाराममहाराजांनी आपल्या शब्दात पुढीलप्रमाणे प्रकट केला आहे. ते असे म्हणतात की –

**देवा आतां ऐसा करी उपकार। देहाचा विसर पाडी मज ॥ १ ॥**
**तरीच हा जीव सुख पावे माझा। बरें केशीराजा कळों आलें ॥ २ ॥**
**ठाव देईं चित्ता राखे पायांपाशीं। सकळ वृत्तींसी अखंडित ॥ ३ ॥**
**आस भय चिंता लाज काम क्रोध। तोडावा संबंध यांचा माझा ॥४॥**
**मागणें तें एक हेंचि आहे आतां। नाम मुखीं संतसंग देईं ॥ ५ ॥**
**तुका म्हणे नको वरपंग देवा। घेईं माझी सेवा भाव शुद्ध ॥ ६ ॥**

  

एका ब्राह्मणाच्या पत्नीला पिशाच्च बाधा झाली होती. तिची पिशाच्चबाधा दूर व्हावी म्हणून त्या ब्राह्मणाने तिला श्रीस्वामीमहाराजांकडे श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे आणले. ज्यावेळी त्यांनी तिला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आणले त्यावेळी त्यांच्यासमोर आल्याबरोबर त्या बाईच्या अंगात पिशाच्चाचा संचार होऊन ते संस्कृत मधून त्यांच्याशी बोलू लागले. त्या पिशाच्चाने श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, “ तुम्ही संन्यासी असून हे लोक का जमा करता ? हे धर्मबाह्य वर्तन नाही काय ? हा जो

वेळूचा कमंडलू तुम्ही वापरता तो वापरणेसुद्धा अयोग्य आहे. खरे तर वेळू म्हणजे वंशी- वंश. संन्यास ग्रहणानंतर तुमचा वंश कोठे उरला आहे ? "

अशा प्रकारे त्या बाईंचे ते संस्कृत भाषण ऐकून लोकांना फार नवल वाटले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी संस्कृतमध्येच भाषण करून त्या पिशाच्चाला आपले वागणे धर्माला कसे धरून आहे हे साधार पटवून दिले. श्रीस्वामीमहाराजांनी वर उल्लेखिलेल्या व त्या पिशाच्चाने विचारलेल्या इतरही प्रश्नांना उत्तरे देऊन त्याचा पराभव केल्यामुळे शेवटी ते पिशाच्च त्यांना शरण आले. त्याने आपली सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन करून शेवटी आपणास या योनीतून मुक्त करावे अशी नम्रतापूर्वक प्रार्थना केली. त्याची प्रार्थना मान्य करून श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईंना तीर्थ देऊन त्या पिशाच्चाला मुक्ती दिली व त्या ब्राह्मणबाईंची पिशाच्चबाधा दूर केली.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील मुक्कामाचा काळ चालू असताना चैत्र महिनाही संपत आला. चैत्र वद्य अमावस्येला श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या सान्निध्यामुळे खूपच मोठ्या प्रमाणात साजरा झाला. या उत्सवाच्या काळात एकदा श्रीस्वामीमहाराज ध्यानस्थ बसले असताना देवांनी त्यांना असे सांगितले की, " लवकरच वाडीत महामारी सुरू होणार आहे. " श्रीस्वामीमहाराजांनी पुजारी मंडळींना बोलावून देवांनी दिलेल्या संकटाची कल्पना देऊन तन्निवारणार्थ असे सांगितले की, " वाडीवर ज़री असे संकट येणार असले; तरी आपण सर्वजणांनी मिळून श्रीपादुकावर रुद्राभिषेक करा म्हणजे रोगाच्या द्वारा येणाऱ्या संकटाचे निवा-

रण होईल." श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील सर्व पुजारी मंडळींनी अत्यंत एकनिष्ठपणे रुद्राभिषेक केल्यामुळे त्या रोगाचा उद्भव झाला नाही व संकट टळले.

श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव संपल्यानंतर थोड्याच दिवसांनन्तर वैशाख शुद्ध पौर्णिमेला देवांनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, "वाडीमध्ये आणखी किती दिवस राहण्याचा विचार आहे?" देवांनी अशा प्रकारे प्रश्न विचारताच एक क्षणमात्र ते स्तंभित झाले; कारण यापूर्वी असे होत नसे. या अगोदरचा प्रघात असा होता की, देव श्रीस्वामीमहाराजांना "अमुक कर, अमुक करू नकोस, अमक्या ठिकाणी जा," अशी आज्ञा करीत असत; परंतु यावेळी देवांनी श्रीस्वामीमहाराजांचा विचार काय आहे? असा प्रश्न विचारून एक प्रकारे आपला त्यांच्यावरील कृतककोपच व्यक्त केला. अशा रीतीने आपला राग व्यक्त करण्याचे खरे कारण असे होते की, यावेळी श्रीस्वामीमहाराजांचे श्रीक्षेत्र नरसोबावाडीला झालेले आगमन हे देवांच्या आज्ञेविरुद्ध होते. श्रीस्वामीमहाराज जणूकाही आपल्या इच्छेविरुद्धच श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जात आहेत असे भासवून व देवभक्तांच्या कृतककलहाचे अपूर्व चित्र उपस्थित करून देवांनी जे नाटक रचले होते त्या नाटकाचाच उत्तरार्ध म्हणजेच त्यांनी विचारलेला हा प्रश्न होता. श्रीस्वामीमहाराज जणूकाही स्वतःच्या इच्छेनेच श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले आहेत तेव्हा आता स्वतःच्याच इच्छेने ते वाडी सोडणार असाच या प्रश्नातील अभिप्राय होता. ते मुळी भांडण नव्हतेच; तर "अर्जुना तो भक्तु। तोचि योगी तोचि मुक्तु। तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढिये॥ १२.१५६॥" या दृष्टान्तातील नात्याचा द्वारा व्यक्त होणारा रुसवा होता.

श्रीस्वामीमहाराजांना देवांनी जरी " तो वल्लभा " या न्यायाने " वाडी केव्हा सोडणार ? " असे विचारले असले तरी त्यांनी " मी कांतु " या न्यायाने अत्यंत प्रेमाने देवांना असे उत्तर दिले की, " आता येथे अधिक काळ राहण्याची आपली इच्छा नाही. आपली आज्ञा होईल त्या दिवशी निघणे होईल. " इतके बोलणे झाल्यावर पुढे दोन-तीन दिवस काहीच दृष्टान्त किंवा आज्ञा झाली नाही. मात्र वैशाख वद्य द्वितीयेला " श्रृंगेरीसं चलावे, " अशी सकाळीच देवांची श्रीस्वामीमहाराजांना आज्ञा झाली. अशा प्रकारे देवांची श्रीक्षेत्र नरसोबावाडी सोडण्याची आज्ञा झाली; तरी या संबंधी श्रीस्वामीमहाराज कोणाला काहीच बोलले नाहीत.

त्या दिवशी दुपारी भिक्षा झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या जवळील सर्व पुस्तके श्रीगांडामहाराजांकडे दिली व ते दंडकमंडलू घेऊन ब्रह्मानंदांच्या मठातून निघून खाली देवदर्शनासाठी गेले. तेथे उत्तरद्वारातच श्रींना वंदन करून पंचगंगा ओलांडून अत्यंत वेगाने पलीकडे निघूनही गेले व पुढे एकसंबे गावात जाऊन त्यांनी मुक्काम केला.

श्रीस्वामीमहाराज एकाएकी एकदम श्रीक्षेत्र नरसोबावाडी सोडून गेल्यामुळे सर्वच मंडळी पार घाबरून गेली. आपणापैकी कोणालाच काहीही न कळविता श्रीस्वामीमहाराज निघून गेल्यामुळे प्रत्येकालाच फार वाईट वाटले. ते वाडी सोडून जाणार असे जर अगोदर कळले असते तर तेथील पुजारी मंडळींनी त्यांना आणखी काही दिवस तेथे राहण्याचा आग्रह केला असता व त्यांनी तेथे राहावे म्हणून सर्व पुजाऱ्यांनी मिळून देवांची परवानगी मिळविण्यासाठी देवावर संततधार, लघुरुद्र, महारुद्र इत्यादि उपाय केले असते. तसे झाले असते तर देवांकडून मुदत वाढवून मिळाली असती; पण या

खेपेला श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये अधिक काळ राहावयाचे नाही असेच श्रीस्वामीमहाराजांच्या मनात होते.

श्रीस्वामीमहाराजांनी आपण वाडी सोडून जाणार असल्याचे त्यांचे पट्टशिष्य श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांनाही कळविले नव्हते; मग इतरांना कळविण्याचा प्रश्नच नव्हता. यावेळी श्रीस्वामीमहाराज न कळविताच एकाएकी निघून गेल्यामुळे श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील मंडळींना पूर्वीप्रमाणेच वाजंत्री, चौघडे लावून व दिंड्या घेऊन टाळ वाजवीत व भजन करीत मिरवणूक वगैरे काढण्याचा काहीच थाट करणे शक्य झाले नाही. अशा प्रकारचा कोणताच थाट व्हावा अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा नसल्यामुळे व जर आपण येथून जाणार आहोत अशी पूर्वसूचना देऊन कळविले असते तर येथील सर्व लोक थाट केल्याशिवाय राहणार नाहीत ही कल्पना असल्यामुळे ते कोणालाच न कळविता निघून गेले होते.

श्रीस्वामीमहाराज अशा रीतीने श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून निघून एकसंबे या गावी गेल्याचे कळल्याबरोबर श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील सर्व भक्त व पुजारी मंडळी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांना बरोबर घेऊन तेथे गेली. तेथे आल्यावर सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून अशी प्रार्थना केली की, " यावेळी वाडीला आपला चातुर्मास होऊन आम्हा सर्व बाळगोपाळांना आपल्या चरणसेवेचा व सर्व भक्त मंडळींना आपल्या दर्शनाचा लाभ होईल असे वाटत होते; तरी आपले वाडीला पुन्हा येणे होऊन आपल्या कृपेचा सर्वांना लाभ व्हावा अशी तीव्र इच्छा आहे. तरी दयाघन महाराजांनी आम्हा सर्वांचे सर्व अपराध पोटात घालून आमची ही प्रार्थना मान्य करावी अशी आपल्या चरणी विनंती आहे. " श्रीक्षेत्र

नरसोबावाडीच्या सर्व भक्त मंडळींनी मिळून केलेली ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " देवांच्या आज्ञेमुळे अकस्मात् निघणे झाले. त्याला काही इलाज नाही. तुम्ही आपले दुर्गुण टाकून एकनिष्ठपणे प्रभूची सेवा करा म्हणजे देवांच्या कृपेने आमचे पुन्हा इकडे येणे होईल. "

याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांचे समाधान केले. त्यानंतर एक दिवस आलेली सर्व मंडळी श्रीस्वामीमहाराजांबरोबर एकसंब्याला राहिली. दुसऱ्या दिवशी सर्वांना श्रीक्षेत्र नरसोबावाडीला परत जाण्याची आज्ञा करून श्रीस्वामीमहाराज टाकळी, बेळगावमार्गे श्रीमलप्रभा नदीच्या तीराने प्रवास करीत करीत गुर्लहोसूर येथें येऊन पोहोचले.

वरील सर्व प्रसंग वाचला म्हणजे श्रीस्वामीमहाराज हे मूर्तिमंत वैराग्याची प्रतिमाच कसे होते याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी आपल्या " उपदेशशतक " या प्रकरण ग्रंथातील पुढील ओव्यांमधून जणूकाही या दृष्टीने श्रीस्वामीमहाराजांचेच चित्र रेखाटले आहे असे वाटते. ते असे म्हणतात की –

**बोलिजे वैराग्य त्यागाचें लक्षण । साक्षी विलक्षण जाणोनियां ।।५२।।**
**जाणोनी माईक सर्वहि त्यागिलें । मन सुखावलें संगत्यागें ।। ५३ ।।**
**संगत्याग केला निःसंग जाहला । सर्वहि एकला एकरूप ।। ५४ ।।**
**एकरूप झालें भक्ति आणि ज्ञान । बुडालें साधन वैराग्याचें ।।५५।।**
**वैराग्यावांचून सर्व खंडे ज्ञान । त्यागाचें लक्षण तेथें नाहीं ।। ५६ ।।**
**नाहीं भक्तिभाव सगुणाचे ठाईं । शब्दज्ञान कांहीं बोलोनियां ।।५७।।**
**बोलोनियां मुखें तैसी क्रिया करी । धन्य तो संसारीं ब्रह्मज्ञानी ।।५८।।**
**ब्रह्मज्ञानी भला वर्तुणुकेपासी । कोरड्या शब्दांसी कोण पुसे ।।५९।।**

**कोण पुसे बापा ज्ञान हे शाब्दिक। क्रिया अलौकिक सत्य जाण ।।६०।।**

  

श्रीस्वामीमहाराज गुर्लहोसूर येथे आल्यावर श्रीकैवल्याश्रम-स्वामीमहाराजांच्या आग्रहावरून एक आठवडाभर म्हणजे ज्येष्ठ शुद्ध दशमीपर्यन्त अर्थात् दशहरा समाप्तीपर्यंत तेथील श्रीचिदंबर-नाथांच्या मंदिरात मुक्काम करून राहिले. यावेळी श्रीसीताराम-महाराज श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर नव्हते. श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून निघाल्यानंतर पंधरा दिवसांनी त्यांनी वाडी सोडली. पुढे ते शिरोळमार्गे पंढरपूरला गेले. तेथून ते श्रीगोदावरी नदीच्या तीरावरील राजूर या गावी एक पर्णकुटी बांधून तेथे दीड-वर्ष राहिले.

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम गुर्लहोसूर येथे असताना श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून श्री. परशुरामभट पुजारी वगैरे मंडळी त्यांच्या दर्शनाला आली होती. या सर्व मंडळींनी सर्व प्रकारच्या रोगांच्या व संकटांच्या शमनासाठी काहीतरी मंत्र- स्तोत्र इत्यादि द्यावे अशी प्रार्थना केली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी सर्व लोकांच्या प्रार्थने-प्रमाणे सर्वरोगशमनार्थं पुढील "श्रीदत्तस्तवस्तोत्र" त्यांना करून दिले व त्यांना त्या स्तोत्राच्या पठणाचे फल सांगताना ते असे म्हणाले की, "जो कोणीही स्त्री-पुरुष शुचिर्भूतपणे या स्तोत्राचे त्रिकाल पठण करील त्याला कोणतीही रोगबाधा होणार नाही."

श्रीथोरल्यास्वामीमहाराजांनी संसारतापाने तप्त झालेल्या व घोर संकटात सापडलेल्या साधकभक्तांना प्राप्त संकटातून पार पाडून त्यांना श्रीदत्तप्रीती म्हणजे अप्राकृत भक्ती प्राप्त व्हावी म्हणून ही एक अपूर्व अशी स्तोत्रवल्ली किंवा स्तोत्र महौषधी उपलब्ध करून दिली आहे. भूत, प्रेत, पिशाच्च, पाप, ताप, भीती, दैन्य,

दारिद्र्य, ग्रहपीडा, खरूज, कोड, कुष्ठादि त्वचारोग, महामारी, प्लेग, संक्रमणशील रोग, उत्पात, संकटे, बाधा, शत्रूंनी केलेले जारण-मारणमोहनादि सर्व प्रयोग इत्यादि सर्व प्रकारच्या अनर्थकारक गोष्टी दूर करून जय, लाभ, यश, शांती व सर्व प्रकारची प्रापंचिक सुखे प्राप्त करून देणारे हे अमोघ असे श्रीदत्तस्तवस्तोत्र आहे. या स्तोत्राचे माहात्म्य वर्णन करताना कै. ब्रह्मश्री पंडित आत्माराम-शास्त्री जेरे यांनी असे म्हटले आहे की, "श्रीमद् दत्तात्रेयांच्या कलियुगातील अवतारांपैकी श्रीपाद श्रीवल्लभ श्रीनृसिंहसरस्वती यांच्या नंतर झालेल्या तिसऱ्या अवताररूप योगिराज श्रीमद् वासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराजांनी केलेले हे "दत्तस्तवन" रूप अत्युत्तम स्तोत्र आहे. याचे ९ श्लोक आहेत. याच्या नित्यपाठाने किंवा जपाने ऐहिक व पारलौकिक सर्व कामना पूर्ण होऊन तो भक्त श्रीदत्तमहाराजांना अत्यंत प्रिय होतो. श्रीदत्तमहाराज आपणास प्रिय वाटणे व आपण श्रीदत्तमहाराजांना प्रिय होणे या दोन गोष्टीच मनुष्यजन्माचे सार्थक करणाऱ्या आहेत व याच्यासाठीच परब्रह्मपरमात्मा श्रीदत्तांनी आपणास अत्यंत दुर्लभ असा मनुष्य-जन्म दिला आहे."

"या दोन गोष्टी या स्तोत्रपाठाने व निरंतर जपाने सिद्ध होतात असे स्वत: श्रीस्वामीमहाराज म्हणतात. म्हणजे याबद्दल अधिक विचार करण्याचे कारण नाही. येता-जाता, बसता-उठता व सोवळ्यात-ओवळ्यात केव्हाही या स्तोत्राचा जप करता येतो व काळाचे सार्थक होते. नाहीतर काळ हा सूर्यरूपाने आपले आयुष्य घेऊन चाललाच आहे. तरी आपले आयुष्य फुकट न जाता आपले सर्वतोपरी कल्याण व्हावे, या करिता विचारी माणसाने या स्तोत्राचा शक्य तितका जप करून आपला उद्धार करून घ्यावा."

॥ श्रीदत्तस्तवस्तोत्र ॥

भूतप्रेतपिशाचाद्या यस्य स्मरणमात्रतः ॥
दूरादेव पलायंते दत्तात्रेयं नमामि तम् ॥ १ ॥
यन्नामस्मरणाद्दैन्यं पापं तापश्च नश्यति ॥
भीतिग्रहार्तिदुःस्वप्नं दत्तात्रेयं नमामि तम् ॥ २ ॥
दद्रुस्फोटककुष्ठादि महामारी विषूचिका ॥
नश्यंत्यन्येऽपि रोगाश्च दत्तात्रेयं नयामि तम् ॥ ३ ॥
संगजा देशकालोत्था अपि सांक्रमिका गदाः ॥
शाम्यंति यत्स्मरणतो दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ४ ॥
सर्पवृश्चिकदष्टानां विषार्तानां शरीरिणाम् ॥
यन्नाम शांतिदं शीघ्रं दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ५ ॥
त्रिविधोत्पातशमनं विविधारिष्टनाशनम् ॥
यन्नाम क्रूरभीतिघ्नं दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ६ ॥
वैर्यादिकृतमंत्रादिप्रयोगा यस्य कीर्तनात् ॥
नश्यंति देवबाधाश्च दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ७ ॥
यच्छिष्यस्मरणात्सद्यो गतनष्टादि लभ्यते ॥
य ईशः सर्वतस्त्राता दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ८ ॥
जयलाभयशः कामदातुर्दत्तस्य यः स्तवं ॥
भोगमोक्षप्रदस्येमं पठेद्दत्तप्रियो भवेत् ॥ ९ ॥

॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती
विरचितं श्रीदत्तात्रेयस्तोत्रं संपूर्णम् ॥

भूत-प्रेत-पिशाचाद्या यस्य स्मरणमात्रतः ।
दूरादेव पलायन्ते दत्तात्रेयं नमामि तम् ॥ १ ॥

अर्थ :—भूत-प्रेत-पिशाच्च वगैरे अनेक दुर्गतीला गेलेले जीव आपल्या कर्मांची फळे भोगत असतात व त्यांचे सामर्थ्यही मोठे

असते. त्यांच्याशी काहीतरी संबंध असल्याशिवाय ते सहसा पीडा देत नाहीत. भूतप्रेतादिपीडा अतिशय घातक असते. त्यामुळे मनुष्याचा जन्म फुकट वाया जातो. अशी अनेक उदाहरणे पाहण्यात आली आहेत. श्रीक्षेत्र नरसोबावाडी, श्रीक्षेत्र गाणगापूर, श्रीक्षेत्र औदुंबर वगैरे श्रीदत्तमहाराजांच्या स्थानात हे पाहावयास मिळते. भूतप्रेतादि जीव श्रीदत्तमहाराजांच्या गुणांपैकी आहेत. मालकाच्या ताब्यात असलेल्या कुत्र्याला दुसऱ्याच्या अंगावर सोडणे अथवा आवरणें हे जसे मालक सहज करतो, तसे भूतादिगणांना दुसऱ्याच्या अंगावर सोडणे अथवा आवरणे श्रीदत्तमहाराजांच्या हाती आहे. भूतप्रेतपिशाच्चसमंधादि काढणारा श्रीदत्तमहाराजांहून दुसरा देव जगात नाही अशी प्रसिद्धी आहे; कारण हे सर्व गण श्रीदत्तमहाराजांचे सैनिक आहेत. श्रीगुरुचरित्रादिकांवरून हे सर्व स्पष्ट कळून येते. भूतप्रेतपिशाचादिगण ज्या श्रीदत्तमहाराजांच्या स्मरणमात्राने त्या स्मरणकर्त्यापासून अतिशय दूर पळून जातात व पुनः त्याच्याकडे येत नाहीत, अशा श्रीदत्तमहाराजांना मी नमस्कार करतो. ॥ १ ॥

यन्नामस्मरणाद्दैन्यं पापं तापश्च नश्यति ।<br>
भीतिग्रहार्तिदुःस्वप्नं दत्तात्रेयं नमामि तम् ॥ २ ॥

अर्थ :– ज्या श्रीदत्तमहाराजांच्या नामस्मरणाने दीनपणा व त्याला कारण असणारे दारिद्र्य व त्याला म्हणजे दारिद्र्याला कारण असणारे पाप व या सर्वांचे फळ जो ताप म्हणजे त्रास समूळ नष्ट होतो, तसेच ज्यांच्यामुळे सर्व प्रकारची भीती, शनी वगैरे नवग्रहापासून होणारी पीडा तसेच वाईट स्वप्ने व त्यांची फळे नष्ट होतात, त्या श्रीदत्तात्रेयांना मी नमस्कार करतो. ॥ २ ॥

दद्रुस्फोटककुष्ठादि महामारी पिषूचिका ।<br>
नश्यंत्यन्येऽपि रोगाश्च दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ३ ॥

**अर्थ** :– ज्यांच्या नामस्मरणाने खरूज, फोड, कुष्ठादि त्वचारोग, महामारी, कॉलरा, विषूचिका, प्लेग इत्यादि प्राणघातक रोग व अन्यही रोग नष्ट होतात त्या श्रीदत्तात्रेयांना मी नमस्कार करतो. ।। ३ ।।

**संगजा देशकालोत्था अपि सांक्रमिका गदाः ।**
**शाम्यन्ति यत्स्मरणतो दत्तात्रेयं नमामि तम् ।। ४ ।।**

**अर्थ** :– ज्यांच्या स्मरणाने संसर्गाने दूषित देशातून व दूषित कालातून आलेले संक्रमणशील रोगही नष्ट होतात त्या श्रीदत्तात्रेयांना मी नमस्कार करतो. ।। ४ ।।

**सर्पवृश्चिकदष्टानां विषार्तानां शरीरिणाम् ।**
**यन्नाम शांतिदं शीघ्रं दत्तात्रेयं नमामि तम् ।। ५ ।।**

**अर्थ** :– साप, विंचू चावून पीडित झालेल्या किंवा इतर विषांनी त्रस्त झालेल्या माणसांना ज्यांचे नाम शीघ्र शांती देणारे आहे त्या श्रीदत्तात्रेयांना माझा नमस्कार असो. ।। ५ ।।

**त्रिविधोत्पातशमनं विविधारिष्टनाशनम् ।**
**यन्नाम क्रूरभीतिघ्नं दत्तात्रेयं नमामि तम् ।। ६ ।।**

**अर्थ** :– ज्यांचे नाम भूमीवर, अंतरिक्षांवर व स्वर्लोकांवर होणाऱ्या नाना प्रकारच्या उत्पाताला व नाना प्रकारच्या संकटाला नाशक आहे व क्रूर प्राण्यांपासून होणाऱ्या भीतीलाही नाशक आहे त्या श्रीदत्तात्रेयांना मी नमस्कार करतो. ।। ६ ।।

**वैर्यादिकृतमंत्रादिप्रयोगा यस्य कीर्तनात् ।**
**नश्यन्ति देवबाधाश्च दत्तात्रेयं नमामि तम् ।। ७ ।।**

**अर्थ** :– आपल्या शत्रूंनी आपल्यावर केलेले जारण मारण-मोहनादि सर्व मंत्रप्रयोग ज्यांच्या नामसंकीर्तनाने नष्ट होतात व

देवादिकांनी केलेल्या बाधाही नष्ट होतात त्या श्रीदत्तात्रेयांना मी नमस्कार करतो. ॥ ७ ॥

**यच्छिष्यस्मरणात् सद्यो गतनष्टादि लभ्यते ।**
**य ईशः सर्वतस्त्राता दत्तात्रेयं नमामि तम् ॥ ८ ॥**

**अर्थ :–** सहस्रार्जुन किंवा कार्तवीर्य या नावाने प्रसिद्ध असलेल्या ज्यांच्या शिष्याच्या स्मरणाने हरवलेली किंवा न सापडणारी वस्तू मिळते व जो ईश्वर सर्व संकटातून आपल्या भक्तांचे रक्षण करतो त्या श्रीदत्तात्रेयांना माझा नमस्कार असो. ॥ ८ ॥

**" कार्तवीर्यार्जुनोनाम राजा बाहूसहस्रवान् ।**
**तस्यस्मरण मात्रेण गतंनष्टंच लभ्यते ॥ १ ॥ "**

**अर्थ :–** हा कार्तवीर्याचा मंत्र आहे. वस्तू हरवल्यास या मंत्राचा जप केला म्हणजे ती वस्तू सापडते असे हजारो लोकांचे अनुभव आहेत. लेखकालाही हा अनुभव आलेला आहे. भाविकांनी अनुभव घ्यावा. एखादी वस्तू हरवली असल्यास त्या वस्तूच्या जागी हा मंत्र लिहून ठेवावा व जपही चालू ठेवावा म्हणजे ती वस्तू अवश्य मिळते. ॥ ८ ॥

**जयलाभयशः कामदातुर्दत्तस्य यः स्तवम् ।**
**भोगमोक्षप्रदस्येमं पठेद्दत्तप्रियो भवेत् ॥ ९ ॥**

**अर्थ :–** जय, लाभ, यश वगैरे इच्छित वस्तू देणाऱ्या, जास्ती काय सांगावे, या लोकातील प्रापंचिक सर्व सुखे व श्रीदत्तस्वरूप प्राप्तिरूप मोक्ष देणाऱ्या श्रीदत्तात्रेयांची ही स्तुती पठण करणारा मानव श्रीदत्तमहाराजांना अत्यंत प्रिय होतो, असे श्रीदत्तस्वरूप असणारे श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती-स्वामीमहाराज अत्यंत कळकळीने सांगतात. फक्त माणसांचा त्यांच्या वचनावर दृढ विश्वास पाहिजे. जितका विश्वास दृढ असेल तितकी

कार्यसिद्धी लवकर होईल. दृढ विश्वास नसतो म्हणूनच मनुष्य संकटे भोगीत असतो. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेल्या या स्तवावर अत्यंत दृढ विश्वास उत्पन्न होऊन या स्तवपाठाने सर्वांचे कल्याण ऐहिक व पारत्रिक होवो अशी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी प्रार्थना करून --

सर्वेऽत्रसुखिनः संतु सर्वेसन्तुनिरामयाः ।
सर्वेभद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥

अशी प्रार्थना करून हे लेखन श्रीदत्तमहाराजांच्या चरणी अर्पण करतो. ॥ ९ ॥

श्रीस्वामीमहाराज गुर्लहोसूर येथे आले आहेत असे कळल्यावर त्यांच्या दर्शनासाठी दररोज शेकडोशे मंडळी सारखी येत होती. त्याचप्रमाणे रोज चार पाचशेपर्यंत मंडळी भोजनासाठी तेथे असत. यावरून तेथील गर्दीची कल्पना येईल. या ठिकाणी दररोज भजन, कीर्तन, पुराण इत्यादि विविध कार्यक्रम सारखे सुरू होते. यावेळीच प्रसिद्ध वेदान्ती श्री. बाबा गर्दे हे श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगतीचा लाभ व्हावा या हेतूने मुद्दाम गुर्लहोसूर येथे येऊन राहिले होते. या ठिकाणीच परमभक्त श्रीबोठेस्वामींचे व श्रीस्वामीमहाराजांचे श्रीमलापहानदीमध्ये प्रेमालिंगन झाले. यामुळे दोघांनाही परमसंतोष झाला.

त्यानंतर दशाहार संपल्यावर गुर्लहोसूरहून श्रीस्वामीमहाराज धारवाडला जावयाला निघाले. त्यावेळी वाटेत ते सौंदत्तीजवळील यल्लमाचे दर्शन घ्यावयाला गेले. यापूर्वीही शके १८२८ मध्ये एकवेळा श्रीस्वामीमहाराज यल्लामाला गेले होते. त्यावेळी त्यांच्या बरोबर श्रीसीतारामहाराज व इतरही बरीच ब्राह्मण मंडळी होती. तेथे

देवीचा पुजारी हा ब्राह्मण नव्हता. त्यावेळी त्याने श्रीस्वामीमहा-राजांना व त्यांच्या बरोबर असलेल्या ब्राह्मण भक्तांसह सर्व लोकांना देवीचा तीर्थप्रसाद दिला. तेव्हा तो तीर्थप्रसाद घ्यावा की न घ्यावा म्हणून सर्वांनी श्रीसीतारामहाराजांना खुणेने विचारले असताना त्यांनी देखील खुणेनेच श्रीस्वामीमहाराज जसे करतील तसे करावे म्हणून उत्तर दिले. त्यानंतर पुजाऱ्यांनी दिलेल्या प्रसादाचा श्रीस्वामी-महाराजांनी स्वतः स्वीकार केल्याचे पाहून इतर सर्वांनीही तीर्थ-प्रसाद घेतला. पूर्वी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला असताना (खंड १ ला पृ. १९९–२००) पुजाऱ्यांच्या लहान मुलांनी दिलेले श्रीदत्तप्रभूंच्या नैवेद्यातले दहीपोहे श्रीस्वामीमहाराजांनी ते शौचाला निघाले असताना पारोशानेच खाल्ले होते. अशा प्रकारे श्रीस्वामीमहा-राजांच्या श्रद्धाभक्तीचा उद्रेक मधून मधून होऊन त्यामुळे लोकांना मोठा आनंद होत असे.

श्रीयल्लम्मादेवीचे दर्शन घेतल्यानंतर श्रीस्वामीमहाराज धार-वाडला गेले. तेथे त्यांनी मदिहाळमध्ये श्री. राजेन्द्राप्पा यांच्याकडे श्रीदत्तमंदिरामध्ये मुक्काम केला. यावेळी त्यांच्या बरोबर श्रीगांडा-महाराजही होते. एक दिवस श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांना असे म्हणाले की, "एक वर्ष झाले ही माणसांची गर्दी सारखी चालूच आहे. जोपर्यंन्त तू बरोबर आहेस तोपर्यंन्त ही उपाधी कमी होणार नाही. श्रीदत्तांनी तुला एक लक्ष गायत्रीमंत्रजप करण्यास सांगितले आहे; पण या गर्दीमध्ये हा जप तुझ्याकडून होणार नाही. यासाठी तू भडोचला जाऊन जप कर. जप पूर्ण झाल्यावर ब्राह्मण-संतर्पण कर. पुढे कळवू तेथे ये." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगि-तल्यावर श्रीगांडामहाराजांनी त्यांच्या आज्ञेने ज्येष्ठ शुद्ध १५ ला त्यांना भिक्षा करून ते धारवाडहून निघून भडोचला गेले.

श्रीस्वामीमहाराजांचा धारवाडला मदिहाळमध्ये मुक्काम असताना श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील प्रसिद्ध पुराणिक श्री. धुंडिराजबुवा हे त्यांच्या दर्शनासाठी तेथें आले होते. श्री. धुंडिराजशास्त्री यांचा स्वभाव अत्यंत दाक्षिण्ययुक्त असून त्यांची वृत्ती अत्यंत संतोषी व समाधानी अशी होती. त्यांचे वडील निवर्तल्यावर श्रीक्षेत्र नरसोबावाडीतच शुक्लवृत्तीने राहून प्रभूची सेवा करावी अशी त्यांची इच्छा होती; परंतु प्रपंचात राहूनच परमार्थ साधावा असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना सांगितल्यामुळे त्यांनी प्रपंच व परमार्थ यांची उत्तम सांगड घालून आपले आयुष्य सार्थकी लावले. त्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना काही मंत्रानुष्ठान सांगितले होते. तेही त्यांनी अत्यंत श्रद्धेने केले. इतकेच नव्हे; तर श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी सर्वत्र पुराणप्रवचनादिद्वारा धर्मजागृतीचे कार्य यावच्छक्य चालू ठेवले. या सर्व गोष्टींमुळे श्रीस्वामीमहाराजांचे त्यांच्यावर विशेष प्रेम व लक्ष होते.

श्री. धुंडिराजबुवा पुराणिक हे मदिहाळला आल्यावर श्रीस्वामीमहाराजांना आपण भिक्षा वाढावी असे त्यांच्या मनात वारंवार येत होते; पण या ठिकाणी गर्दी फार असल्यामुळे "आपली दाद येथे कशी लागणार?," अशी भीती त्यांना वाटत राहिली. श्रीस्वामीमहाराज जाण्याचे दिवस जवळ आले तरी त्यांना जेव्हा भिक्षा वाढण्याचा अवसर मिळाला नाही, तेव्हा आपली भीती सार्थ ठरते की काय असे त्यांना वाटू लागले; पण श्रीस्वामीमहाराजांसारख्या सर्वज्ञ गुरुमाउलीला आपल्या प्रेमळ भक्ताचे निर्मळ अंतःकरण समजल्यामुळे त्यांनी दुसऱ्या दिवशीच श्री. धुंडिराजबुवा पुराणिक यांना भिक्षेची तयारी करण्याची आज्ञा केली. श्रीस्वामीमहाराजांनी आपली इच्छा ओळखून केलेल्या आज्ञेमुळे अत्यंत

आनंदित होऊन श्री. धुंडिराजबुवांनी एका बाजूस स्वयंपाक करून त्यांना भिक्षा वाढली. त्यामुळे त्यांना कृतार्थता वाटली. पुढे जेव्हा श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास नर्मदाकाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे झाला तेव्हा त्यावेळीही श्री. धुंडिराजबुवा त्यांच्या दर्शनासाठी तेथे गेले होते.

श्रीस्वामीमहाराज ज्येष्ठ महिन्याच्या अखेरीला धारवाडहून निघाले. ते जाता जाता श्रीतुंगभद्रातीरावर हावनूर या गावी येऊन पोहोचले. तेथे ब्राह्मणवस्ती बरीच असल्यामुळे त्या गावीच चातुर्मास करावयाचा असे ठरवून ते तेथेच राहिले.

**श्रीस्वामीमहाराज ! आपण अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक राजाधिराज श्रीसद्‌गुरुनाथमहाराज आहात ! आपण निखिल भूमंडलातील सर्वश्रेष्ठ असे परमहंस परिव्राजकाचार्य आहात ! आपण साक्षात् पूर्ण ब्रह्म असून आपल्या रूपाने जणू काही अमृताची मूर्तीच साकार झाली आहे ! आपण आमच्या हृदयसिंहासनाधीश्वर श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचे सद्‌गुरू आहात ! आपला अखण्ड जयजयकार असो !**

**श्रीस्वामीमहाराज ! ! आपण शक्तिपाताचार्य आहात ! आपण आपल्या कृपेच्या म्हणजेच शक्तिपाताच्या अपरंपार अशा लोकोत्तर, लोकविलक्षण व अलौकिक सामर्थ्याने शक्तिसंक्रमण करून मायेने रचलेली मोठमोठी विशाल ब्रह्माण्डे स्वानंदाच्या डोहात बुडवून शिष्याला निःसंगातीत अशा एकपणाचाही अंत करणाऱ्या सच्चिदानंदघन अवस्थेचे दान करून स्वसाम्य देत असल्यामुळे आपण सर्वेश्वर, निजबोधदायक व अनाथांचे माहेरघरच आहात ! आपण श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वरूप असून कलियुगात जन्मलेल्या आमच्यासारख्या जडजीवांचा उद्धार करण्या-**

करिताच "योगिराज" या नावाने या भूतलावर अवतार धारण करून आमच्या श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या रूपाने आम्हाला सिद्धयोगान्तर्गत शक्तिपातयोगदीक्षा देऊन आमची अनादि माया, भ्रम, संसारवासना, नाशिवंत संग व समस्त बंधने दूर करण्या करिता महावस्तुप्राप्तीचे साधन देऊन आमच्यावर अपरंपार कृपा केलेली असल्यामुळे श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी "आत्माराम" या प्रकरण ग्रंथात श्रीसद्‌गुरुनाथांच्या कृपाकटाक्षाची जी महती गुरुशिष्यसंवादरूपाने वर्णन केली आहे, तीच महती आपल्या चरणी प्रस्तुत करून आम्हाला नीजबीज प्राप्त करून देण्याची प्रार्थना करीत आहोत.

॥ श्रीराम समर्थ ॥

जयजय सच्चिदानंदा। जयजयाजी निजबोधा।
जयजयाजी आनंदकंदा। परमपुरुषा ॥ २.१ ॥
अनन्त ब्रह्मांडें ढिसाळें। मायेनें रचिलीं विशाळें।
तुमचे कृपेचेनि बळें। विरती स्वानंदडोहीं ॥ २ ॥
आतां स्वामीनें जें इच्छिलें। तें पाहिजे अंगिकारलें।
शरणागत आपुलें। उपेक्षू नये ॥ ३ ॥
नाशिवंत काय टाकावें। तें मज स्वामींनी सांगावें।
मज दातारें करावें। आपणाऐसें ॥ ४ ॥
ऐकोनि शिष्याचें बोलणें। स्वामी म्हणती सावध होणें।
अवधान देऊनि घेणें। आनंदपद ॥ ५ ॥
शिष्या बहुत मन घालीं। आतां बाऽकुळता राहिली।
तेथें वृत्ति चंचळ केली। तरी बुडशी ॥ ६ ॥
अग्निसंगें लोह पिटे। पिटतां तयाचा मळ तुटे।
परिसासि झगडतां पालटे। लोहपण तयाचें ॥ ७ ॥

जयाचा मळ जळेना। अभ्यंतरहि वळेना।
तरी ते सहसा पालटेना। मृत्तिकारूपें ॥ ८ ॥
नाशिवंत तितका मळ। तुवां त्यजावा अमंगळ।
तो गेलिया तूंचि सकळ। आहेसि बापा ॥ ९ ॥
नाशिवंत तूं जाण माया। मायिक जाईल विलया।
ते मायाचि प्राणसखया। ऐक सांगतों ॥ १० ॥
संग तितुका नाशवंत। निःसंग शब्द अशाश्वत।
म्हणोनि संगानिःसंगातीत। होवोनि राहें ॥ ४१ ॥

श्रीस्वामीमहाराज!!! अशा प्रकारे आपण आम्हाला आपल्या कृपाकटाक्षाद्वारा होणाऱ्या संकल्पदीक्षेने संगनिःसंगातीत ब्रह्मरूप करून आपल्या निजपदी ऐक्यरूपाने ठाव द्यावा व "जो स्वामीस शरण गेला। तेणें जन्म सार्थक केला॥" या श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी "आत्माराम" या प्रकरण ग्रंथात सांगितलेल्या न्यायाने आमचा जन्म सार्थक व्हावा म्हणून त्यांनी वर्णिलेली प्रार्थना, शक्तिसंक्रमण प्रक्रिया व अनुभूतीच्या प्राप्तीची अपेक्षा आम्ही आपल्या चरणी प्रस्तुत करून कृपाशीर्वादाची प्रार्थना करीत आहोत.

॥ श्रीराम समर्थ ॥

जी जी स्वामी सर्वेश्वरा। आम्हां अनाथांचिया माहेरा।
सार्थक झालें जी दातारा। कृपाकटाक्षें ॥५.१ ॥
या मनाचे संगती। जन्म घेतले पुनरावृत्ती।
माया मायिक असोनि भ्रांती। वरपडा झालों होतों ॥ २ ॥
मी मानवी किंकर। एकाएकीं झालों विश्वंभर।
संदेह तुटला थोर। यातायाती ॥ ३ ॥

मी संसाराहून सुटलों। मीच सकळ देहीं विस्तारलों।
जन्मदुःखापासूनी मुकलों। सर्वांभूतीं ॥ ४ ॥
मी करून अकर्ता। मी भोगूनि अभोक्ता।
मजमध्यें वार्ता। मीपणाची नाहीं ॥ ५ ॥
ऐसें जें कां निजबीज। गाळींव मीपणाचा फुंज।
तो मुरलिया सहज। सिद्धचि आहे ॥ ६ ॥
ऐसा शिष्याचा संकल्पू। म्हणोनि बोलें भवरिपू।
संसारदर्प भग्नदर्पू। केला जेणें ॥ ७ ॥
जें स्वामीच्या हृदयीं होतें। तें शिष्यास बाणलें अवचितें।
जैसें सामर्थ्य परिसाचे तें। लोहाअंगीं ॥ ८ ॥
स्वामीपरिसाचा स्पर्श होतां। शिष्य परीस झाला तत्त्वतां।
गुरुशिष्यांची ऐक्यता। झाली स्वानुभवें ॥ ९ ॥
गुज स्वामींच्या हृदयींचें। शिष्यासी वर्म तयाचें।
प्राप्त झालें योग्यांचे। निजबीज जें ॥ १० ॥
बहुतां जन्मांच्या शेवटीं। झाली स्वरूपाची भेटी।
एका भावार्थासाठीं। परब्रह्म जोडलें ॥ ११ ॥
जो वेदशास्त्रांचा भावगर्भ। निर्गुण परमात्मा स्वयंभ।
तयाचा एकसरां लाभ। झाला सद्‌भावें ॥ १२ ॥
जें ब्रह्मादिकांचे माहेर। अनंत सुखाचें भांडार।
जेणें हा दुर्गम संसार। सुखरूप होय ॥ १३ ॥
ऐसें ज्यासी ज्ञान झालें। तयाचें बंधन तुटलें।
येर नसोनि पावलें। दृढ अविवेकें ॥ १४ ॥
संदेह हेंचि बंधन। निःशेष तुटलें तेंचि ज्ञान।
निःसंदेहीं समाधान। आपैसें होय ॥ १५ ॥

प्राणियांसी माया सुटेना। अभिमानें त्रिपुटी तुटेना।
वृत्ती स्वरूपीं फुटेना। स्फूर्तिरूपें ॥ १६ ॥
मायाजळीं जे पडले। ते ईश्वरासि चुकले।
ते प्राणी सांपडले। वासनाबंधनीं ॥ १७ ॥
ज्याचें दैव उदेलें। तयास ज्ञान प्राप्त झालें।
तयाचें बंधन तुटलें। निःसंगपणें ॥ १८ ॥
सर्वसाक्षी तुर्यावस्था। तयेचाहि तूं जाणता।
म्हणोनि तुज निःसंगता। सहजचि आली ॥ १९ ॥
आपणासी तूं जाणसी। परी तूं तें नव्हेसी।
तूंपणाची कायसी। मात स्वरूपीं ॥ २० ॥
जाणता आणि वस्तू। निमाली या उर्वरित तूं।
तूंपणाचीही मातू। सहजचि वाव ॥ २१ ॥
असो हा शब्द पाल्हाळ। तुझें तुटलें जन्ममूळ।
कां जें नाशिवंत सकळ। मदर्पण केलें ॥ २२ ॥
जें जें जाणोनि टाकिलें। तें तें नाशिवंत राहिलें।
तुझें तुज प्राप्त झालें। अक्षय पद ॥ २३ ॥
ऐसें बोले मोक्षपाणि। ऐकोनि शिष्य लोटांगणी।
निःसंग स्वरूप मिळणी। दोघे एकचि झाले ॥ २४ ॥
ऐसा कृपाळू स्वामीराव। आदिपुरुष देवाधिदेव।
शिष्यासी निजपदीं ठाव। ऐक्यरूपें दिल्हा ॥ २५ ॥
जो स्वामीस शरण गेला। तेणें जन्म सार्थक केला।
संदेहावेगळा झाला। जो देवां दुर्लभ ॥ २६ ॥

श्रीस्वामीमहाराज !!!! आपली चरित्रकथा ही परमपावन श्रीगंगानदीच आहे. त्या चरित्रकथेच्या वाचनाने, मननाने, चिंतनाने व निरन्तर गायनाने सर्व जग पावन झाल्याशिवाय राहणार नाही.

आपल्या या अमर कथेला आलेला प्रेमपूर, आपले अनन्यतमश्रेष्ठ सच्छिष्य व आमचे सद्‌गुरुनाथ, श्रीवामनहृदयी सामाविलेला होता. माझ्या सारख्या आळशावर त्यांनी हा परमपवित्र चरित्रगंगेचा पूर लोटून मला तर या पुरात पूर्ण बुडवून धन्य केलेच; परंतु इतर सर्व जनांना या कथेचा लाभ व्हावा म्हणून तिचे या स्वरूपात प्रकटीकरणही माझ्याकडून करवून घेतले. खरोखर ज्या घरात आपली कथा वाचली जाईल ते घर धन्य धन्य होईल; कारण या घोरतम कलियुगात आपली चरित्रकथा व कीर्तनच सर्वांना उद्धरून नेणारे आहे. या दृष्टीने श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांच्या शब्दात अल्पसा बदल करून असे म्हणता येईल की –

वासुदेव कथा गंगा। श्रवणें पावन करी जगा ।। १ ।।
तिशी प्रेमपूर आला। वामनहृदयीं सामावला ।। २ ।।
वामनदासाची माउली। आळशावरी गंगा आली ।। ३ ।।

  

धन्य धन्य ते पवित्र घर। जेथें वासुदेव कथा निरंतर ।। १ ।।
गुण गाती वासुदेवाचे। तेचि मानावे दैवाचे ।। २ ।।
स्वयें बोले जगजीवन। थोर कलियुगीं कीर्तन ।। ३ ।।
वामनदास म्हणे भले। हरिभक्तीं उद्धरिले ।। ४ ।।

या दृष्टीनेच आपले परमभक्त व पूर्वाश्रमातील धाकटे बन्धू श्रीसीतारामहाराज यांनी स्वतः एका पदात वर्णन केल्याप्रमाणे "नित्यानित्य हा विवेक करुनी सद्‌गुरुचरणीं शरण रिघें ।।" या न्यायाने आम्हा सर्वांना आपल्या चरित्ररूपी संगतीत नित्य

राहण्याची सद्‌बुद्धी होऊन आम्ही सर्वजणांनी ईश्वरभजनात रंगून जावे म्हणून आपल्या चरणी आपल्या परमभक्ताच्या शब्दांनी प्रार्थना करून आपले श्रीसद्‌गुरुरूपाने ध्यान व नमन करून आपल्या परमरूपात स्थिर राहण्याचा प्रयत्न करीत आहोत.

## ॥ पद ॥

अमोल काया जाइल वाया प्राण्या विचार करि चित्तीं ॥ ध्रु० ॥
लक्ष चौऱ्याशीं फेरे फिरतां मानव देहा आलासी।
विषयसुखाला पशुवत भुलुनी स्वस्वरुपाला मुकलासी ॥ १ ॥
गृह धन दारा आप्त सुतादिक देहाचे हे साथी रे।
यमरायाची वर्दी येतां कोणि नये तुज सांगी रे ॥ २ ॥
भौतिक देह हा टाकुनि भूवरि संगे येईल पुण्य पाप।
लिंग देह तो काढुन नेती अपार दुःखें भोगिसि रे ॥ ३ ॥
नर देह हा पुन्हा नये तुज ऐसें आणुनि तूं चित्तीं।
नित्यानित्य हा विवेक करुनी सद्‌गुरु चरणीं शरण रिघें ॥ ४ ॥
सज्जन संगति नित्य धरोनी ईश्वर भजनीं रंगुनि जा।
सीताराम हा प्रार्थितसे तुज चित्तीं विचार करुनि पहा ॥ ५ ॥

## ॥ श्रीसद्‌गुरूध्यान ॥

वासुदेवाय दत्ताय गुरवे ब्रह्मरूपिणे।
नमोऽस्तु देवदेवाय भवदुःखविनाशिने ॥ १ ॥
वेणुदण्डं तु दक्षेण सव्येन च कमण्डलुम्।
दधानं वासुदेवाख्यं दत्तरूपं नमाम्यहम् ॥ २ ॥

ध्यायामि वासुदेवाख्यं दत्तरूपं शिवान्वितम् ।
कौपिनमेखलाशाटीदधानं भस्मभूषितम् ।। ३ ।।
ध्येयः सदा वासुदेवो वेदरूपः सुखात्मकः ।
पादरक्षाहीनकाषायाम्बरोभक्तसेवितः ।। ४ ।।
वासुदेवो दत्तरूपः प्रसन्नमुखपंकजः ।
ज्योतिर्वेत्ता वैद्यराजः सदाभक्तार्थजीवनः ।। ५ ।।

## ।। नमन ।।

नमो गुरु कृपाकरा नमो गुरु गुणाकरा ।।
नमो गुरु परात्परा नमो गुरु महत्तरा ।।
नमो गुरु सनातना नमो गुरु मनोन्मना ।।
नमो गुरु घनाघना नमो गुरु निरंजना ।।

  

# अध्याय बाविसावा

## ।। निर्गुण भूपाळी ।।

उठि उठि बा जीवराया । सोडी अविद्या निंद्य माया ।
व्यर्थ जातसे नरकाया । स्वरूपीं सावध होई तूं ।। धृ. ।।
पंचकोशांचें पांघरूण । विवेक हस्तानें काढून ।
देहत्रयाचें अंथरूण । वत्सा गुंडाळून तूं टाकी ।। १ ।।
अहंता ममते त्याग । हाचि मलमूत्र उत्सर्ग ।
हरिनाम हे सवेग । बाह्यांतरीं शौच करी ।। २ ।।
निंदेनें मुख कडुवट । झालेसें अति वाईट ।
हरिनामजळें चोखट । धुवोनि निर्मळ होईं तूं ।। ३ ।।
त्रिगुणाचें आचमन । करूनि दृश्य दे सोडून ।
क्रोधव्याघ्रचर्मीं बैसून । विचार करी स्वहिताचा ।। ४ ।।
हा स्थूल देह तूं नव्हेसी । घटापरी जडत्व यासी ।
आदि अंतीं अभाव त्यासी । साक्षी प्रकाशक तूं त्याचा ।। ५ ।।
प्राणहि नव्हेसी निर्धारी । क्षुधेतृष्णेनें पिडे भारी ।
हाही जड स्थूलाचे परी । याहुनि विलक्षण तूं आत्मा ।। ६ ।।
मनहि नव्हेसि निश्चित । चंचल संशयें तें ग्रस्त ।
अहंतें ममत्वें वेष्टित । याहुन विलक्षण तूं चित्घन ।। ७ ।।
बुद्धि नव्हेसी निश्चय । निद्राकाळीं होतो लय ।
जगताहि व्याप्त होय । ईहून वेगळा तूं द्रष्टा ।। ८ ।।
निद्रानंदहि तूं नव्हेसी । तो आनंद एकदेशी ।
आनंदरूप बिंब त्यासी । आत्मत्व होय परिपूर्ण ।। ९ ।।
पंचकोशांचा जाणता । तो आत्मा जाण आयता ।
ऐसा अनुभव तत्त्वतां । पावुनि सुखिया तूं होईं ।। १० ।।

पंचकोशांचा अनुभव। आत्म्याचा तो न दिसे ठाव।
तरी पाचातें स्वयमेव। जाणें, तो नाहीं होय कसा॥ ११ ॥
अनुभवरूप तूं स्वतां। दुजा नाहीं अनुभविता।
तरी त्यासी बोधरूपता। सहजचि आली जाण तूं॥ १२ ॥
ब्रह्म असतांहि एकलें। मायोपाधि ईश्वर झाले।
कोशामधि जीवत्व आलें। उपाधित्यागें एकचि ते॥ १३ ॥
मुळांतील कोमल दर्भ। स्थूलरूपानें काढिता लाभ।
तैसा आत्मा देहीं स्वयंभ। विचारें काढुनि घेई तूं॥ १४ ॥
स्थूल सूक्ष्म कारण तीन। शरीराचा निरास जाण।
करिता, आत्मा ब्रह्म पूर्ण। होय निश्चय क्षणमात्रें॥ १५ ॥
महावाक्याचें मुख्य सार। तूं ब्रह्मचि हा निर्धार।
महावाक्याचा वारंवार। विचार करी साक्षेपें॥ १६ ॥
सद्‌गुरुमुखानें श्रवण। महावाक्यार्थ होता जाण।
तत्काळचि ब्रह्म पूर्ण। होय, परी तो दृढ नाहीं॥ १७ ॥
श्रवणादिकांचा अभ्यास। येथें करुनि विश्वास।
तरीच बोध दृढतेस। पावेल, संशय नाहींच॥ १८ ॥
देह मी जैसा दृढ निश्चय। तैसा 'मी आत्मा' हा प्रत्यय।
जाहल्या, कृतकृत्य होय। झाला कळस बोधाचा॥ १९ ॥
मुळीचा तूं पुरुषोत्तम। संकल्पें जीवत्वाचा भ्रम।
संकल्पत्यागें तूंचि ब्रह्म। होसी अनायासें पाहि पां॥ २० ॥
करितां सर्वहि व्यवहार। न पडावा आपुला विसर।
ऐसें आत्मत्व दृढतर। होता सहजचि मुक्त तूं॥ २१ ॥
वर्णाश्रमादिक हे सर्व। देहीं कल्पित याचा भ्रम।
बोधस्वरूप आत्माराम। तेथें हें बंड कांहीं नसे॥ २२ ॥

क्षुधा तृष्णा हे प्राणधर्म। शोक मोह हे बुद्धीचे नेम।
देहा, जरा मृत्यु जन्म। निद्रादि अवस्था बुद्धीच्या ॥ २३ ॥
वर्णाश्रम आणि अवस्था। हा अभिमान घेसी माथां।
त्यासी विधिनिषेध तत्त्वतां। हें गुह्य निश्चयें जाण तूं।।२४।।
वर्णाश्रमाचा अभिमान। ज्यास, तो श्रुतीचा दास जाण।
तो अभिमान जातां पूर्ण। मुगुटमणी श्रुतीचा तूं ॥ २५ ॥
देह असतां विदेहत्व। कर्में करितां अकर्तृत्व।
सर्व भोगोनि अभोक्तृत्व। ऐसें सामर्थ्य ज्ञानाचें ॥ २६ ॥
प्रलयीं जैसें एक नीर। तैसें चिन्मय चराचर।
(जीवा) जयासी अणुमात्र। थारा पाहतां न दिसे कोठें ॥२७॥
ऐसें केवळ ब्रह्म झालें। नरदेहीं सार्थक केलें।
आपण तरोनि तारिले। कृपाळूपणें जग सर्व ॥ २८ ॥
ज्ञानी आणि जगदीश। येथें भेदाचा न दिसे लेश।
हें स्वमुखें कृष्ण परेश। पार्था सांगे गीतेंत ॥ २९ ॥
निर्गुण भूपाळी पठण। प्रातःकाळीं करील जाण।
तो स्वयें ब्रह्म पूर्ण। होईल, अवश्य हें फळ ॥ ३० ॥
जीवरायासी बोध केला। सद्गुरूंनीं, तो ब्रह्म झाला।
सद्गुरु तेणें आनंदला। गातो वासुदेव तें प्रेमें ॥ ३१ ॥
उठि उठि बा जीवराया। सोडी अविद्या निंद्य माया।
व्यर्थ जातसे नरकाया। स्वरूपीं सावध होई तूं ॥ ध्रु० ॥

**चातुर्मास विसावा–शके १८३२ इ. स. १९१० हावनूर :–**

हावनूर हे गाव श्रीतुंगभद्रेच्या तीरावर असूनया गावाचा परिसर अत्यंत रमणीय व शांत असा आहे. येथे माणसांची वर्दळ कमी आहे असे पाहून या वर्षीचा चातुर्मास हावनूरला करावयाचा असे ठरवून श्रीस्वामीमहाराजांनी येथील प्रसिद्ध अशा श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या

मंदिरामध्ये मुक्काम केला. या मंदिरात राहिल्यावर त्यांनी त्रिपु-रान्तक श्रीशंकराची पुढीलप्रमाणे स्तुती केली.

## ॥ श्रीत्रिपुरान्तकस्तोत्र ॥

तापत्रयानें अति तापलों शिवा। विश्रांति कोठें न मिळे उमाधवा॥
भवाब्धिनावा तव पाद हे हरा। तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा॥१॥
हा कामरुड्लोभदवाग्नि पेटला। तच्छांतिकर्ता मजला न भेटला॥
दयाघना हा निववी महेश्वरा। तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा॥२॥
देवा अहंता ममता पिसाळल्या। त्या शाकिनी डाकिनी अंगि झोंबल्या।
हा लोभ वेताळ गिळेल कीं मला। तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा।३।
नको नको हा भवजाच साच तूं। विमुक्तिहेतू वर काढि हात तूं।
धरूनि माझा सदया उमेश्वरा। तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा॥४॥
मी पातकी केवळ बुद्धिमंद हा। महामति तूंचि उदार पापहा!
माझ्या शिरीं तूं धरि हात शंकरा। तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा।५।

श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या स्तुतीप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी "॥ श्रीतुंगाष्टकम् ॥" या नावाने स्तोत्र रचून श्रीतुंगभद्रानदीचीही स्तुती केली. ते स्तोत्र असे आहे.

## ॥ श्रीतुंगाष्टकम् ॥

तुंगा तुंगतरंगवेगसुभगा गंगासमा निम्नगा
रोगान्ताऽवतु सह्यसंज्ञितनगाज्जातापि पूर्वाब्धिगा॥
रागाद्यान्तरदोषहृद्वरभगा वागादिमार्गातिगा
योगादीष्टसुसिद्धिदा हतभगा स्वंगा सुवेगापगा॥ १ ॥
स्वसा कृष्णावेणीसरित उत वेणीवसुमणि –
प्रभापूतक्षोणीचकितवरवाणीसुसरणिः॥

अशेषाघश्रेणीहृदखिलमनोध्वान्ततरणि –
दृढा स्वर्निश्रेणिर्जयति धरणीवस्त्ररमणी ॥ २ ॥
दृढं बध्वा क्षिप्ता भवजलनिधौ भद्रविधुता ।
भ्रमच्चित्तास्त्रस्ता उपगतसुपोता अपि गताः ॥
अधोधस्तान्भ्रान्तान्परमकृपया वीक्ष्य तरणिः ।
स्वयं तुंगा गंगाभवदशुभभंगापहरणी ॥ ३ ॥
वर्धा सधर्मा मिलितात्र पूर्वतो भद्रा कुमुद्वत्यपि वारुणीतः ।
तन्मध्यदेशेऽखिलपापहारिणी व्यालोकि तुंगाखिलतापहारिणी ॥४॥
भद्रया राजते कीर्त्या या तुंगा सह भद्रया ।
संनिधिं या करोत्वेतं श्रीदत्तं लघुसंनिधिम् ॥ ५ ॥
गंगास्नानं तुंगापानं भीमातीरे यस्य ध्यानम् ।
लक्ष्मीपुर्यां भिक्षादानं कृष्णातीरे चानुष्ठानम् ॥
सिंहाख्याद्रौ निद्रास्थानं सेवा यस्य प्रीत्या ध्यानम् ।
सद्भक्तायाक्षय्यं दानं श्रीदत्तस्यास्यास्तु ध्यानम् ॥ ६ ॥
( गोमूत्रिकाबंधः ) तुंगापगा महाभंगा पातु पापविनाशिनी ।
रागातिगा महागंगा जंतुपापविनाशिनी ॥ ७ ॥
( हारबंधः )
हर परमरये समस्तमदाख्यान् खलबलदलनेऽघमप्यमले मम ।
हरसि रसरसे समस्तमनोमलं कुरु गुरुकरुणां समस्तमते मयि॥८॥
वेगातुंगापगाघं हरतु रयरया देवदेवर्षिवंद्या
वारं वारं वरं यज्जलमलमलघुप्राशने शस्तशर्म ।
श्रीदत्तो दत्तदक्षः पिबति बत बहु स्याः पयः पद्मपत्रा –
क्षीं तामेतामितार्थां भज भज भजतां तारकां रम्यरम्याम् ॥ ९ ॥
॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद-
सरस्वतीविरचितं तुंगाष्टकं संपूर्णम् ॥

अर्थ :– ही श्रीतुंगा अर्थात् श्रीतुंगभद्रा नदी उंच अशा लहान मोठ्या लाटांमुळे ऐश्वर्यशालिनी व श्रीभागीरथीच्या बरोबरीची म्हणजे पाप–तापादि दूर करणारी अशी आहे. ही सह्य नावाच्या अर्थात् सह्याद्रि पर्वतापासून उगम पावणारी असूनही पूर्वेकडील सागराला जाऊन मिळणारी आहे. हिचे पाणी सर्वरोगनाशक आहे. आसक्ती इत्यादि मनोदोषांना हरण करणारी, वाणी–बुद्धी व मनाच्याही टप्प्यात न येणारी अर्थात् वाणी इत्यादिकांच्या पलीकडे असणारी, श्रेष्ठ ऐश्वर्याने शोभणारी, विलासीवृत्तीला दूर करणारी, मार्जन-स्नान-पानादि निमित्ताने हिचा संयोग झाला असता अपेक्षित अशा अणिमादि अगणित सिद्धींना देणारी, निर्मल शरीराची व वेगाने धावणारी ही नदी आमचे रक्षण करो. ॥ १ ॥

ही श्रीतुंगभद्रानदी श्रीकृष्णानदीची (व श्रीयमुनेचीही) बहीण आहे. सर्व प्रकारच्या पातकसमुदायाला हरण करणारी व सर्वांच्या मनोरूप अंधकाराला दूर करण्याच्या कामी ही सूर्यासारखी आहे. ही स्वर्गाची मुख्य पायरी असून पृथ्वीच्या रमणीय अशा आवरणवस्त्रा-सारखी अर्थात् पृथ्वीला झाकणारे सुंदर वस्त्रच आहे. ही दृढ म्हणजे भरीव अर्थात् सदैव जलयुक्त म्हणजे कधीही न सुकणारी आहे. ही श्रीतुंगभद्रानदी पृथ्वीची वेणी असून त्या वेणीवर लावलेल्या अगणित अशा अमूल्य रत्नसमूहाची ती प्रभाच आहे. हिचे वर्णन करताना पंडितांची वाणी किंचित् कंपित होते. हिचा प्रवाहप्रदेश चांगला धान्योत्पादक आहे. ॥ २ ॥

ही श्रीतुंगभद्रानदी कल्याणाला पारखे झालेल्या, कामक्रोधादि षड्रिपूंच्या व नानाविध वासनांच्या साखळदंडाने मजबूत बांधून भवसागरामध्ये फेकून दिलेल्या, भ्रान्तचित असलेल्या, नाना

प्रकारच्या दुःखाने त्रासलेल्या व कंटाळलेल्या आणि मनुष्यदेहरूपी चांगली नौका मिळूनही बुडण्याच्या मार्गात किंवा बेतात असलेल्या अशा सर्व मानवांना पाहून परमकृपेने त्यांच्या अशुभांचा नाश करणारी अशी श्रीगंगानदी होऊन सर्वांना तारणारी नौकाच झाली आहे. याचा अर्थच असा आहे की, श्रीगंगानदी व श्रीतुंगाभद्रानदी या दोघी समानशक्तीच्या आहेत. ।। ३ ।।

ही श्रीतुंगभद्रानदी पापनाशिनी असून तिच्या सारखीच सर्व पापांचा नाश करणारी श्रीवरदा नदी तिला (हावनूर जवळ गळगनाथ येथे) येऊन मिळाली आहे. त्याचप्रमाणे (जिच्यामध्ये पांढरी कमळे उत्पन्न होतात) अशी पश्चिमेकडून येणारी श्रीकुमुद्वती व दुसरी श्रीभद्रा नावाची नदी, अशा दोन नद्या येथेच येऊन श्रीतुंगभद्रेला मिळतात. या सर्व नद्यांच्या मध्यदेशातून वाहणारी सर्वतापपापनाशिनी श्रीतुंगभद्रानदी आम्ही पाहिली. ।। ४ ।।

जी श्रीतुंगभद्रानदी कल्याणकारिणी अशा श्रीभद्रानदीसह मांगल्याने शोभून दिसते, ती आम्हाला श्रीदत्तप्रभूंचे सान्निध्य लवकर प्राप्त करून देवो. ।। ५ ।।

श्रीदत्तप्रभू नित्य श्रीगंगानदीचे स्नान करतात, श्रीतुंगानदीचे जल प्राशन करतात व श्रीभीमानदीच्या तीरावर ध्यानयोग करतात. कोल्हापूर म्हणजे श्रीक्षेत्र करवीर हे श्रीदत्तात्रेयांचे भिक्षा घेण्याचे स्थान असून तेथे ते भिक्षा करतात. श्रीकृष्णातीर हे श्रीदत्तप्रभूंचे अनुष्ठानस्थान असून तेथेच ते आपली उपासना करतात. ("भक्तांचे अखंड कल्याण-मंगल कसे होईल," याचा सतत विचार करणे हीच श्रीदत्तप्रभूंची उपासना व अनुष्ठान होय. याशिवाय वेगळ्या अनुष्ठानाची त्यांना जरूरच काय आहे ?) श्रीदत्तप्रभू सह्याद्रीपर्वतावर रात्री विश्रांती घेतात. सद्‌भक्ताला अक्षय्य म्हणजे कधीही क्षय न

पावणारे ज्ञान-मोक्षाचे दान देणे हेच त्यांचे दातृत्व होय. अत्यंत भक्तिप्रेमाने त्या महात्म्या श्रीदत्तप्रभूंचे ध्यान करणे हीच त्यांची खरी सेवा होय. अशा श्रीदत्तप्रभूंची ध्यानसेवा आमच्याकडून सदैव होवो. ॥ ६ ॥

या श्रीतुंगभद्रानदीच्या लाटा मोठमोठ्या असून ती सर्व पाप अर्थात् दुःखदैन्यादि अशुभ नष्ट करणारी आहे. ही स्वतः क्रोध, आसक्ती व मत्सरादिकांच्या पलीकडे गेलेली असून प्राणिमात्रांचे ताप दूर करणारी आहे व ही मोठी श्रीगंगाच अर्थात् श्रीगंगेसमान आहे. ती श्रीतुंगभद्रानदी ( आम्हा सर्वांचे ) रक्षण करो. ॥ ७ ॥

हे वेगवती श्रीतुंगे अर्थात् श्रीतुंगभद्रे ! आमच्या उन्मत्तपणारूपी व्याधींना दूर कर. हे निर्मले ! दुष्टशक्तिनाशिके ! माझे पाप दूर कर. हे सर्वसारस्वरूपे ! तू सर्व मनोमल अर्थात् मनोदोष दूर करतेस. तू सर्वमान्य आहेस. तू माझ्यावर अपार कृपा कर. ॥ ८ ॥

ही वेगाने वाहणारी श्रीतुंगा माझे पाप अर्थात् दैन्य-दुःख दूर करो. हिचा वेग रथासारखा आहे. देवांना व नारदादि देवर्षींना ही श्रीतुंगभद्रानदी वंदनीय आहे. या नदीचे जल नेहमी पिण्याला योग्य, हलके व कल्याणकारक आहे. श्रीदत्तात्रेयप्रभू हिचे पाणी मोठ्या आवडीने व आदराने प्राशन करतात. अतिरमणीय, कमलपत्रा-प्रमाणे नेत्र असणाऱ्या, आपल्या सेवकांना तारणाऱ्या व कृतकृत्य अशा श्रीतुंगभद्रानदीची मनःपूर्वक सेवा करा अर्थात् प्रेमाने तिची भक्ती करा. ॥ ९ ॥

हावनूर येथे ब्राह्मणांची बरीच वस्ती असल्यामुळे श्रीस्वामी-महाराजांना भिक्षेची अडचण वाटली नाही. गावातील ब्राह्मणांनी प्रथम श्रीस्वामीमहाराजांना ओळखले नाही. अधूनमधून गावात येणाऱ्या संन्याशांसारखेच हे ही एक सामान्य संन्यासी आहेत असेच

सर्वांना वाटले. सुरुवातीला गावातील काही अडाणी धनगरांनीसुद्धा श्रीस्वामीमहाराजांची थट्टा केली; पण त्यावेळी त्या अज्ञानी लोकांवर न रागवता श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "बाबांनो ! अशी लोकांची विनाकारण थट्टा करू नये."

श्रीस्वामीमहाराजांचे हावनूर येथील दैनंदिन कार्यक्रम कोणाच्याही नजरेमध्ये न भरता पार पडत होते. या चातुर्मासाच्या काळातच श्रीगांडामहाराज गायत्री जप करण्यासाठी भडोचला गेल्यामुळे व श्रीसीतारामहाराज राजूर येथे मोठा मठ बांधून तेथेच राहिल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ कोणीही शिष्य मंडळी नव्हती. याशिवाय इतर मंडळींनाही श्रीस्वामीमहाराजांविषयी काहीच माहिती नसल्यामुळे लोकांची गर्दीही नव्हती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना पुष्कळ दिवसांनन्तर अत्यंत आवश्यक असलेली विश्रांती येथे मिळू लागली; पण हे समाधान त्यांना अगदी थोडेच दिवस लाभले.

श्रीगुरुपौर्णिमेचा दिवस उजाडला. त्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी यथाशास्त्र व्यासपूजा केली. त्यांनी केलेली ती शास्त्रोक्त व्यासपूजा पाहून हावनूर येथील सर्व ब्राह्मणवर्ग चकित झाला. श्रीस्वामीमहाराजांचे शास्त्रज्ञान पाहून तेथील सर्व लोकांच्या मनात त्यांच्याबद्दल अत्यंत आदर निर्माण झाला. हळूहळू दररोज श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी लोक येऊ लागले. ते तेथे बसून प्रश्नोत्तरे करू लागले. या सर्व गोष्टींमुळे लोकांना श्रीस्वामीमहाराजांच्या अपार विद्वत्तेची थोडीशी कल्पना आली. त्यामुळे त्यांच्याबद्दलचा आदर अधिकच वाढला. हे सर्व घडल्यामुळे दररोजच पाच-दहा माणसे श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात येऊन श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर बसू लागली आणि काही दिवसातच श्रीस्वामीमहाराजांची

शुचिता, शास्त्रपूत वर्तणूक, विद्वत्ता, धर्मनिष्ठा आणि तीव्र वैराग्य या गुणांनी नुसती दिपूनच गेली नाहीत; तर त्यांच्यात स्वत:ला हरवून बसली. त्यामुळे जो तो त्यांना आपापल्या घरी भिक्षेला बोलावू लागला. असे असले; तरी वैष्णवांच्या घरी मात्र श्रीस्वामी-महाराज भिक्षेला जात नसत.

श्रीस्वामीमहाराजांचा हावनूर येथे चातुर्मास सुरू झाल्यावर १०–१२ दिवसांनी म्हणजे आषाढ वद्य १३, शके १८३२ इ. स. १९१० मध्ये माझे परमाराध्य सद्गुरुनाथ श्रीवामनरावजी गुळवणी-महाराज हे श्रीक्षेत्र गाणगापूरहून निघून श्रीस्वामीमहाराजांचा शोध करीत करीत तेथे आले व ८–१० दिवस त्यांच्या दिव्य संगतीत राहून धन्य व कृतार्थ झाले. पवनीचा चातुर्मास संपल्यावर माझ्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांना श्रीस्वामीमहाराजांच्या भेटीची जी तीव्र तळमळ लागली होती, ती कशी पूर्ण झाली व प्रत्यक्ष भेटीत काय घडले याची सर्व हकीकत मोठी भावपूर्ण आहे. या सर्व हकीकतीची प्रचीती, मी ( केशव रामचंद्र जोशी ) दि. २२–१२–१९७२ ला श्रीसद्गुरुनाथचरणांबरोबर हावनूरला गेलो असताना श्रीत्रिपुरान्त-केश्वराच्या मंदिरात ज्या भावपूर्ण समाधी अवस्थेत ते दोन तास स्तब्ध बसून राहिले होते, त्यावेळी मौनाने व नंतर प्रत्यक्ष शब्दां-नीच त्यांनी मला आणून दिली. ही सर्वच हकीकत मोठी मननीय आहे.

पवनी येथील चातुर्मासात श्रीसद्गुरुनाथमहाराजांना मंत्रदीक्षा झाल्यावर त्यांनी मुंबईस जाऊन नोकरीचा प्रयत्न केला; परंतु त्यांना कोठेही नोकरी मिळाली नाही. त्यामुळे श्रीक्षेत्र गाणगापूरला जाऊन श्रीगुरुचरित्राची पारायणे करावीत असा त्यांनी विचार केला. एके दिवशी त्यांनी आपले स्नेही श्री. रहाळकर यांच्याकडे सर्व सामान ठेवून देऊन बरोबर फक्त दोनतीन वस्त्रे, छत्री, घोंगडी व एक

लोटी एवढेच सामान घेऊन मुंबई सोडली. वाटेत स्नान-संध्येसाठी ते दौंड स्टेशनवर उतरले. त्या दिवशी चैत्र शुद्ध एकादशी होती. अत्यंत कडक उन्हाळा असल्यामुळे त्यांना दौंडला नदीवर स्नानाला जाणे शक्य झाले नाही. त्यामुळे त्यांनी स्टेशनवरील नळाला असलेल्या गरम पाण्यानेच स्नान उरकले. त्या दिवशी त्यांना कडक उपवासही घडला. त्या दिवसापासून श्रीसद्गुरुनाथमहाराजांचे "एकादशी व्रत" सुरू झाले. पुढे गाडी वदलून ते गाणगापूर रोड स्टेशनवर आले. तेथे क्वारंटाईन म्हणजे साथीचे रोग पसरू नयेत म्हणून दूषित जंतू निर्मूलन करणारी छावणी होती; परंतु श्रीगुरुकृपेने त्यांना तेथे राहावे न लागता त्यातून त्यांची सुटका झाली. त्यानंतर त्यांनी तेथील श्रीचैतन्यदेवांच्या धर्मशाळेत वास्तव्य केले. तेथे कण्या व ताक मिळाले. ते खाऊन त्यांनी तो दिवस काढला. दोन दिवस कडक उन्हात प्रवास झाल्यामुळे त्यांना उन्हाळी लागली. त्यामुळे लघवीला त्रास होऊ लागला. तो दूर व्हावा म्हणून त्यांनी लंगोटी भिजवून ओली करून घातली तेव्हा त्यांना बरे वाटले. हे सर्व पाहिले म्हणजे पुढे हावनूर येथे श्रीस्वामीमहाराजांची व श्रीसद्गुरुनाथमहाराजांची भेट होऊन जो महामिलनाचा दिव्य सोहळा घडला तो "चणे खावे लोखंडाचे। तुका ब्रह्मपदीं नाचे" या अनुभूतीने संपन्न झालेला होता यात काहीच शंका नाही.

श्रीसद्गुरुनाथमहाराज हे दुसऱ्या दिवशी बैलगाडीने श्रीक्षेत्र गाणगापूर येथे गेले. तेथे ते मंदिराच्या कट्ट्यावरच राहिले व तेथेच झोपू लागले. दुसऱ्या दिवसापासून त्यांनी पूर्व संकल्पानुसार श्रीगुरुचरित्राचे सप्ताह सुरू केले. तेथे दुपारी माधुकरी आणून ते जेवण करीत असत. माधुकरीत सात-आठ घासच अन्न मिळत असल्यामुळे रोज पोटभर जेवण होत नसे. मात्र पाच-सात दिवसांनी कोणीतरी

भक्त येऊन तो सर्व सेवेकऱ्यांना पुरणपोळीचे जेवण घालीत असे. त्यावेळी श्रीसद्गुरुनाथमहाराज २–३ पुरणपोळ्या खाऊन आठवड्याची बेगमी करून ठेवीत असत. अशा रीतीने ४२ दिवसात सहा सप्ताह पूर्ण झाले. ज्या दिवशी सहावा सप्ताह पूर्ण झाला त्याच दिवशी त्यांची तेथे आलेल्या एका रमल ज्योतिषाशी गाठ पडली. त्यावेळी श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी त्या रमल ज्योतिषाला असे विचारले की, "माझे सद्गुरू श्रीवासुदेवानंदसरस्वतीटेंबेस्वामीमहाराज यांची व माझी भेट केव्हा होईल?" हा प्रश्न ऐकताच त्या ज्योतिषाने फासे टाकून त्यावर असे उत्तर दिले की, "आपल्या सद्गुरूंची व आपली भेट या सहा महिन्यात झाली तरच होईल. नाही तर पुन्हा भेट होणार नाही." हे उत्तर ऐकताच श्रीसद्गुरुनाथमहाराज एकदम दिङ्मूढ झाले. ज्योतिषाच्या उत्तराच्या अनुरोधाने मनाशी निश्चय करून त्यांनी शेवटचा सातवा सप्ताह एका दिवसात संपविला व सात सप्ताहांची सांगता केली. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गाणगापूरहून निघताना श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या जवळ एकही पैसा नसल्यामुळे ते तेथील पुजारी श्री. लक्ष्मणभट यांना असे म्हणाले की, "मला पुढील प्रवासासाठी जावयाचे आहे; तरी आपण माझ्या जवळील ही छत्री व घोंगडी घेऊन काही पैसे द्यावेत." श्रीसद्गुरुनाथमहाराजांचे हे म्हणणे मान्य करून श्री. लक्ष्मणभटजींनी त्यांना तीन रुपये दिले. ते घेऊन श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीसद्गुरुशोधार्थ निघाले.

श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास दक्षिणेकडे कोठेतरी होईल असे समजल्यामुळे श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीक्षेत्र गाणगापूरहून पायीच निघाले. त्यांच्या जवळ त्यावेळी पैसे नसल्यामुळे पायी प्रवास करण्याशिवाय दुसरे गत्यंतरच नव्हते. त्यांचा ६ जून १९१० ते ३

ऑगस्ट १९१० पर्यंत झालेला हा दीड-दोन महिन्यांचा प्रवास फारच कष्टमय व खडतर असा झाला.

श्रीक्षेत्र गाणगापुराहून निघून श्रीसद्‌गुरुनाथमहाराज हेटगीमार्गे आहेरवाडीस एका बैराग्याकडे भोजन करून विजापूरहून सीतीमनीस आले. सीतीमनीच्या स्टेशनमास्तरांशी ओळख होऊन ते त्यांच्याकडे जेवावयास गेले. या स्टेशनमास्तरांकडे लग्न असल्यामुळे बरीच मंडळी तेथे आली होती. त्यांच्याशी बोलता बोलता श्रीसद्‌गुरुनाथ-महाराजांना असे कळले की, धारवाडच्या मदिहाळ येथील श्रीदत्त-मंदिरात गुर्लहोसूरचे श्रीकैवल्याश्रम उर्फ श्रीबोठेस्वामी हे त्यांचे शिष्य श्री. बाजेंद्रप्पा मास्तर यांच्याकडे श्रीस्वामीमहाराजांसह राहिले आहेत. ही माहिती मिळताच श्रीसद्‌गुरुनाथमहाराज सीती-मनीहून गदगला आले. तेथे आपल्या जवळील एक घोंगडी दोन रुपयांना विकून तिकीट काढून ते धारवाडला गेले व तेथे श्रीदत्त-मंदिरात जाऊन त्यांनी श्री. वाजेंद्राप्पांची भेट घेतली. परंतु तेथे त्यांना ऐवढेच समजले की, श्रीस्वामीमहाराज येथे तीन दिवस राहून नंतर पुढे निघून गेले.

श्रीस्वामीमहाराजांची धारवाड येथील मदिहाळच्या श्रीदत्त-मंदिरात भेट न झाल्याने श्रीसद्‌गुरुनाथमहाराज पुन्हा गदगला आले. गदग येथे श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचे श्री. मुर्की भावीकर नावाचे एक पोलीस सबइन्स्पेक्टर स्नेही होते. त्यांच्याकडे ते गेले. त्यांनी मोठ्या प्रेमाने श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना दोन दिवस आपल्याकडे ठेवून घेतले. वास्तविक पाहता श्री. भावीकर हे त्यावेळी मोठ्या हुद्यावर होते; मात्र श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या अंगावर फक्त दोन वस्त्रेच होती. त्यांची दाढीही वाढलेली होती. सतत कष्टदायक पायी प्रवास सुरू असल्यामुळे व वेळेवर अन्नही मिळत नसल्यामुळे

त्यांची शरीरप्रकृती अगदी खंगून गेली होती. अशा विपन्नस्थितीत असूनही श्री. भावीकरांनी आपल्या मित्राला ओळख दिली व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना दोन दिवस आपल्याकडे ठेवून घेऊन जी आत्मीयता व्यक्त केली ती स्पृहणीय आहे यात काही शंकाच नाही. तेथून निघताना श्री. मुर्की भावीकर यांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची हरिहरच्या प्रवासाची गार्डला सांगून व्यवस्था केली व किरकोळ खर्चासाठी तीन रुपयेही दिले.

श्रीसद्‌गुरुनाथमहाराज श्रीक्षेत्र हरिहर येथे आल्यावर त्यांची व श्री. मुक्तिनाथ नावाच्या एका तेलंगी ब्राह्मण साधकांची भेट झाली. हे श्री. मुक्तिनाथही श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून श्रीस्वामीमहाराजांच्या शोधार्थ निघाले होते. पुढे श्री. मुक्तिनाथ रेल्वेने प्रवास करीत स्वतंत्रपणे निघाले व श्रीसद्‌गुरुनाथमहाराज पायी चालत निघाले. ते तेथून हुबळीला आले. तेथे त्यांना असे समजले की, गदगच्या पुढे सव्वीस मैलावर आब्बेगिरी नावाच्या गावी श्रीस्वामीमहाराज आहेत. तेथून श्रीसद्‌गुरुनाथमहाराज पुन्हा गदगला आले. तेथे स्टेशनवर चौकशी केली असता त्यांना असे कळले की, एक मैल अंतरावर एका ब्राह्मणाच्या मळ्यात एक स्वामी उतरले आहेत. श्रीसद्‌गुरुनाथमहाराज तेथे गेल्यावर ते श्री. गोविंदस्वामी नावाचे एक चिम्मड सांप्रदायी स्वामी असल्याचे समजले. त्यांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची मोठ्या आस्थेने चौकशी केली. त्याच वेळी हरिहरहून निघून गेलेले श्री. मुक्तिनाथही तेथे आले. त्या दोघांना श्री. गोविंदस्वामींनी १५ दिवस ठेवून घेतले. पुढे श्री. मुक्तिनाथ श्रीस्वामीमहाराजांच्या शोधासाठी रामेश्वरकडे निघून गेले.

श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचा त्या वर्षीचा श्रीगुरुपौर्णिमेचा उत्सव

गदगलाच झाला. त्यानंतर श्री. गोविंदस्वामींनी त्यांना एक घोंगडीची कफनी दिली व काही पैसे देऊन श्रीस्वामीमहाराजांच्या शोधासाठी उत्तरेकडे जाण्यास सांगितले. त्याप्रमाणे ते तेथून निघाले असताना रस्त्यातच त्यांना समोरून एक गृहस्थ एका पांढऱ्या शुभ्र बैलाला दोरी बांधून घेऊन येत असल्याचे दिसले. आता श्रीस्वामीमहाराजांचे लवकरच दर्शन होणार याचा द्योतक असा हा बद्धपशूचा शुभशकून श्रीसद्गुरुनाथमहाराजांना थोडा आशादायक व आनंददायक असा वाटला. गदगहून ते बागलकोटला आले. तेथे त्यांना श्रीस्वामीमहाराज हावनूरला असल्याचे समजले. त्यामुळे तेथून ते पायीच गलगलीला आले. तेथून हवेरी मार्गे ते पायीच हावनूरला जाण्यास निघाले.

"बहु एकांतावरी प्रीती। जया जनपदाची खंती। जाण मनुष्याकारें मूर्ती। ज्ञानाची तो।। १३. ६१४।।" असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत "अरतिर्जनसंसदि।। १३.१०।।" या श्रीमद्भवद्गीतेतील श्लोकार्धाचा भावार्थ प्रकट करताना म्हटले आहे, त्या न्यायानेच साक्षात् ज्ञानमूर्तीच असलेले श्रीस्वामीमहाराज एकांतासाठी व जनसंपर्कापासून काही काळ दूर राहून विश्रांती घ्यावी म्हणून हावनूरला आले होते. श्रीस्वामीमहाराजांच्या एकान्तात आपल्या एकाचाही अन्त करण्यासाठी श्रीसद्गुरुनाथमहाराज निघाले होते. हावनूरला आल्यावर श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात जाऊन श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला व ते हात जोडून त्यांच्यापुढे उभे राहिले. त्यावेळी आपल्या हृदयसिंहासनाधिष्ठित परमप्रेममय अशा श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य दर्शनाने श्रीसद्गुरुनाथमहाराजांचा दीड-दोन महिन्यांच्या खडतर प्रवासाचा शीण एका क्षणात नाहीसा होऊन त्यांच्या

ठिकाणी "ते स्तंभस्वेदरोमांचाः स्वरभेदोऽथ वेपथुः। वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ॥ १० ॥" या श्रीरूपगोस्वामींनी "भक्तिरसामृतसिंधूमध्ये" वर्णन केलेल्या भक्तिरसाने परिप्लुत अशा अष्टसात्त्विक भावांचा उद्रेक होऊन एक दिव्य आनंद प्राप्त झाला. त्या स्थितीत स्तंभ म्हणजे खांबाप्रमाणे देहाची जडवत् स्थिती होणे, घाम, रोमांच, स्वरभेद म्हणजे कंठातून नाना प्रकारचे उच्चार विकृतरीतीने प्रकट होणे, कंप, वैवर्ण्य म्हणजे शरीराचा रंग पालटणे, अश्रू व निद्रा हे सर्वच भाव श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या ठिकाणी अंतरातून उसळून आले.

अशा स्थितीत काही काळ गेल्यानंतर जेव्हा श्रीसद्‌गुरुनाथमहाराज भानावर आले त्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना सर्व हकीकत सांगितली. ती ऐकल्यावर त्यांनी त्यांना असे विचारले की, "इकडे येणार म्हणून घरी कळविले होते का ?" श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी या प्रश्नाला "नाही," असे उत्तर देताच श्रीस्वामीमहाराज त्यांना पुन्हा असे म्हणाले की, "तावडतोब आजच्या आज घरी पत्र टाकून येथे आल्याचे कळव." श्रीस्वामीमहाराजांच्या या आज्ञेप्रमाणे श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी लगेच घरी पत्र टाकून इकडे आल्यासंबंधी कळविले.

पहिल्या दिवशी दुपारी जेव्हा श्रीस्वामीमहाराज भिक्षेस निघाले त्यावेळी त्यांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना असे विचारले की, "तू पूर्वी कधी माधुकरी मागितली आहेस का ? येथे काही वाडीसारखे लोक खाण्याचे पदार्थ पुढे आणून ठेवीत नाहीत. तेथे पदार्थांचे ढीग पडत असत. येथे माधुकरीशिवाय पर्यायच नाही." हे ऐकताच श्रीसद्‌गुरुनाथमहाराज श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "मी गाणगापूरला असताना माधुकरी मागितली आहे. त्याची मला सवय

आहे व आपणाबरोबर माधुकरी मागूनच येथे राहीन." श्रीसद्गुरुनाथमहाराजांचे हे विचार ऐकून श्रीस्वामीमहाराजांना फार समाधान वाटले. त्या दिवशी माधुकरी मागून आणल्यावर ज्यावेळी उभयता गुरु–शिष्य श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या देवालयाबाहेरील सभामंडपवजा कट्ट्यावर भोजनास बसले त्यावेळी जो प्रसंग घडला तो श्रीसद्गुरुनाथमहाराजांबरोबर मी दि. २२–१२–१९७२ ला हावनूरला गेलो असताना त्यांनी तेथील कट्ट्यावर बसून जसा सांगितला तसाच पुढे देत आहे.

ते मला असे म्हणाले की, "पहिल्या दिवशी तीन घरी भिक्षा मागून आणल्यावर येथे आलो. महाराज भिक्षेला बसल्यावर मीही बसलो. त्यांनी आपल्यासाठी आठ घास होतील एवढेच अन्न ठेवून बाकीचे येथील एका दगडावर काढून ठेवले. महाराजांनी आपल्या झोळीतून बाजूला काढून ठेवलेले ते भिक्षान्न महाप्रसाद म्हणून घ्यावे अशी इच्छा झाली; परंतु ते मागून घेण्याचे काही धैर्य होईना. जरी त्यांचे प्रेम असले; तरी त्यांच्या झोळीतील त्यांच्या हातचा महाप्रसाद मिळण्याची हीच एकमेव संधी आहे व अशी संधी आयुष्यात पुन्हा मिळेल की नाही हा विचार तीव्र होऊन शेवटी धैर्य धरून मी त्यांना असे म्हणालो की, "महाराज ! आपण आपल्या झोळीतून काढून ठेवलेले अन्न मी प्रसाद म्हणून घेऊ का ? " हा प्रश्न ऐकताच त्यांनी मान वर करून माझ्याकडे अशा काही विलक्षण दृष्टीने पाहिले की, माझ्या अंतःकरणाचे पाणी पाणी झाले. आपण अशा प्रकारे त्यांच्या झोळीतील प्रसाद मागण्यात काही चूक तर केली नाही ना ? असा प्रश्न माझ्या मनाला चाटून जातो न जातो तोच ते सुहास्य मुद्रेने "हो घे ना ! " असे म्हणाल्यामुळे मनाला फारच समाधान वाटले. पुढे जोपर्यंत मी हावनूरला महाराजांच्या

जवळ होतो, तोपर्यंत रोजच त्यांच्या झोळीतील महाप्रसाद मला मिळाला. रोज तीन घरची माधुकरी मागून आणली की, ती भरपूर होई. मुंबईला राहात असताना एकभुक्त राहण्याची सवय झालीच होती. त्यामुळे येथे कसलीच अडचण आली नाही. महाराजांची भिक्षा झाल्यावर त्यांच्या हातावर पाणी घालण्याची व त्यांचे उष्टे काढण्याची सेवाही येथे घडली. त्यावेळी येथे दुसरे कोणीही नसल्यामुळे शांतचित्ताने मनाप्रमाणे सेवा करता आली."

इतके सर्व सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांच्या स्वभावावर व व्यवहारावर प्रकाश टाकणारी हकीकत सांगताना ते असे म्हणाले की, "ज्यावेळी इतर लोक महाराजांच्या बरोबर किंवा सभोवती असत तेव्हा आपल्या ओळखीच्या सेवक लोकांनी दूर राहिले पाहिजे व जणूकाही आपली व यांची काही ओळखच नाही असे वागले पाहिजे अशी त्यांची अपेक्षा असे. त्यावेळी इतरांच्या देखत काही विचारलेले किंवा ओळख दाखविलेले त्यांना आवडत नसे. एकांतात असताना मात्र ते घरातील वडिलधाऱ्या माणसासारखे प्रेमाने बोलत व घरातील सर्वांची विचारपूस करीत असत. त्यांची स्मरणशक्ती अत्यंत तीव्र असल्याने घरातील प्रत्येकाचे नाव घेऊन त्या त्या व्यक्तीची ते चौकशी करीत असत. शिवाय व्यवहारासंबंधी ते नेहमी असे म्हणत असत की, "व्यवहार तर सांभालाच पाहिजे व तो सांभाळूनच सर्व काही परमार्थ केला पाहिजे. हा सर्व व्यवहार आमच्या गुरुमहाराजांनी आम्हाला शिकविला व त्याचा अभ्यास त्यांनी आमच्याकडून वर्षभर तरी करवून घेतला असेल. "आधी प्रपंच करावा नेटका। मग परमार्थ साधावा झटका॥" हे लक्षात घेऊन व्यवहार न टाकता दिवसा पोटासाठी हवा तो धंदा करून रात्रीच्या नियमित वेळी आपली आराधना, उपासना इत्यादि जी

काही असेल ती नियमित वेळी करावी. आपण एकदा नियम धरला की, तो निमित्तावाचून कधीही सोडता कामा नये. आणखी व्यवहारातील एक मुख्य लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे की, उभयतातील व्यवहाराची कधीही बाहेर परिस्फुटता न करिता त्याचा उलगडा परस्परांनी एकांतातच करीत असावा. असे केले तरच तो व्यवहारज्ञ व तो व्यवहार केल्याचे सार्थक."

हे सर्व सांगून झाल्यावर हावनूर येथील मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासातील सर्व हकीकत सांगताना श्रीसद्‌गुरुनाथमहाराज असे म्हणाले की, "येथे चातुर्मास चालू आहे असे कोणालाही पत्र लिहू नको. लोकांना एकदा कळले म्हणजे सर्वांचीच येथे फार गर्दी होईल." अशी सूचना श्रीस्वामीमहाराजांनी मला सुरुवातीलाच दिली होती. त्यावेळी हावनूरला तुंगभद्रेला भरपूर पाणी असल्यामुळे पाण्याचे फार सुख होते. महाराज सकाळी स्नानाला गेले की, ते जेथे स्नान करीत असत तेथून प्रवाहाच्या खालच्या बाजूला उभे राहून मी स्नान करीत असे. त्यामुळे त्यांच्या अंगावरून प्रवाहित झालेल्या पवित्र पाण्याने स्नान होत असे. महाराज रोजच स्वहस्ते माझ्या अंगावर पाणी शिंपडीत असत. स्नान झाल्यावर रोज महाराजांची छाटी व लंगोटी धुऊन आणीत असे. एक दिवस छाटी आपटून धूत असताना झालेला आवाज महाराजांच्या कानावर गेला. तेव्हा ते असे म्हणाले की, "संन्याशाची वस्त्रे आपटून धुऊ नयेत असे शास्त्र आहे." त्याप्रमाणे पुढे महाराजांची वस्त्रे न आपटता धूत असे व फार न पिळताच वाळत टाकीत असे."

ही सर्व माहिती सांगता सांगता श्रीसद्‌गुरुनाथमहाराज अकस्मात भावसमाधीत गेल्यामुळे एकदम मौन झाले. त्यामुळे त्यांच्या कथनाचा ओघ तुटला हे खरे असले; तरी ज्यावेळी मी त्यांच्या मुखमंडलाकडे

पाहिले तेव्हा एका अपूर्व तेजाने त्यांचा चेहरा झळकत होता. त्यावेळी असे वाटत होते की, ६२ वर्षांपूर्वी श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य सत्संगतीत जे जे काही घडले, अनुभवले, ऐकले व पाहिले त्यामध्ये ते पूर्णपणे समरस झाले आहेत. त्यावेळी जणूकाही तेथे ६२ वर्षांपूर्वी-प्रमाणेच श्रीस्वामीमहाराज व तेच फक्त आहेत, तोच एकान्त आहे, असे भासत होते. श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या त्या दिव्य अनुभूतीत मीही सामील झालो. एक क्षणभर तरी त्या अलौकिकत्वाची अनुभूती "गुरोस्तु मौनं व्याख्यानं" या न्यायाने त्यांनी मला दिली. ही त्यांच्या प्रेमाची व कृपेची खूण माझ्या हृदयसिंहासनावर त्यांची जी मूर्ती अखंडपणे विराजमान झाली आहे त्या रूपाने अविरतपणे जागृत असते.

श्रीसद्गुरुनाथमहाराज भानावर आल्यावर पूर्वकथनाचे सूत्र पकडून त्यावेळची हकीकत सांगताना मला असे म्हणाले की, "या मुक्कामात आणखी एका मंत्राची दीक्षा झाली. ( श्रीदत्तयंत्रात गुंफलेल्या सर्व मंत्रांच्या दीक्षा श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्गुरुनाथ-महाराजांना वेळोवेळी दिल्या होत्या.) या ठिकाणी मी रोज स्नान करून आल्यावर जपास बसत असे. (असे म्हणून त्यांनी श्रीत्रिपुरा-न्तकेश्वराच्या मंदिरातील डाव्या हाताची ती जागा दाखविली. ) येथेच त्यांनी मला संपूर्ण गीतेची व श्रीविष्णुसहस्रनामाची संथा स्वतः दिली. त्याच वेळी संप्रदायानुसार नित्योपासनेत काय काय असावे हे सांगताना महाराज असे म्हणाले की, "स्वशाखोपनिषत् गीता विष्णुनामसहस्रकम् । श्रीरुद्रं पौरुषं सौरं जपेन्मुच्येत् बन्धनात् ॥" असा आपल्या संप्रदायाचा उपासनाक्रम आहे. या दृष्टीनें ऐतरेय उपनिषद, गीता, विष्णुसहस्रनाम, रुद्र, पुरुषसूक्त व सौरसूक्त यांची नित्य उपासना करीत असावे. त्यामुळे मनुष्य बंधनमुक्त होतो."

येथेच महाराज दुपारी सदाशिव ब्रह्मेंद्रांची "ब्रह्मसूत्रवृत्ती" लिहून घेत असत. लांबट आकाराच्या कागदावर स्वहस्ते लिहिलेली या वृत्तीची पोथी पुढे प्रवासाला जाताना महाराज आपल्या कमरेला बांधून घेत असत. त्यांना ही वृत्ती फार आवडत असे. वृत्ती लिहिण्याचे काम संपले की, तिसऱ्या प्रहरी हावनूरचे श्री. व्यंकण्णभट्ट गोपाळी यांना महाराज गीतेवरील श्रीधरी टीका सांगत असत. त्यावेळी श्री. व्यंकण्णभट्ट गोपाळी यांनी एक लहानशी गीता मला दिली होती. ज्यावेळी मी येथून परत जाण्यास निघालो त्यावेळी त्यांनी मला असे विचारले की, "व्यंकण्णभट्टांनी दिलेली गीता परत केलीस का?" त्यावेळी मी महाराजांना असे म्हणालो की, "व्यंकण्णभट्टांनी मला ती गीता भेट दिल्यामुळे परत केली नाही." हे ऐकताच महाराज काही बोलले नाहीत; परंतु दुसऱ्याची वस्तू परत करण्या-संबंधीची त्यांची व्यवहारदक्षता लक्षात येऊन फार आश्चर्य वाटले"

"महाराज व्यंकण्णभटांना तिसऱ्या प्रहरी गीतेवरील टीका सांगत असताना एक विद्वान् वैष्णव ब्राह्मण महाराजांचे ते प्रवचन ऐकण्यास दररोज येत असत. मात्र ते कट्टर वैष्णव असल्यामुळे त्या शंकराच्या मंदिरात न येता बाहेरच बसून प्रवचन ऐकत असत. मधून मधून ते वैष्णव ब्राह्मण महाराजांना काही शंकाही विचारीत असत; परंतु महाराज त्यांच्या बोलण्याकडे लक्ष देत नसत व त्यांनी विचारलेल्या एकाही प्रश्नाला उत्तर देत नसत. एके दिवशी न राहवून मी महाराजांना असे विचारले की, "महाराज! बाहेर बसून ऐकणारे ते ब्राह्मण गृहस्थ आपणास रोज काही ना काही तरी शंका विचारीत असतात; मग आपण त्यांना कधीच काही उत्तर देऊन त्यांच्या शंकांचे निराकरण का करीत नाही?" मी असे विचारल्या-वर महाराज असे म्हणाले की, "जो शंकराच्या देवळात येणे हे पाप

समजतो, त्याला काय उत्तर देणार व त्याच्या शंकांचे समाधान तरी कसे करणार ? अशा प्रकारे द्वैतभाव बाळगणाऱ्या लोकांचे काही म्हणणे ऐकण्याची गरजच काय आहे ? अशांची उपेक्षाच करणे बरे." हे ऐकताच महाराजांच्या भेदात्मक किंवा द्वैतात्मक दृष्टि-त्यागाची व समान किंवा अद्वैतात्मक दृष्टिस्वीकाराची कल्पना येऊन स्थूलात्मक दृष्ट्यासुद्धा कसे वागले पाहिजे हे लक्षात आले. त्या वैष्णव ब्राह्मणगृहस्थांच्या या भेददृष्टीमुळेच बहुधा महाराज कधीही त्यांच्या घरी भिक्षेसाठी जात नसत असे वाटते. या भागातील वैष्णव लोक फारच कट्टर असल्याचे दिसून आले; परंतु पिशाच्चाने पछाडलेल्या वैष्णव मंडळींना महाराज शंकराचीच उपासना सांगून त्यांची ती पीडा दूर करीत असत, असे एक–दोन प्रसंगावरून लक्षात आले. त्यामुळे वैष्णवांचा स्मार्त द्वेष पुढे बराच कमी झाला असे ऐकले."

"येथे एके दिवशी रात्री झोपण्याच्या वेळी महाराजांना उजेडाचा त्रास होऊ नये म्हणून देवापाशी लावलेला दिवा मी कमी करू लागलो. ते पाहताच महाराज असे म्हणाले की, "देवाचा दिवा कधीही कमी करू नये. रात्रीच्या वेळी महाराज एक डुलकी घेऊन नंतर उठून बसत असत. अशा प्रकारे ते पहाटेपर्यंत समाधी अवस्थेतील सामरस्यात्मक निजानंदात निमग्न असत. मला गाढ झोप लागत असल्यामुळे प्रथम ही गोष्ट माझ्या लक्षात आली नाही; परंतु येथेच जवळ असणाऱ्या एका तरुण विद्यार्थ्याने हे पाहिले होते. त्याने मला ज्या दिवशी हे सांगितले त्याच दिवशी रात्री झोप न घेता मी जागा राहून स्वस्थ पडून राहिलो. माझ्या बरोबर महाराजही झोपले; पण १–१॥ तासातच ते उठून बसले व लगेच समाधिमग्न झाले. त्यांच्या त्या

समाधिमग्नमूर्तीच्या दर्शनाने फारच समाधान व आनंद वाटत असे. ”

“ एके दिवशी महाराजांशी बोलता बोलता सहज ज्योतिषाचा विषय निघाला. त्यावेळी त्यांनी मला असे सांगितले की, “ पुढे सप्तग्रही येणार आहे; तरी या वैदिक मंत्राचा सप्तग्रहीच्या आधी सहा महिने व पुढे सहा महिने दररोज २८ वेळा जप करीत जा. ” इतके सांगून त्यांनी तो मंत्र स्वहस्ते लिहून दिला. त्याचवेळी महाराज मला असे म्हणाले की, “ अरे ! तुला तर सध्या अकरावा गुरू आहे; मग त्याचा तुला काय फायदा झाला ? ” हा प्रश्न ऐकताच मी तात्काळ महाराजांना असे म्हणालो की, “ महाराज ! यावेळी आपले दर्शन होऊन आपल्या सेवेचा लाभ मिळाला यापेक्षा आणखी दुसरा कोणता मोठा फायदा या जगात आहे ? ” माझे हे उत्तर ऐकून महाराजांना मोठा संतोष झाला व ते अगदी प्रसन्नपणे किंचित् हसले. ”

“ या काळातच एक दिवस मी महाराजांना असे म्हणालो की, “ मला आसने व प्राणायाम शिकावयाचा आहे. ” माझी ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी पश्चिमोत्तासन, शीर्षासन, हलासन, सर्वांगासन, वज्रासन, मयूरासन, मत्स्येंद्रासन, पद्मासन, सिद्धासन, स्वस्तिकासन, वीरासन, कूर्मासन, धनुरासन इत्यादि विविध आसने स्वतः करून दाखविली व माझ्याकडून करवूनही घेतली. त्रिबंधात्मक म्हणजे मूळ, उड्डियान व जालंधर या तीन बंधांनी युक्त असा प्राणायाम शिकविला. त्याचप्रमाणे सूर्यभेदन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्त्रिका, भ्रामरी, मूर्च्छा व प्लाविनी हे प्राणायामाचे आठही प्रकार समजावून सांगितले व ते करवूनही घेतले. हे करवून घेत असताना हे प्राणायाम म्हणजे काय ? ते कोठपर्यंत करावेत

व त्यांचे फल काय आहे हे सांगताना त्यांनी हठयोगप्रदीपिकेतील पुढील श्लोक म्हणून दाखवून त्याचा अर्थही समजावून सांगितला.

प्राणायाम स्त्रिधा प्रोक्तो रेचपूरककुंभकैः ।
सहितः केवलश्चेति कुंभको द्विविधो मतः ॥ २.७१ ॥
यावत्केवल सिद्धिः स्यात्सहितं तावदभ्यसेत् ।
रेचकं पूरकं मुक्त्वा सुखं यद्वायुधारणम् ॥ ७२ ॥
प्राणायामोऽयमित्युक्तः स वै केवलकुंभकः ।
कुंभके केवले सिद्धे रेचपूरकवर्जिते ॥ ७३ ॥
न तस्य दुर्लभं किंचित्त्रिषु लोकेषु विद्यते ।
शक्तः केवलकुंभेन यथेष्टं वायुधारणात् ॥ ७४ ॥
राजयोगपदं चापि लभते नात्र संशयः ।
कुंभकात्कुंडलीबोधः कुंडलिबोधतो भवेत् ॥ ७५ ॥
अनर्गला सुषुम्ना च हठसिद्धिश्च जायते ।
हठं विना राजयोगं राजयोगं विना हठः ।
न सिध्यति ततो युग्मसानिष्पत्तः समभ्यसेत् ॥ ७६ ॥
कुंभकप्राणरोधान्ते कुर्याच्चित्तं निराश्रयम् ।
एवमभ्यासयोगेन राजयोगपदं व्रजेत् ॥ ७७ ॥
वपुःकृशत्वं वदने प्रसन्नता नादस्फुटत्वं नयने सुनिर्मले ।
अरोगता बिन्दुजयोऽग्निदीपनं नाडीविशुद्धिर्हठयोगलक्षणम् ॥ ७८ ॥

" या श्लोकाचा अर्थ सांगताना श्रीगुरुमहाराज असे म्हणाले की, " रेचक, पूरक व कुंभक अशी प्राणायामाची तीन अंगे आहेत. सहित व केवल अशा दोन प्रकारचा कुंभक आहे. पूरकाने वायू आत खेचून घेऊन मध्ये कुंभक करून नंतर रेचकाने हळूहळू प्राणवायू बाहेर सोडून जो प्राणायाम केला जातो, त्याला सहित कुंभक असे म्हणतात. रेचक व पूरक न करता सुखपूर्वक वायुधारणा होऊन जो प्राणायाम

होतो त्याला केवलकुंभक असे म्हणतात. जोपर्यंन्त केवलकुंभकाची सिद्धी होत नाही तोपर्यंन्त सहितकुंभकाचा अभ्यास करीत राहिले पाहिजे.॥७१–७२॥ अशा प्रकारे प्राणायाम करीत राहिल्यावर जेव्हा केवलकुंभक सिद्ध होतो तेव्हा रेचक व पूरक सुटून जातात अर्थात् या दोहोंचा अभ्यास करण्याची गरज राहात नाही. यारीतीने रेचक–पूरकवर्जित केवल कुंभक सिद्ध झाल्यावर त्या योगीसाधकाला तिन्ही लोकातील कोणतीही वस्तू दुर्लभ राहात नाही. अर्थात् त्रैलोक्यातील सर्व वस्तू त्याला सुलभतेनें प्राप्त होतात. या केवलकुंभकामुळेच साधक आपल्या इच्छेनुसार प्राणवायूची धारणा करण्यास समर्थ होतो. ॥ ७३–७४ ॥ या केवलकुंभकाच्या योगानेच तो राजयोगपदाची प्राप्ती करू शकतो, यांत काहीच शंका नाही. या केवलकुंभकाच्या अभ्यासानेच कुण्डलिनीचे जागरण होते. या कुण्डलिनीशक्तीच्या जागरणामुळे सुषुम्नानाडी मलरहित होते अर्थात् ती कफ, वात व पित्तादि दोषांनी रहित होते आणि हठयोगात सिद्धी प्राप्त होते. हठयोगाशिवाय राजयोग व राजयोगाशिवाय हठयोग सिद्ध होत नाही. याकरिता दोन्हींची सिद्धी अर्थात् सामरस्यावस्था प्राप्त होईपर्यंन्त हठयोगाचा व राजयोगाचा अभ्यास केला पाहिजे. केवल कुंभकाच्या अभ्यासाने प्राणनिरोध करून, कुण्डलिनी शक्ती जागृत करून, तिचा सुषुम्णेत प्रवेश करून व शेवटी चित्ताला म्हणजे शक्तीला आश्रयरहित करून ब्रह्माकार परमवैराग्याच्या वृत्तीत विलीन केले पाहिजे. अशा रीतोने अभ्यास केला म्हणजें शरीर कृश होते, चेहऱ्यावर प्रसन्नता येते, अनाहतनाद प्रकट होतो, नेत्र निर्मल होतात, शरीर निरोगी होते, बिन्दू अर्थात् वीर्याचा जय होतो, जठराग्नी प्रदीप्त होतो आणि सर्व नाड्या मलरहित होऊन शुद्ध होतात. ॥ ७५–७८ ॥"

" महाराजांनी यावेळी षट्क्रिया, मुद्रा इत्यादि हठयोगप्रदीपिकेत आलेले योगाचे सर्वच विषय मला शिकविले. यावेळीच महाराजांनी अजपाजपाचा ( अर्थात् ' सोऽहं ' मंत्रजपाचा ) संकल्प लिहून दिला व हा जप शीतली प्राणायाम करून कसा करावयाचा तेही शिकविले. "

" मी येथे असतानाच महाराजांनी तुंगाष्टक, चिदंबर दीक्षितांच्या स्तुतीपर श्लोक व त्रिपुरान्तकेश्वरस्तोत्र रचले. त्रिपुरान्तकेश्वराचे स्तोत्र त्यांनी देवायलयाच्या चौकटीवर खडूने लिहून ठेवले होते. या स्तोत्राचे पालुपद " तारी मला तूं त्रिपुरांतकेश्वरा " असे होते. तुंगाष्टकात महाराजांनी तुंगभद्रानदीचा " हारबंधा "चा हारबद्धश्लोक रचला होता. त्यामुळे महाराजांनी एक दिवस गावातून काय लागेल ते सामान आणून तुंगभद्रेचे चित्र काढण्यास सांगितले. त्यांच्या इच्छेप्रमाणे गावातील मास्तरांकडून कागद, रंग इत्यादि साहित्य आणून त्यावर तुंगभद्रेचे एक चित्र काढून तिच्या गळ्यात तो हारबद्धश्लोक घालून ते महाराजांना दाखविले. ते चित्र पाहून त्यांना फार समाधान वाटले. त्यानंतर त्यांनी सांगितल्याप्रमाणें तुंगभद्रेचे ते चित्र त्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिराच्या दरवाजावर लावले. "

" हावनूरला आल्यावर पहिल्या एक दोन दिवसातच महाराजांनी घरची सर्व हकीकत विचारली. ती हकीकत सांगताना वडिलांचे वर्षश्राद्ध श्रावण शुद्ध १० असल्याचें मी त्यांना सांगितले. हे ऐकताच तें असे म्हणाले की, " वडिलांच्या वर्षश्राद्धास मुलाने घरी उपस्थित राहिलेच पाहिजे असे शास्त्र आहे; तरी तत्पूर्वीच घरी अवश्य जा. " त्यांनी अशी आज्ञा करताच त्यांचा सत्संग सोडून येथून लवकर जावें लागू नये म्हणून मी त्यांना असे म्हणालो की, " महाराज !

मुंबईहून निघून गाणगापूरला जातानाच माझे सामान व कपडे एका पेटीत भरून मी ती पेटी मित्राकडे ठेवून आलो आहे." हे सांगत असताना मला मनात असे वाटत होते की, कपडे, टोपी इत्यादि नसल्यामुळे महाराज असे म्हणतील की, "टोपी, कपडे नाहीत तर नको जाऊ;" परंतु महाराज लगेच मला असे म्हणाले की, "मुंबईला मित्राला पत्र लिहून कपड्यांची पेटी रेल्वे पार्सलने मागवून घे." त्यांच्या इच्छेप्रमाणे मी लगेच मुंबईला रहाळकरांना पत्र लिहून कपड्याची पेटी रेल्वे पार्सलने हावनूरला पाठवून देण्या-संबंधी लिहिले. त्या पत्राप्रमाणे पाच सहा दिवसांनंतर रोज टपा-लाची व पार्सलने येणाऱ्या पेटीची वाट पाहात होतो; परंतु सात आठ दिवस झाले तरी पेटी आली नाही. मात्र श्रावण शुद्ध सप्त-मीच्या दिवशी सकाळी उठल्याबरोबर महाराज मला असे म्हणाले की, "अरे! आज तुझी पेटी येईल बरे का?" त्यांनी सकाळी सांगितल्याप्रमाणे पोष्टाने पावती येऊन पेटी मिळाली. ती उघडून पाहिल्यावर मी महाराजांना असे म्हणालो की, "महाराज! या पेटीत सर्व कपडे आहेत; पण टोपी काही नाही. त्यामुळे आता आज काही येथून निघून जाता येईल असे वाटत नाही." असे सांगितल्यावर आता टोपी नसल्यामुळे तरी महाराज जाऊ नको असे म्हणतील व त्यांच्या सत्संगतीत राहता येईल असे वाटले होते; पण माझे म्हणणे ऐकताच ते मला असे म्हणाले की, "अरे! पेटी नीट पाहिली का? तळाला टोपी असेल." त्यावेळी मी त्यांना असे सांगितले की, "मी दोनदा सर्व कपडे काढून पेटी पाहिली; पण त्यात काही टोपी नाही." माझे हे म्हणणे ऐकताच ते मला असे म्हणाले की, "माझ्या देखत एकदा पेटी पाहा म्हणजे टोपी सापडेल." आता आपण दोनदा तळापासून शोध घेतलेल्या व सर्व

कपडे उलगडून झाडून पाहिलेल्या पेटीत टोपी कशी सापडेल ? असे वाटले; तरी महाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्यांच्या देखत जेव्हा पुन्हा सर्व पेटी तपासली तेव्हा पेटीच्या तळाशी टोपी असल्याचे लक्षात आले. दोन वेळा आपण सर्व पेटी पाहिली तेव्हा आपल्याला न दिसलेली टोपी आता महाराजांच्या देखत पेटी तपासल्यावर कोठून आली ? या विचाराने मी दिङ्मूढ झालो ! सापडलेली टोपी महाराजांना दाखविताच ते मला असे म्हणाले की, "बरे झाले. कपडे आले. टोपी सापडली. आता वडिलांच्या श्राद्धासाठी वेळच्या वेळी घरी जाता येईल." महाराजांनी असे सांगतच आता कोणत्याही परिस्थितीत आपणास येथून निघून घरी जावे लागणार या विचाराने फार वाईट वाटले; परंतु त्याला काही इलाजच नव्हता. वर्षश्राद्धाची गोष्ट त्यांच्या कानावर घातली नसती तर बरे झाले असते, असे एकदा मनात येऊन गेले; परंतु महाराजांपासून काहीही लपून राहणे अशक्य आहे याची खात्री असल्यामुळे व अशास्त्रीय वागणे त्यांना कधीही आवडणार नाही हे पक्के माहीत असल्यामुळे मी वर्षश्राद्धाची गोष्ट त्यांना सांगितली."

"श्रावण शुद्ध ८ ला ( दि. १३-८-१९१० ला ) हावनूरहून निघून वर्षश्राद्धाला घरी जा," असे महाराजांनी आधीच सांगितले होते. त्याप्रमाणे मला प्रथम हावनूरहून हावेरीला २०-२२ मैल पायी जावयाला लागणार होते. हे सर्व लक्षात घेऊन त्या दिवशी महाराजांनी आमचे दोघांचे नेहमीप्रमाणे स्नान झाल्यावर आन्हिक लवकर उरकले. रोजच्याप्रमाणे जरा मागून भोजनास न बसता त्या दिवशी त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या बरोबरच भोजन केले. भोजन झाल्यावर गावातील आत्मारामपंतांकडून महाराजांनी एक नारळ आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे मी नारळ घेऊन आलो. मी परत

येईपर्यन्त महाराजांनी अंगारा व कुंकू वगैरेंच्या प्रसादाच्या पुड्या बांधून ठेवल्या होत्या. "

" गावातून आणलेला नारळ मी महाराजांच्या पुढे ठेवला व अत्यंत व्याकूळ अंत:करणाने त्यांना नमस्कार घातला. त्यावेळी माझ्या डोक्याला स्पर्श करून त्यांनी कृपाशीर्वाद दिला. त्यांच्या त्या दिव्य हस्तस्पर्शाने माझ्या अंगावर रोमांच उभे राहून डोळ्यातून अश्रू पाझरू लागले. त्यानंतर त्यांनी मला नारळ-प्रसाद, अंगारा व कुंकू दिले. ते घेऊन पेटीत ठेवले व सर्व आवराआवर करून निघण्याची तयारी केली. "

" येथून निघताना पुन्हा एकदा महाराजांना साष्टांग नमस्कार घातला. त्यावेळी माझे अंत:करण अत्यंत जड झाले होते. पायातही कोणीतरी मणामणाच्या बेड्या घातल्या आहेत असे वाटत होते. पुन्हा महाराजांचे दर्शन व सत्संग केव्हा होईल या एकाच विचाराने अंत:करणात खळबळ माजली होती. त्यामुळे शेवटी निघताना मी त्यांना असे म्हणालो की, " महाराज ! आपले दर्शन पुन्हा कधी होईल ? " माझा हा प्रश्न ऐकताच महाराजांनी स्वत:कडे बोट दाखविले व एका क्षणात अत्यंत दिव्य अशा अवस्थेत जाऊन अनंतकोटी ब्रह्मांडनायकाचे अतर्क्य व अलौकिक असे आपले मूळ आत्मस्वरूप श्रीदत्तात्रेयांच्या रूपाने प्रकट करून ते मला असे म्हणाले की, " हे माझे स्वरूप जसे पाहात आहेस तसेच नेहमी लक्षात ठेव. हे रूप लक्षात ठेवले म्हणजे अखंड दर्शनाची तुझी इच्छा पूर्ण होईल. " महाराजांनी असे सांगून आपल्या मूळ आत्मस्वरूपरूपी श्रीदत्तात्रेयांचे साक्षात् दर्शन देऊन माझी इच्छा पूर्ण केल्याने अंत:करण एकदम शांत झाले. त्या शांतभावानेच मी पुन्हा त्यांना साष्टांग नमस्कार घातला. मी उठून उभे राहून पाहिले, तेव्हा

महाराज आपल्या नेहमीच्या रूपात सिद्धासनावर बसलेले दिसले. ( सिद्धासनातील जो श्रीदत्तात्रेयांचा फोटो या खंडात छापलेला आहे तो त्यावेळी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्तस्वरूप धारण करून दिलेल्या दर्शनाचाच आहे. )

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन श्रीसद्गुरुनाथ-महाराज हावेरी स्टेशनपर्यन्त २०–२२ मैल चालत गेले व पुढे रेल्वेने कोल्हापूर मार्गे आपल्या घरी कुडुत्रीला गेले. या दहा दिव-सात श्रीस्वामीमहाराजांकडून मिळालेला अमोल ठेवा त्यांना पुढे आयुष्यभर पुरला. श्रीस्वामीमहाराजांनी सुयोग्य भूमीत पेरलेल्या बीजाचे पुढे महान् वटवृक्षात रूपांतर होऊन त्या वृक्षाच्या सावलीचा अनेक साधकभक्तांनी आश्रय घेऊन आपले जीवन धन्य व कृतार्थ केल्याचे त्यांच्या पुढील जीवनचरित्रावरून दिसून येते.

श्रीसद्गुरुनाथमहाराजांसारख्या शिष्याला श्रीस्वामीमहाराजां-सारख्या सद्गुरूंचा सत्संग हावनूरला १० दिवस लाभला. त्याचे वर्णन हे शब्दातीत असल्याचा निर्वाळा "तेथें पुसतां वृत्तान्तु। खालती सांगतां नये मातु। जें जालें शब्दातीतू। गुह्य भाषा॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरुनिवृत्तिराजमहाराजांच्या कृपेचा महिमा कथन करताना दिला आहे. या दृष्टीने उपरोक्त प्रसंगाचे सार त्यांच्या पुढील दोन अभंगात साकल्याने आले आहे. ते असे म्हणतात की –

**मग निर्गुण निर्विकार। जगद्गुरु आदि अवतार।**
**कैसे धारणा बांधेल धार। रोमरंध्रीं॥ १॥**
**ऐसे पाहोनी योग आधी। वरी सद्गुरु सांगितली समाधीं।**
**येरीं पडलों असतों बंदीं। भवार्णवाच्या॥ २॥**

अहो जी भाग्य आमुचें केव्हढें। आम्ही मागें तूं धांव घेई पुढें।
उघडिलें जननीचें कवाडे। अनुभवें तुमच्या ॥ ३ ॥
जैसी गर्भां घाला भुली। मायें चालवी आपुल्या चाली।
पुढें अनेक भाषा आली। पांच पाटांगणें ॥ ४ ॥
हात लावुनिया दारवंटा। झडपा लोटली उन्मनी अवस्था।
कांहीं कान उचली माथा। ऐसें वाटे ॥ ५ ॥
ते निर्विकार घडे। तलाव दिसे ओंकार ब्रह्मांडें।
मी म्हणे ऐसे तोंडें। कैसे म्हणूं ॥ ६ ॥
तेथें पुसतां नये वृत्तांतु। खालती सांगता नये मातु।
जें जालें शब्दातीतू। गुह्य भाषा ॥ ७ ॥
निवृत्ति जीवन वळूनि आलें। ज्ञानेश्वरासि तैसेचि केलें।
चक्षु अनुभवें वाहिलीं फुलें। तया माथा ॥ ८ ॥

याचा अर्थ असा आहे की, "श्रीसद्‌गुरुनाथमहाराज हे निर्गुण निराकार असून आदि अवतार आहेत. ही धारणा माझ्या रोमरंध्रात कशी अवतरित होईल ? ॥ १ ॥ अशी जेव्हा माझ्याठिकाणी तळमळ उपस्थित झाली तेव्हा माझ्या श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी मला अत्यंत विचारपूर्वक आधी योगाची सर्व अंगे शिकवून व नन्तर समाधी कशी साधावी ते सांगितले. अशा रीतीने तर त्यांनी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा व ध्यान या सप्तांगांचा अभ्यास करवून घेऊन समाधी साधून दिली. त्यांनी जर असे साधन माझ्याकडून करवून घेतले नसते तर मी या संसार समुद्रात बुडून गेलो असतो. ॥ २ ॥ अहो ! आमचे भाग्य पाहा ना केवढे आहे ते ! हे सद्‌गुरुनाथमहाराज ! तुम्ही मला सहस्रारस्थ गंतव्यस्थानापर्यंत नेण्यासाठी सुषुम्णामार्गे ऊर्ध्वगतीने पुढे धावत आहात व त्यामुळे आपोआप उत्पन्न होणाऱ्या आकर्षणामुळे मी आपल्या मागोमाग

येत आहे. तुम्ही केलेल्या शक्तिपातामुळे अर्थात् बलवत्तर कृपेमुळे अनादि कालापासून बंदिस्त असलेल्या जगज्जननी कुंडलीनीशक्तीचे मूलाधारातील बंद असलेले दार उघडले जाऊन आपल्या मागे येण्याच्या प्रक्रियेची अपूर्व अनुभूती आली.।। ३ ।। जीवावर अनादि मायाशक्तीचे आवरण घालून ती जगज्जननी महासत्ता आपल्या चालीनेच त्याला संसारचक्रात भ्रमण करावयास लावते. पुढे या गोष्टीचा विस्तारच कुंडलिनी शक्तीपासून उत्पन्न झालेल्या सर्व भाषांतून झाला. ।। ४ ।। मी माझ्या हाताने सर्व इंद्रियांची द्वारे झडपा लावून बंद केली व अशा रीतीने आत जाऊन मी उन्मनी अवस्था प्राप्त केली. या अवस्थेत कानादि कोणतीच इंद्रिये आपला माथा उचलतील म्हणजेच बहिर्मुख होऊन कार्यरत होतील असे वाटत नाही. ।। ५ ।। श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या कृपेने हे सर्व निर्विकारतेने घडून येते. या उन्मनी अवस्थेत सर्व ब्रह्मांड ॐकारस्वरूपाचे आहे असे वाटते. कोणत्या मुखाने ही अवस्था वर्णन करावी हेच मला कळत नाही. ।। ६ ।। या दिव्य अवस्थेचा वृत्तान्त खरे म्हणजे शब्दाने सांगता येणेच शक्य नाही; कारण या अवस्थेची भाषा शब्दातीत व रहस्यमय अशी असते. ।। ७ ।। श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी ही दिव्य उन्मनी अवस्था प्राप्त करून दिल्यामुळे त्यांच्या कृपेचे रहस्य समजून आले. ते अखंडच या अवस्थेत असल्यामुळे त्यांनी आपल्याप्रमाणेच मला ज्ञानेश्वरालाही उन्मनी अवस्थारूप केले. श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी आपल्या कृपेने माझ्या दिव्य चक्षूंचे उन्मीलन करून जे अनुभव दिले त्या अनुभवांच्या द्वारा मी त्यांच्या मस्तकावर फुले वाहून त्यांची पूजा केली. ।। ८ ।।

त्याचप्रमाणे श्रीसद्गुरुनाथमहाराजांना हावनूरच्या मुक्कामात

श्रीस्वामीमहाराजांनी ज्या गुह्य गोष्टींचा उपदेश करून त्यांच्या ठिकाणी ज्ञानोदय घडवून आणला तसाच ज्ञानोदय श्रीनिवृत्तिनाथ-महाराजांनी गुह्यतत्त्वाचा उपदेश करून आपल्या ठिकाणी घडवून आणल्यामुळे आपली ( जीवाची ) काय स्थिती झाली ( होते ) याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

सूक्ष्म साध्य काज सांगितलें स्वामीं ।
धृति धारणा क्षमीं हरपल्या ।। १ ।।
सूक्ष्म सख्य नेलें विश्वरूप देहीं आलें ।
प्रपंचेसी मावळलें तिमिर रया ।। २ ।।
विशेषेंसी मिठी दिधली शरीरें ।
इंद्रियें बाहिरें नाईकती ।। ३ ।।
ऐसें हें साधन साधकां कळलें ।
चेतवितां बुझाविलें मन माझें ।। ४ ।।
उतावेळ पिंड ब्रह्मांडासहित ।
नेत्रीं विकासत ब्रह्मतेज ।। ५ ।।
ज्ञानदेव विनवी निवृत्तीस काज ।
हरपली लाज संदेहेंसी ।। ६ ।।

याचा अर्थ असा आहे की, " बुद्धीला कळण्यास अत्यंत कठीण असे सूक्ष्म परमात्मतत्त्व समजावून घेणे हेच मनुष्य जन्माचे मुख्य ध्येय असून तेच जिज्ञासू साधकाचे मुख्य काम आहे आणि ते समजावून देणे हे श्रीगुरूंचे कार्य आहे. त्याप्रमाणे स्वामीश्रीनिवृत्तीरायांनी मला ते परमतत्त्व अनुभूत करून दिले. त्यामुळे धैर्य, धारणा, क्षमा इत्यादि सर्व साधनात्मक वृत्ती मावळून गेल्या. ।। १ ।। त्या सूक्ष्म अध्यात्म तत्त्वाचा अंतःकरणात उदय झाल्याबरोबर अर्थात् आत्मशक्ती जागृत

झाल्यावर सर्व पिंडब्रह्माण्ड लयास गेले. (ते गेले कोठे ? तर देहात परमात्मज्ञानाचा उदय झाल्याबरोबर देहाचे आत परमात्मस्वरूपात ते लीन झाले.) आणि सर्व प्रपंचोदयाचे कारण जे आत्मस्वरूपाचे अज्ञान तेही नाहीसे झाले. ॥ २ ॥ त्यामुळे विशेष ज्ञानाच्या भावाला शरीराने मिठी दिली म्हणजे देहाच्या सर्व द्वारातून ज्ञानप्रकाश उत्पन्न झाल्यामुळे ते शरीर व इंद्रियेही परमात्मरूप झाली. त्यामुळे इंद्रियांची बहिर्मुख गती संपुष्टात आली व ती आपापले विषय घेईनाशी झाली. ॥ ३ ॥ असे हे श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी दिलेले साधन मला मिळाले असून त्यांनी माझी अनादिनिद्रिस्त आत्मशक्ती अर्थात् प्राणशक्ती कुंडलिनी जागृत करून तिची सुषुम्णेत गती केल्यामुळे माझे मन बुझून गेले अर्थात् नाहीसे झाले. ॥ ४ ॥ अशा प्रकारे ज्ञानशक्ती कुंडलिनीचा उदय झाल्यावर सर्व पिंडब्रह्मांड लीन होऊन नेत्रात केवळ ब्रह्मतेजच विकसित होऊन राहते. ॥ ५ ॥ श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, आत्मज्ञान प्राप्तीसाठी श्रीसद्‌गुरूंनी जर शक्तिजागृतीची याचना पूर्ण केली तर तुमचे सर्व संदेह निवृत्त होऊन तुम्ही सुखी व्हाल. ॥ ६ ॥

शके १८२४ अर्थात् इ. स. १९०२ मध्ये श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास ब्रह्मावर्त येथे झाला असताना त्यांच्याकडून अनुग्रह घेतलेले व त्यांच्याच कडून कीर्तनाचे धडे घेतलेले (खंड २ पृ. २७९) श्री. गोपाळबुवा राजाध्यक्ष श्रीस्वामीमहाराजांचा शोध करीत करीत श्रावण वद्य २ ला हावनूर येथे आले. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाल्यावर त्यांना साष्टांग नमस्कार करून ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! आपण अगदी दूरचे व एकान्ताचे ठिकाण चातुर्मासाकरिता शोधून काढले. पण महाराज ! आपण कोठेही असला तरी आमची आपल्यावरील भक्ती आम्हाला आपल्या पायाश

आणून सोडील." श्री. गोपाळराव राजाध्यक्षांचे हे उद्‌गार ऐकून श्रीस्वामीमहाराज प्रसन्नपणे हसले व स्वस्थ बसले.

श्री. गोपाळबुवा राजाध्यक्षांनी ह्यावनूरला आल्या दिवसापासून रोज रात्री भजन सुरू केले. प्रथम प्रथम काही मुले तेवढी भजनाला येत असत. परंतु नंतर तरुण व म्हातारी माणसेही भजनाला येऊ लागली. हळूहळू श्रोत्यांची दाटी होऊ लागली. येथील सर्व कानडी मंडळींना सुद्धा ते भजन ऐकून आनंद होत असे. भाषेमुळे कोणाचेच काही अडले नाही. श्री. गोपाळबुवा मधून मधून कीर्तनही करीत असत. श्रीस्वामीमहाराजही श्री. गोपाळबुवांचे भजन व कीर्तन ऐकावयाला येऊन बसत असत. रोज रात्री भजन संपल्यावर तेथे जमलेली सर्व मंडळी श्रीस्वामीमहाराजांची आरती करीत व प्रसाद घेऊन सर्व मंडळी घरी जात असत.

एकदा श्री. गोपाळबुवांनी अखंड भजनसप्ताह केला. त्या सप्ताहाच्या अखेरीस ते गावात भिक्षेस गेले. श्री. गोपाळबुवा भिक्षेला निघाले असे पाहून त्यांच्याबरोबर आणखीही बरीच मंडळी वाद्ये वाजवीत व "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ।।" असे भजन करीत निघाली. त्या दिवशी गावातील सर्वांनीच कोरडी भिक्षा घातली. त्यामुळे खूप शिधा जमा झाला. श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवशी सर्वच ग्रामस्थ मंडळींना भजनसप्ताहाच्या सांगता प्रसादासाठी बोलविले.

श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेप्रमाणे सर्वांनी मिळून स्वयंपाक केला. गावातील कित्येक लोकांनी या कार्यक्रमासाठी आणखीही शिधा पाठवून दिला. श्रीस्वामीमहाराजांची भिक्षा झाल्यावर सर्व मंडळी प्रसाद घेण्यासाठी बसली. त्या दिवशी पाचशेच्या वर पान झाले. जेवण चालू असताना श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना श्लोक

म्हणावयास सांगितले. प्रत्येकाने क्रमाक्रमाने श्लोक म्हटले. त्यातच एक मुका मुलगा होता. त्याला श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, " तू श्लोक म्हणतोस का ? म्हण. " श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलाला असे सांगताच लोकांना वाटले हा मुका मुलगा श्लोक कसा म्हणणार ? परंतु त्या मुक्या मुलाने श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्लोक म्हणावयाला तोंड उघडले आणि जणू काही सरस्वतीच त्याच्या मुखातून बोलू लागली. आपल्या गावातील एक मुका मुलगा श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा झाल्याबरोबर श्लोक म्हणू लागल्याचे पाहून सर्व लोक अवाक् झाले. त्यांच्या ठिकाणी असलेले हे अद्‌भुत सामर्थ्य व ही देवकळा पाहून सर्वांचा त्यांच्या बद्दलचा आदर शतगुणित झाला.

श्री. गोपाळबुवांनी दररोज रात्री भजन कीर्तनाचा कार्यक्रम चालू ठेवला होता. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आता सर्वतोमुखी झाली होती. अनेक लोकांना औषधे देऊन त्यांना बरे केल्यामुळे श्रीस्वामीमहाराज धन्वन्तरी असल्याची सर्व लोकांची खात्री पटली; परंतु याशिवाय " मूकं करोति वाचालम् " अशी दिव्य शक्ती त्यांच्या अंगी विलसत असल्याचा प्रत्यय सर्व लोकांना येऊन ते अवतारी पुरुष आहेत अशी त्यांची खात्री झाली. श्रीथोरल्यास्वामीमहाराजांचा अवतार हा लोकांच्या दुरिताचे तिमिर घालविण्यासाठीच झाला होता. लोकांच्या दुःखांचे निवारण करून त्यांना परमेश्वर भक्तीकडे लावावयाचे अशी त्यांची रीतच होती.

एके दिवशी रात्री भजन सुरू असताना श्री. शेषगिरी नावाचे एक वैष्णव ब्राह्मण आपल्या विवाहित बहिणीला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले. त्यांच्या या बहिणीचे लग्न झाल्यावर काही दिवसांनी तिचे पाय अगदी आखडून गेल्यामुळे तिला चाल-

ताही येत नव्हते. अलीकडे तीन–चार वर्षे तिची दृष्टी गेल्यामुळे तिला दिसतही नव्हते. तिची ही सर्व हकीकत श्री. शेषगिरी यांनी भजन चालू असतानाच श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घातली. ती सर्व ऐकून घेतल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्री. शेषगिरी यांना भजन संपल्यावर तिला घेऊन येण्यास सांगितले.

त्या दिवशीचे रात्रीचे भजन आटोपल्यावर श्री. शेषगिरींनी आपल्या वहिणीला श्रीस्वामीमहाराजांच्या समोर आणून बसविले. तिला पाहताच त्यांच्या असे लक्षात आले की, तिला रोगबाधा झाली नसून पिशाच्चबाधा झाली आहे. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईच्या अंगावर आपल्या कमण्डलूतील पाणी शिंपडले व थोडेसे पाणी श्री. शेषगिरी यांच्याकडे देऊन ते तिच्या पायांना व डोक्याला लावावयास सांगितले. श्री. शेषगिरी यांनी असे करताच त्या बाईच्या अंगात पिशाच्चाचा संचार झाला व ते पिशाच्च एकदम "जातो जातो" असे ओरडले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्या पिशाच्चाला असे विचारले की, "तू कोण आहेस ? या बाईला त्रास कशाकरिता देत आहेस ?" श्रीस्वामीमहाराजांचे हे प्रश्न ऐकताच त्या पिशाच्चाने आपली सर्व हकीकत सांगितली व शेवटी ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! मला सद्‌गती मिळावी म्हणून मी या बाईला धरले आहे; परंतु अद्याप माझी या योनीतून काही सुटका झाली नाही व सद्‌गतीही मिळाली नाही. तरी आपण मला सद्‌गती देऊन या पिशाच्च योनीतून सोडवावे म्हणजे मी या बाईला सोडून निघून जाईन."

त्या पिशाच्चांची ही प्रार्थना मान्य करून श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या कमंडलूतील पाणी पुन्हा एकदा त्या बाईंच्या अंगावर शिंपडले व ते त्या पिशाच्चाला असे म्हणाले की, "जा, तुला

सद्‌गती मिळेल." श्रीस्वामीमहाराजांचे हे उद्‌गार ऐकताच ते पिशाच्च त्या बाईला सोडून गेले. त्या बरोबर ती बाई एकदम उठून बसली व लगेच उभे राहून तिने श्रीस्वामीमहाराजांना नमस्कारही केला. त्यानंतर ती चालूही लागली व तिला उत्तम दिसूही लागले. वास्तविक पाहता तिला श्रीस्वामीमहाराजांच्या समोर आणताना श्री. शेषगिरी यांनी दोन–चार माणसांच्या साहाय्याने तिला उचलूनच तेथे आणले होते; पण परत घरी जाताना ती आपल्या पायांनी चालत गेली, हे पाहून सर्व लोक आश्चर्यचकित झाले.

त्या दिवसांमध्ये दक्षिणेत शैव व वैष्णव यांचा वाद अगदी पराकोटीला गेलेला होता. त्यामुळे दोन्ही संप्रदायांच्या अनुयायांमधून विस्तूही जात नसे. श्रीत्रिपुरान्तकेश्वर म्हणजे महादेव शंकर होय. त्या देवळात वैष्णव लोक जात नसत; पण श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य सामर्थ्याने व लोकोत्तर कीर्तीने प्रभावित होऊन सर्व वैष्णव मंडळी श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात येऊन त्यांचे दर्शन घेत असत. अशा रीतीने त्या भागातील सर्व शैव व वैष्णव लोक आपल्या उद्धारासाठी व कल्याणासाठी त्यांच्या भजनी लागले होते.

हावनूर हे ठिकाण कर्नाटकातील तुंगभद्रेच्या तीरावर असून या गावाला जवळचे रेल्वे स्टेशन हावेरी हे असून ते तेथून २०–२२ मैल अंतरावर आहे. या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास सुरू झाल्यावर हळूहळू ही वार्ता सर्व लोकांना समजत गेली. चातुर्मासाच्या या दोन महिन्यांच्या काळात श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम निश्चितपणे एका जागीच राहात असल्यामुळे तेथे गेल्यावर आपल्याला खात्रीपूर्वक त्यांचे दर्शन होईल, अशी लोकांना खात्री असल्यामुळे ज्या ज्या भक्तांना हावनूर येथे श्रीस्वामीमहा-

राजांचा चातुर्मास असल्याचे समजले ते ते सर्व भक्त समस्त भारत वर्षातून येथे येत होते.

हावनूर हे ठिकाण कर्नाटकात असल्यामुळे उत्तरेकडून आलेल्या लोकांना इकडील कानडी भाषा समजत नसे; परंतु या सर्वांची व्यवस्था व्हावी अशी ईश्वरानेच योजना केली. ह्यावेळी हावेरीचे स्टेशनमास्तर हे महाराष्ट्रीय ब्राह्मण गृहस्थ असून ते श्रीस्वामी-महाराजांचे भक्त होते. त्यामुळे हावनूरला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला येणाऱ्या सर्व भक्तांची राहण्याची, स्नानपाण्याची, फराळाची व जेवण्याची सर्व व्यवस्था ते करीत असत. हावेरीहून हावनूरला बैलगाडीने जावे लागे. हे स्टेशनमास्तर यात्रेकरूंना स्वतः बैलगाडी ठरवून देत, त्यांचे भाडे स्वतः आगाऊ ठरवीत व गाडी-वाल्याला सर्व भक्तमंडळींना हावनूरला सांभाळून नेण्यास कानडी भाषेत समजावून सांगत असत. अशा रीतीने ते स्टेशनमास्तर श्रीस्वामीमहाराजांच्या भक्तमंडळींची सर्वतोपरी सेवा करीत असत.

या स्टेशनमास्तरांनी आपणासही श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शना-साठी हावनूरला जाता यावे व त्यांच्या सत्संगाचा लाभ घेता यावा म्हणून रजेचे दोन अर्ज केले; पण त्यांची रजा काही मंजूर झाली नाही. आपली रजा मंजूर होत नाही असे पाहून त्या स्टेशनमास्त-रांच्या मनात नेहमीच असे विचार येत असत की, "येथे येऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाणारी मंडळी किती भाग्यवान् आहेत ! दूरदूरहून येऊन ते श्रींचे दर्शन घेतात. सत्संगतीमुळे त्यांचा उद्धार होतो; पण मी सन्निध असूनही परतंत्रतेमुळे रजा मिळत नसल्याने हा लाभ काही आपणास मिळत नाही. श्रींचा चातुर्मासही आता संपत आला. आपल्या नशिबी काही दर्शन दिसत नाही." अशा प्रकारे स्टेशन मास्तरांच्या मनाची विलक्षण उलघाल चालली

असताना चातुर्मास संपण्याच्या आधल्या दिवशीच त्यांची रजा मंजूर झाली. त्यामुळे त्यांना खूप आनंद झाला व त्या आनंदात ते रिक्तहस्तानेच हावनूरला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर ते त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही रजेसाठी अर्ज केला त्याच वेळी तुमची रजा आम्ही मंजूर केली असती; तर येथे येणाऱ्या भक्तमंडळींची सोय कोणी केली असती ? देवांनीच तुमच्या रजेचा अर्ज लवकर मंजूर करून दिला नाही. तुम्ही जी सर्व भक्तमंडळींची सेवा केलीत ती सर्व देवांचीच सेवा केली आहे. तुमची ही सर्व सेवा देवांना पोहोचली. हा देवांचा प्रसाद घ्या." श्रीस्वामीमहाराजांचे हे बोलणे ऐकताच त्यांनीच आपली रजा भक्तसमाजाच्या सेवेकरता मंजूर करू दिली नाही हे लक्षात येऊन ते साक्षात् श्रीदत्तप्रभूच असल्याची प्रचीती येऊन स्टेशनमास्तरांचे अंतःकरण भरून येऊन त्यांच्या नेत्रातून अश्रू पाझरू लागले. स्टेशनमास्तरांचा उत्कट भक्तिभाव पाहून श्रीस्वामी-महाराजांनाही फार संतोष झाला. त्यांनी श्री. गोपाळराव राजाध्य-क्षांकडून कोठीतून एक रेशमी वस्त्र, धोतरजोडी, दहा रुपये व नारळ घेऊन या सर्व गोष्टी स्टेशनमास्तरांना प्रसाद म्हणून दिल्या. श्रीस्वामीमहाराजांनी स्वहस्ते आपल्याला प्रसाद देऊन आपल्या-वरील जो प्रेमभाव व्यक्त केला तो पाहून आपले जीवन धन्य व कृतार्थ झाले असेच स्टेशनमास्तरांना वाटले.

हावनूर येथील एक शिक्षक श्री. गोविंदराव फाटक यांच्या हाताला कुष्ठरोग झाल्यामुळे त्यांना आपल्या हाताने काहीही खाता येत नव्हते. श्रीस्वामीमहाराज महान् धन्वन्तरी असून ते लोकांचे असाध्य रोगही बरे करतात असे कळल्यावर एके दिवशी ते श्रीस्वामीमहा-राजांच्या दर्शनासाठी आले व त्यांची अत्यंत नम्रतापूर्वक करुणेने

प्रार्थना करताना असे म्हणाले की, "महाराज ! मी या व्याधीने पार पीडून गेलो आहे. मला स्वतःला जेवताही येत नाही. आपण काहीतरी औषध देऊन माझी व्याधी बरी करावी, अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे. महाराज ! आपण साक्षात् दत्तप्रभूच आहात ! आपणास काहीही अशक्य नाही." श्री. गोविंदराव फाटकांनी स्तुतिपूर्वक केलेली प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना कुष्ठरोग शमनार्थं मंत्र देऊन त्याचे जपानुष्ठान करण्यास सांगितले. याशिवाय त्यांनी श्री. गोविंदरावांचा रोग दूर व्हावा म्हणून त्यावर लावण्यासाठी औषधही दिले. श्रीस्वामीमहाराजांनी दिलेले औषध लावून त्यांनी सांगितलेल्या मंत्राचे जपानुष्ठान केल्यावर फारच त्वरित गतीने श्री. गोविंदराव फाटक यांचे कुष्ठ जाऊन त्यांचा हात पूर्ववत् उत्तम झाला.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे आपणास श्रीस्वामीमहाराजांचे जे दर्शन घडते त्याचेच वर्णन श्रीसंततुकाराममहाराजांनी जणूकाही पुढील अभंगात केले आहे याची जाणीव होऊन त्या अभंगाच्या वाचनाने आपणापुढे श्रीस्वामीमहाराज साक्षात् उभे असल्याचा दिव्य आनंद प्राप्त झाल्याशिवाय राहात नाही.

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥<br>
थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥२॥<br>
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारें ॥३॥<br>
भूतांची दया हें भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥<br>
तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्त्रवतसे ॥ ५ ॥

  

जे का रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥ १ ॥<br>
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥

मृदु सबाह्य नवनीत। तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥
ज्यासि आपंगिता नाहीं। त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥
दया करणें जे पुत्रासी। तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगूं किती। तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६ ॥

  

श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील श्रीनारायणस्वामींच्या कन्येच्या वंशातील रट्टेहळीचे श्री. यज्ञेश्वर दीक्षित लहानपणी राणीबिन्नूर येथे आपले मामा श्री. रामप्पा नाईक यांच्या घरी राहात असत. त्यांच्या मस्तकाला गळू होऊन त्याला अनेक छिद्रे पडून त्यातून सारखा पू वाहू लागला. श्री. यज्ञेश्वर यांचा हा रोग बरा व्हावा म्हणून श्री. रामप्पांनी पुष्कळ औषधोपचार केले; परंतु त्यांना गुण आला नाही. अशा स्थितीत आता काय करावे असा विचार श्री. रामप्पांना पडला. शेवटी श्री. यज्ञेश्वरांना श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला नेले म्हणजे ते त्यांच्या कृपेनेच बरे होतील, असा निश्चय करून श्री. रामप्पा नाईक त्यांना घेऊन हावनूर येथे आले.

श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन श्री. रामप्पांनी श्री. यज्ञेश्वरांच्या व्याधी संबंधी सर्व हकीकत सांगितली व शेवटी ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! आपण तर पूर्वाश्रमापासून नारायणस्वामींचे परमभक्त आहात. त्यांच्याच वंशातील हे लेकरू आहे. आपण त्याच्यावर आपली अमृतदृष्टी टाकलीत; तर तो एका दिवसात बरा होईल. महाराज ! आपणास काहीही अशक्य नाही. आपले कर्तुंअकर्तुंअन्यथाकर्तुं सामर्थ्य सर्व त्रिभुवनात प्रसिद्ध आहे. माझी आपल्या परमकोमलचरणी एवढीच प्रार्थना आहे की, आपण याच्यावर आपली कृपादृष्टी टाकून याला बरे करा ! "

श्री. रामप्पांची ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांचे कोमल

अंत:करण एका क्षणात द्रवले. त्यांनी श्री. रामप्पांच्या प्रार्थनेप्रमाणे श्री. यज्ञेश्वरांवर आपली कृपादृष्टी फिरवून जणूकाही आपल्या दिव्य कृपामृत दृष्टीने त्यांना तपासले. सूक्ष्मदृष्टीचा अस्थूल पातळीवरील हा उपचार केल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी स्थूलात्मक दृष्टीचा उपचार म्हणून श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात जाऊन एक लांब मुळी आणून ती श्री. रामप्पांना दिली आणि ती लिंबाच्या रसात उगाळून त्याचा लेप गळवावर घालण्यास सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांनी दिलेली मुळी घेऊन त्यांनी सांगितल्याप्रमाणे ती उगाळून श्री. रामप्पांनी त्याचा लेप श्री. यज्ञेश्वरांच्या गळवावर घातला. त्यामुळे दुसऱ्याच दिवशी पू वाहण्याचे बंद होऊन आठ दिवसात ते गळू नाहीसे झाले. हे सर्व पाहिले म्हणजे श्रीपादश्रीवल्लभांनी आपल्या मातेच्या इच्छेप्रमाणे आपल्या बंधूंना डोळे व पाय देऊन त्यांचे अंधत्व व पांगळेपण कसे दूर केले याचे स्मरण होऊन "श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज" या नावाने श्रीदत्तप्रभूंनी "योगिराज" रूपाने जो अवतार धारण करून आपल्या मागील अवतारातील कार्याचीच पुनरावृत्ती केल्याचे दृष्टीस पडते. या प्रसंगाचे वर्णन करताना श्रीसरस्वतीगंगाधरांनी "श्रीगुरुचरित्र" ग्रंथात असे म्हटले आहे की—

निश्चय करूनि आपुले मनीं । पुत्रास म्हणती जनक जननी ।
होती आशा आम्हांलागुनी । प्रतिपाळिसी म्हणोनियां ।। ५.६० ।।
ऐशीं मनीं व्याकुळित । डोळां निघती अश्रुपात ।
माता पडली मूर्च्छागत । पुत्रस्नेहें करोनियां ।। ६१ ।।
देखोनि मातेचें दुःख । संबोखित परमपुरुष ।
उठवूनि स्वहस्तें देख । अश्रुपात पुशितसे ।। ६२ ।।

न करी चिंता अहो माते। जें मागसी तें देईन तूतें।
दृढ करूनि चित्तातें। राहा सुखें म्हणतसे ॥ ६३ ॥
बा रे तुजकरितां आपण। दुःख विसरलें संपूर्ण॥
रक्षिसी आम्हा वृद्धांलागून। दैन्यावेगळें करोनी ॥ ६४ ॥
पुत्र असती आपणा दोन। पाय पांगुळ अक्षहिन।
त्यांतें पोशील आतां कोण। आम्हां कवण रक्षील ॥ ६५ ॥
ऐकोनि जननीचें वचन। अवलोकी अमृतदृष्टीं करून।
पुत्र दोघेही झाले सगुण। आली दृष्टी चरणादिक ॥ ६६ ॥
वेदशास्त्रादि व्याकरण। सर्व म्हणती तत्क्षण।
दोघे येऊनि धरिती चरण। कृतार्थ झालों म्हणोनियां ॥ ६७ ॥
चिंतामणीचा होता स्पर्श। सुवर्ण करी लोहास।
तैसें महात्मदृष्टीने तयांस। योग्यता आली तत्काळीं ॥ ६८ ॥
आश्वासून तये वेळीं। दिधला वर तात्काळीं।
पुत्रपौत्रीं नांदा प्रबळीं। श्रियायुक्त सनातन ॥ ६९ ॥
सेवा करा जनकजननी। पावाल सुख महाज्ञानी।
इहसौख्य पावोनी। व्हाल मुक्त हें निश्चयें ॥ ७० ॥

  

हिंगोली गावचे श्री. हेमराज मारवाडी हे श्रीमंत गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त होते. पवनीहून निघताना ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज हिंगोली येथे गेले होते त्यावेळी श्री. हेमराज यांनी आपल्या ती. मातोश्रींसंबंधी सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांना सांगितली होती. त्यावेळी शेवटी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी अशी प्रार्थना केली होती की, "महाराज! आमच्या मातुश्रींना वस्त्राचेही भान राहात नाही; तरी आपण त्यांच्यावर कृपा करून त्यांना या पीडेतून मुक्त करा." त्यांची ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांनी

श्री. हेमराज यांना त्यांच्या ती. मातुश्रींची पीडा दूर व्हावी म्हणून एक यंत्र तयार करून दिले व त्याचा सर्व विधीही समजावून सांगितला. त्याप्रमाणे श्री. हेमराज यांनी सर्व विधी केल्यावर त्यांच्या मातुश्रींची पीडा दूर होऊन त्यांची प्रकृती पूर्ववत् उत्तम झाली. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाशीर्वादाने आपल्या मातुश्रींची प्रकृती बरी झालेली पाहून श्री. हेमराज यांना परमानंद झाला व त्यांनी आपल्या मातुश्रींना घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाण्याचे ठरविले. त्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास हावनूर येथे चालू असल्याचे समजल्यावर ते आपल्या ती. मातुश्रींना घेऊन त्यांच्या दर्शनासाठी मुद्दाम हावनूर येथे आले.

हावनूर येथे एक वैष्णव संप्रादायातील बाई बरीच वर्षे अथंरुणावर पडूनच होत्या. पुष्कळ औषधोपचार करूनसुद्धा त्यांना अथंरुणावरून काही उठता आले नाही. त्या अशा स्थितीत असताना श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास हावनूर येथे सुरू झाला. श्रीस्वामीमहाराज धन्वंतरी आहेत, ते अवतारी पुरुष आहेत व ते सर्वांवर दया करतात अशा प्रकारचा त्यांच्या कीर्तीचा परिमल सर्वत्र पसरला होता. त्यामुळे कितीतरी हितसंबंधीयांनी व गावातील लोकांनी त्या बाईंच्या घरच्या लोकांना त्यांना श्रीस्वामीमहाराजांकडे घेऊन जाण्यास सांगितले. गावातील सर्व लोकांनी अत्यंत प्रेमाने सल्ला दिला असला; तरी श्रीस्वामीमहाराज हे स्मार्त असल्यामुळे आपल्या सारख्या वैष्णवांनी त्यांच्याकडे जाणे कदापीही योग्य नाही असा विचार करून घरच्या लोकांनी त्या बाईंना श्रीस्मामीमहाराजांकडे आणले नाही.

अशा रीतीने काही दिवस गेल्यावर जेव्हा सर्वांनीच फार आग्रह केला तेव्हा त्या घरातील वैष्णव मंडळींनी शेवटी श्रीस्वामीमहा-

महाराजांकडे जाऊन त्या वाईंची सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली. ती सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्या सर्व वैष्णव मंडळींना असे म्हणाले की, " त्या बाईंना समक्ष पाहिल्याशिवाय त्यांना काय झाले आहे हे काहीही सांगता येणार नाही. तरी तुम्ही त्यांना येथे घेऊन या. "

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी त्या वैष्णव मंडळींना त्या बाईंना श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात समक्ष घेऊन येण्यास सांगितल्यावर त्यांच्या घरातील सर्व लोकांनी मोठ्या नाईलाजाने त्यांना उचलून श्रीस्वामीमहाराजांसमोर आणले.त्या बाईंना पाहिल्या बरोबर श्रीस्वामीमहाराज त्या सर्व वैष्णव मंडळींना उद्देशून असे म्हणाले की, " हिला कोणताही रोग झालेला नसून पिशाच्चबाधा झाली आहे. " इतके बोलून श्रीस्वामीमहाराजांनी तिच्या अंगावर आपल्या कमंडलूतील पाणी मंत्रून शिंपडले. ते पाणी अंगावर पडताच त्या बाईंच्या अंगातील पिशाच्च बोलू लागले. ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " महाराज ! गेल्या जन्मी या बाईने मला फार छळले आहे. त्यामुळे पिशाच्च होऊन मी हिला पिडा देत आहे. आज आपल्या दर्शनाने मी पवित्र झालो आहे. आपल्या आज्ञेप्रमाणे मी हिला सोडून जातो. "

त्या पिशाच्चाने जरी मी त्या बाईंना सोडून जातो असे सांगितले तरी पिशाच्च नेहमी खोटे बोलत असते व ते दुष्ट वासनेमुळे त्याने धरलेल्या माणसाला तसे सोडून जात नाही हे माहीत असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईंबरोबर आलेल्या वैष्णव मंडळींना एक यंत्र तयार करून देऊन ते तिच्या गळ्यात बांधण्यास सांगितले व एक जपही करावयास सांगितला. तो जप पूर्ण होताच त्या बाई

उत्तम बऱ्या होऊन हिंडू फिरू लागल्या. त्या बाईंची पिशाच्चबाधा दूर होऊन त्या पूर्णपणे बऱ्या झालेल्या पाहिल्यावर वैष्णव मंडळींच्या मनात श्रीस्वामीमहाराजांच्या विषयी अत्यंत पूज्य भावना निर्माण झाली.

श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाण्यासाठी काही भक्त मंडळी हावेरी स्टेशनवर उतरून बैलगाडीने हावनूरला जावयाला निघाली. त्यांच्या बरोबर एक सौभाग्यवती बाई पायीच चालल्या होत्या. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची यात्रा पायीच करावयाची असा त्यांचा संकल्प व नवस होता. असे असले; तरी बरोबरच्या मंडळींनी फारच आग्रह केला, तर त्या तेवढ्यापुरते गाडीत बसून पुन्हा पायी चालू लागत असत.

काही अंतर गेल्यावर त्या सर्व स्वामीभक्तांना दोन बटू सामोरे आले आणि हात जोडून त्या सर्वांना त्यांनी अशी विनंती केली की, "श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने या भूतलावर अवतरलेल्या श्रीदत्तगुरुमहाराजांचे दर्शन घेण्यासाठी आपण सर्वजण हावनूरला चाललेले आहात. अजून तुम्हाला खूप अंतर जावयाचे आहे. आताच तुम्ही फार दमलेले दिसत आहात. आमच्या गुरुदेवांच्या आश्रमात येऊन आपण सर्वजणांनी प्रसाद घेतला तर आम्हाला फार धन्यता वाटेल." त्या दोन बटूंची ही प्रेमळ प्रार्थना ऐकून सर्वजण त्या बटूंच्या मागे आश्रमात गेले. खरे तर सर्वजणांना खूपच भूक लागली होती. अशा स्थितीत श्रीस्वामीमहाराजांनीच या बटूंना पाठविलेले आहे असे त्यांना वाटले.

त्या बटूंनी सर्व मंडळींना एका प्रशस्त आवारात नेले. तेथे बऱ्याच लहान मोठ्या इमारती होत्या. समोरच एक श्रीगणेशाचे मंदिर होते. तेथे जाऊन सर्व लोकांनी श्रीगणेश दर्शन घेतले. त्यानंतर

त्या बटूंनी सर्वांना विहिरीवर नेऊन हातपाय धुण्यास पाणी दिले व त्यांना भोजनमंदिरामध्ये नेले. तेथे केळीची लांबरुंद पाने मांडून तयार होती. त्या सभोवार सुंदर रांगोळ्या काढलेल्या होत्या व समोर सुवासिक उदबत्त्या लावलेल्या होत्या. सर्वजण पानावर बसल्यावर त्या हसतमुख बटूंनी त्यांना वाढावयास सुरुवात केली. वाढून झाल्यावर त्या बटूंनी त्रिसुपर्ण म्हटल्यावर हरहर महादेव होऊन सर्वांनी जेवावयास सुरुवात केली. भोजनोत्तर त्या बटूंनी सर्वांना विडेही दिले.

ज्यावेळी विडे खाऊन सर्व मंडळी हावनूरला जाण्यासाठी निघण्याच्या तयारीला लागली त्यावेळी एका गृहस्थांना कुतूहल वाटून त्याच्या मनात असा विचार आला की, आपल्यासारख्या इतक्या पांथस्थांना यांनी विनामूल्य जेवावयास घातले; तर हे रहाटगाडगे कशावर चालले असेल ? हा विचार त्या गृहस्थांच्या मनात उद्भवतो आहे तोच एक बटू त्या गृहस्थांजवळ येऊन त्यांना असे म्हणाला की, “चला आमचे अन्नपूर्णामंदिर तुम्हाला दाखवितो.” असे म्हणून त्या बटूने त्या सर्वांना अन्नपूर्णेच्या मंदिरात नेले. ते मंदिर अत्यंत प्रशस्त व स्वच्छ असून एखाद्या भव्य दालनासारखे होते. त्याच्या चारी भिंतीस लागून लाकडाच्या घडवंच्यांवरून एकाच आकाराचे लहानमोठे डबे हारीने मांडले होते. त्या प्रत्येक डब्यावर सुवाच्य चिठ्ठी असून त्यावर आतील पदार्थांचा नामनिर्देश केलेला होता. चारी बाजूंनी भरगच्च भरलेल्या त्या दालनाच्या मध्यभागी एका चौरंगावर श्रीअन्नपूर्णेची मूर्ती ठेवून तिची मोठी आकर्षक पद्धतीने पूजा केलेली होती. ती मंडळी हे सर्व पाहात असतानाच तो बटू त्या गृहस्थांना असे म्हणाला की, “आम्ही दोघे आळीपाळीने स्वयंपाक करतो. आमच्यापैकी ज्याची स्वयंपाकाची पाळी

असेल त्याने येथे येऊन स्तोत्रपूर्वक अन्नपूर्णेची पूजा व जप करून स्वयंपाकास लागावयाचे असते. आम्ही श्रीअन्नपूर्णा देवीचा जप, आचमन, प्राणायाम करून "ममाभीष्ट सिद्धिद्वारा श्रीपरमेश्वर-प्रीत्यर्थं श्रीअन्नपूर्णामंत्रजपमहं करिष्ये," असा संकल्प करून करतो. हा जप असा आहे–

**"नमो भगवते माहेश्वरी अन्नपूर्णे।**
**ममाभिलषितमन्नं देहि देहि ॥"**

अशा रीतीने वटूंचा निरोप घेऊन ती सर्व मंडळी हावनूरला जाण्यासाठी निघाली. काही पावले चालून गेल्यावर ज्यावेळी त्या मंडळींनी सहज मागे पाहिले त्यावेळी त्या लोकांच्या असे लक्षात आले की, आत्ताच आपण जेथे जेवण केले तो आश्रम, ते बटू, ते मंदिर इत्यादि काहीच तेथे नाही. तेथे तर फक्त मोकळी जागाच आहे असे त्यांना दिसले. तो सर्व प्रकार पाहून ती सर्वच मंडळी दिङ्मूढ झाली.

त्या दिवशी सायंकाळी सर्व मंडळी चालत चालत हावनूर येथे पोहोचली. त्या सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर जेव्हा त्यांनी दुपारी घडलेली सर्व हकीकत त्यांना सांगितली व "आम्ही पाहिलेला तो आश्रम नाहीसा कसा झाला ? आम्ही सर्वजण जेवलो ते खरे का ? हे सर्व कसे घडले ?" इत्यादि विविध प्रश्न आश्चर्य, भीती व जिज्ञासेपोटी त्यांना विचारले. तेव्हा त्या सर्वांचे प्रश्न व जिज्ञासा पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुमच्या भक्तिभावाने प्रसन्न होऊन देवाने तुम्हाला हे सर्व दाखविले. देव असेच आपल्या सामर्थ्याने मनःकल्पित विश्व निर्माण करतो व ते विलीनही करतो. त्यासाठी त्याला कोणत्याही साधनाची गरज लागत नाही."

. . . . . .

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनी देवाने आपणा सर्व लोकांना हे दाखविले असे सांगून उपरोक्त चमत्काराचे कर्तृत्व स्वत:कडे घेतले नसले; तरी त्यांनीच आपल्या भक्तांना सृष्टी-उत्पत्ती, स्थिती-विलयाचा प्रायोगिक चमत्कार दाखवून प्रत्यक्ष कृतीने त्यांना आत्मज्ञानाचे शिक्षण दिले हेच खरे ! श्रीस्वामीमहाराजांनी जे कृतीने दाखविले तेच जणूकाही श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी आपल्या ग्रंथराज दासबोधात पुढील शब्दात निबद्ध केले आहे. ते वाचून मन आनंदाने भरून आल्याशिवाय राहात नाही. ते असे म्हणतात की –

तें हें दृश्य नाशवंत। ऐसें वेदश्रुति बोलत।
निर्गुण ब्रह्म शाश्वत। जाणती ज्ञानी ॥ ६.२.१५ ॥
जें शस्त्रें तोडितां तुटेना। जें पावकें जाळितां जळेना।
जें कालवितां कालवेना। आपेंक्रूनी ॥ १६ ॥
जें वायूचेनि उडेना। जें पडेना ना झडेना।
जें घडेना ना दडेना। परब्रह्म तें ॥ १७ ॥
ज्यासी वर्णचि नसे। जें सर्वांहूनि अनारिसें।
परंतु असतचि असे। सर्वकाळ ॥ १८ ॥
दिसेना तरी काय झालें। परंतु तें सर्वत्र संचलें।
सूक्ष्मादि कोंदाटलें। जेथें तेथें ॥ १९ ॥
दृष्टीस लागली सवे। जें दिसेल तेंचि पाहावें।
परंतु गुज ते जाणावें। गौप्य आहे ॥ २० ॥
प्रकट तें जाणावें असार। आणि गुप्त तें जाणावें सार।
गुरुमुखें हा विचार। उमजों लागे ॥ २१ ॥
जें उमजेना तें उमजवावें। जें दिसेना तें पाहावें।
जें कळेना तें जाणावें। विवेकबळें ॥ २२ ॥

गुप्त तेंचि प्रकटवावें । असाध्य तेंचि साधावें ।
कानडेंचि अभ्यासावें । सावकाश ॥ २३ ॥

जागें होतां स्वप्न सरे । विवेक पाहतां दृश्य वोसरे ।
स्वरुपानुसंधानें तरे । प्राणिमात्र ॥ ३८ ॥

आपणास निवेदावें । आपण विवेकें तुरावें ।
आत्मनिवेदन जाणावें । याचें नांव ॥ ३९ ॥

आधीं अध्यात्मश्रवण । मग सद्गुरुपादसेवन ।
पुढें आत्मनिवेदन । सद्गुरुप्रसादें ॥ ४० ॥

आत्मनिवेदनाउपरी । निखळ वस्तु निरंतरी ।
आपण 'आत्मा' हा अंतरीं । बोध जाहला ॥ ४१ ॥

त्या ब्रह्मबोधें ब्रह्मचि झाला । संसारखेद तो उडाला ।
देह प्रारब्धीं टाकिला । सावकाश ॥ ४२ ॥

यासि म्हणिजे आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान ।
परब्रह्मीं अभिन्न । भक्तचि जाहला ॥ ४३ ॥

आतां होणार तें होईना कां । आणि जाणार तें जाईना कां ।
तुटली मनांतील आशंका । जन्ममृत्यूची ॥ ४४ ॥

संसारीं पुंडावे चुकले । देवा भक्तां ऐक्य झालें ।
मुख्य देवास ओळखलें । सत्संगे करुनी ॥ ४५ ॥

* * *

ऐसें रचलें चराचर । येथें एकाहूनि एक थोर ।
पाहतां येथीचा विचार । अंत न लगे ॥ ६.४.९ ॥

एक म्हणती विष्णु थोर । एक म्हणती रुद्र थोर ।
एक म्हणती शक्ति थोर । सकळांमध्यें ॥ १० ॥

ऐसे आपुलालेपरी बोलती । परंतु अवघेच नासेल कल्पांती ।
यद्दृष्टं तन्नष्टं हें श्रुति । बोलतसे ॥ ११ ॥

आपुलाली उपासना। अभिमान लागला जनां।
याचा निश्चय निवडेना। साधुविण ॥ १२ ॥
साधु निश्चय करिती एक। आत्मा सर्वत्र व्यापक।
येर हें अवघेंची मायिक। चराचर ॥ १३ ॥
चित्रीं लिहिलीं सैना। त्यांत कोण थोर कोण साना।
हें कां तुम्ही विचारांना। आपुले ठायीं ॥ १४ ॥
स्वप्न उदंड देखिलें। लहान थोरही कल्पिलें।
परंतु जागें झालिया झालें। कैसें पहा ॥ १५ ॥
पाहतां जागृतीचा विचार। कैचें लहान कैचें थोर।
झाला अवघा विचार। स्वप्नरचनेचा ॥ १६ ॥
अवघाचि मायिक विचार। कैचें लहान कैचें थोर।
लहान थोर हा निर्धार। जाणती ज्ञानी ॥ १७ ॥
जो जन्मासी येऊनी गेला। तो 'मी थोर' म्हणतचि मेला।
परी याचा विचार पाहिला। पाहिजे श्रेष्ठीं ॥ १८ ॥
जयांस झालें आत्मज्ञान। तेंचि थोर महाजन।
वेदशास्त्रपुराण। साधुसंत बोलिले ॥ १९ ॥
एवं सकळांमध्यें थोर। तो एकचि परमेश्वर।
तयांमध्यें हरिहर। होती जाती ॥ २० ॥
तो निर्गुण निराकार। तेथें नाहीं उत्पत्ति स्थिति संहार।
स्थानमानाचा विचार। ऐलीकडे ॥ २१ ॥
नांव रूप स्थान मान। हा तों अवघाचि अनुमान।
तथापि होईल निदान। ब्रह्मप्रळयीं ॥ २२ ॥

* * *

वरील कथेंत वर्णन केलेली सर्व मंडळी त्या सौभाग्यवतीबाईंसह श्रीक्षेत्र हावनूर येथे पोहोचल्यानंतर त्याच्या दुसऱ्या दिवशी मंगळ-

वारी श्रीस्वामीमहाराजांनी त्या वाईंकडे भिक्षा ग्रहण करून त्यांना पुढील तीन मंत्रांचा जप करण्यास सांगितले. ते मंत्र असे आहेत.

दरिद्रविप्रगेहे यः शाकं भुक्त्वोत्तमश्रियं ।
ददौ श्रीदत्तदेवः स दारिद्र्याच्छ्रीप्रदोऽवतु ॥
दूरीकृत्य पिशाचार्ति जीवयित्वामृतं सुतम् ।
योऽभूदभीष्टदः पातु स नः संतानवृद्धिकृत् ॥
जीवयामास भर्तारं मृतं सत्या ह्री मृत्युहा ।
मृत्युंजय स योगींद्रः सौभाग्यं मे प्रयच्छतु ॥

अशा रीतीने या मंत्रांचे अनुष्ठान करून पुढे त्या सौभाग्यव्रती वाई संपत्ती, संतती, सौभाग्य, सेवा इत्यादि सर्व उपभोगून शेवटी सायुज्य मुक्तीस जाऊन पोहोचल्या.

श्रीक्षेत्र हावनूर येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू असताना एके दिवशी एक श्रीमंत सौभाग्यवती बाई आपल्या कारकुनाला बरोबर घेऊन त्यांच्या दर्शनासाठी आल्या. त्या बाईंची राहाणी सुखवस्तू कुळाला साजेशी अशी अत्यंत उच्च दर्जाची असल्यामुळे तिने आपल्या इतमामाला साजेल अशीच श्रीस्वामी-महाराजांची पूजा केली.

ही पूजा झाल्यानंतर त्या वाईंच्या कारकुनाने श्रीस्वामीमहा-राजांच्या चरणी अत्यंत नम्रतेने अशी प्रार्थना केली की, " बाई-साहेबांचा श्रीचरणी असा अर्ज आहे की, " बाईंची आत्तापर्यंन्त चार बाळंतपणे झाली; परंतु त्यांचे एकही मूल जगले नाही. प्रत्येक गरोदरपणाच्या वेळी पाचसहा महिने झाले की, यांच्या यजमानांचे डोके फिरते. पुढे वाईसाहेब बाळंत होऊन बाळ जिवंत असेपर्यंन्त ते असेच भ्रमिष्ट असतात. मात्र मूल गेले की, त्यांचा भ्रमिष्टपणा जाऊन ते पुन्हा पूर्ववत् ताळ्यावर येतात. आता सध्या बाईसाहेबांना

दिवस गेले आहेत. मागील चार वेळा घडलेल्या प्रसंगांमुळे सध्या त्यांचा जीव थाऱ्यावर नसून त्या अत्यंत घाबरल्या आहेत. या संकटातून मुक्तता करण्यास श्रींचे चरणच समर्थ आहेत. त्यासाठीच त्या आपल्या चरणी लीन होऊन आल्या आहेत. श्रींनी बाईसाहेबांना या संकटातून सोडवावे अशी माझी श्रींच्या चरणी प्रार्थना आहे." एवढे सांगून त्या कारकुनाने श्रीस्वामीमहाजांना साष्टांग नमस्कार घातला. त्यावेळी त्या बाई तेथेच बाजूला हात जोडून उभ्या होत्या. त्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहात होते. त्यांच्या कारकुनाने साष्टांग नमस्कार केल्यावर त्यांनीही श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला.

त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांकडून काहीतरी मार्ग आपल्याला मिळेल अशा कल्पनेने ते दोघेही स्तब्ध उभे होते; परंतु बराच वेळ झाला तरी श्रीस्वामीमहाराज काहीच बोलले नाहीत. श्रीस्वामीमहाराज काहीच बोलत नाहीत असे पाहून त्या बाईंचा कारकून पुन्हा अत्यंत नम्रतेने श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाला की, "महाराज! दर वर्षाची यांची पाच पंचवीस हजारांची मिळकत आहे; पण यांच्या घरात कोणालाच स्वस्थ चित्ताने घास जात नाही." हे कारकुनाचे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुमच्याकडे कोणाचे पाचपंचवीस हजार रुपये आले? त्यांच्या प्रीत्यर्थ काहीतरी व्हावे म्हणून देवधर्माकडे काही सेवा म्हणून ठेवली आहे का? त्यांचे श्राद्ध व पक्ष करून वर्षातून त्यांना एखादा घास तरी पोहोचतो का?"

श्रीस्वामीमहाराजांनी विचारलेले हे सर्व प्रश्न ऐकून त्या बाई एकदम गंभीर झाल्या व आपली चूक कबूल करताना त्या त्यांना असे म्हणाल्या की, "महाराज! आपण म्हणता ते अगदी खरे

आहे. आमच्याकडे जी मिळकत आली आहे. ती आमच्या निर्वंश नातेवाईकांचीच आहे. आमच्या यजमानांनी ही संपत्ती आल्यापासून श्राद्ध-पक्षास टाळा दिला असून त्यांच्यासाठी म्हणून अद्यापपर्यन्त तरी काही देवधर्म करून त्यांच्या आत्म्याला शांती मिळेल असे काहीही केलेले नाही." इतके सर्व सांगून झाल्यावर आपल्या कपाळावर साठलेले घामाचे बिंदू टिपीत क्षणभर थांबून त्या पुन्हा श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "महाराज ! आमच्या यजमानांना सद्बुद्धी द्यावयाला श्रीचरणच समर्थ आहेत. आपल्या कृपेने त्यांना सद्बुद्धी होऊन आमच्या वंशाचा दिवा लागावा एवढीच आपल्या चरणी प्रार्थना आहे."

त्या बाईंनी अशी प्रार्थना करताच श्रीस्वामीमहाराज त्या बाईंना असे म्हणाले की, "श्रीदत्तच समर्थ आहेत. त्यांच्या कृपेनेच तुमची इच्छा पूर्ण होईल." एवढे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईंच्या ओटीत नारळ-प्रसाद घालून त्यांना आशीर्वाद दिला. पुढे त्या घरी गेल्यावर त्यांच्या यजमानांना श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने सद्बुद्धी होऊन त्यांनी श्राद्धपक्षादि व देवधर्मादि सर्व सेवा मोठ्या श्रद्धा-भक्तिपूर्वक केल्यामुळे त्या बाईंना एक मुलगा झाला. त्यानंतर दोन वर्षांनी त्या आपल्या यजमानांना व मुलाला घेऊन श्रीस्वामीमहा-राजांच्या दर्शनाला गेल्या. त्यांनी आपल्या मुलाला त्यांच्या चरणी ठेवले. त्याबरोबर श्रीस्वामीमहाराज "श्रीदत्त" असे म्हणाले. श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून जी अक्षरे निघाली तेच आपल्या मुलाचे नाव ठेवावयाचे असे म्हणून त्या मुलाचे नाव त्यांनी "श्रीदत्त" असेच ठेवले.

अशा रीतीने काही वेळ त्या बाईंचा मुलगा श्रीस्वामीमहाराजांच्या समोरच खेळत होता. त्यावेळी त्या मुलाला उद्देशून ते असे म्हणाले

की, "वर्णाश्रम करिसी चोख। तरि तूं पावसी उत्तम लोक ॥" खरे तर त्यांचा हा उपदेश त्या मुलाच्या पित्यालाच होता. पुढे कालौघात त्या मुलाच्या पित्याने निरंतर वर्णाश्रम धर्माप्रमाणे आचरण करून आपले जीवन धन्य व कृतार्थ तर केलेच; पण आश्चर्याची गोष्ट अशी की, श्रीस्वामीमहाराजांच्या अमोघ शब्दांनी त्या बालकाकडूनही पुढे वर्णाश्रमधर्माचे आचरण घडून येऊन त्याचे जीवनही उत्तमलोक पावण्याइतके श्रेष्ठ झाले.

श्रीक्षेत्र हावनूर येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू असताना नाशिकहून तीन–चार तरुण पुरुष व एक पोक्त बाई श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी तेथे आल्या. त्या बाई रोज नित्य नियमाने एक ताट भरून ताजी व सुकी फळे श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेवीत असत. श्रीस्वामीमहाराज त्या सर्व फळांचा नैवेद्य दाखवून ती फळे सर्वांना प्रसाद म्हणून वाटीत असत. हा प्रसाद घेताना गावातील मंडळीही उपस्थित असत.

त्या बाई हावनूर गावात राहिल्यामुळे व त्यांच्या बरोबर घरातील तीनचार तरुण पुरुष असल्यामुळे बोलता बोलता त्यांच्या घरासंबंधीची सर्व हकीकत गावातील लोकांना माहीत झाली. त्यामुळे त्या बाई श्रीस्वामीमहाराजांची जी सेवा करीत असत ते एक ढोंग आहे असेच त्यांना वाटत असे. एके दिवशी गावातील लोक प्रसाद घेण्यासाठी जेव्हा श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात आले होते त्यावेळी त्या मंडळींपैकी एकजण असे म्हणाले की, "काय हो ! ही बाई केवढा भक्तीचा दिमाख दाखविते. इकडे ही ताटे भरभरून श्रीस्वामीमहाराजांना देते; पण घरी फक्त एकटी सून असूनही तिला मात्र बिचारीला डोके दुखले तर सुंठीचे कुंडेही मिळणार नाही. ही तर हिची स्थिती आहे." या गृहस्थांचे हे बोलणे ऐकून

त्यावेळी उपस्थित असलेले दुसरे एक गृहस्थ असे म्हणाले की, "काय हो ! हे गुरुमहाराज तर अंतर्ज्ञानी आहेत असे म्हणतात; मग या बाईंच्या वागण्याबद्दल ते त्यांना बोलून सुधारत का नाहीत ?" त्यावेळी तिसरे गृहस्थ असे म्हणाले की, "मी जर गुरुदेवांच्या ठिकाणी असतो; तर या बाईंची चांगलीच खरडपट्टी काढून त्यांची फजिती केली असती." लोकांचे हे सर्व बोलणे श्रीस्वामीमहाराजांमी ऐकले होते; पण त्यावेळी त्या बाईंना किंवा लोकांना श्रीस्वामी-महाराज काहीच बोलले नाहीत.

अशा रीतीने काही दिवस गेल्यानंतर त्या बाई श्रीस्वामीमहा-राजांना असे म्हणाल्या की, "आम्ही सर्वजण आता आमच्या गावी जातो; तरी आपण मला काही उपदेश द्यावा." त्यावेळी श्रीस्वामी-महाराजांनी "श्रीदत्त" म्हणून एका कागदावर पुढील श्लोक लिहून त्या बाईंना दिला.

**जळीं स्थळीं सर्वहि वस्तुमाजीं । व्यापूनि राहेचि तयासिराजो ।**
**जो ठेवि भावें नर हो कृतार्थ । तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥**

हा श्लोक त्या बाईंना दिल्यावर त्या बाई श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "महाराज ! मला वाचता येत नाही. त्यावेळी त्या बाईंच्या जवळ त्यांच्या गावाची मंडळी उभी होतीच ! त्यांच्या-कडे वळून श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "हल्लीच्या सुनांना वाचता येते, नाही का ?" श्रीस्वामीमहाराजांना काय सुचवावयाचे होते ते सर्वजण समजले. त्यांना नकळतच त्या बाईंच्या बरोबर त्यांनाही गुरूपदेश झाला. पुढल्या वेळी श्रीस्वामीमहाराज जेथे होते तेथे त्या बाई आपला मुलगा व सून यांच्यासह दर्शनाला आल्या. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्या बाईंच्यामध्ये नकळत सुधारणा झाली. नाशिककर मंडळींनाही या गोष्टीमुळे बोध मिळाला.

श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्या बाईच्या गृहस्थाश्रमात " आजि आनंद आनंद । मनीं भरला पूर्णानंद ॥ " होऊन राहिला.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनी सत्संगाच्या महात्म्याचे जे तीन अभंग लिहिले आहेत त्याचे स्मरण होते व असे वाटते की, त्यांनी उपदेशिल्याप्रमाणे जर आपल्या बहुभाग्याने आपणास सत्संग मिळाला तर आपले जीवन धन्य व कृतार्थ झाल्याशिवाय राहणार नाही.

## ॥ अभंग ॥

सदा संतांपाशी जावें । त्यांचें जवळीं बैसावें ॥ १ ॥
उपदेश ते न देती । तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥ २ ॥
तेचि उपदेश होती । त्याही कष्ट नष्ट होती ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे संत । संगे करिती पसंत ॥ ४ ॥

★ ★ ★

चंदनाचें वनीं अन्यवृक्ष वसे । चंदन होतसे शीत सुगंध ॥ १ ॥
चंदनाचे परी तोही ताप वारी । शीतलता करी बरी सर्वां ॥ २ ॥
दैवें संतांचिया जवळी राहती । तेही संत होती गती दाते ॥ ३ ॥
कर्म उपासना सांगूनि तें ज्ञान । उद्धरती दीनजनांतें ही ॥४ ॥
ते त्रिविध पाप वारिती त्रिताप । तेचि दत्तरूप वासु म्हणे ॥ ५ ॥

★ ★ ★

सेवावे संत जन । वंदावे लीन होऊन ॥ १ ॥
उदार संत मुक्त । करिती ते कर्मबाधित ॥ २ ॥
पुण्य पाप जे संतांचें । हिशेदार असती त्याचे ॥ ३ ॥
संतांच्या सकृता घेती । जे भावें त्यां सेविती ॥ ४ ॥

संतांच्या पापा घेती । जे दुष्ट त्यां द्वेषिती ॥ ५ ॥
वासुदेव म्हणे संतां । दत्त मानी आत्मवत् ॥ ६ ॥

  

अशा रीतीने श्रीक्षेत्र हावनूर येथे आलेल्या भक्तजनांचा उद्धार करीत व त्यांना अध्यात्माच्या मार्गाला लावीत असताना श्रीक्षेत्र हावनूर येथील श्रीस्वामीमहाराजांच्या चातुर्मासाचा काळ संपत आला. वास्तविक पाहता लोकांची उपाधी टाळण्यासाठी निवांत ठिकाण म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी या ठिकाणी चातुर्मास करावयाचे ठरविले होते. तेथे त्यांना पहिले १५–२० दिवसच थोडी फार विश्रांती मिळाली असेल तेवढीच. कस्तुरीचा सुवास लपवून कसा ठेवता येणार ? त्यामुळेच हावनूर सारख्या कमी वस्तीच्या व विशेष वर्दळ नसलेल्या गावाला श्रीस्वामीमहाराजांच्यामुळे गजबजलेल्या नगराचे स्वरूप प्राप्त झाले. जणूकाही दोन महिने न ओसरणारी यात्राच हावनूरला भरली होती.

श्रीस्वामीमहाराजांनी चातुर्मास पूर्ण होताच भाद्रपद पौर्णिमेला सीमोल्लंघन केले. त्यावेळी गावातील व गावाबाहेरची बरीच मंडळी त्यांच्या बरोबर सीमोल्लंघनासाठी आली होती. सर्व लोक भजन करीत गावाबाहेर गेले. श्रीक्षेत्र हावनूरची सीमा ओलंडल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीमद् भगवद्गीतेचा अकरावा अध्याय म्हटला. त्यानंतर प्रसाद वाटून सर्व मंडळी पुन्हा भजन करीत करीत श्रीस्वामीमहाराजांसह श्रीत्रिपुरान्तकेश्वराच्या मंदिरात परत आली. दुसऱ्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी जाण्याची तयारी केली तेव्हा सर्व लोक त्यांना आणखी काही दिवस राहण्याचा खूपच आग्रह करताना असे म्हणाले की, “महाराज ! आपल्या आगमनाने

आमच्या सारख्या शेकडोशे जडजीवांचा उद्धार झाला. आपण कशाकरिता जन्माला आलो, आपल्याला कोठे जावयाचे आहे, आपल्या जीवनाचा हेतू काय आहे ? इत्यादि कितीतरी गोष्टी आम्हाला कळल्या. आपला सत्संग लाभला नसता; तर आणखी शेकडोशे जन्म गेले असते तरी आमचा देहभाव नष्ट होण्याला सुरुवात झाली नसती. आपल्या कृपेने व आपण दिलेल्या साधनानेच आमची देहात्मबुद्धी दूर होऊन आम्ही जन्ममरणचक्रपरंपरेतून मुक्त होऊ शकू. याकरिता आम्हा सर्वांना असे वाटते की, आपण जर येथे आणखी काही दिवस राहिला तर आमचा आत्मभाव वृद्धिगत होऊन आमच्या सर्वांच्या जीवनाचे सोने होईल. आपण आम्हा सर्वांच्या प्रार्थनेचा स्वीकार कराल अशी आम्हाला आशा आहे." इतके बोलून सर्व लोक हात जोडून उभे राहिले. येथ एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की, श्रीक्षेत्र हावनूर हे गाव कर्नाटकात येत असल्यामुळे तेथील सर्व लोकांची भाषा कानडी होती. श्रीस्वामीमहाराज मराठी भाषिक होते; पण भाषाभेदाचे बंधन लोकांच्या भक्तिप्रेमाच्या आड आले नाही. या आनंद सोहळ्यात हृदयाची भाषा चालत होती व हृदयाचे कान करून ती ऐकली जात होती !

श्रीस्वामीमहाराजांनी तेथून निघण्याचे निश्चित ठरविले असल्यामुळे श्रीक्षेत्र हावनूर येथील सर्व लोकांचा आग्रह न मानता ते तेथून पुढे निघाले. त्या दिवशी ते तुंगभद्रा तीरावरील श्रीक्षेत्र गळगनाथ येथे गेले. श्रीगळगनाथ देवस्थानात श्री. चिक्काप्पाशास्त्री म्हणून एक अत्यंत विद्वान्, प्रेमळ व ईश्वरभक्त ब्राह्मण गृहस्थ राहात असत. त्या दिवशी त्यांच्याकडे भिक्षा करून ते श्रीक्षेत्र हावनूर येथे परत आले. त्या दिवशी गुरू हा तूळ राशीला आल्यामुळे पर्वणी काल होता; कारण गुरू हा तुळेला आला की, श्रीगंगामाता ही

तुंगभद्रेला मिळते अर्थात् एक वर्षभर श्रीगंगामातेचा तुंगभद्रेत वास होऊन तिच्यामध्ये त्या काळात स्नान केल्यास श्रीगंगामातेच्या स्नानाचेच फळ मिळते, असे शास्त्रकारांनी सांगितले आहे. श्रीस्वामी-महाराजांनी या पर्वकाळात तेथे श्रीतुंगभद्रागंगेमध्ये स्नान केले व तेथील सुवासिनी स्त्रियांना हळदी-कुंकू देऊन खण दिले. शास्त्री-मंडळींना उपरणी, मुलांना खाऊ व इतरांना नारळ-प्रसाद देऊन श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र हावनूर येथील मंडळींचा निरोप घेतला.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र हावनूर येथून निघाल्यावर त्यांचा पुढील संचार श्रीतुंगभद्रा नदीच्या किनाऱ्या किनाऱ्याने चालला होता. यावेळी या प्रवासात श्रीक्षेत्र हावनूर येथे श्रीस्वामीमहा-राजांच्या सेवेमध्ये येऊन राहिलेली श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील काही भक्त मंडळी होती. त्यामध्ये वाडीच्या काही पुजाऱ्यांच्या मुलीही होत्या. ही सर्व मंडळी व त्या मुली बरोबर असल्यामुळे इतर वेळी एकटे प्रवास करणारे व मनोवेगाने जाणारे श्रीस्वामी-महाराज त्यांच्या चालीने चालत चालत व त्यांना नाना प्रकारे आत्मबोध करीत करीत चालले होते. या प्रवासात ते श्रीतुंगभद्रा व वर्धा या नद्यांच्या संगमस्थानी आल्यावर तेथे संगमात स्नान करून तेथील श्रीदत्तात्रेयांच्या मंदिरात जाऊन त्यांनी पुढीलप्रमाणे श्रीदत्तात्रेयांचा धावा केला.

उद्धरिं गुरुराया । अनसूया-तनया दत्तात्रेया ।। ध्रु. ।।
जो अनसूयेच्या, भावाला, भुलुनियां सुत झाला ।।
दत्तात्रेय अशा, नामाला, मिरवी, वंद्य सुराला ।।
तो तूं मुनिवर्या, निज पायां, स्मरतां वारिसि माया ।। १ ।।

जो माहूरपुरीं, शयन करी, सह्याद्रीचें शिखरीं ॥
निवसे, गंगेचें स्नान करी, भिक्षा कोल्हापूरीं ॥
स्मरतां दर्शन दे, वारि भया, तो तूं आगमगेया ॥ २ ॥
तो तूं वांझेसी, सुत देसी, सौभाग्या वाढविसी ॥
मरतां प्रेतासी, जीवविसी, सद्वरदाना देसी ॥
यास्तव वासुदेव, तव पाया, धरि त्या तारीं सदया ॥ ३ ॥
उद्धरिं गुरुराया। अनसूया–तनया दत्तात्रेया ॥ ध्रृ. ॥

या ठिकाणाहून निघून पुढे ते आगठी येथे आले. तेथील मठामध्ये एक दिवस मुक्काम करून पुढे राणीबिन्नूर नजीक कुपेलूर येथे नवरात्रात श्रीशारदोत्सव व श्रीसरस्वतीपूजन करून शिमोग्यावरून श्रृंगेरी येथे आले. त्यावेळी श्रृंगेरीमठाचे श्रीशंकराचार्य मठात नव्हते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी मठातील श्रीशंकराचार्यांच्या गादीला वंदन करून त्यांची पुढील प्रमाणे स्तुती केली.

## ॥ श्रीशंकराचार्यस्तुतिः ॥

श्रीमद्भगवत्पूज्यपदेश्वर। वैदिकमार्गस्थापक शंकर ॥
शिवावतार श्रीमच्छंकर। किंकर हरहर त्राहि यतीश्वर ॥ १ ॥
शिवगुरुसद्गृहावतीर्ण मोहांतक। जनशिक्षक तारक दान्त ॥
खण्डितपण्डितसंहतिमंडित। मण्डनपण्डितदुर्मतशान्त ॥ २ ॥
विजितासंगतशास्त्रासंमतसौगतबौद्धादिकराद्धांत ॥
प्रस्थानत्रयभाष्यकृदद्वयसततसंस्थापक दृढसिद्धान्त ॥ ३ ॥
वृषभूकमठान्यो दिक्षु मठान्। कृत्वा चतुरस्तत्र चतुरः ॥
सुरेश्वरार्यप्रमुखान् चतुरानयोजयद्यो शिष्यांश्चतुरः ॥ ४ ॥

श्रीमत्परमहंसपरिव्राजक । श्रीमच्छंकराचार्यमशोकं ।।
वासुदेवयतिर्भक्त्या नमति । स्तुत्वा यथामति पावतिलोकम् ।। ५ ।।

।। इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती-विरचिता श्रीशंकराचार्यस्तुतिः संपूर्णा ।।

अर्थ :– हे श्रीमान् भगवन् श्रीशंकराचार्यमहाराज ! आपले चरण नेहमीच अत्यन्त पूजनीय व वंदनीय असे आहेत. आपण सर्व समर्थ असून वैदिकमार्गाची अर्थात् वेदप्रणीत वर्णाश्रमधर्ममार्गाची स्थापना करणारे आहात. हे कल्याणकर्त्या श्रीशंकरा ! आपण शिवाचे अवतार म्हणजे मानवरूपी शिव आहात. हरिहरइंद्रादि देव आपले सेवक आहेत. आपण सर्वश्रेष्ठ असे संन्यासी आहात. आपण माझे रक्षण करा. ।। १ ।।

हे श्रीमान् भगवन् श्रीशंकराचार्यमहाराज ! आपण सत्कुलीन अशा शिवगुरूंच्या घरी अवतार धारण केलात. आपण जीवाच्या मायामोहाचा नाश करणारे, लोकांना आत्मविद्याप्राप्तीचे शिक्षण देऊन भवसागरातून परतीराला नेणारे व इंद्रियांना ताब्यात ठेवणारे म्हणजे इंद्रियनिग्रही अर्थात् जितेन्द्रिय आहात. आपण नास्तिक पंडितांच्या मतांचे खंडन केल्यामुळे वैदिकमताभिमानी लोकांकडून सन्मानित आहात आणि पंडित मंडनमिश्रांच्या दुष्टमतांचे निराकरण करणारे शांत संन्यासी आहात. ।। २ ।।

हे श्रीमान् भगवन् श्रीशंकराचार्यमहाराज ! आपण सांख्य-न्यायादिशास्त्रांना सम्मत नसलेल्या म्हणजे सर्वथैव विसंगत असलेल्या बौद्धजनांच्या सिद्धान्तांना अर्थहीन केले आहे. आपण प्रस्थानत्रयीवर म्हणजे ब्रह्मसूत्रे, उपनिषदे व श्रीमद् भगवद्गीता यांवर प्रसन्न व गंभीर असे भाष्य केले आहे. आपण अद्वैतमताचे संस्थापक आहात.

आपले सिद्धान्त दृढ म्हणजे अपरिवर्तनीय अर्थात् न बदलणारे म्हणजे स्थिर असे आहेत. ।। ३ ।।

हे श्रीमान् भगवन् श्रीशंकराचार्यमहाराज ! आपण आपले कमंडलू हे धर्मोत्पादक चिन्ह म्हणून चारही दिशात ठेवून स्वचातुर्याने तेथे चार मठांची स्थापना केली आणि त्या मठात श्रीसुरेश्वराचार्यप्रभृती अशा चार चतुर व धार्मिक शिष्यांची योजना केली. ।। ४ ।।

अशा शोकादिरहित आणि लोकांना पावन व शुद्ध अर्थात् निर्मल करणाऱ्या श्रीमत् परमहंस, परिव्राजकाचार्य, श्रीशंकराचार्यांचे यथामती स्तवन करून हा श्रीवासुदेवानन्दसरस्वतीयती त्यांना परमभक्तीने नमस्कार करतो. ।। ५ ।।

।। अशा रीतीने श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती यांनी रचलेले श्रीमदाद्यशंकराचार्यांचे स्तुतिस्तोत्र पूर्ण झाले. ।।

अशा रीतीने श्रीमद् शंकराचार्यांना स्तुतिरूप वंदन करून श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र हरिहर येथे जाऊन श्रृंगेरीस पुन्हा परत आले. इ. स. १९०७ मध्ये श्रीस्वामीमहाराजांची व श्रीमद्शंकराचार्यांची भेट श्रीरंग येथे झाली होती. ( खंड दुसरा पृष्ठ २८२ ते २८४ ) त्यावेळी येथील मुक्कामात श्रीशंकराचार्यांनी श्रीस्वामीमहाराजांचा अपरंपार महिमा आपल्या सर्व अनुयायांना सांगितला होता. त्यामुळे तेथील मठवासीयांनी श्रीस्वामीमहाराजांना मठात वास्तव्य करण्याची प्रार्थना केली; परंतु मठात न थांबता श्रीस्वामीमहाराजांनी श्रीतुंगभद्रेच्या पैलतीरावर असलेल्या नृसिंहवनामध्ये १५ दिवस मुक्काम केला. तेथे राहून ते दररोज तेथून एक मैल दूर असलेल्या वैकुंठपुरी या नावाच्या गावात भिक्षेसाठी जात असत.

त्यानंतर श्रीस्वामीमहाराज श्रृंगेरीहून निघून अरण्यमार्गाने वाटचाल करीत कार्तिक महिन्यात बनवासी येथे येऊन राहिले. बनवासी येथे श्रीमधुकेश्वराच्या मंदिरात श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम दीड महिन्यापेक्षा अधिक काळ होता. या ठिकाणी श्रीमधुकेश्वर म्हणून एक शिवलिंग दीड पुरुष उंचीचे असून श्रीनंदिकेश्वर महादेवाचे लिंग दोन पुरुष उंचीचे आहे. या दोन्ही शिवलिंगांची स्थापना मधुकैटभ दैत्यांनी केली असे सांगतात. या ठिकाणी बरीच अधिकारी शिष्य मंडळी होती. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना शिक्षा व तैत्तरीय उपनिषदांचे भाष्य समजावून सांगितले. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांनी त्यांना "षट्पंचाशिका" या नावाचे पुढील प्रमाणे एक स्तोत्र करून दिले.

## ॥ षट्पंचाशिका स्तोत्र ॥

त्र्यात्मा सच्चित्सुखो दत्तो रक्तोष्णाकाशदीपवत् ॥
मायाब्धिनौर्दृढाऽसंगा तद्भक्तिर्न तथा प्लवः ॥ १ ॥
भवाध्वतापश्रान्तस्य सीतारामः समाश्रयः ॥
यथाध्वतापश्रान्तस्य शीतारामः समाश्रयः ॥ २ ॥
भवांबुधिनिमग्नस्य तारिणी भगवत्कथा ॥
यथांबुधिनिमग्नस्य तरर्णिर्विधिचोदिता ॥ ३ ॥
भवतापाभितप्तस्य शरणं न गुरोः परम् ॥
दवतापाभितप्तस्य शरणं न घनात्परम् ॥ ४ ॥
रोचते सुविरक्तस्य न सांसारिकपुंकथा ॥
यथा पित्तज्वरार्तस्य सुरसान्नादिसत्कथा ॥ ५ ॥
श्रृणोति सर्वं संन्यस्य श्रुतिवार्तां स आदरात ॥
परव्यसनिनी नारी जारवार्तां यथाऽऽदरात् ॥ ६ ॥

कथंचन त्यजेन्नैव विवेकी शान्तिगेहिनीम् ॥
यथा कामाग्निसंतप्तोऽविवेकी कान्तगेहिनीम् ॥ ७ ॥
मुक्तिर्न सुलभाऽध्यासभातनानात्वदर्शिनः ॥
आदर्शबिंबितानेकद्वारदर्शिशिशोरिव ॥ ८ ॥
धीमांछमादिसंपन्नः सद्गुरूक्त्या लभेत्पदम् ॥
चोरैस्त्यक्तो वने यद्वत्तदभिज्ञगिरा नरः ॥ ९ ॥
भावान्भूमेत्यकर्तात्मत्वं व्रजेत्सद्गुरोर्गिरा ॥
भिल्लपालितराट्पुत्र आप्तोक्त्या राजतामिव ॥ १० ॥
कूटस्थसच्चिदानन्दतनोर्बन्धविमोचने ॥
पुत्रस्य जातिवन्ध्याया इव जन्मोत्सवात्ययौ ॥ ११ ॥
वाचरंभणमात्रं चित्तनौ विश्वं न चापरम् ॥
वस्त्वन्तरं यथा ध्वान्ते रज्जौ सर्पविसर्पणम् ॥ १२ ॥
विषयग्रहणेच्छा तु स्वात्मविज्ञानतः पुरा ॥
अज्ञस्य शुक्तिविज्ञानात्पुरेव रजतस्पृहः ॥ १३ ॥
भ्रममात्रमसद्विश्वं ज्ञातं चेत्तेन कः सुखी ॥
को नामशुक्तिरौप्येण जातो धनसमृद्धिमान् ॥ १४ ॥
जगदस्तित्ववादो न स्वात्मज्ञाने प्रकाशिते ॥
ध्वान्ते स्थाणौ पिशाचादिभ्रान्तिर्दीप इवाहृते ॥ १५ ॥
आश्चर्यमेतद्विश्वं न पुराद्योर्ध्वं च भाति चेत् ॥
भातु नामेन्द्रजालभं चिदात्मनि तु मायया ॥ १६ ॥
असच्चेज्ज्ञस्य नेतोपि व्यवहारः क्षणं कुतः ॥
नायं दोषोऽपि जानन्सन्निन्द्रजालं हि वीक्षते ॥ १७ ॥
एकोऽपि सन्नयं भूमा मायया भात्यनेकवत् ॥
पुंसो यथाक्षि दोषेण चन्द्र एको द्वितीयवत् ॥ १८ ॥

आत्मोपाधिवशाद्भाति निश्चलोऽपि हि चंचलः ॥
विकारी निर्विकारोऽपि जलोपाधिगतार्कवत् ॥ १९ ॥
नित्यं भ्रमदिवाभाति मायाभ्रमविजृंभितम् ॥
जगच्चक्रं यथाऽलातचक्रं भ्रान्तदृशेरिह ॥ २० ॥
विद्योतते नात्मविद्या यावत्तावच्चिदंबरे ॥
विविधं भाति विश्वं खे गन्धर्वनगरं यथा ॥ २१ ॥
आरोपितजगद्बाध आत्मैकः परिशिष्यते ॥
शत्रून्हत्वाखिलान्युद्धे महावीरो यथैककः ॥ २२ ॥
विक्षेपः शिष्यते मायावरणेऽपि विघातिते ॥
उपादाने विनष्टेपि कार्यं तिष्ठति हि क्षणम् ॥ २३ ॥
समे प्रारब्धभोगेऽपि ज्ञानी क्लिश्यति नाज्ञवत् ॥
समेऽप्यध्वश्रमेऽध्वज्ञो दैन्यं नैति यथाज्ञवत् ॥ २४ ॥
पतत्वद्य युगान्ते वा वपुर्मुक्तस्य चित्तनोः ॥
कुंभे भग्ने स्थिते वा द्योर्हानिलाभौ कुतस्ततः ॥ २५ ॥
सङ्कल्पमात्रं विश्वं सद्भाति मन्दमतेर्यथा ॥
सङ्कल्पमात्रभाता स्त्री सत्या विरहिणो भ्रमात् ॥ २६ ॥
स्वस्वरूपस्थितौ सत्यां दुःखं नैव सुखात्मनि ॥
यथा वास्यादिके त्यक्ते कष्टं त्वष्टरि नैव तत् ॥ २७ ॥
नाध्यात्मिकादिच्छन्नोऽपि जात्वेकरसतां विभुः ॥
त्यजत्यात्मा यथा लोके पटतां चित्रितः पटः ॥ २८ ॥
कामं सृजतु कूटस्थे माया विश्वं चिदम्बरे ॥
नास्य लाभो न वा हानिर्वर्षत्यब्दे यथा दिवः ॥ २९ ॥
करणव्यवहारैस्तु कूटस्थात्मा न लिप्यते ॥
न लिप्यते यथा कूटो लोहानामपि ताडनैः ॥ ३० ॥

तत्तन्मय इवाभातोऽप्यात्मा कोशेभ्य उत्तरः ॥
तेभ्यो विवेचितः शुद्धः स्फटिको रङ्गतो यथा ॥ ३१ ॥
मुक्तात्मा व्यवहारेऽपि स्थितस्तेन न लिप्यते ।
असंगत्वात्ततोन्यत्वात्पद्मपत्रमिवांभसा ॥ ३२ ॥
देहादितापतप्तोऽहमिति धी विवेकिनः ॥
पुत्रदारेषु तप्यत्सु तपामीति मतिर्यथा ॥ ३३ ॥
सच्चिदानंदरूपोऽहमेवं निश्चयवानपि ॥
मर्त्योऽस्मीति कदाचिद्दिग्भ्रमवन्मनुते क्षणम् ॥ ३४ ॥
निराकृत्य त्यजेद्विश्वं सारमास्वाद्य नीरसम् ॥
यथा त्यजति निःसारं फलं स्वादु रसं पिबन् ॥ ३५ ॥
नात्यन्तासन्ननात्मानं मूढः पश्यति दुष्टदृक् ॥
यथा दिवान्ध उदितमर्कं लोकप्रकाशकम् ॥ ३६ ॥
विभाव्याज्ञोऽन्यं प्रपंचं सुखं चापि बिभेति यः ॥
दीपादितो दृश्यमानां स्वच्छायामिव बालकः ॥ ३७ ॥
माया खादिविकारैर्न ब्रह्मान्यथयितुं क्षमा ॥
विमलं खं यथाऽभ्यरतधर्मा मलिनतादयः ॥ ३८ ॥
व्यभिचारिसुषुप्त्यादिदशा बुद्धिगुणोदिताः ॥
बुधे स्वीया न निर्मोका यथा सर्पगुणोदिता ॥ ३९ ॥
व्यवहारोऽङ्गतापेक्षः स्वप्नो जाग्रदितीक्षितुः ।
गृहिणो गेहतापेक्षबाह्यान्तर्व्यवहारवत् ॥ ४० ॥
यस्य निद्रा समाधिर्वा सुखा सर्वोपसंहृतिः ॥
व्यापाराकुलितस्येव सुखा सर्वोपसंहृतिः ॥ ४१ ॥
कामं करोतु विधितो मुक्तः कर्तास्य तेन किम् ॥
स्तोकाभ्रच्छादितोऽर्को यो राहुग्रस्तो भवेत्स किम् ॥ ४२ ॥

मिथ्याजगत्समुल्लासात्प्रबुद्धस्य कथं भयम् ॥
व्याघ्रादीन्पश्यतः स्वप्नात्प्रबुद्धस्य कथं भयम् ॥ ४३ ॥
आदेयात्मनिरीक्षार्थमनात्मधियमुज्ज्वलाम् ॥
यथाऽऽस्यहीनमुकरो मुखसौन्दर्यवीक्षणे ॥ ४४ ॥
क्रमेण वर्धमानेऽन्तर्बोधे हार्दतमःक्षयः ॥
कलाभिर्वर्धमानेऽब्जे यथा नैशतमःक्षयः ॥ ४५ ॥
प्राज्ञोऽपि बोधितोऽन्तर्दृग्जानात्यन्यन्न किंचन ॥
ग्रासे ग्रासे बोधितोऽपि निद्राण इव बालकः ॥ ४६ ॥
स्वानुभूतिरसास्वादे विषया विरसा विदः ॥
यथाऽऽरनालं विरसं परमामृतपायिनः ॥ ४७ ॥
पूर्वाभ्याससमाधिं ज्ञो वांछत्याप्ताखिलात्मनः ॥
कालात्ययाय राजेव सुसमृद्धोऽपि देवनम् ॥ ४८ ॥
नाऽऽनन्दयति विध्यादि निस्त्रैगुण्याध्वचारिणम् ॥
निर्व्यापारालसनरं देशिका देशिनं यथा ॥ ४९ ॥
चिन्तयानोऽपि तत्त्वं स्वं स्वच्छन्दो न नियम्यते ॥
साम्राज्यगं स्वतन्त्रं च प्रजाभिरिव राट्सुतः ॥ ५० ॥
परमार्थदृशः क्वापि नेष्टानिष्टे शुभाशुभे ॥
वृष्ट्याऽवृष्ट्याप्पूरस्थसस्यवृद्धिक्षयाविव ॥ ५१ ॥
श्रुत्याद्यावृत्तियोगाग्न्युज्ज्वलितः पूर्वरूपभाक् ॥
जीव आत्मैव चागन्तुमलदाहे सुवर्णवत् ॥ ५२ ॥
कीटभ्रमरदृष्ट्या न चित्रं स्वध्यानतः स्वता ॥
नामरूपोपाध्यपाये सत्यैक्यं सरिदब्धिवत् ॥ ५३ ॥
चित्रप्रापंचिकैश्वर्यं तत्त्वज्ञं रंजयेत्कथम् ॥
हावैः स्त्रीवेषधृक्स्वज्ञहृदुन्मथयतीह किम् ॥ ५४ ॥

ज्ञानी क्षीणान्यकर्मापि प्रारब्धं सहतेऽवशी ॥
व्यालग्राही गृहीताहिर्यथा तत्कृतपीडनम् ॥ ५५ ॥
प्राप्तकामं स्थितप्रज्ञं स्वयं कामा विशन्ति तैः ॥
शान्तो नोत्सर्पति यथा पूर्णाब्धिरचलांबुभिः ॥ ५६ ॥
या षट्पंचाशिका वासुदेवानन्दीयमुद्गता ॥
वानवासीपुरि तया प्रीयतामत्रिनन्दनः ॥ ५७ ॥

॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य वासुदेवानंदसरस्वती विरचिता षट्पंचाशिका संपूर्णा ॥

अर्थ :—श्रीदत्तात्रेय त्रिगुणात्मक म्हणजे आत्मा अर्थात् जीवात्मा, परमात्मा व जगदात्मा किंवा सत्त्व, रज व तम अथवा सत्, चित् व आनंदस्वरूपी असून ते आकाशातील दिव्याप्रमाणे अर्थात् सूर्याप्रमाणे तांबडे व उष्ण आहेत. त्यांची भक्ती ही मायिक संसारसागरातून परतीरास नेणारी अशी स्वतंत्र अर्थात् असंग व दृढ म्हणजे बळकट अशी नौका आहे. इतर नौका अशा नसतात. ॥ १ ॥

ज्याप्रमाणे उन्हातून चालल्यामुळे घामाघूम झालेल्या प्रवाशाला थंड वृक्षराई जशी सुख देते किंवा सुखकारक आश्रय देते त्याप्रमाणेच संसाररूपी अरण्यात भटकून भटकून त्रस्त, संतप्त व दुःखी झालेल्या मनुष्याला सीतापती श्रीराम हेच श्रेष्ठ व सुखदायक असे आश्रयस्थान आहे. ॥ २ ॥

ज्याप्रमाणे समुद्रात गटांगळ्या खाणाऱ्या मनुष्याला कर्मधर्मसंयोगाने आढळलेली नाव तारून नेते त्याप्रमाणे भवसागरात बुडणाऱ्या मनुष्याला श्रीभगवन्ताची कथा ही तारून परतीराला सुखरूप नेऊन पोहचविते. ॥ ३ ॥

ज्याप्रमाणे वणव्याने पोळलेल्या माणसाला मेघावाचून अर्थात्

पर्जन्यवृष्टी करणाऱ्या ढगाशिवाय दुसरा रक्षक नाही त्याप्रमाणे संसारातील विविधतापाने गांजलेल्या जीवाला श्रीसद्गुरुंशिवाय दुसरा कोणताही रक्षक, आधार किंवा अभयदाता नाही. ।। ४ ।।

ज्याप्रमाणे पित्तज्वराने पीडलेल्या रोग्याला सुमधुर पक्वान्नांचे वर्णन आवडत नाही त्याप्रमाणे खऱ्या वैराग्यसंपन्न साधकाला संसारात आसक्त असलेल्या माणसांच्या गोष्टींमध्ये रस वाटत नाही. ।। ५ ।।

ज्याप्रमाणे जारकर्म करणारी स्त्री जारपुरुषांच्या गोष्टी जितक्या आदराने अर्थात् लोभाने किंवा मोहाने ऐकत असते त्याप्रमाणे तो ( विरक्त साधक ) सर्वस्वाचा त्याग करून वेदवेदान्तवचने अर्थात् ब्रह्मज्ञानचर्चा अत्यन्त श्रद्धेने व अत्यादराने ऐकत असतो. ।। ६ ।।

ज्याप्रमाणे अविवेकी म्हणजे अज्ञानी अर्थात् कामाग्नीने होरपळलेला विषयी पुरुष सुंदर कामिनीला सोडून राहू शकत नाही त्याप्रमाणे विवेकी म्हणजे ज्ञानी अर्थात् ब्रह्मज्ञानसंपन्न पुरुष शांतिरूप पत्नीला कशाही परिस्थितीत सोडून राहात नाही. ।। ७ ।।

ज्याप्रमाणे आरशांमध्ये प्रतिबिंबित झालेल्या अनेक द्वारांना पाहणाऱ्या मुलाला खोलीतून बाहेर पडणे कठिण आहे त्याप्रमाणे अध्यासामुळे भासमान अशा अनेक पदार्थांना पाहणाऱ्या मनुष्याला या संसारात मोक्षलाभ किंवा मुक्तीची प्राप्ती करणे कठिण आहे. ।।८।।

ज्याप्रमाणे वनात चोरांनी लुबाडला गेलेला माणूस अरण्यातील मार्ग जाणणाऱ्या वाटाड्याकडून मार्ग जाणून घेऊन आपल्या गावी परत जातो त्याप्रमाणे शमदमादिसंपन्न साधक श्रीसद्गुरूंकडून साधनमार्ग मिळवून पद म्हणजे श्रेष्ठस्थान अर्थात् मोक्ष प्राप्ती करून घेतो. ।। ९ ।।

ज्याप्रमाणे भिल्लांच्या झोपडीत वाढलेला राजपुत्र आपल्या

हितकर्त्यांच्या वचनाने पुन्हा राजपद प्राप्त करतो त्याप्रमाणे श्रीसद्-गुरूंच्या तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि, अयमात्मा ब्रह्म व प्रज्ञानं ब्रह्म या चार महावाक्यांच्या उपदेशाच्या द्वारा शिष्य, "तूच ते ब्रह्मतत्त्व आहेस, तू ब्रह्मच आहेस, तू व्यापक ब्रह्म आहेस, तुला सर्वात्मकत्व आहे, तू सर्वात्मा आहेस, हे ज्ञान मिळवितो. ॥ १० ॥

ज्याप्रमाणे जन्मतः वांझ असलेल्या स्त्रीच्या मुलाचे बारसे आणि मृत्यू हे जसे खोटे असतात त्याप्रमाणे कूटस्थ व सच्चिदानन्दरूपी जीवात्म्याचे जन्ममृत्यू हे खोटे आहेत. ॥ ११ ॥

ज्याप्रमाणे मंद अंधकारात दोरीवर सर्पाचा आभास झाला किंवा सळसळ भासली तरी प्रत्यक्षात त्या ठिकाणी दुसरी वस्तू नसल्याने तो आभास खोटा असतो त्याप्रमाणे चिद्रूपावर हे विश्व आहे असा आभास झाला तरी ते नाममात्र वाचेने उच्चारण्यापुरते असल्याने विश्व नावाची कोणतीही वेगळी वस्तू नसल्याने तो आभास खोटा असतो. ॥ १२ ॥

ज्याप्रमाणे शिंपीवर भासणाऱ्या चांदीची इच्छा "ही ती शिंप आहे," असे ज्ञान होण्यापूर्वी असल्यामुळे, अशा प्रकारचे ज्ञान झाल्या-वर ही इच्छा नाहीशी होते त्याप्रमाणे अज्ञानी मनुष्याला विषयांची ओढ अर्थात् तीव्र इच्छा आत्मज्ञान होण्यापूर्वी असल्यामुळे, अशा प्रकारचे आत्मज्ञान झाल्यावर विषयेच्छा नाहीशी होते. ॥ १३ ॥

ज्याप्रमाणे शिंपीवरील चांदीमुळे कोणी धनवान् किंवा श्रीमंत होत नाही; कारण श्रीमंत होण्यासाठी खऱ्या चांदीचीच अपेक्षा असते त्याप्रमाणे हे विश्व खोटे व केवळ भ्रम आहे असे नुसते ज्ञान झाल्याने कोणीही सुखी होत नाही; कारण अशा प्रकारे होणाऱ्या ज्ञानाने सुखी होण्यासाठी त्या दृष्टीने आमरणान्त साधनचतुष्टय-संपन्न आचरणाचीच अपेक्षा असते. ॥ १४ ॥

ज्याप्रमाणे अंधारात खांबावर भासणारा भूत-पिशाच्चादिकांचा भ्रम तेथे दिवा आणल्यावर राहात नाही त्याप्रमाणे स्वात्मज्ञान झाले की, जगाच्या अस्तित्वाविषयीचा अर्थात् त्याच्या खरेपणाविषयीचा वाद संपतो म्हणजे जगत् खरे आहे असा जो खोटा भ्रम झालेला असतो तो आत्मज्ञान झाल्यावर राहात नाही व जगत् स्वप्नवत् मिथ्या आहे याचा प्रत्यय येतो. ॥ १५ ॥

पूर्वी भूतकाळी नसलेले हे विश्व ( आज-आत्ता ) वर्तमानकाळी भासत असेल व भविष्यकाळी भासणार असेल तर ते भासू देत. हे विश्व भूत-वर्तमान व भविष्यकाळी आहे असे भासते हे एक आश्चर्यच आहे; मात्र ते मायेमुळे चिद्रूपावर इंद्रजालाप्रमाणे अर्थात् जादूच्या खेळाप्रमाणे भासत असते हे लक्षात घ्यावे. ॥ १६ ॥

सर्व विश्व हे खोटे असेल तर ज्ञानी माणसाचा व्यवहार अर्थात् सर्व व्यावहारिक कामे यापुढे क्षणभरही व्हावयास नको आहेत; पण त्याचा व्यवहार होतो, हा काही दोष नाही, कारण ज्ञानी माणूसही जाणून बुजून इंद्रजालाचे अर्थात् जादूचे खेळ गंमत किंवा करमणूक वा विरंगुळा म्हणून पाहतोच ना ! ! ॥ १७ ॥

ज्याप्रमाणे एखाद्या मनुष्याला दृष्टिदोषामुळे चंद्र एक असूनही अनेक असल्याप्रमाणे वाटते त्याप्रमाणे हा चिदात्मा एक व व्यापक असा मोठा असूनही मायेच्या प्रभावाने अनेक किंवा असंख्य असल्यासारखा वाटतो अर्थात् भासतो. ॥ १८ ॥

ज्याप्रमाणे पाण्यात प्रतिबिम्बित झालेला सूर्य स्थिर असूनही चंचल आणि विकाररहित असूनही विकृतियुक्त अर्थात् हालचाल करणारा आहे असा वाटतो त्याप्रमाणे आत्मा एकच व स्थिर असूनही तो देहादि उपाधींमुळे चंचल आणि विकाररहित असूनही ( बहिरा, लुळा, पांगळा वगैरे) सविकार अर्थात् विकृतियुक्त वाटतो. ॥ १९ ॥

ज्याप्रमाणे भ्रान्तदृष्टीच्या मनुष्याला पेटलेले व चक्राकार फिरत असलेले कोलित गोलाकार आहे असे वाटते त्याप्रमाणे मायाभ्रमाने फैलावलेले हे विश्व चक्रवत् फिरणारे आहे असे वाटते. ॥ २० ॥

ज्याप्रमाणे आकाशातील गंधर्वनगर हे अनेक आकाराचे आहे असे भासत राहिल्यामुळे खरे आकाश प्रकाशित होत नाही त्याप्रमाणे जोपर्यंन्त चिदाकाशात विविध विश्व भासते तोपर्यंन्त आत्मविद्या प्रकाशित होत नाही. ॥ २१ ॥

ज्याप्रमाणे युद्धामध्ये सर्व शत्रूंना मारून टाकून एकटा महावीरच शिल्लक राहतो त्याप्रमाणे आरोपित जगाचा बाध झाल्यावर एक-मात्र आत्माच शिल्लक राहतो. ॥ २२ ॥

ज्याप्रमाणे उपादान म्हणजे मूळ कारण किंवा पदार्थाचे घटकद्रव्य ( उदा. वस्त्राचे मूळ कारण तंतू ) हे नष्ट झाले तरी कार्य ( पट किंवा वस्त्र) हे काही काळ शिल्लक राहते त्याप्रमाणे मायेची आवरणशक्ती नष्ट झाली किंवा नष्ट केली तरी विक्षेपशक्ती शिल्लक राहते. ॥ २३ ॥

ज्याप्रमाणे चालण्याचे श्रम सारखे असूनही ज्याला मार्गाचे ज्ञान आहे अशा ज्ञानी माणसाला किंवा वाटसरूला श्रमाची खंत वाटत नाही; मात्र ज्याला मार्गाचे ज्ञान नाही अशा अज्ञानी माणसाला किंवा वाटसरूला मुक्कामाच्या जवळ-दूरपणाची उगीचच चिंता किंवा खंत वाटून तो कष्टी होतो त्याप्रमाणे ज्ञानी व अज्ञानी या दोघांचा प्रारब्धभोग सारखा असला तरी ज्ञानी त्याची खंत करीत नाही; मात्र अज्ञानी त्यामुळे खिन्न किंवा कष्टी होतो. ॥ २४ ॥

ज्याप्रमाणे घडा-घट फुटला किंवा चांगला राहिला तरी त्यात प्रतिबिंबित झालेल्या किंवा सामावलेल्या आकाशाची हानी किंवा

लाभ वगैरे काहीही होत नाही त्याप्रमाणे चिदात्मज्ञानी माणसाचे शरीर आज पडले किंवा युगान्ती नाहीसे झाले तरी ज्ञानी माणसाला त्याचे काहीही वाटत नाही. ॥ २५ ॥

ज्याप्रमाणे विरही मनुष्याला भ्रमामुळे कल्पनेतली स्त्री खरी वाटते त्याप्रमाणे मंदबुद्धीच्या माणसाला केवळ कल्पनेतील विश्व सत्य वाटते. ॥ २६ ॥

ज्याप्रमाणे सुताराला आपले काम पूर्ण झाल्यावर त्या कामाच्या पूर्तीची वाकस वगैरे साधने दूर टाकताना कसलेच दु:ख वाटत नाही त्याप्रमाणे (सद्‌गुरूंनी दिलेली साधने करून) स्वत:च्या स्वरूप-स्थितीत (सतत) असणाऱ्या सुखात्म्याला अर्थात् ज्ञानी मनुष्याला (आयुष्यभर ज्ञानप्राप्तीसाठी केलेली सर्व साधने) दूर टाकताना किंवा सोडून देताना कसलेही दु:ख वाटत नाही. ॥ २७ ॥ ( या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत" लिहिलेल्या पुढील ओव्या अभ्यसनीय अशा आहेत.)

जैसें रसौषध खरें। आपुलें काज करोनि पुरें।
आपणही नुरे। तैसें होतसे ॥ १८.१०७९ ॥

देखोनि ठाकिता ठावो। धांवता थिरावे पावो।
तैसा ब्रह्मसामीप्यें थावो। अभ्यासु सांडी ॥ १०८० ॥

घडतां महोदधीसी। गंगा वेगु सांडी जैसी।
कां कामिनी कांतापासीं। स्थिर होय ॥ १०८१ ॥

नाना फळतिये वेळे। केळीची वाढी मांटुळे।
कां गांवापुढें वळे। मार्गु जैसा ॥ १०८२ ॥

तैसा आत्मसाक्षात्कारु। होईल देखोनि गोचरु।
ऐसा साधनहतियेरु। हळूचि ठेवी ॥ १०८३ ॥

म्हणौनि ब्रह्मेंसीं तया। ऐक्याचा समो धनंजया।
होतसे तैं उपाया। वोहट्ट पडे ॥ १०८४ ॥

ज्याप्रमाणे रंगविलेला कापडाचा पडदा स्वतःचे पटल म्हणजे कापडपणा टाकीत नाही अर्थात् लोक ते रंगविलेले कापड आहे म्हणूनच ओळखतात; कारण रंगविल्यामुळे कापडाचे पटत्व नष्ट होत नाही त्याप्रमाणे व्यापक आत्मा हा आध्यात्मिक तापाने झाकला गेला तरी स्वतःची एकरूपता टाकीत नाही. ॥ २८ ॥

ज्याप्रमाणे मेघाने कितीही वृष्टी केली तरी आकाशाचा लाभ किंवा हानी इत्यादि काहीच होत नाही त्याप्रमाणे चिदाकाशात कूटस्थाच्या ठिकाणी या मायेने विश्वाची उत्पत्ती केली तरी त्यामुळे कूटस्थाची हानी किंवा लाभ इत्यादि काहीही होत नाही. ॥ २९ ॥

ज्याप्रमाणें लोखंडादि धातू तोडण्यासाठी तो धातू ऐरणीवर ठेवून कितीही घाव घातले तरी ऐरणीवर त्याचा काहीच परिणाम होत नाही त्याप्रमाणे इंद्रियांच्या विविध व्यवहारांनी कूटस्थ आत्मा लिप्त होत नाही. ॥ ३० ॥

ज्याप्रमाणे विविध रंगांच्या कापडांवर किंवा कागदावर ठेवलेला स्फटिक त्या त्या रंगाचा आहे असे भासले तरी तो तसा नसून शुद्धच असतो त्याप्रमाणे अन्नमयादि पंचकोशांच्या पलीकडे असणारा आत्मा अन्नादिकोशमय भासत असला तरी विवेकपूर्वक विवेचन दृष्टया पाहिल्यास तो निर्लेप अर्थात् शुद्धच असतो. ॥ ३१ ॥

ज्याप्रमाणे पाण्यात राहूनही कमळाचे पान पाण्याने लिप्त न होता निर्लेप राहते त्याप्रमाणे मुक्तावस्थेतला जीवात्मा अर्थात् मुक्त मनुष्य व्यवहारात राहूनही अर्थात् व्यावहारिक कर्मे करूनही लिप्त होत नाही; कारण तो असंग व व्यवहारापासून भिन्न असतो. ॥ ३२ ॥

ज्याप्रमाणे आपल्या घरातील बायका-मुले वगैरे आजारी पडली

तर संसारी माणसाला मीच आजारी आहे असे वाटते त्याप्रमाणे अविवेकी मनुष्याला आत्मविस्मृतीमुळे मी देहादिक असून त्या देहादिकांच्या पीडेने पीडलेलो आहे असे वाटते. ।। ३३ ।।

ज्याप्रमाणे दिशांची योग्य कल्पना किंवा जाणीव अर्थात् ज्ञान असलेल्या माणसालाही "आपली दिशा चुकली की काय ?" असे एखाद्यावेळी वाटते त्याप्रमाणे "मी सच्चिदानंद आहे म्हणजे माझे खरे स्वरूप सत्, चित् व आनंद हे आहे", अशा निश्चयाच्या मनुष्यालाही "मी मर्त्य अर्थात् मरणधर्मी मनुष्य आहे," असे एखाद्यावेळी क्षणभर वाटते. ।। ३४ ।।

ज्याप्रमाणे एखाद्या फळातील मधुररस चाखून झाल्यावर त्यातील रसहीन भाग फेकून देतात त्याप्रमाणे विश्वातील सारभागाचा उपभोग घेऊन नीरस किंवा रसहीन भागाचे परीक्षण करून त्याचे निराकरण अर्थात् त्याचा त्याग करावा म्हणजे संसारातील रसहीन भागाची आसक्ती ठेवू नये. ।। ३५ ।।

ज्याप्रमाणे दिवान्ध म्हणजे दिवसा आंधळा असलेला माणूस उगवलेल्या व जगताला प्रकाश देणाऱ्या सूर्याला पाहू शकत नाही त्याप्रमाणे दृष्टिदोष अर्थात् विकृतियुक्त दृष्टी असलेला मनुष्य अत्यंत जवळ असलेल्या आत्म्याला पाहू किंवा ओळखू शकत नाही. ।। ३६ ।।

ज्याप्रमाणे लहान मुलगा दिवा किंवा कंदिल इत्यादिकांमुळे पडलेल्या व स्वतःला दिसणाऱ्या आपल्याच सावलीला भितो म्हणजे आपण व आपली सावली वेगळी आहे असे वाटून बालकाला भय वाटते त्याप्रमाणे मूर्ख मनुष्य हा संसार वेगळा व सुख वेगळे अशी भावना करून संसारादिकांपासून भीत असतो. ।। ३७ ।।

ज्याप्रमाणे अध्यस्त म्हणजे नसलेले किंवा कल्पिलेले असे मलिन-

तादि दोष स्वच्छ किंवा निर्मळ आकाशाला बदलवू शकत नाहीत त्याप्रमाणे आकाशादि महाभूतरूपी विकारांनी किंवा कार्यांनी युक्त अशी ही माया ब्रह्मामध्ये यत्किंचित् सुद्धा बदल करण्यास समर्थ नाही. ॥ ३८ ॥

ज्याप्रमाणे सापाच्या शरीरापासून सुटलेल्या कातीचा सापाशी काहीही संबंध राहात नाही त्याप्रमाणे अनियमितपणे बदलणाऱ्या अशा सुषुप्त्यादि अवस्था बुद्धिगुणांपासून उत्पन्न झालेल्या असल्या-मुळे त्यांचा ज्ञानी माणसाशी काहीही संबंध नसतो; कारण ज्ञानी व जाग्रदादिदशा परस्पर भिन्न अर्थात् संबंधहीन आहेत. ॥ ३९ ॥

ज्याप्रमाणे गृहस्थाला आत-बाहेर असा व्यवहार त्याच्या घरामुळे असतो त्याप्रमाणे द्रष्टयाला जाग्रत्स्वप्नादि व्यवहार दृष्टिसापेक्षतेमुळे असतो अर्थात् लांबून पाहणाऱ्याला द्रष्टा व्यवहार करताना दिसला तरी प्रत्यक्षात तो आत्मस्वरूपात स्थित असून काहीही करीत नाही अर्थात् त्याचा सर्व व्यवहार मायिक असतो. ॥ ४० ॥

ज्याप्रमाणे अनेक व्यापारांमुळे त्रस्त झालेल्या व्यक्तीस सर्व उद्योगांचा उपसंहार अर्थात् त्याग, नाश किंवा समाप्ती ही सुखकारक वाटते त्याप्रमाणे ज्ञानी माणसाला निद्रा किंवा समाधी या गोष्टी सुखदायक वाटतात; कारण निद्रासमाधीदि अवस्थांमध्ये सर्व क्रिया लुप्तप्राय झालेल्या असतात. ॥ ४१ ॥

ज्याप्रमाणे लहान ढगामुळे आच्छादित झालेला किंवा झाकला गेलेला सूर्य हा राहूने ग्रासलेला असा होईल काय? किंवा तसे वाटेल काय? त्याप्रमाणे विधिनिषेधातून मुक्त झालेल्या कर्त्या अर्थात् ज्ञानी मनुष्याने काहीही केले तरी त्याचे काहीही बिघडत नाही;

कारण मुक्त झालेल्या ज्ञानी मनुष्याला कर्मलेप होत नाही. ॥ ४२ ॥

ज्याप्रमाणे स्वप्नात पाहिलेल्या व्याघ्रादिकांचे भय जागेपणी वाटते काय ? अर्थात् वाटत नाही त्याप्रमाणे खोटचा जगाच्या अवाढव्यपणाचे किंवा विस्तृतपणाचे भय खऱ्या ज्ञानी माणसाला वाटत नाही; कारण जग हे एक दीर्घ स्वप्न आहे, याची त्याला अखंड जाणीव असते. ॥ ४३ ॥

ज्याप्रमाणे मुख नसलेला आरसा हा मुखाचे सौंदर्य पाहण्यासाठी घेतात किंवा घेतला जातो त्याप्रमाणे आत्म्याला पाहण्यासाठी धारदार अर्थात् उज्ज्वल अशी अनात्मबुद्धी साधन म्हणून वापरावी किंवा जागृत ठेवावी अर्थात् मी आत्मस्वरूप किंवा ब्रह्म आहे व इतर सर्व संसार त्याज्य, हेय किंवा अनात्म आहे असे अखंड चिंतन करावे. ॥ ४४ ॥

ज्याप्रमाणे ( शुक्लपक्षात ) चंद्र हा कलांच्या संयोगाने अर्थात् कलाकलाने क्रमशः वाढत असताना प्रत्येक रात्रीचा अंधार थोडा थोडा कमी होत जातो त्याप्रमाणे अंतर्ज्ञान, अन्तर्बोध किंवा आत्म-ज्ञान हळूहळू वाढत राहिल्यास हृदयातील तमोगुणाचा म्हणजे अज्ञानाचा क्रमशः नाश किंवा क्षय होतो. ॥ ४५ ॥

ज्याप्रमाणे झोपेने गुंगणाऱ्या मुलाला भरविताना ते मूल प्रत्येक घासाच्या वेळी तेवढ्या पुरतेच जागे होते व पुन्हा झोपी जाते त्याप्रमाणे अन्तर्ज्ञानात अर्थात् आत्मानन्दात मग्न झालेला आत्मा-नंदज्ञानी मोठ्या प्रयत्नानेही देहबुद्धीवर येत नाही अर्थात् बाहेरील विषय जाणत नाही. ॥ ४६ ॥

ज्याप्रमाणे परमामृत प्राशन केलेल्या माणसाला तांदुळाची पेज अर्थात् कांजी जशी नीरस किंवा रसहीन अर्थात् बेचव वाटते त्याप्रमाणे ज्ञानी मनुष्याला आत्मानुभवाची गोडी चाखत असताना

जगतातील शब्दस्पर्शादि सर्व विषय अत्यंत रसहीन किंवा बेचव वाटतात. ।। ४७ ।।

ज्याप्रमाणे सर्वैश्वर्यसंपन्न असा राजा देखील आपला वेळ घालविण्यासाठी द्यूत म्हणजे जुगार खेळण्याची इच्छा करतो अर्थात् द्यूत खेळतो त्याप्रमाणे "मी ब्रह्म आहे" असे निश्चित समजणारा अर्थात् असे ज्ञान झालेला ज्ञानी मनुष्यही पूर्वाभ्यासकालीन समाधि-सुखाच्या अनुभवाची इच्छा करतो. ।। ४८ ।।

ज्याप्रमाणे आळशी माणसाला उद्योगी माणसाने उद्योगाविषयी केलेला उपदेश आवडत नाही त्याप्रमाणे सत्त्वादि त्रिगुणाच्या पलीकडील मार्गावरून चालणाऱ्या मनुष्याला अर्थात् आत्मज्ञानी माणसाला वेदातील कर्तव्यपर अर्थात् विधिपर वाक्यांनी आनंद होत नाही. ।। ४९ ।।

ज्याप्रमाणे साम्राज्याचा उपभोग घेणाऱ्या स्वतंत्र अशा राज-पुत्राला प्रजा विरोध करू शकत नाही किंवा त्याला अडवू शकत नाही त्याप्रमाणे आत्मतत्त्वाचे चिंतन करणाराही आपल्या स्वभा-वाला अर्थात् इच्छेला मुरड घालू शकत नाही. ।। ५० ।।

ज्याप्रमाणे नद्या इत्यादिकांच्या पाण्यावर झालेल्या धान्याची वृद्धी व क्षय म्हणजे अवृद्धी, ही वृष्टी व अनावृष्टी यांवर अवलंबून नसते त्याप्रमाणे अध्यात्मदृष्टीच्या मनुष्याला अर्थात् तत्त्वज्ञानी मनुष्याला कोठेही काहीही शुभ व अशुभ आणि इष्ट व अनिष्ट नसते. ।। ५१ ।।

ज्याप्रमाणे अग्नीत तापविल्याने सोन्याचा आगंतुक मल जळून गेल्यानन्तर खाली शुद्ध असे खरे सुवर्ण शिल्लक राहते त्याप्रमाणे श्रुत्यादिवचनांच्या आवृत्तीने व वारंवार कथनाने प्रज्ज्वलित झालेल्या योगाग्नीने प्रकाशित झालेला पूर्वजन्मातील सुखादिकांची आठवण

करणारा जीव हा वस्तुतः आत्मा किंवा ब्रह्मच आहे अर्थात् जीव हा आत्मरूपच आहे. ॥ ५२ ॥

ज्याप्रमाणे किडयाला भ्रमराच्या ध्यासाने भ्रमरत्व येते त्याप्रमाणे आत्मध्यानाने आत्मत्व येणे हे काही नवल किंवा आश्चर्य नाही; कारण नदीचे नाम व रूप या दोन्ही गोष्टींचा संबंध किंवा उपाधी नाहीशी झाली की, नदी आणि समुद्र यांचे जलरूपाने ऐक्य किंवा एकत्व हे असतेच असते. ॥ ५३ ॥

ज्याप्रमाणे स्त्रीवेषधारी पुरुषनट हावभावकटाक्षादिकांनी त्या नटाला ओळखणाऱ्यांना (त्याच्या मित्रांना) भुलवून उद्दीपित किंवा विषयलोलुप करू शकत नाही त्याप्रमाणे चित्र-विचित्र असे प्रापंचिक किंवा सांसारिक ऐश्वर्य म्हणजे धन-दौलत-सेवक-चाकर-लवाजमा इत्यादि सर्व तत्त्वज्ञान्याला किंवा ब्रह्मज्ञान्याला रंजवू शकत नाही किंवा संतोषवू शकत नाही. ॥ ५४ ॥

ज्याप्रमाणे गारुडी हा सर्पांना पकडल्यानंतर त्या सापांचे दंश, वेटोळे व शेपटीचे तडाखे वगैरे सर्व सहन करतो त्याप्रमाणे संचित व क्रियमाण कर्म क्षीण झालेला अध्यात्मज्ञानी महात्मा मोठ्या धैर्याने प्रारब्धकर्म भोगतो किंवा सहन करतो. ॥ ५५ ॥

ज्याप्रमाणे पाण्याच्या चंचल लाटांनी वरचेवर भरणारा समुद्र आपली मर्यादा अर्थात् सीमारेषा सोडीत नाही म्हणजे तो विस्तृत होत नाही किंवा पसरत नाही त्याप्रमाणे सर्वेच्छा पूर्ण झालेल्या स्थितप्रज्ञ ज्ञानी माणसापुढे सर्व कामना किंवा सर्व वैषयिक वासना स्वयं हात जोडून येऊन त्याच्या मनात प्रवेश करतात; पण तो स्थितप्रज्ञ आत्मज्ञानी महात्मा चंचल किंवा शिथिल होऊन धावाधाव न करता शांतचित्त राहतो. ॥ ५६ ॥

अशा रीतीने बनवासी या क्षेत्रात लिहिलेल्या किंवा रचलेल्या व

श्रीवासुदेवानन्दसरस्वतीच्या मुखातून निघालेल्या या षट्पंचाशिका स्तोत्राने भगवान् श्रीदत्तात्रेय संतुष्ट होवोत. ॥ ५७ ॥

॥ अशा रीतीने श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्द-सरस्वतीस्वामीमहाराजांनी रचलेले षट्पंचाशिका स्तोत्र पूर्ण झाले.॥

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम वनवासी येथे असताना एक दिवस एक ब्राह्मण गृहस्थ त्यांच्या दर्शनाला आले व त्यांना साष्टांग नमस्कार करून असे म्हणाले की, "महाराज ! काही वर्षांपूर्वी माझे घर फार जीर्ण झाले म्हणून ते मी नवीन बांधावयास घेतले. ते बांधून पूर्ण झाल्यावर एका पिशाच्चाने स्वप्नात येऊन मला आधी सूचना देऊन मी बांधलेले ते नवीन घर जाळून टाकले. पुढे याच प्रकाराने त्या पिशाच्चाने माझी नवीन घरे दहावेळा जाळली. तरी महाराज ! हे पिशाच्च आता माझे नवीन घर जाळणार नाही व मला त्या घरात सुखाने राहता येईल अशी आपण माझ्यावर कृपा करा व मला या पिशाच्चाच्या त्रासातून कायमचे मुक्त करा."

त्या गृहस्थांनी केलेली ही प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराजांनी त्या पिशाच्चाला आवाहन केले. त्याबरोबर पिशाच्चाने त्या ब्राह्मण गृहस्थांच्या शरीरात प्रवेश केला व ते त्यांच्यासमोर येऊन हात जोडून उभे राहिले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्या पिशाच्चाला असे म्हणाले की, "तू या ब्राह्मण गृहस्थाची घरे का जाळून टाकीत आहेस ? त्याने तुझा काय अपराध केला आहे ? तू याला सोडून कधी जाणार आहेस ?" श्रीस्वामीमहाराजांनी विचारलेले हे प्रश्न ऐकताच ते पिशाच्च त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! या ब्राह्मण गृहस्थाने पूर्वजन्मात मला फार त्रास दिला आहे. या गृहस्थाचा सूड घ्यावयाची भावना मृत्यूसमयी माझ्या मनात तीव्र स्वरूपात घर करून राहिल्यामुळे मला सद्गती न लाभता ही पिशाच्चयोनी

प्राप्त झाली. जर आपण या गृहस्थाला माझ्याकरिता काही सत्कार्य करावयास सांगून माझी या योनीतून मुक्तता होत असेल तर मी आपल्या आज्ञेप्रमाणे याला सोडून देण्यास तयार आहे." त्या पिशाच्चाने असे सांगितल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या ब्राह्मण गृहस्थास त्या पिशाच्चाच्या मुक्तीसाठी काही अनुष्ठान करण्यास सांगितले. पुढे त्या ब्राह्मण गृहस्थांनी श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे अनुष्ठान केल्यावर त्यांची पिशाच्चपीडा दूर होऊन पुढे त्यांचे घर जळाले नाही व ते आपल्या घरात सुखाने राहू लागले.

श्रीस्वामीमहाराजांनी बनवासीहून निघताना श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे जे लोक त्यांच्या बरोबर होते त्यांना पुन्हा परत पाठवून दिले व ते पुढील संचाराला एकट्यानेच निघाले. वाटेत अरण्यातून जात असताना त्यांच्या सोबतीने चार-पाच वाटसरूही चालू लागले. श्रीस्वामीमहाराज अरण्यातून अगदी निर्भयतेने चाललेले असल्यामुळे त्यांच्या बरोबर चाललेल्या वाटसरूंनाही अधिक धीर येऊन सुरक्षित वाटत होते. मात्र श्रीस्वामीमहाराज हे अखंड अद्वय स्थितीत असल्यामुळे त्याना कसलीही व केव्हाही भीती वाटत नसे. खरे तर ते साक्षात् अभयच होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना अरण्य काय आणि लोकवस्तीने गजबजलेला प्रदेश काय, दोन्ही सारखेच होते. देहाची आसक्ती असणाऱ्यांना भीती वाटत असते व "द्वितीयात् वै भयं भवति" या न्यायाने द्वैत पाहणाऱ्यांना भय असते; पण श्रीस्वामीमहाराजांना देहाची आसक्ती नव्हती आणि त्यांना दुसरे म्हणून काहीच नव्हते. ते सर्व चराचरात आत्मरूपाने व्याप्त होऊन राहिले होते. त्यामुळे अखंड ब्रह्मरूपाने असणारे व अभय स्थितीत राहणारे श्रीस्वामीमहाराज त्या वाटसरूंना सोबत करण्यासाठीच त्यांना बरोबर घेऊन प्रवास करू लागले. एरवी श्रीस्वामीमहाराज

एकट्याने व तीव्र गतीने प्रवास करीत असत; कारण त्यांना कोणाचीही सोबत आवडत नसे. त्यामुळे प्रसंगी श्रीगांडामहाराज व श्रीसीतारामसहाराज यांनाही त्यांनी स्वतंत्रपणे वेगळा प्रवास करावयाला लावले होते.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांचा प्रवास दाट जंगलातून चालला असताना समोरून जंगली हत्तींचा एक कळप येत असलेला दिसला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबरच्या सर्व लोकांची भीतीने गाळण उडाली. लपून बसून आपला बचाव करण्यासारखे जवळपास एकही ठिकाण त्यांना दिसत नव्हते. ज्यावेळी बरोबरचे सर्व लोक अगदी घाबरून गेले आहेत असे श्रीस्वामीमहाराजांनी पाहिले तेव्हा त्यांच्या रक्षणासाठी काहीतरी करणे प्राप्त आहे असा विचार करून त्यांनी श्रीदत्तप्रभूंची प्रार्थना केली व सर्वांना बरोबर घेऊन ते तेथेच हत्तींच्या मार्गापासून बाजूला एका झाडाखाली जाऊन उभे राहिले. तो हत्तींचा कळप आला आणि त्या सर्व लोकांची काही-सुद्धा दखल न घेता व त्यांना काहीही न करता सरळ मार्गाने दूर निघून गेला.

श्रीस्वामीमहाराज अशा रीतीने प्रवास करीत करीत शिरसीहून सिद्धेश्वर येथे आले. तेथे त्यांना श्रीक्षेत्र गोकर्णाहून आलेले श्री. बळवंतराव भागवत व श्री. देवरात गजानन शर्मा हे दोघेजण भेटले. श्री. बळवंतराव भागवत हे पुण्यश्लोक अहिल्याबाईंच्या धर्मशाळेत व्यवस्थापक-कारकून होते. ते व श्री. शर्मा हे श्रीस्वामी-महाराजांना श्रीक्षेत्र गोकर्णाला घेऊन जाण्यासाठीच म्हणून निघाले होते. श्रीस्वामीमहाराजांचे सिद्धेश्वर येथे दर्शन झाल्यामुळे त्यांना परमानंद झाला. त्या दोघांनीही श्रीस्वामीमहाराजांना श्रीक्षेत्र गोकर्णाला येण्यासंबंधी खूप आग्रह केला. त्यांच्या आग्रहास्तव

श्रीस्वामीमहाराज पौष शुद्ध पंचमी शके १८३२ म्हणजे इ. स. १९१० मध्ये श्रीक्षेत्र गोकर्णाला गेले. तेथे पुण्यश्लोक अहिल्याबाईंच्या छत्रात श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम होता.

श्रीक्षेत्र गोकर्ण येथे आल्यावर त्यांनी "महाबळेश्वर त्राहि" अशी चरणारंभी शब्दयोजना करून दोन श्लोकात महाबळेश्वर श्रीशिवाची स्तुती केली. येथे श्रीस्वामीमहाराजांचा बारा दिवस मुक्काम झाला. या बारा दिवसात तेथील मंडळींच्या आग्रहावरून रोज सकाळी सोवळ्यात प्रवचन झाले. त्याच काळात येथे रोज सायंकाळी श्रीस्वामीमहाराजांनी "वासुदेवमनन" हा ग्रंथ सांगितला. ( सध्या हा ग्रंथ सिद्धयोग प्रकाशनातर्फे छापून प्रसिद्ध झालेला असून त्यात – १) प्राकृत वासुदेव मननसार २) आत्मचिन्तन ३) गुरुशिष्यसंवाद ४) नवरत्नमाला ५) चित्तसद्‌बोधनक्षत्रमाला ६) आत्मानात्मविचार–पूर्व व उत्तरभाग ७) ब्रह्मचिंतन ८) वेदान्तस्तोत्रे–(उपविभाग) १) वेदान्तनिरूपण २) परापूजा ३) उपदेश ४) ऐतरेयभावार्थरूप अभंग ५) निर्गुण भूपाळी ६) वेदान्तपर पदे, असे विभाग व उपविभाग आहेत. सर्वसामान्य जनांना व संस्कृत न येणाऱ्या सर्वांना ब्रह्मचिंतन करून आत्मस्वरूपाची प्राप्ती करून घेण्यासाठी हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे. )

श्रीस्वामीमहाराजांनी मकरसंक्रांतीच्या पर्वकाळाचे स्नान श्रीक्षेत्र गोकर्ण येथेच केले. त्यावेळी तेथील सर्व मंडळींनी श्रीस्वामीमहाराज आपल्या येथे येऊन त्यांनी आपल्यावर कृपावर्षाव केला या आनंदाप्रीत्यर्थ सव्वामणाचा तिळगूळ करून तो सर्वांना वाटला. त्यानंतर श्रीक्षेत्र गोकर्णाहून निघून श्रीस्वामीमहाराज श्रीकृष्णानदीच्या तीरावरील कोटितीर्थावर आले. त्या ठिकाणी पौष पौर्णिमेला पौष महिन्याचे क्षौर करून तेथे दोन-तीन दिवस मुक्काम

केल्यावर ते तेथून निघून श्रीक्षेत्र गुर्लहोसूर मार्गे गलगली येथे आले.

गलगली हे गालव ऋषींनी आपल्या वास्तव्याने व तपश्चर्येने पुनीत केलेले गाव आहे. त्या गावातील लोक सच्छील, प्रेमळ व मोठे भाविक आहेत आणि तेथे ब्राह्मणांची वस्तीही बरीच आहे असे पाहून श्रीस्वामीमहाराज त्या ठिकाणी राहिले. श्रीदत्तप्रभूंच्या इच्छेने या गावी श्रीस्वामीमहाराजांचे दोन महिने राहणे झाले.

श्रीस्वामीमहाराजांचा गलगली येथे मुक्काम असतानाच मागे (पृ. २८२) वर वर्णन केल्याप्रमाणे धारवाडच्या महिदाळ येथील श्रीदत्तमंदिरात सांगितल्याप्रमाणे भडोचला जाऊन एक लक्ष गायत्री-जप पूर्ण करून श्रीगांडामहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांपाशी परत आले. तेथे आल्यावर श्रीगांडामहाराजांनी श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेप्रमाणे जप पूर्ण केल्याचे कथन केले. काही दिवस गेल्यानंतर श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांना असे म्हणाले की, "पुत्र होत नव्हता म्हणून तुझ्या आईने शिवरात्रीचे व्रत करण्याचा नवस केला होता. त्या व्रताचे उद्यापन मात्र अद्याप झालेले नाही; तरी तू ते उद्यापन करून मातृऋणातून मुक्त हो." श्रीस्वामीमहाराजांच्या या आज्ञेप्रमाणे श्रीगांडामहाराजांनी लघुरुद्रस्वाहाकारपूर्वक या व्रताचे उद्यापन करून ते मातृऋणातून मुक्त झाले.

गलगली येथे एका धनिक बाईंचा मुलगा बरेच दिवस आजारी होता. औषधोपचाराने त्या मुलाला गुण येत नव्हता. अशा वेळी त्या बाईंनी श्रीस्वामीमहाराजांना मनोमन प्रार्थना करून असा नवस केला की, जर माझा मुलगा बरा झाला तर मी आपणास ११०० रुपये दक्षिणा देईन. त्या बाईंनी केलेल्या नवसाची श्रीस्वामीमहाराजांना

काहीच कल्पना नव्हती. हा नवस केल्यावर त्या बाईंचा मुलगा लगेचच बरा झाला. त्यामुळे त्यांनी आपल्या नवसाप्रमाणे श्रीस्वामी-महाराजांच्यापुढे ११०० रुपये दक्षिणा आणून ठेवली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्या बाईंना असे म्हणाले की, " आपण हे इतके पैसे येथे कशाकरिता ठेवले ? " हे ऐकताच त्या बाई श्रीस्वामीमहा-राजांना असे म्हणाल्या की, " महाराज ! माझा मुलगा आपल्या कृपेने बरा झाला; तर आपल्याला ११०० रुपये दक्षिणा देईन असा मी आपणास नवस केला होता. आपल्या अपार कृपेने माझा मुलगा बरा झाला. महाराज ! माझ्या मुलावर आपली अशीच कृपा अखंड राहू द्या. खरोखर आपल्या सामर्थ्याचा महिमा अपरंपार असाच आहे. आपण साक्षात् दत्तप्रभूच आहात. तरी महाराज ! माझ्या या दक्षिणेचा आपण स्वीकार करावा अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे. "

त्या बाईंनी अशी प्रार्थना केल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " हे पैसे आम्हाला नकोत. ते तुम्ही परत न्या. " हे ऐकताच त्या बाईंना अत्यंत वाईट वाटले व त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, " महाराज ! काहीही झाले तरी मी हे पैसे परत नेणार नाही. आपणास ते नको असतील तर आपण ते नदीत टाकून द्या." त्या बाईंचे हे कृतनिश्चयाचे बोलणे ऐकून व त्यांची दृढ निष्ठा, श्रद्धा व भक्ती पाहून त्यांनी ते पैसे तेथील एका पुजाऱ्याकडे देऊन त्यातून पुराण, कीर्तन, प्रवचन इत्यादि कार्यक्रम करवून घेतले.

श्रीस्वामीमहाराज गलगलीमध्ये असताना जमखिंडीचे शाळा-मास्तर आपल्या ती. मातुश्रींना घेऊन दर्शनाला आले होते. त्यांच्या मातुश्रींच्या हातापायांचे सांधे जखडून गेल्यामुळे त्यांना चालता येत नव्हते. तेथे आल्यावर त्या शिक्षकांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग

नमस्कार करून ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! गेली काही वर्षे सांधे धरल्यामुळे माझ्या आईला चालता येत नाही. सर्व औषधोपचार झाले; पण हिला काही गुण येत नाही. आपण कृपा करून काहीतरी औषधोपचार सांगून तिला या व्याधीतून मुक्त करावे अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे. "

त्या शिक्षकांनी असे सांगताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " आपल्या मातुश्रींना कोणताही शारीरिक रोग झाला नसून त्यांना पिशाच्च बाधा झाली आहे." इतके सांगून श्रीस्वामीमहाराज थांबतात न थांबतात तोच त्या पिशाच्चाने बाईंच्या अंगात संचार केला व ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! या बाईने माझ्या राहण्याच्या जागेवर लघुशंका केली म्हणून मी हिला पीडा देत आहे. आज आपल्या दर्शनानेच मी पवित्र झालो. आता या बाईला मी सोडून जातो." इतके सांगून ते पिशाच्च त्या बाईंच्या शरीरातून निघून गेले. त्याबरोबर त्या बाई बेशुद्ध पडल्या. काही वेळानंतर त्या बाई शुद्धीवर आल्या. त्यावेळी त्यांचे सांधे सुटल्यामुळे त्या बाई आपल्या पायाने चालत घरी परत गेल्या.

गलगली येथे वैष्णव ब्राह्मणांची संख्या भरपूर असून ते स्मार्तांचा फार द्वेष करीत असत. वास्तविक पाहता त्यावेळी वैष्णव आणि स्मार्त यांच्यातील वाद दक्षिणेत सगळीकडेच तीव्र स्वरूपात होता. अर्थात् गलगली येथेही हा वाद मोठ्या प्रमाणात होता. एके दिवशी समाराधना करण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबरीच्या मंडळींनी तेथील वैष्णवांना स्वयंपाकासाठी मोठ मोठी भांडी मागितली; परंतु ती त्यांनी दिली नाहीत. त्यामुळे दुसऱ्या गावाहून मोठी भांडी आणून समाराधनेचा कार्यक्रम पार पाडावा लागला. वास्तविक पाहता मोठ्या प्रेमाने गावातील लोकांनी एकमेकांना मदत

करावयास हवी होती; पण स्मार्त-वैष्णव भेदामुळे हे प्रेम राहिले नाही. श्रीस्वामीमहाराजांना ही गोष्ट काही आवडली नाही, त्यांना तेथील वैष्णव ब्राह्मणांची मत्सरी वृत्ती पसंत पडली नाही म्हणजे ती देवांनाच पसंत पडली नाही. त्यामुळे पुढे लवकरच सर्व वैष्णव लोक एकदम आजारी पडले. वैष्णवांपैकी एखादा दुसरा आजारी पडला असता तर कोणाच्या काहीच लक्षात आले नसते; परंतु येथे सर्वच वैष्णव ब्राह्मण मंडळी एकदम आजारी पडल्यामुळे आपण स्मार्तांना मदत न केल्यामुळे हा दैवी कोप आपल्यावर ओढवला आहे, याची सर्वांना मनोमन जाणीव झाली व ते सर्वच जण अगदी भयभीत होऊन गेले.

या सर्व संकटातून सुटण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांना शरण जाणे हा एकच मार्ग आहे याची त्यांना पक्की जाणीव होती; परंतु श्रीस्वामीमहाराज स्मार्त असल्यामुळे त्यांना शरण जाणे ही गोष्ट काही वैष्णव ब्राह्मणांच्या मनाला रुचेना. परंतु एक दोन दिवस गेले तरी जेव्हा कोणाचाही ताप उतरेना तेव्हा ते सर्व वैष्णव ब्राह्मण श्रीस्वामीमहाराजांकडे गेले व त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! आम्ही सर्व लोकांनी आपल्याला समाराधनेला भांडी न दिल्यामुळे देवांचा आम्हा सर्व लोकांवर कोप झाला आहे. आमच्या या कोत्या व मत्सरी वृत्तीबद्दल आपण क्षमा करावी व आम्हा सर्वांना या संकटातून सोडवावे अशी आम्हा सर्वांची आपल्या चरणी प्रार्थना आहे."

त्या सर्व वैष्णव ब्राह्मण मंडळींची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज अत्यधिक संतापून त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही स्वतःला ब्राह्मण म्हणविता आणि संतर्पणासारख्या देवकार्याला भांडी देत नाही ? हा तुमचा उद्दाम उद्धटपणा व कोती अनुदार

मत्सरी वृत्ती पाहिली की, तुमच्यापेक्षा महार लोक चांगले आहेत असे म्हणावयास काहीच हरकत नाही. तुम्ही लोक येथून ताबडतोब चालते व्हा. पुन्हा येथे येऊन तोंड दाखवू नका." अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज त्या सर्व वैष्णव ब्राह्मणांना रागावले, तरी कोणीही आपल्या जागेवरून हालला नाही; कारण श्रीस्वामीमहाराजांचे पाय धरणे हा एकच उपाय आपल्या सर्वांवर आलेल्या संकटातून व दैवी आपत्तीतून सोडविण्यास समर्थ आहे याची सर्वांना जाणीव होती. त्यामुळे ते सर्वजण श्रीस्वामीमहाराजांना पुन्हा असे म्हणाले की, "महाराज! आमच्या हातून पुन्हा कधीही असे वर्तन घडणार नाही. आम्हा सर्वांना अंतःकरणापासून आमच्या वागण्याचा पश्चात्ताप झाला आहे; तरी आपण आमच्या हातून झालेल्या अपराधाची क्षमा करून आम्हाला या संकटातून मुक्त करावे व आम्हा सर्वांची भीती दूर करावी अशी आम्हा सर्वांची आपल्या चरणी प्रार्थना आहे."

ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराजांचे मन द्रवले व ते त्यांना असे म्हणाले की, "या शिवाच्या मंत्राचा प्रत्येकाने १२०० जप केला; तर सर्वजण ज्वरमुक्त व्हाल." हे ऐकताच आपल्यावर आलेले संकट दूर व्हावे म्हणून नाईलाजाने का होईना त्यांच्यापैकी प्रत्येकाने श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेल्या शिवमंत्राचा जप केला. त्यामुळे त्यांचा ताप जाऊन ते सर्वजण बरे झाले. यामुळे त्यांच्या मनातील स्मार्तांविषयीचा द्वेष किती कमी झाला असेल हे काही सांगता येत नाही; परंतु एक गोष्ट मात्र खरी आहे की, अशा प्रकारे करुणासंपन्न श्रीस्वामीमहाराजांनी कृपा केल्यामुळेच आपण सर्वजण संकटातून मुक्त झालो या जाणीवेने त्या सर्वांची त्यांच्यावर आत्यंतिक श्रद्धा जडली. या श्रद्धेमुळे व प्रेमामुळे श्रीस्वामीमहाराज

जेव्हा गलगलीहून निघाले तेव्हा त्या सर्व वैष्णव ब्राह्मणांनी त्यांना आणखी काही दिवस तेथे राहण्याचा आग्रह केला; परंतु श्रीस्वामी-महाराजांना पुढील संचारार्थं जावयाचे असल्यामुळे त्यांनी त्या मंडळींना यापुढे " आतां येथे अधिक दिवस राहणे शक्य नाही, " असे स्पष्टपणे सांगून ते तेथून पुढे जाण्यास निघाले.

श्रीस्वामीमहाराज तेथून जाऊ लागले असे पाहून ही सर्व मंडळी त्यांच्या पाठीमागून धावू लागली. आपल्या मागे धावत येणाऱ्या या मंडळींना श्रीस्वामीमहाराजांनी वारंवार " आपल्या मागे येऊ नका, " म्हणून सांगितले; परंतु ही सर्व मंडळी ऐकत नाहीत असे पाहून श्रीस्वामीमहाराजांनी रस्त्यात एक रेषा काढली आणि आपल्या पाठीमागून येणाऱ्या सर्व लोकांना असे सांगितले की " जर तुम्ही लोक ही रेषा ओलांडून माझ्या मागून याल तर तुमचा वंशक्षय होईल." श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना असे सांगताच ती सर्व मंडळी भीतीने मागे फिरली. श्रीस्वामीमहाराजांच्या अमोघ शब्दांच्या सामर्थ्याची प्रचीती या लोकांनी घेतली असल्यामुळे व एकदम गुप्त होणे, दूर जाणे इत्यादि कामांसाठी सिद्धींचा उपयोग आपण फक्त तीन वेळा केला असे श्रीस्वामीमहाराजांनी एकदा सहज बोलता बोलता सांगितल्याचे सर्वांच्या स्मरणात होते. श्रीस्वामी-महाराजांच्या या सामर्थ्याची व शक्तीची कल्पना असल्यामुळेच सर्व मंडळी अधिक आग्रह न धरता तेथूनच नमस्कार करून घरी परत गेली.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराज गलगली येथील ब्राह्मणांवर का रागावले असा प्रश्न जेव्हा मनात येतो तेव्हा श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी " दासबोध " या ग्रंथात युग-धर्माचे निरूपण करताना ब्राह्मणांच्या एकंदर स्थितीचे जे विदारक

चित्र उभे केले आहे ते पुढे उभे राहते व श्रीस्वामीमहाराजांच्या रागाचा अंतस्थ हेतू स्पष्टपणे कळून येतो. श्रीसमर्थ म्हणतात–

नीच प्राणी गुरुत्व पावला। तेथें आचारचि बुडाला।
वेदशास्त्र ब्राह्मणाला। कोण पुसे ॥ १४.७.२९ ॥

ब्रह्मज्ञानाचा विचारु। त्याचा ब्राह्मणासीच अधिकारु।
वर्णानां ब्राह्मणो गुरुः। ऐसें हें वचन ॥ ३० ॥
ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले।
गुरुत्व सांडून झाले। शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥
कित्येक दावलमलकास जाती। कित्येक पिरासी भजती।
कित्येक तुरक होती। आपुले इच्छेनें ॥ ३२ ॥
ऐसा कलियुगीं आचार। कोठें राहिला विचार।
पुढें पुढें वर्णसंकर। होणार आहे ॥ ३३ ॥
गुरुत्व आलें नीचयाती। कांहीं एक वाढली महंती।
शूद्र आचार बुडविती। ब्राह्मणांचा ॥ ३४ ॥
हें ब्राह्मणांस कळेना। त्याची वृत्तीच वळेना।
मिथ्या अभिमान गळेना। मूर्खपणाचा ॥ ३५ ॥
राज्य नेलें म्लेंच्छीं क्षेत्रीं। गुरुत्व नेलें कुपात्रीं।
आपण अरत्रीं ना परत्रीं। कांहींच नाहीं ॥ ३६ ॥
ब्राह्मणांस ग्रामणीनें बुडविलें। विष्णूनें श्रीवत्स मिरविलें।
त्याच विष्णूनें शापिलें। परशुरामें ॥ ३७ ॥
आम्हींही तेचि ब्राह्मण। दुःखें बोलिलों हें वचन।
वडील गेले ग्रामणी करून। आम्हां भोंवतें ॥ ३८ ॥
आतांच्या ब्राह्मणीं काय केलें। अन्न मिळेना ऐसें झालें।
तुम्हां बहुतांचे प्रचीतीस आलें। किंवा नाहीं ॥ ३९ ॥

बरें वडिलास काय म्हणावें। ब्राह्मणाचें अदृष्ट जाणावें।
प्रसंगें बोलिलें स्वभावें। क्षमा केलें पाहिजे ॥ ४० ॥

  

श्रीस्वामीमहाराज गलगली येथें दोन महिने होते. या काळात तेथील सर्व ब्राह्मण मंडळींनी विश्वकल्याणार्थ संहितेचे तीन, पवमानाचे सात व रुद्राचे दोन असे एकंदर बारा स्वाहाकार केले. त्या वेळी या स्वाहाकारांकरिता हजारो मंडळी आली होती. या स्वाहाकारांप्रीत्यर्थ आलेल्या सर्व विद्वज्जनांची तेथील लोकांनी खूपच उत्तम संभावना केली. या स्वाहाकारांची स्मृती पुढे कित्येक वर्षे गलगलीतील लोकांना उत्साह देत होती.

श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांना बरोबर घेऊन गलगलीहून निघून फाल्गुन महिन्याच्या अखेरीला जैनापूर येथे आले व तेथील श्रीदत्तमंदिरात उतरले. तेथे श्रीदत्तप्रभूंचे दर्शन घेतल्यावर त्यांच्या मुखातून पुढील स्तोत्र बाहेर पडले. ते स्तोत्र असे आहे –

## ॥ श्रीदत्तात्रेयस्तोत्रम् ॥

दत्तात्रेयं महात्मानं वरदं भक्तवत्सलं।
प्रपन्नार्तिहरं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ १ ॥
दीनबन्धुं कृपासिन्धुं सर्वकारणकारणं।
सर्वरक्षाकरं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ २ ॥
शरणागतदीनार्तपरित्राणपरायणं।
नारायणं विभुं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ ३ ॥
सर्वानर्थहरं देवं सर्वमंगलमंगलम्।
सर्वक्लेशहरं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ ४ ॥

शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः ।
भक्ताभीष्टप्रदं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ ५ ॥
सर्वरोगप्रशमनं सर्वपीडानिवारणम् ।
तापप्रशमनं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ ६ ॥
ब्रह्मण्यं धर्मतत्त्वज्ञं भक्तकीर्तिविवर्धनम् ।
आपदुद्धरणं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ ७ ॥
जन्मसंसारबन्धघ्नं स्वरूपानन्ददायकम् ।
निःश्रेयसप्रदं वन्दे स्मर्तृगामी स माऽवतु ॥ ८ ॥
जयलाभयशःकामदातुर्दत्तस्य यः स्तवम् ।
भोगमोक्षप्रदस्येमं प्रपठेत्स कृती भवेत् ॥ ९ ॥

॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्द-
सरस्वतीविरचितं श्रीदत्तात्रेयस्तोत्रं संपूर्णम् ॥

अर्थ :– शरणागताची पीडा अर्थात् मनोव्यथा दूर करणारा, इच्छित किंवा अपेक्षित वर देणारा, भक्तांवर प्रेम करणारा अर्थात् अत्यंत मायाळू व उदार मनाचा असा जो अत्रिपुत्र श्रीदत्तात्रेय त्याला मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ १ ॥

दीन – दुबळ्यांचा बन्धू, दयेचा सागर व सर्व कारणांचाही मूळ हेतू अर्थात् बीज किंवा आदिकारण असलेला आणि सर्वांचे रक्षण करणारा असा जो अत्रिपुत्र श्रीदत्तात्रेय त्याला मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ २ ॥

शरण आलेले, दीन व दुःखपीडित यांचे रक्षण करण्यात तत्पर, उदकात ज्याचे शयनस्थान किंवा वसतिस्थान आहे आणि जो

सर्वव्यापी आहे त्या अत्रिपुत्र श्रीदत्तात्रेयाला मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ ३ ॥

सर्व संकटांना किंवा अनर्थांना दूर करणारा, प्रकाशमान, सर्व मांगल्यामध्ये मंगल व सर्व क्लेश दूर घालविणारा असा जो अत्रि-पुत्र श्रीदत्तात्रेय त्याला मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच-धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ ४ ॥

पापरूपी चिखलाला शुष्क करणारा, ज्ञानरूप तेजाला अधिक प्रकाशित करणारा व भक्तांचे मनोरथ पुरविणारा असा जो अत्रि-पुत्र श्रीदत्तात्रेय त्याला मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ ५ ॥

सर्व प्रकारच्या रोगांचे प्रकर्षत्वाने शमन करणारा, सर्व तऱ्हेच्या पीडांचे निवारण करणारा आणि सर्व प्रकारच्या तापांचे विशेषत्वाने शमन करणारा असा जो अत्रिपुत्र श्रीदत्तात्रेय त्याला मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ ६ ॥

जो ब्रह्मण्य म्हणजे अतिपवित्र किंवा वेदपारंगत अशा ब्राह्मणांचा हितकर्ता आहे, जो धर्मतत्त्वांचा खरा ज्ञाता किंवा जाणता आहे, जो भक्तांच्या कीर्तीला अमाप वाढविणारा आहे आणि जो सर्व आपत्तीतून वर काढणारा आहे त्या अत्रिपुत्र श्रीदत्तात्रेयांना मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ ७ ॥

जो जन्मादिरूप संसारबंधनांचा नाश करणारा आहे, जो स्वस्व-रूपाच्या सुखानंदाला देणारा आहे आणि जो निःश्रेयस म्हणजे अतिकल्याणकारी मोक्षही देणारा आहे त्या अत्रिपुत्र श्रीदत्तात्रेयाला

मी वंदन करतो. तो स्मरण करताक्षणीच धावून येणारा आहे. तो माझे रक्षण करो. ॥ ८ ॥

जो साधक किंवा भक्त जय अर्थात् कीर्ती, लाभ, यश, अपेक्षित व इच्छित असे सर्व देणाऱ्या आणि भोग व मोक्षही देणाऱ्या श्रीदत्त-प्रभूच्या या स्तोत्राचे नेहमी पठण करील तो सुखी व कृतकृत्य होईल. ॥ ९ ॥

॥ अशा रीतीने श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती विरचित श्रीदत्तात्रेयस्तोत्र पूर्ण झाले. ॥

श्रीस्वामीमहाराजांनी जैनापूर येथे बरेच दिवस मुक्काम केला. या गावी श्रीकृष्णानदी ही उत्तरवाहिनी असून या उत्तरवाहिनी व पुण्यप्रद श्रीकृष्णाप्रवाहात दररोज स्नान व्हावे या हेतूनेच काही अधिककाळ श्रीस्वामीमहाराजांनी येथे वास्तव्य केले असावे. जैनापूर येथील एका लिंगायताच्या बाई दर महिन्याच्या शेवटी तीन दिवस बेशुद्ध होऊन पडत असत. अशा वेळी त्या बाईंची अवस्था अगदी काष्ठवत् होत असे. या बाईंना कित्येक दिवस औषध चालू होते; पण त्यांचा रोग वैद्यांच्या आटोक्यात येत नव्हता. अशा स्थितीत त्या बाईंच्या कानावर श्रीस्वामीमहाराजांच्या सामर्थ्याची कीर्ती आल्यावर त्या त्यांच्या दर्शनासाठी आल्या. श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईंना पाहताच त्यांना असे सांगितले की, "तुम्ही श्रीदत्त-प्रभूंच्या मंदिरात भगवान् श्रीदत्तात्रेयांना किंवा औदुंबराला प्रदक्षिणा घाला म्हणजे तुमची प्रकृती बरी होईल." श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे त्यांनी नियमितपणे, उत्तमरीतीने, एकनिष्ठपणे व श्रद्धाभक्तिपूर्वक उपासना करण्यास सुरुवात केल्यावर त्यांची व्याधी हळूहळू कमी कमी होत होत कालांतराने त्या बाई पूर्णपणे बऱ्या झाल्या.

श्रीस्वामीमहाराज जैनापूरहून निघून श्रीकृष्णातीराने प्रवास करीत करीत चैत्र वद्य अमावस्येला मलप्रभा–कृष्णा–संगमावर येऊन पोहोचले. या ठिकाणी त्यांनी श्रीनारायणस्वामीमहाराजांची पुण्यतिथी साजरी केली. श्रीस्वामीमहाराज कोठेही असले; तरी त्यांची श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या ठिकाणी अत्यधिक भक्ती असल्यामुळे चैत्र वद्य अमावास्येला ते त्यांची पुण्यतिथी साजरी करीत असत.

या ठिकाणाहून निघून पुढे श्रीस्वामीमहाराज छायाभगवतीच्या दर्शनाला गेले. हे विश्वामित्रऋषींचे तपस्थान म्हणून प्रसिद्ध असून येथे त्यांनी लोहपिष्ट भक्षण करून तप केले होते अशी आख्यायिका आहे. हे स्थान अगदी निर्जल अशा डोंगरात आहे. या ठिकाणी एकही झाड नाही. या क्षेत्रात फक्त अक्षय्य तृतीयेस यात्रा जमते. त्याच दिवशी श्रीगायत्रीच्या पादुका व छायाभगवतीदेवी यांची पूजा होते. श्रीस्वामीमहाराजांनीही अक्षय्यतृतीयेच्या दिवशी श्रीगांडामहाराजांना बरोबर घेऊन या स्थानाची यात्रा करून श्रीगायत्रीच्या पादुकांची व छायाभगवतीची पूजा करून त्यांचे दर्शन घेतले.

शके १८३३ अर्थात् इ. स. १९११ च्या वैशाख शुद्ध तृतीयेलाच छायाभगवतीदेवीच्या क्षेत्रातून निघून श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांसह पुढील संचारार्थ निघाले. या तीर्थक्षेत्राहून निघतानाच त्यांना देवांनी दृष्टान्त देऊन असे सांगितले की, "या पुढे शरीराला काही दिवस व्याधी होऊन फार कष्ट होणार आहेत." श्रीस्वामीमहाराजांनी ही आपत्ती मोठ्या हर्षाने स्वीकारली. श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराजांसह प्रवास करीत करीत कोपरगावात श्रीनरसिंहक्षेत्रात येताच त्यांना ताप येऊ लागला. त्यामुळे त्यांनी दोन दिवस तेथेच मुक्काम केला; परंतु दोन दिवस थांबूनही ज्वर हटत नाही असे पाहून श्रीस्वामीमहाराज तसेच पुढे निघाले.

या प्रांतातून उभयता गुरुशिष्य प्रवास करीत असताना श्रीगांडा-महाराजांना पैसे खर्च करूनही इकडे दही, दूध, ताक इत्यादि काहीच मिळेना. एकीकडे श्रीस्वामीमहाराजांच्या अंगात आत्यंतिक ताप व दुसरीकडे ताकादि आवश्यक वस्तूंचा अत्यंत अभाव या विषम परिस्थितीमुळे श्रीगांडामहाराज अगदी घाबरून गेले. इकडील भागात वैष्णवांचीच वस्ती बहुसंख्येने असून ते सर्वजण स्मार्तांचा द्वेष करणारे होते. वैष्णव व स्मार्त यांचा द्वेष येथे अगदी शिगेला पोहोचला होता. या द्वेषामुळे श्रीस्वामीमहाराजांना प्रवासात साधे ताकसुद्धा मिळेना.

अशा रीतीने अंगात ताप असताना व ताक, भिक्षादि अत्यंत आवश्यक वस्तूंचा चार दिवस पूर्णपणे अभाव असतानाच श्रीस्वामीमहाराज व श्रीगांडामहाराज प्रवास करीत करीत श्रीकृष्णाभीमासंगमावरील कडलूर गावापासून अलीकडे असलेल्या एक-दीड कोसावरील एका गावी येऊन पोहोचले. तेथेही दोघांना ताक व भिक्षा मिळाली नाही; मात्र त्या गावातील काही लोकांनी श्रीगांडामहाराजांना असे सांगितले की, "येथून एक-दीड कोसावर एक गाव असून तेथे ब्राह्मणाचे एक घर आहे. त्या घरी आपणास ताक मिळेल. हे समजताच श्रीगांडामहाराजांना आनंद झाला. ते तात्काळ त्या गावी गेले व तेथील ब्राह्मणाच्या घरी जाऊन ते तेथील गृहस्वामिनीला असे म्हणाले की, "माझ्या बरोबर माझे श्रीगुरुमहाराज असून ते तापाने फार आजारी आहेत. चार पाच दिवस भिक्षा न मिळाल्यामुळे ते उपाशीच आहेत. तरी आपण कृपा करून त्यांच्यासाठी थोडे ताक द्या. नाही म्हणू नका. आपणास भिक्षा म्हणून तसेच ताक देणे शक्य नसल्यास वाटल्यास किंमत घेऊन द्या." अशा प्रकारे श्रीगांडामहाराज त्या गृहस्वामिनीस कळकळीने विनंती करीत असताना, ती

त्या गृहस्वामींनी ऐकली व तेच एकदम रागाने पुढे येऊन श्रीगांडा-महाराजांना असे म्हणाले की, "चार–पाच दिवस जर भिक्षा केली नाही म्हणता; तर स्वामी जिवंत कसा राहिला ? काहीतरी खोटयानाटचा गोष्टी लोकांना सांगावयाच्या आणि मिळेल ते उपटावयाचे हा आजकाल संन्यासी म्हणविणाऱ्या लोकांचा उद्योगच झाला आहे. चला ! पुढच्या घरी जा. येथे ताकबिक काही मिळा-वयाचे नाही." अशा तऱ्हेने गृहस्थाला न शोभणारी अद्वातद्वा भाषा बोलून त्यांनी श्रीगांडामहाराजांना अक्षरशः हाकलूनच लावले.

श्रीगांडामहाराज अत्यंत खिन्न अंतःकरणाने मुक्कामी परत आले. त्यांनी एकंदर घडलेली सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांना सांगताच ते काही एक न बोलता स्वस्थ बसले. देवांनी पूर्वीच दिलेल्या सूचनेनुसार सर्व घडत असल्यामुळे प्रारब्ध भोगूनच संपविणे एवढेच शिल्लक होते. त्यामुळे त्यानंतर ते दोघे कोस–दीडकोस चालून कडलूर या गावी आले.

कडलूर येथे आल्यावर श्रीगांडामहाराजांनी गावात जाऊन ताकाचा तपास केला. त्यावेळी तेथील एका घरातील बाईंनी त्यांना असे सांगितले की, "अजून ताक व्हायला अवकाश आहे; तरी तुम्ही थोडया वेळाने या." हे ऐकताच श्रीगांडामहाराज मुक्कामा-वर परत आले व त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले की, "ताक मिळण्यास अद्याप थोडा अवकाश आहे; तरी मी स्नान करून येतो व लगेच तेथून आपणासाठी ताक घेऊन येईन." इतके सांगून ते स्नानाकरिता गेले. श्रीस्वामीमहाराजांनी हे ऐकले; परंतु वैशाख महिन्यातील कडक उन्हाळ्याचे दिवस, दुपारची वेळ व अंगात ताप असल्यामुळे त्यांना फार तहान लागली होती. त्यामुळे श्रीगांडामहाराज नदीवरून स्नान करून येण्याची वाट न पाहता

श्रीस्वामीमहाराज स्वतःच उठून त्या बाईंच्या घरी ताक आणण्यासाठी गेले. तहान लागल्यावर पाणी प्याल्यास श्रीस्वामीमहाराजांना संग्रहाणीचा विकार बळावत असे. त्यामुळे तीव्र तहान लागली की, त्यावेळी ते घोटभर ताक पीत असत.

श्रीस्वामीमहाराज त्या घरी ताक मागावयास गेले असता त्यावेळी त्या घरचे यजमान दारातच बसले होते. श्रीस्वामीमहाराजांनी ताकाची मागणी करताच त्यांनी त्यांच्यावर वाटेल तसे तोंडसुख घेऊन शेवटी त्यांना ताक न देताच घालवून दिले. श्रीस्वामीमहाराजांनी शांत चित्ताने त्या गृहस्थांचे बोलणे ऐकून घेतले व ते आपल्या मुक्कामावर परत आले. तेवढचात स्नानादि उरकून श्रीगांडामहाराज तेथे परत आले. श्रीस्वामीमहाराजांनी ताक मागावयास गेल्यावर घडलेला सर्व प्रकार त्यांना सांगून ते त्यांना असे म्हणाले की, "तू आता तेथे ताक आणावयास जाऊ नकोस."

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेली सर्व हकीगत ऐकल्यावर श्रीगांडामहाराजांना अत्यंत वाईट वाटले व त्यांच्या मनात असे विचार आले की, "श्रीस्वामीमहाजांसारख्या जगद्वंद्य पुरुषाला ताकही न देणारे व त्यांच्यावर वाटेल तसे तोंडसुख घेणारे हे ब्राह्मण गृहस्थ काय भाग्याचे असतील ही खरोखरच विचारणीय गोष्ट आहे! आज त्यांचा आणि त्यांच्या कित्येक पिढचांचा उद्धार व्हावयाची वेळ आली होती; पण ते ब्राह्मण गृहस्थ खरोखर दुर्दैवीच असले पाहिजेत. त्यांचे कितीतरी प्रारब्ध अजून भोगावयाचे बाकी असल्यामुळे त्यांना सुबुद्धी तरी कशी सुचणार? जो तो आपापल्या कर्माचा भोगी असतो हेच खरे!" या सर्व विचारांमुळे व श्रीस्वामीमहाराजांना झालेल्या त्रासामुळे श्रीगांडामहाराजांच्या डोळचात पाणी

तरळू लागले. ज्या जगद्वंद्य देवपुरुषाची पदधुली मस्तकाला लावण्यात आसेतुहिमाचल पसरलेला भारत वर्षातील जनसामान्यच नव्हे; तर विद्वान् लोकही स्वतःला धन्य मानीत होते, त्या या महान् विभूतीला एका ब्राह्मणाने घोटभर ताक नाकारावे ही देवाने घडविलेली अप्रूप गोष्ट होती यात काही शंकाच नाही !

ही सर्व कथा वाचली म्हणजे "ललाटरेखा तरि पालटेना। तुजवीण दत्ता मज कंठवेना ।। " अशीच जणूकाही श्रीस्वामीमहाराजांची स्थिती झाली होती; हे पाहून मन दिङ्मूढ होते. मात्र काही कुबुद्धिकांच्या मनात श्रीस्वामीमहाराजांना झालेला हा त्रास पाहून श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी आपल्या "जुना दासबोध" या ग्रंथात शिष्याच्या मुखी घातलेली शंका येते. ही शंका प्रस्तुत करताना शिष्य असे म्हणतो की, "स्वामी मजकारणीं बोलती। परीं येथें संतांचे गुण क्षुद्र दिसती। इतुकीच आशंका होती। ते बोलिलों स्वामी ।। जुना दासबोध १२–१० ।। " या शंकेला जे श्रीसमर्थांनी उत्तर दिले आहे ते पाहिले म्हणजे श्रीस्वामीमहाराजांना झालेल्या त्रासामुळे त्यांच्या अवतारित्वाला कसलाही बाध येत नाही याची जाणीव होते व कुशंका दूर होऊन ते सकल मानवांच्या कल्याणासाठी या भूतलावर अवतरलेले एक महासंत होते याची प्रत्ययात्मक अनुभूती येऊन मन श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी अधिकच उत्कटतेने लीन झाल्याशिवाय राहात नाही. श्रीसमर्थ असे म्हणतात की –

अरे संतांसी गुण कैंचे। ते निर्गुण ठायींचे।
गुणावगुण हे मायेचे। संत निराळे मायेहूनि ।। १२·११ ।।
आळ आला संतनामाचा। पार नेणवे त्यांच्या स्वरूपाचा।
जेथ खुंटल्या चारी वाचा। तेथ मी रंक कोणीकडे ।। १२ ।।

स्तवन करी वेदश्रुती। परी न वर्णवे स्वरूपस्थिती।
तेथ क्षुद्र मी कैंची दिसती। मज मानवियाचे बोलें ॥ १३ ॥
संत विश्वाचे मायबाप। संतांसी नाहीं पारखे आप।
रूप आणि अरूप। यांही वेगळे जे ॥ १४ ॥
संतांसी गर्व नाहीं। संत निंदा न करिती कांहीं।
निष्ठुर कधींही। प्राकृतासारखे नव्हेती ॥ १५ ॥
संत वेदशास्त्रसंपन्न। तयांपुढें बोलतां अज्ञान।
श्रवण होतां धरिती मौन। आदरें सादरें ऐकती ॥ १६ ॥
संत दोष आच्छादिती। आपण स्वयें न करिती।
मर्यादा उल्लंघितां न येती। देहबुद्धि सर्वथा ॥ १७ ॥
संत शांतीचे सागर। संत सर्वस्वीं उदार।
ज्ञान वरुषते जलधर। सर्वस्वावरी ॥ १८ ॥
संत अभावाचे काळ। संत वैराग्याचे वडवानळ।
संतांसी हा भवमळ। स्वप्नींही लागूं न शके ॥ १९ ॥
अहंकारगज डुल्लती। जंववरी संत सिंहाचे चपेटे न येती।
थापा मारूनि विदारती। गंडस्थळें तयांचीं ॥ २० ॥
स्तुति अथवा निंदा केली। तये मायेसीच लागली।
ते ऐकतां देहबुद्धि आली। तरी तो देहधारक प्राणी ॥२१॥
देहमात्र तितुका निंदिला। तेथ स्थूळलोभी कैंचा वांचला।
लंडीचा युद्धासि गेला। तो मोडतां वेळ नाहीं ॥ २२ ॥
विष्ठा तितुकी दुर्गंध। नृपतीचे विष्ठे सुगंध।
ऐसें ऐकता सुबुद्ध। मानीतना सर्वथा ॥ २३ ॥
वाईट म्हणता क्रोधासि यावें। तरी त्याचें रूप तें जाणावें।
मग त्यासी काय भिऊनि म्हणावें। तुम्ही सत्पुरुष म्हणोनि।२४।

मोठें भय स्थूळासी । तरी स्थूळ कैंचें आम्हांसी ।
हें जायाचें म्हणोनि रामासी । अनन्य शरण गेलों ।। २५ ।।
स्थूळाअंगीं शब्द आदळे । संत त्याहूनि निराळे ।
त्यांचा अंत मायेसी न कळे । बापुडी लटकीच हे ।। २६ ।।
आपुलें नव्हे आणि लालुच केली । तरी प्रारब्धें नव्हती पालटली
ऐसेंही जाणोनी स्थूळाशा धरिली । ते पढतमूर्ख जाणावे ।।२७।।
स्थूळाचें पांगिलें नसावें । होईल तैसें कौतुक पहावें ।
आपण निंदेसि न प्रवर्तावें । आदरें करूनी ।। २८ ।।
अरे शिष्या परमार्थ बुडाला । परमार्थवेषें प्रपंच जाला ।
स्थूळ हें निंदितां बहुसालां । विषाद येतो ।। २९ ।।
विषाद अभिमानाचें मूळ । विषाद अविवेकाचें स्थळ ।
विषाद येतो तेंचि केवळ । अज्ञान जाणावें ।। ३० ।।
विषाद आला रावणाला । म्हणोनि सहपरिवारें निमाला ।
विषादें तयां कौरवांला । वेढा लावूनि मारिलें ।। ३१ ।।
विषाद प्राणी आवरूं नेणती । विषादेंचि देशधडी होती ।
विषादें जीवें मारिजेती । परस्परें जिवलग ।। ३२ ।।
विषाद परमार्थ बुडवणा । विषाद आडताळा निरूपणा ।
विषादें संवादींच्या खुणा । हिरोनि नेल्या ।। ३३ ।।
शिष्या देह हें लटिकें वाटतें । परी हें बहुत रे वेडा लावितें ।
आणि अंतीं नासोनि जातें । रांडिचें अमंगळ ।। ३४ ।।
तूं जरी विवेकी होसी । तरी देहपांगीहूनि सुटसी ।
जरी विवेका दुऱ्हावसी । तरी नाटोपे देहपांग ।। ३५ ।।
जैसा अंकुशेविण दंतीं । कां प्रधानाविण भूपति ।
तैसी विवेकाविण शांति । होणार नाहीं ।। ६६ ।।

ज्याचा क्रोध अति लाडका। तेथ उरीं नाहीं विवेका।
जैसें बकवायसउलूकां। मध्यें हंस एकटा ।। ३७ ।।

तैसें काम क्रोध मद मत्सर। अभिमान तिरस्कार।
ऐसी अमंगळें मिळतां अपार। विवेकस्थान भ्रष्ट होय ।।३८।।

जेणें हा देह निंदावा। तो आपुला आप्त जाणावा।
तो निंदक वानावा। विवेकबळें करूनियां ।। ३९ ।।

आम्ही देहासी निंदितों। आणि आम्हांसि जो साहाय्य होतो।
आपणासि जो उपेगा येतो। तो आपुला परमसखा ।। ४० ।।

विवेकें सांगतों तुज मानलें। परी तैसेंचि पाहिजे वर्तलें।
आपुलिया गुणदोषा जाणीतलें। पाहिजे तुवां ।। ४१ ।।

  

अशा रीतीने प्रवास करीत करीत श्रीस्वामीमहाराज श्रीपादश्रीवल्लभ यांच्या श्रीक्षेत्र कुरुगड्डी या स्थानी वैशाख वद्य ६ शके १८३३ अर्थात् इ. स. १९११ मध्ये येऊन पोहोचले. येथे येण्यापूर्वी श्रीपादश्रीवल्लभांनी श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले होते की, "आपण या स्थानी येऊन चातुर्मास करावा म्हणजे पुष्कळ मंडळी येऊन हे दुर्गम स्थान प्रसिद्ध होईल." अशा प्रकारे श्रीपादश्रीवल्लभांनीच येथे येण्यापूर्वी त्यांना एक महिना आधी सांगितल्यामुळे ते येथे आले. ज्याप्रमाणे श्रीपादश्रीवल्लभांनी श्रीस्वामीमहाराजांना येथे येऊन चातुर्मास करण्यास सांगितले त्याप्रमाणे श्रीक्षेत्र कुरुगड्डी येथील वडील पुजारी श्री. भीमाप्पा यांनाही एक महिना अगोदर देवांनी दृष्टान्त देऊन असे सांगितले की, "एक महिन्याने आमचे एक परमभक्त संन्यासी येथे येतील. त्यांची उत्तम व्यवस्था ठेव; नाहीतर तुला शिक्षा होईल." श्रीक्षेत्र कुरुगड्डी येथील श्रीस्वामी-

महाराजांच्या चातुर्मासाची सर्व व्यवस्था ते येथे येऊन पोहचण्यापूर्वीच देवांनी मोठ्या प्रेमाने करून ठेवली होती.

श्रीस्वामीमहाराज ! आपण अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक राजाधिराज श्रीसद्गुरुनाथमहाराज आहात ! आपण निखिल भूमंडळातील सर्वश्रेष्ठ असे परमहंस परिव्राजकाचार्य आहात ! आपण साक्षात् पूर्ण ब्रह्म असून आपल्या रूपाने जणूकाही अमृताची मूर्तीच साकार झाली आहे ! आपण आमच्या हृदयसिंहासनाधीश्वर श्रीसद्गुरुनाथमहाराजांचे सद्गुरू आहात ! आपला अखण्ड जयजयकार असो !

श्रीस्वामीमहाराज ! ! आपण शक्तिपाताचार्य आहात ! आपण आपल्या कृपेच्या म्हणजे शक्तिपाताच्या अपारावार अशा लोकोत्तर सामर्थ्याने शिष्यदेहात शक्तिसंक्रमण करून जीवाचे ब्रह्म करणारे, जीवाला मायागौरीपासून आलेला जीवपणाचा आळ घालवून टाकून त्याला निजपदापलीकडील आनन्दाचे साम्राज्य देऊन कृतार्थ करणारे, कृपेच्या उजेडामुळे संसाराचे चक्र तोडून टाकणारे, दृश्य मायेचे चक्र भस्म करणारे आणि कृपादीपाने संसाराचे साकडे तोडून टाकणारे निजसाध्यदायक, निगमागमप्रतिपाद्यविश्रांतिपददायक व अद्वैतरूप महावस्तुप्रदायक असे स्वानंदसम्राटच आहात ! आपण श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वरूप असून कलियुगात जन्मलेल्या आणि कलीने गिळल्या जाणाऱ्या आमच्या सारख्या जडमूढ जीवांचा उद्धार करण्याकरिताच "योगिराज" या नावाने या भूतलावर अवतार धारण करून आमच्या श्रीसद्गुरुनाथमहामहाराजांच्या रूपाने आम्हाला सिद्धयोगान्तर्गत शक्तिपातयोगाची दीक्षा देऊन आमचा अनादि संसारभ्रम, जगत्स्वप्न, दुष्ट संस्कार, वासना, रावणरूपी भोगवासना व समस्त बंधने छिन्नभिन्न करणारे साक्षात् श्रीरामच असल्यामुळे "श्रीसमर्थरामदासस्वामीमहा-

राजांनी" "सगुणध्यान" या प्रकरण ग्रंथात जे श्रीरामाचे सगुणध्यान वर्णिले आहे, ते आपलेच आहे या दृढ श्रद्धेने ते वर्णन करून, त्यात वर्णन केल्याप्रमाणे "नामें तुटे देहबुद्धि" या न्यायाने "श्रीवासुदेव" या नामाचा आश्रय घेऊन कृतार्थ व्हावे म्हणून आपण आम्हा सर्वांना "श्रीवासुदेवाय नमः" हा बीजमंत्र देऊन कृतार्थ करावे अशी आपल्या परमपवित्र व परमकोमलचरणी प्रार्थना करीत आहोत.

रामाचेनि स्वामीपणें। मी ब्रह्माण्ड मानीं ठेंगणें।
त्रैलोक्यही वाटें उणें। महिमा वर्णितां ॥१०५॥
राम सर्वांगें सुंदर। राम करुणेचा सागर।
दीन अनाथांचा उद्धार। श्रीराम कर्ता ॥ १०६ ॥
राम जीवींचा जिव्हाळा। राम मनींचा कोवळा।
राम जाणे अंतरकळा। निजदासांची ॥ १०७ ॥
राम पुण्यपरायण। राम त्रैलोक्याचा प्राण।
रामें दास बिभीषण। चिरंजीव केला ॥ १०८ ॥
राक्षस केले देशधडी। देव सोडिले तेहतीस कोडी।
राज्यीं स्थापिले आवडीं। शरणांगत ॥ १०९ ॥
राम सुरवरां कोंवसा। राम मंडण सूर्यवंशा।
रामजप भवानीशा। सप्रचीती रामनामें ॥ ११० ॥
नामें तरले पाषाण। नामें पतित पावन।
नामें मुक्त विश्वजन। शिवाचे उपदेशें ॥ १११ ॥
शुकमिषें रामवाणी। म्हणतां पावन कुंटिणी।
अंतकाळीं सकळ प्राणी। रामनामें उद्धरती ॥११२॥
हो कां ज्ञाते विरक्त भक्त। हो कां साधु जीवन्मुक्त।
हो कां भाविक साबडे भक्त। नामेंविण वृथा ॥ ११३ ॥

सकळांमध्यें थोर। तो नाम जपे शंकर।
तेथें मानव किंकर। बापुडे किती ॥ ११४ ॥
नामें होय चित्तशुद्धी। नामें तुटे देहबुद्धी।
नामें होय कार्यसिद्धी। निजध्यासें ॥ ११५ ॥
नामें स्वहित फावे। नामें निश्चयो दृढावे।
नामस्मरणें शीघ्र पावे। देवाधिदेव ॥ ११६ ॥
ऐसें हें रामनाम। परमगुह्य विश्रामधाम।
मंथूनि काढिलें वर्म। शतकोटीचें ॥ ११७ ॥

श्रीस्वामीमहाराज !!! आपण आम्हाला आपल्या सुमधुर नामाची शब्ददीक्षा देऊन तद्द्वारा होणाऱ्या शक्तिजागृतीने ब्रह्मरूप करून आपल्या चरणी ऐक्यरूपाने ठाव द्यावा म्हणून "श्रीमद् भागवत महापुराणात" महर्षी श्रीवेदव्यासांनी श्रुतिद्वारा श्रीनृसिंह भगवन्ताची जी प्रार्थना केली आहे तीच आम्ही आपल्या चरणी प्रस्तुत करून व आपला जयजयकार करून आपल्या कृपाशीर्वादाची प्रार्थना करीत आहोत.

हे अजित ! आपला जयजयकार असो ! जयजयकार असो !! खोटे गुण धारण करून चराचरातील जीवांना आच्छादित करणाऱ्या या मायेला नष्ट करा. आपल्या कृपेशिवाय बिचारे जीव या मायेला मारू शकणार नाहीत; मग तिला पार करून जाणे त्यांना कसे शक्य आहे ? आपण सकळ सद्‌गुणांचे सागर आहात असेच सर्व वेद सतत गायन करीत असतात. ॥ १ ॥

हे प्रभो ! ब्रह्मा, अग्नी, सूर्य, इन्द्र इत्यादि देवता आणि हे सम्पूर्ण जगत् जरी भासमान होत असले तरी ते आपल्याहून निराळे नाही. यामुळे अनेक देवदेवतांचे प्रतिपादन करणारे वेदमंत्र त्या विभिन्न देवदेवतांच्या नावाने खरे तर आपल्याच निरनिराळ्या

मूर्तींचे वर्णन करीत असतात. वास्तविकपणे आपण अजन्मा असून त्या मूर्तींच्या रूपाने आपला जन्म होत नाही. ।। २ ।।

हे भगवन् ! सर्व वेद आपल्या सद्‌गुणांचेच वर्णन करतात. याकरिता संसारातील सर्व विद्वान् लोक आपल्या मंगलमय व कल्याणकारी गुणांचे श्रवण, स्मरण इत्यादींच्या द्वारा आपल्यावरच प्रेम करतात आणि आपल्या चरणकमलांचे स्मरण करून समस्त क्लेशांपासून मुक्त होतात. ।। ३ ।।

हे नरहरे ! मनुष्य शरीर प्राप्त केल्यावर जर जीवाने श्रवण गुणवर्णन आणि संस्मरण इत्यादींच्या द्वारा आपले भजन केले नाही तर जीवांनी श्वासोच्छ्‌वास करणे हे फुंकणीप्रमाणे सर्वथा व्यर्थ आहे. ।। ४ ।।

हे नारायणा ! जे लोक ऋषी व मुनींनी सांगितलेल्या पद्धतींनी उदरादि स्थानांच्या ठिकाणी आपले चिंतन करतात त्यांचे मृत्यूचे भय आपण दूर करता. अशी कृपा करणाऱ्या व आमच्या हृदयात म्हणजे आज्ञाचक्रात निवास करणाऱ्या प्रभूची आम्ही अखंड उपासना करतो. ।। ५ ।।

हे परमेश्वरा ! आपण स्वतःच निर्माण केलेल्या कार्यांमध्ये म्हणजे पिंडब्रह्माण्डामध्ये कमीअधिक किंवा श्रेष्ठकनिष्ठ भावरहित व सर्वत्र परिपूर्ण असलेल्या आणि या रूपात अनुभवाला येणाऱ्या निर्विशेष सत्तेच्या रूपाने स्थिर अशा आपले भजन आम्ही अहर्निश करतो. ।। ६ ।।

हे माझ्या परमानन्दरूप स्वामी ! मी आपला अंश आहे. आपणच आपल्या चरणकमलांची सेवा माझ्याकडून करवून घेऊन आपल्या मायेच्या द्वारा निर्माण केलेल्या बन्धनांची निवृत्ती करा. ।। ७ ।।

हे करुणासागर प्रभो ! काही काही अगदी विरळे असे शुद्धान्त-करणाचे महापुरुषच आपल्या अमृतमय कथासमुद्रात विहार करीत परमानन्दात निमग्न राहतात आणि धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारही पुरुषार्थांचा गवताप्रमाणे त्याग करतात. ॥ ८ ॥

हे दीनदयाघन प्रभो ! आपण जगताचे स्वामी आहात. या जीवनातच माझे मन आपल्या ठिकाणी रमून जाऊ देत. हे माझ्या स्वामी ! अशा प्रकारे आपल्यात रममाण होण्याचे सौभाग्य प्राप्त करून देणारा मनुष्यजन्म केव्हा बरे मिळेल ? ॥ ९ ॥

हे देवा ! आपल्या चरणांचे उत्कट प्रेमाने स्मरण करणे अत्यन्त दुर्लभ आहे. हे नृसिंहा ! कोणत्याही प्रकाराने का होईना, आपल्या चरणांचे स्मरण मला रात्रंदिवस राहावे हीच माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे. ॥ १० ॥

हे अनन्ता ! कोठे बुद्धी इत्यादि परिच्छिन्न उपाधींनी घेरलेला मी आणि कोठे मन, वाणी इत्यादींना अगोचर असे आपले स्वरूप ! ( खरोखर आपल्या स्वरुपाचे ज्ञान होणे हे फार कठिण आहे. ) याकरिता हे दीनबन्धू ! दयासिन्धू ! नरहरी देवा ! ! आपण मला आपली भक्तीच द्या. ॥ ११ ॥

हे अनन्त महिमाशाली प्रभो ! जे मंदमती पुरुष खोट्या तर्कांच्या द्वारा प्रेरित होऊन अत्यन्त कर्कश वादविवादाच्या घोर अन्धकारात भटकत राहतात, त्यांना आपल्या ज्ञानाचा मार्ग स्पष्टपणे समजणे कधीही शक्य नाही. याकरिता माझ्या जीवनात अशी सौभाग्याची वेळ केव्हा येईल की, जेव्हा मी श्रीमन्माधव, वामन, त्रिलोचन, श्रीशंकर, श्रीपते, गोविंद, मधुपते इत्यादि मधुर नावांचे उच्चारण करून आपल्याला हाका मारीत मुक्त होईन. ॥ १२ ॥

हे जगन्नाथ प्रभो ! स्वरूप, नाम आणि आकृती यांच्या रूपाने हे सर्व जगत् असत्य आहे. असे असले; तरी आपल्या ज्या अधिष्ठान सत्तेच्या सत्यतेने हे सत्य आहे असे भासत राहते आणि या असत्य प्रपंचात ज्या सत्यरूपाने आपण नेहमी प्रकाशमान राहता त्या आपल्या अनन्ताचे आम्ही भजन करतो. ॥ १३ ॥

हे सर्वशक्तिसंपन्न स्वामी ! लोक पंचाग्नी साधनादि तापांनी तप्त झाले, त्यांनी पर्वतावरून उडी टाकून आत्मघात करून घेतला, त्यांनी तीर्थाटन व वेदपठण केले, यज्ञांच्या द्वारा यजन केले आणि भिन्न भिन्न मतवादांच्या द्वारा आपापसात वादविवाद केला; तरी हे प्रभो ! आपल्या कृपेशिवाय कोणीही जीव हा मृत्युमय संसारसागर ओलांडून पार जाऊ शकणार नाही. ॥ १४ ॥

हे प्रभो ! आपण इंद्रियरहित असूनही सर्व बाह्य आणि आन्तरिक इंद्रियांच्या शक्तींना धारण करता. आपण सर्वज्ञ व सर्वकर्ते असून सर्वांना सेवनीय असलेल्या अशा आपल्याला मी नमस्कार करतो. ॥ १५ ॥

हे नृसिंह देवा ! आपल्या सृष्टि–संकल्पाने क्षुब्ध होऊन मायेने कर्मांना जागृत केले. त्यामुळेच आम्हा लोकांचा जन्म झाला आणि आता जन्ममरणचक्रात फिरत राहून आम्ही दुःखी झालो आहोत. हे पिताश्री ! आपण आमचे रक्षण करा. ॥ १६ ॥

हे प्रभो ! श्रुतीने सर्व दृश्यप्रपंचाच्या अन्तर्यामीरूपाने आपलेच गान केले आहे आणि युक्ती किंवा तर्कानेही (आपले गायन करणेच योग्य आहे) असाच निश्चय होतो. त्यामुळे सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् आणि सर्वसौंदर्य–माधुर्यनिधी अशा नृसिंहपुरुषोत्तमाचाच मी मनातल्या मनातच अखंडपणे आश्रय ग्रहण करतो. ॥ १७ ॥

हे जगत्प्रभो ! जीवांसहित हे संपूर्ण विश्व आपल्या ठिकाणी उदित झाल्यावर जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती इत्यादि अवस्थांमध्ये त्याचे भान होऊन ते विलीनही होते. ज्यावेळी श्रीगुरुदेवांची करुणा प्राप्त होते त्यावेळी साधकाला शुद्ध आत्म्याचे ज्ञान होते. ज्याप्रमाणे नदी समुद्रात विलीन झाल्यावर त्याच्याशी पूर्णपणे समरस होते त्याप्रमाणे सर्व पिंडब्रह्मांडादींचा ज्याच्या ठिकाणी आत्यंतिक प्रलय होतो त्या त्रिभुवनगुरू श्रीनृसिंह भगवन्ताची मी आपल्या हृदयात भावना करतो. ॥ १८ ॥

हे नृसिंहा ! संसारचक्राच्या आऱ्यामुळे या जीवाचे तुकडे तुकडे होत असून नाना प्रकारच्या सांसारिक पापांच्या धगधगत्या ज्वालामध्ये तो जळत असतो. त्यामुळे हा आपत्तिग्रस्त जीव अकस्मात् आपल्या कृपेने आपल्या चरणी शरण आला आहे. आपण त्याचा उद्धार करा. ॥ १९ ॥

हे परमानन्दमय गुरुदेव ! भगवन् ! ज्यावेळी माझे मन आपल्या चरणकमली स्थान प्राप्त करील त्यावेळी माझी आपल्या कृपेने समस्त साधनांच्या परिश्रमापासून सुटका होऊन मी परमानन्द प्राप्त करीन. ॥ २० ॥

हे सदानन्द प्रभो ! जे लोक आपले भजन करतात त्यांच्यासाठी आपण स्वतःच साक्षात् परमानन्दचिद्घन आत्मा आहात. त्यामुळे स्त्री, पुत्र, धन इत्यादि तुच्छ गोष्टींचे त्यांना काय प्रयोजन आहे ? ॥ २१ ॥

हे दीनबन्धो ! मी शरीर आणि त्याच्या नातेवाईकांची आसक्ती सोडून रात्रंदिवस आपलेच चिंतन करीन आणि जेथे जेथे निरभिमान सन्त निवास करतात त्या त्या आश्रमात राहीन. त्या सत्पुरुषांच्या

मुखकमलातून निघालेल्या आपल्या पुण्यमय कथामृताच्या नदीच्या प्रवाहात दररोज स्नान करीन आणि हे नृसिंहा ! पुन्हा कधीही मी या देहाच्या बंधनात पडणार नाही. ॥ २२ ॥

हे जगन्नियंत्या प्रभो ! माळेच्या रूपाने दिसणाऱ्या व सर्पाप्रमाणे सत्यस्वरूप भासणाऱ्या या त्रिभुवनाचा उदय झालेला असला; तरी हे त्रिभुवन सत्य नाही. खोट्या सोन्याची बाजारात चलती झाली; तरी ते खरे असत नाही. जगत् सत्य नाही असेच वेदांचे तात्पर्य आहे. याकरिता हे इन्दिरावन्दित श्रीहरे ! आपले जे परमसत्य व परमानन्दस्वरूप सुंदर असे अद्वैत पद आहे त्याला मी वन्दन करतो. मी शरणागत असून आपण मला सोडू नये. ॥ २३ ॥

हे करुणासागर प्रभो ! सोने हे मुकुट, कुण्डल, कंकण किंवा किंकिणीच्या रूपात परिणत झाले; तरी खरे पाहिले असता ते सोनेच असते. हे नृसिंहा ! अशा प्रकारेच महतत्त्व, अहंकार, आकाश, वायू इत्यादींच्या रूपाने उपलब्ध होणारे हे सम्पूर्ण जगत् खरे तर आपल्यापासून भिन्न नाही. ॥ २४ ॥

हे प्रभो ! आपली ही माया आपल्या दृष्टीच्या प्रांगणात नाचत असून ती काळ, स्वभाव इत्यादींच्या द्वारा सत्त्वगुणी, रजोगुणी आणि तमोगुणी अशा अनेकानेक भावांचे प्रदर्शन करीत आहे. त्याप्रमाणेच ही माया माझ्या मस्तकावर चढून माझ्यासारख्या मोहातुर माणसाला मोठ्या बलपूर्वक तुडवीत आहे. मी आपल्याला शरण आलो आहे. आपणच या मायेला दूर करावे. ॥ २५ ॥

हे भगवन्ता ! मी दंभपूर्ण अशा संन्याशाचा बहाणा करून लोकांना फसवीत आहे. एकमात्र भोगाच्या चिन्तेनेच मी अत्यंत आतुर झालो असून, रात्रंदिवस नाना प्रकारचे उद्योग करून,

त्यामुळे येणाऱ्या थकव्याने व्याकूळ व भानरहित होत आहे. मी आपल्या आज्ञेचे उल्लंघन करीत असल्यामुळे खरे तर अज्ञानी आहे आणि अज्ञानी लोक माझा जो सन्मान करतात त्यामुळेच "मी सन्त आहे," अशी मला घमेण्ड झाली आहे. हे दीनानाथा! हे दयानिधाना! हे परमानंदा! आपण माझे रक्षण करा. ॥ २६ ॥

हे माधवा! आपण मला एकदा आपल्या स्वरूपाची अनुभूती करून दिली म्हणजे मग पुन्हा मला सुखदुःखाच्या संयोगाची स्फूर्ती होणार नाही. किंवा आपण मला आपल्या गुणांचे श्रवण व वर्णन करण्याचे प्रेम द्या म्हणजे मी विधिनिषेधाचा दास होणार नाही. ॥ २७ ॥

हे अनन्ता! आपला अन्त ब्रह्मादि देवता जाणत नाहीत, आपणही जाणत नाही आणि वेदांचे मुकुटमणी उपनिषदेही जाणत नाहीत; कारण की, आपण अनन्त आहात! उपनिषदे "नमो नमः" व "जयजयकार असो, जयजयकार असो," असे म्हणून स्तब्ध होतात. याकरिता मीही "नमो नमः," "जयजयकार असो, जयजयकार असो," असे म्हणून आपल्या चरणकमलांची उपासना करतो. ॥२८॥

श्रीस्वामीमहाराज!!! आपली चरित्रकथा ही परमश्रेष्ठ व परमपावन अशी श्रीनर्मदा महानदीच आहे. ज्याप्रमाणे श्रीनर्मदा महानदीच्या पानाने साधकाला वैराग्य प्राप्त होते त्याप्रमाणे आपल्या या चरित्रकथेच्या वाचनाने साधकाला साधन चतुष्टयातील "वैराग्य" ही महान् अशी साधनसंपत्ती प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाही. आपल्या या अमर जीवनकथेत सामाविलेला वैराग्यपूर, आपले अनन्यतम भक्तश्रेष्ठ, सच्छिष्य व आमच्या हृदय-सिंहासनावर अखंडपणे अधिष्ठित झालेले आमचे सद्गुरुनाथ

श्रीवामनहृदयी सामाविलेला होता. त्यांनी माझ्या सारख्या त्यांच्या चरणरजसेवकाला "तरी विरक्तीवांचूनि कहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं ।। ज्ञानेश्वरी १५-३६ ।। " हा सिद्धान्त, श्रीस्वामीमहाराजांच्या कितीतरी कथा, शब्दाने व कृतीने सांगून मला वैराग्याच्या पुरात पूर्णपणे बुडवून धन्य केलेच; परन्तु इतरही जनांना या वैराग्य कथेचा लाभ व्हावा म्हणून तिचे या स्वरूपात माझ्याकडून प्रकटीकरणही करवून घेतले. खरोखर ! जो कोणी साधक या परमपवित्र कथेचे वारंवार वाचन करील तो साधक ज्ञानप्राप्तीसाठी व ज्ञानधारणे-साठी योग्य ठरेल यात काहीच शंका नाही. या घोरतम कलियुगात आपल्या चरित्रकथेचे निरंतर वाचन हेच वैराग्यप्राप्तीचे सर्वात् मोठे सुलभ साधन आहे. या वैराग्यप्राप्तीसाठीच श्रीसमर्थरामदासस्वामी-महाराज यांच्या शब्दात अल्पसा बदल करून आम्ही आपल्या चरणी अशी प्रार्थना करतो की–

वासुदेवा तुझा वियोग। ऐसा नको रे प्रसंग।
तुजकारणें सर्व संग। त्यक्त केला ।। १ ।।

वासुदेवा तुझिये स्वामीपणें। मी हें ब्रह्माण्ड मानीं ठेंगणें।
स्वामी तुजवीण कोण जाणें। अंतर आमुचें ।। २ ।।

तुजवीण मज माया। कांही नाहीं रे वासुदेवा।
आम्हां अनाथा कासया। उपेक्षिसी ।। ३ ।।

तुज समुदाय दासांचा। आम्हांसि स्वामी आणिक कैंचा।
तुजकारणे जिवलगांचा। संग सोडिला ।। ४ ।।

सगुण वासुदेव मुद्दल। माझें हेंचि भांडवल।
कास धरूनि टाकीन पैल। पार भवाचा ।। ५ ।।

या दृष्टीनेच आपले परमभक्त व पूर्वाश्रमातील धाकटे बन्धू श्रीसीताराममहाराज यांनी स्वतः एका पदात वर्णन केल्याप्रमाणे " विषयापासुनी मन फिरवोनी दत्तस्वरूपीं ठेवावें ।।," या न्यायाने आम्हा सर्वांना आपल्या चरित्ररूपी संगतीत नित्य राहण्याची सद्-बुद्धी होऊन आम्हाला आमच्या धारणाबलाप्रमाणे वैराग्य प्राप्त होऊन आम्ही सर्वजणांनी ईश्वरभजनात रंगून जावे म्हणून आपल्या चरणी आपल्या परमभक्ताच्या शब्दांनी प्रार्थना करून आपले श्रीसद्‌गुरुरूपाने ध्यान व नमन करून आपल्या परमश्रेष्ठरूपात स्थिर राहण्याचा प्रयत्न करीत आहोत.

सद्‌गुरुचरणीं रत हो मनुजा मार्ग सुलभ तुज कथितों रे ।। ध्रु. ।।
मानवदेह मोठा दुर्लभ पुन्हां नये बा तुजला रे ।
निशिदिनीं सज्जनसंग धरुनिया मुक्तिपदावर जावें रें ।। १ ।।
यमनियमादिक प्रथम साधुनी आसन सुस्थिर राखावें ।
रेचकपूरक गुरुमुखें जाणुनि वायुनिरोधन साधी रे ।। २ ।।
विषयापासुनी मन फिरवोनी दत्तस्वरूपीं ठेवावें ।
त्रिमूर्ति षड्‌भुज काषायांबर ध्यान हृदयिं तव स्थिर करि रे ।।३।।
तत्त्वमसीति श्रुति वाक्याचें विवरण करुनी पाही रे ।
निवान्तदीपस्थितिवत् मन हें होतां स्वरूप प्रगटे रे ।। ४ ।।
सेवा करितां गुरुचरणाची होईल प्राप्ती स्वरूपाची ।
स्वानुभवानें सीताराम हा कथितो हृद्‌गुज तुजसी रे ।। ५ ।।

## ।। श्रीसद्‌गुरुध्यान ।।

वासुदेवाय दत्ताय गुरवे ब्रह्मरूपिणे ।
नमोऽस्तु देवदेवाय भवदुःखविनाशिने ।। १ ।।

वेणुदण्डं तु दक्षेण सव्येन च कमण्डलुम् ।
दधानं वासुदेवाख्यं दत्तरूपं नमाम्यहम् ।। २ ।।
ध्यायामि वासुदेवाख्यं दत्तरूपं शिवान्वितम् ।
कौपीनमेखलाशाटीदधानं भस्मभूषितम् ।। ३ ।।
ध्येयः सदा वासुदेवो वेदरूपः सुखात्मकः ।
पादरक्षाहीन काषायाम्बरोभक्तसेवितः ।। ४ ।।
वासुदेवो दत्तरूपः प्रसन्नमुखपंकजः ।
ज्योतिर्वेत्ता वैद्यराजः सदाभक्तार्थंजीवनः ।। ५ ।।

## ।। नमन ।।

नमो गुरु कृपाकरा नमो गुरु गुणाकरा ।।
नमो गुरु परात्परा नमो गुरु महत्तरा ।।
नमो गुरु सनातना नमो गुरु मनोन्मना ।।
नमो गुरु घनाघना नमो गुरु निरंजना ।।

उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क ३
अर्थात्
खण्ड चवथा समाप्त



## ★ सिद्धयोग प्रकाशन ★

२६/२०२ लक्ष्मीनगर, पुणे ९. पिन ४११.००९

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज विरचित स्तोत्र व इतर ग्रंथ

# - स्तोत्रग्रंथ -

(सर्व स्तोत्रग्रंथ मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणांसह आहेत.)

| | | |
|---|---|---|
| १) | नित्यउपासनाक्रम | ४-०० |
| २) | घोरसंकटनिवारणपूर्वक श्रीदत्तप्रीतिकारकस्तोत्र | २-०० |
| ३) | श्रीदत्तात्रेयकवच | २-०० |
| ४) | श्रीदत्तस्तवस्तोत्र | २-०० |
| ५) | अपराधक्षमापनस्तुतिस्तोत्र | ३-०० |
| ६) | मंत्रात्मक श्लोक | ३-०० |
| ७) | चंचलचित्त स्थिर करणारे श्रीदत्तस्तोत्र | २-०० |
| ८) | श्रीदत्तभावसुधारसस्तोत्र | ५-०० |
| ९) | बालाशिष:स्तोत्र | १-०० |
| १०) | श्रीकृष्णालहरी | १०-०० |
| ११) | षट्पंचाशिकास्तोत्र | ५-०० |



| | | |
|---|---|---|
| १) | श्रीसत्यदत्तव्रतपूजाकथा | ५-०० |
| २) | श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार | ५-०० |
| ३) | श्रीदत्तमाहात्म्य | ४०-०० |
| ४) | श्रीगुरुचरित्रत्रिशतीदत्तकाव्य ( सार्थ ) | ३०-०० |
| ५) | प्राकृत वासुदेव मननसार | ३०-०० |

### चरित्र-ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १) | श्रीवासुदेवानंदसरस्वतीटेंबेस्वामीमहाराज यांचे चरित्र (खण्ड पहिला) | ५०-०० |
| २) | ,, ( खण्ड दुसरा ) | ५०-०० |
| ३) | ,, ( खण्ड तिसरा ) | ५०-०० |
| ४) | ,, ( खण्ड चवथा ) | ६०-०० |

